श्री.

# रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक,

## सी. एस्. आय्.

उपाध्यक्ष-रॉयल एशियॅटिक सोसायटी, मुंबई;
सभासद-बेंगॉल एशियॅटिक सोसायटी;
फेलो-रॉयल जिऑग्रॅफिकल सोसायटी
आफ् ग्रेट ब्रिटन व आयर्लंन्ड.
फेलो-स्टॅटिस्टिकल सोसायटी, लंदन;
फेलो, सिन्डिक व डीन-युनिव्हर्सिटी, मुंबई;
सभासद-कायदेकाउन्सिल मुंबई व कलकत्ता;
सरकारी वकील, हायकोर्ट मुंबई,

# यांचें चरित्र.

## भाग २ रा.

गणेश रामकृष्ण हवलदार, बी. ए. एल् एल्. बी. हेड शिरस्तेदार,
हायकोर्ट, अपील शाखा, मुंबई.
होमरकृत इलियडच्या कवितावद्ध भाषांतराचे कर्ते यांनीं लिहिलें.

---

सन १९२७. शके १८४९.

---



---

आवृत्ति पहिली.

---

सर्व ग्रन्थ भाग १ व २ मिळून

---

किंमत साडेतीन रुपये.

# प्रकरण ४५ वें.

# महाबळेश्वर

And short retirement urges sweet return.
( Milton's Paradise Lost. )

॥ अदीर्घकालीनविविक्तवृत्तिः । आवश्यकं स्वादु फलं ददाति ॥
( वरील इंग्रजी कवितेचें भाषांतर. स्वकृत )

**राव**साहेब हवापाण्याविषयीं पहिल्यापासूनच फार काळजी घेत असत. त्यांस **मुं**बईस आल्यावर कधीं कधीं ज्वराची पीडा प्रथम होत असे. तेव्हां ते १८५९ सालापासूनच **वाळ**केश्वरीं रहावयास जात असत. पुढें १८६७ सालाच्या शेवटीं **राव**साहेबांच्या पत्नी व **राव**साहेब या उभयतांच्या प्रकृती बिघडल्या. त्यांच्या पत्नीची नेहमींचीच वायूची विकृति वाढली व **राव**साहेबांचा उजवा हात जड पडूं लागला. आपल्या वकिलीच्या कामाची व्यवस्था **गणपतराव भा**स्कर यांकडे सोंपवून व घरची व्यवस्था नातेवाईकांवर टाकून **म**हाबळेश्वरास सहकुटुंब विश्रान्ति घेण्यास **मार्च** महिन्यापासून जाऊन राहिले. बरोबर वै॥ कुटुंबवैद्य **रामभाऊ गोरे** ( **सा**तारकर ) होते.

**राव**साहेब विश्रान्ति घेणार हें ऐकतांच त्यांचे मित्र **जे**कबसाहेब यांस आनंद झाला. ते त्यांस ३।११।१८६७ च्या पत्रांत म्हणाले:—" तुम्हीं विश्रान्ति घेण्याचें योजिलेंत हें वाचून फार आनंद झाला. आतां श्रम कमी करून पुढील काळाकरतां शक्ति राखून ठेवणें, हें, आतांच सर्व शक्ति खर्च करून पुढील काळीं अगदीं निःशक्त होऊन जाण्यापेक्षां फार बरें आहे.

**तुमच्या आयुष्याची वृद्धि म्हणजे हिंदुस्थानच्या हिताची वृद्धि आहे अशी माझी समजूत आहे. "**

महाबळेश्वर येथील थंड हवा, स्वच्छ लोहांशामिश्र पाणी, शान्तता इ. गोष्टी रावसाहेबांस मानवल्या. पण कुटुंबाची प्रकृति मात्र विशेष सुधारली नाहीं, तरी साधारण बरी राहिली म्हणून उन्हाळयांत तेथें नेहमीं जाण्याचा संकल्प करून तीन बंगले रावसाहेबांनीं विकत घेतले. वाटोळी निरुपयोगी झुडपांची दाटी होती ती साफ करून, कित्येक ठिकाणीं पिळदार वेलींच्या जाळयांनीं वेष्टिलेले मोठाले वृक्ष होते ते तोडून, मधून मधून वाटा केल्या. " त्यापूर्वी आवारांत प्रवेश करून संचार करणाऱ्यास त्यांपासून चांगलाच प्रतिबंध होत असे. कपडे आंगांत घालून फिरल्यास त्यांची खराबी होई. उघडे फिरल्यास अंगास इजा होई. " आवारांत पाण्याचा पुरवठा मुबलक होता, म्हणून तेथें बटाट्यांची लागवड करवीत. कधीं कधीं मधाची पोंवळी वृक्षावर सांपडत. वनशोभा विलक्षण असे. इकडून तिकडे धांवत जाणारे ससे व उडणारे कर्बुरितशरीर पक्षी आढळत. दुपारीं एके ठायीं समूरासमूर वृक्षावर बसून उरावर अर्धचंद्र धारण करणारे चित्रित पृष्ठभागाचे बुलबुलनामक पक्ष्यांचे जोडे मंजुळ ध्वनींत शब्द प्रतिशब्द करीत बसत असत. क्वचित् रात्रीच्या प्रसंगीं तेथील रहिवाश्यांस, व्याघ्र दर्शन देत असे. कधीं कधीं विलक्षण पर्णस्वानित, किंवा दुरून भक्ष्यार्थ हिंडणाऱ्या वनचराचा शब्द कर्णीं पडे; अथवा कृष्णवर्ण तमांत त्याचे डोळे चकाकले असावे, असा भास होई. उंचनीच होणाऱ्या च्छायामय आकृती रात्रीच्या तमांत क्षणीं दृश्य व अदृश्य होत. हें स्थान रावसाहेबांस इतकें मानवूं लागलें कीं ते दरवर्षीं तेथें १८७१ पासून नियमानें जाऊं लागले. पुण्याच्या पुढें टांग्यांतून जावें लागे. तरी वाटोवाट माणसांकरवीं सोय करवून जात असत.

येथें असतां रावसाहेबांना ग्रंथालयाची विशेष उणीव भासूं लागली. एक ग्रंथालय स्थापून तें चालविण्याचे नियम रावसाहेबांनीं तयार केले. मुंबईहून येणारीं वर्तमानपत्रें भेट म्हणून आणून देत.

पहिल्यानें बंगले **रा**वसाहेबांनीं घेतले तेव्हां जी हवेंत शीतलता होती ती जसे तेथें अधिकाधिक बंगले होऊं लागले व त्यांकरतां व रस्त्यांकरतां जंगल तोडण्यांत येऊं लागलें तशी कमी होऊं लागली, असें **रा**वसाहेब म्हणत. तरी "येथील टेंकड्या व दऱ्या खोऱ्या वन्य मधुगन्धानें भरल्या असतां सृष्टिसौंदर्यानें होणाऱ्या आनंदानें आत्मा एकरूप होतो." ( डा. **वे**अर यांस पत्र २३।५।८८. ) दस्ताची रक्कम एकदां भरून ही मिळकत दरवर्षी द्याव्या लागणाऱ्या दस्तापासून मुक्त करून **रा**वसाहेबांनीं घेतली.

**रा**वसाहेबांची आणखी एक हवा खाण्याची आवडती जागा त्यांच्या जन्मग्रामाजवळ एक **आ**सूद म्हणून गांव आहे तेथें होती. तेथील थोडा डोंगर चढल्यावर त्यांच्या कुलस्वामीचें ( श्रीकेशवराजाचें ) *देऊळ आहे. तेथें श्रीच्या सान्निध एक लांकडी बंगला बांधून तेथें **रा**वसाहेब १८७० सालीं जावून राहिले होते. वरतीं इषद् उंच पर्वताचें शृङ्ग, खालीं किंचित् खोल दरी, मध्यें देवालयाच्या सानिध्यानें पवित्र झालेल्या झाडींनें झांकलेला बंगला. अशा परिस्थितींत राहून प्रातःकाळीं पक्ष्याचें मंजु मंजु गान व बागेंतील पाण्याच्या झऱ्याची जल्पना श्रवण करून, दुपारीं भोजनोत्तर ताप हरण करणारे वारे सेवन करून, मधल्या वेळीं आप्तेष्टांच्या दर्शनानें सुख पावून, रात्रौ आश्रमसदृश शान्ततेचें सौख्य भोगून, स्त्रीसमेवत **रा**वसाहेब बहुत आराम पावले.

**ए**प्रिलपासून **मे** महिन्याच्या १३ व्या तारखेपर्यंत या ठिकाणीं **रा**वसाहेब होते. ते कोठेंही असले तरी संस्थानिकाप्रमाणें त्यांचा बेत असावयाचा. **मुं**बईस येतांना बोटीवर कशी व्यवस्था ठेवावयाची तीविषयीं त्यांनीं आपले मित्र **ग**णपतराव **भा**स्कर यांस लिहिलें होतें तें:—एल्फिन्स्टन बोटीच्या कप्तानांला मेहरबानी करून कळवा कीं माझे चाकरनोकर व इष्टमित्र मिळून वीस उतारूंसह **मुं**ब-

* **स**दाशिव **मा**णकेश्वर, सुभेदार प्रांत **जं**जिरे यांनीं दिलेल्या सनदेंत असा मजकूर आहे कीं या अनादिसिद्ध जागृत संस्थानाचा जीर्णोद्धार **धों**डोपंत ( **म**डलिक ) यांनीं केला.

ईस येण्याकरितां येत्या वीस मेला मी हर्णैहून निघणार आहें. बरोबर एक अश्व, एक सवत्स धेनु, व मेण्यासकट आठ भोई इतक्यांची जागा राखून ठेवणें. याच ठिकाणीं पुन्हा एकवार १८७३ सालीं १४ मार्चपासून ३ मेपर्यंत प्रकृतीच्या निमित्तानें रावसाहेब राहिले होते. " प्रकृति अस्वस्थ असल्याचा दाखला घेऊन काम अशेष बंद करून कोडताची रजा घेऊन येथें आलों आहें. वकिलातीचे कामासंबधें येथें कोणी आल्यास त्यास विमुख जावें लागेल. ( गणेशपंत जोशी यांस १५।३।७३ चें पत्र. ) येथें सर्व काळ त्यांनीं वाचनांत घालविला. येथें नेलेल्या ग्रंथांचीं यादी सांपडते तींत ११० ग्रंथाचीं नांवें आहेत. तेवढीं सर्व देऊन ग्रंथविस्तार करणे नलगे. त्यांचें थोडक्यांत वर्णन दिलें म्हणजे झालें. त्या ग्रंथांत पुराणें, संहिता, सूत्रें, स्मृती, इत्यादि धर्म शास्त्रावरील ग्रंथ; संस्कृत काव्यें; उपनिषदें; भाष्यें; व्याकरणें; कोश; कायद्याचीं विशेष पुस्तकें व भगवद्गीता अशीं होतीं.

अगदीं स्वस्थ बसण्याचा त्यांचा मानस होता. परंतु सार्वजनिक कामास वाहून घेतलेल्या मनुष्यास तसें कसें बसवणार ! त्यांनीं एक रत्नागिरीच्या कलेक्टरकडे अर्ज केला होता. त्यांत ( १ ) कोणत्या रस्त्यांची दुरुस्ती व्हावयास पाहिजे तें सांगून त्या कामाकडे थोडे थोडे रुपये खर्च करून लोकल फंडाची सार्थकता करावी; ( २ ) आंजर्लें, आडें व केळशी येथील तरींवर तराफ्यांची व्यवस्था करण्याचें विचारांत घ्यावें; ( ३ ) त्याचप्रमाणें घाट, घाट्या व पूल वगैरे मोठालीं कामें जीं विशेष खर्चानें तयार झालीं असतील तेथें रहदारीची फी ठेवणें न्याय्य आहे, तशी हर्णैकडील सडकेची स्थिति नसून या सडकेवर गिमवणेंनजीक एका ठिकाणीं दस्तुरी ठेवली आहे ती विचार केला तर न्याय्य नाहीं असें लक्षांत येईल. कारण थोडक्या जागेंतील लोकांवर हा एक जातीचा भारी कर आहे असें म्हटलें तर चिंता नाहीं. तर समयीं व्यापार हयात असता तर गोष्ट निराळी, परंतु इकडील लोक कृषिकर्मावर निर्वाह करणारे असून त्यांस व्यापाराची गोडी लागावी म्हणून सरकार

झटत आहे, त्या उद्देशास अल्प कारणासाठीं असले त्रास देणारे कर उलट बाध आणतात. त्यासाठीं हा रहित होण्याचा विचार ध्यानांत येईल तर बरें ईत्यादि नम्रपणें सुचविलें होतें.

याशिवाय रावसाहेबांनीं आपल्या पुणें येथील वडिलार्जित ठिकाणांत घर बांधून ठेविलें होतें तेथें जाऊन शेवटीं शेवटीं एक दोनदां राहिले होते.

वळगें मुक्कामीं एक घर त्यांनीं बांधविलें. येथें पाणी फार सुन्दर आहे; स्थान अगदीं विविक्त आहे. याशिवाय दापोलीसही बंगले घेऊन ठेविले होते.

---

## प्रकरण ४६ वें.

# बडोदें.

—०—

। अत्युच्छ्रिते मंत्रिणि पार्थिवे च ।
॥ विष्टभ्य पादावुपतिष्ठते श्रीः ॥
। सा स्त्रीस्वभावादसहाभरस्य ।
॥ तयोर्द्वयोरेकतरं जहाति ॥ १ ॥

( मुद्राराक्षस )

बडोदें संस्थान हें हिंदी लोकांचें व हिंदी वर्तमानपत्रांचें लाडकें आहे. खंडेराव महाराजांच्या निधनानंतर मल्हारराव हे कैदखान्यांतून एकदम राज्यपदारूढ झाले, तेव्हांपासून देशी वर्तमानपत्रें व हिंदी लोक विशेषतः मुंबईचे लोक, यांचे सारखें लक्ष या संस्थानानें आपलेकडे वेधून घेतलें आहे.

रावसाहेबांचे मनांत हिंदी संस्थानिकांविषयीं पूर्ण सहानुभूति असे. त्यांची स्थिति पाहून रावसाहेबांस वाईट वाटे. " हल्लींचा बोलावयाचा मुख्य विषय

---

रावसाहेब १८६७ सालीं बडोद्यास गेले होते. बरोबर मि. वुड होते. हेतु आराम वाटावा असा होता ( १९।१२।६७ रो. )

एक बडोदें सरकार, होय, व दुसरा म्हटला म्हणजे कोल्हापुरच्या गादीचा वारसा हा होय. इतके राजे मृत झाले आहेत कीं राजपालकांच्या नेमणुकींचा रोज धडाका सुरू आहे" ( ३-५-१८७१ चें ज. जेकब यांस पत्र )

"हिंदी संस्थानिकांविषयीं माझें धोरण एकच आहे. तें त्यांचें संरक्षण करून त्यांची सुधारणा करणें, हें होय. ( ४-९-८४ चें आप्पा आठल्ये यांस पत्र. )

मधून मधून रावसाहेब बडोद्याचे दिवाण होणार अशा भूमिका उठविण्यांत येत. "या जागेवर काम फार पडेल असें वाटतें. मला त्याची मुळींच काळजी वाटत नाहीं. माझा स्वभाव राजाला जसजसा कळत जाईल तसतसा तो माझा द्वेष करीत नाहींसा होईल कारण माझ्या अंगांत कॉन्सरव्हेटिझम फार आहे. काय पंचाईत पडेल ती रेसिडेन्टची×××कधीं कधीं खटके उडतील. मला सरकारचा पाठिंबा मिळेल आणि माझ्या अटी पाळल्या जातील तर घोटाळा दुरुस्त करून चांगली व्यवस्था करण्याचें पाहीन." ( एका इंग्रज मित्रास पत्र ). रावसाहेबांच्या अटी पाळणें संस्थानिकांस शक्य नव्हतें व त्याबरोबर त्यांची दिवाणगिरीवर नेमणूक होणें शक्य नव्हतें. तेव्हां नुसत्या विचारापलीकडे गोष्ट गेली नव्हती. नंतर पुढें नेमणूक दादाभाई नवरोजींची झाली. हे पूर्ण रावसाहेबांच्या पक्षाचेच होते.

दादाभाई यांची कारकीर्द यशस्वी व्हावी अशी रावसाहेबांची फार इच्छा होती. त्याचप्रमाणें दादाभाईसुद्धां संस्थानांतील काम उत्तम चालावें म्हणून त्या कामावरील नेमणुकांसंबंधीं कांहीं सल्ला रावसाहेबांची घेत असत. ८-१-७४ च्या दादाभाईस लिहिलेल्या एका पत्रांत तेथील सर्व खात्यांची रचना काय आहे त्यासंबंधीं माहिती रावसाहेबांनीं मागवली होती. ती मुख्यतः अशीः—" १ तुमचे जिल्हे, तालुके व महाल किती ? २ मुलकी आणि न्याय खातीं निराळीं करणार काय ? ३ कांहीं मध्यवर्ती नवीं खातीं काढणार कीं काय ? ४ पेन्शनासंबंधें रकमा भरून ब्रिटीश अमलांतील कांहीं चागलीं माणसें मिळावीं म्हणून अर्ज करणार कीं काय ?"

रावसाहेबांनीं शिक्षण, मुलकी, जंगल व न्याय इत्यादि इंग्रजी अम्मलांतील

खात्यांतील बऱ्याच लोकांची शिफारस केली होती. त्यांत कामाचा अनुभव, प्रामाणिकपणा, करारीपणा, व हुषारी हेच गुण लक्षांत घेतलेले होते. १५–१–७४ च्या पत्रावरून असें दिसतें कीं, दादाभाईनीं रावसाहेबांस मुख्य जज्ज होण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति केली होती. परंतु ते म्हणाले कीं माझ्या वेळाची किंमत तुम्हांला फार पडेल; तितका बोजा स्टेटवर घालणें प्रशस्त नाहीं. तेथें न जाण्याचें दुसरें कारण असें दिसतें कीं, " खुद्द बडोद्याच्या अधिपतीची जी स्थिति होती तिच्याहून त्याच्या वाटोळे असणाऱ्या लोकांची स्थिति अधिक नीट नव्हती. म्हणून बाहेरून जर उपाय योजले तर त्यांचा गुण ते येऊं देत नाहींत. "

* नाना मोरोजी व महादेव गोविंद रानडे यांसही मिळविण्याचा प्रयत्न दादाभाईनीं केला होता. " रानडे न मिळतील तर ज्याची चांगली वकिली चालत असेल व ज्यावर डोळे मिटून कामगिरी सोंपवावी असा मनुष्य शोधून काढला पाहिजे. " ( २१–१–७४ चें पत्र. )

यानंतर अधिक चांगलीं रजिस्टरें, आवक जावक बुकें, एक महिन्यांत निकालांत न निघालेल्या कामाच्या हिशेबाचीं सर्व खात्यांतील बुकें, जरूर त्या मुलकीं कामाचीं, न्यायाचे कामाचीं, व पोलिसच्या कामाचीं हिशोबी मासिक पत्रकें इंग्रजी पद्धतीवर चालू करण्याविषयीं सूचना रावसाहेबांनीं केली होती.

अशा रीतीनें दादाभाई संस्थानचा गाडा हाकीत असतां मल्हारराव गायकवाड यांस त्यांच्या बरोबर चालावयाचें कार्य झेंपेना व दादाभाईस राजिनामा देण्याची पाळी आली. दादाभाईच्या कारकीर्दीबद्दल रावसाहेबांचें मत चांगलें

* या मुंबईतील प्रसिद्ध प्रभुगृहस्थांच्या बद्दल रावसाहेबांचें मत फार चांगलें होतें. ३५ वर्षें यांनीं सरकारची नोकरी उत्तम रीतीनें केली. त्यांतली भर बंडाचे अमदानींत कांहीं वर्षें पुण्यासारख्या ठिकाणीं केली. रावसाहेबांनीं एका पत्रांत यांचे विषयीं असे उद्गार काढले कीं नानाचे योग्यतेचे लोक हाताचे बोटानीं मोजण्याइतके नाहींत. नामदार गिब्स साहेबांचेंही मत असेंच होतें. " मला नाना मोरोजीचें शील आवडतें. हा भला मनुष्य आहे. "

होतें. " दादाभाई नवरोजी यांची नेमणूक दिवाणाचे जागेवर झाली ती उत्तम होती. जें नांव सालरजंग यांनीं हैदराबादेस कमाविलें किंवा दिवाण बहादूर रघुनाथराव यांनीं त्रावणकोर येथें कमाविलें तेंच दादाभाईनीं बडोद्यांस कमाविलें असतें. " परंतु यावें तितकें यश न येण्याला कारण रावसाहेबांनीं एका पत्रीं असें दिलें आहे:—तेथें नोकरीवर जाण्यापूर्वीं जी नक्की व्यवस्था करून घ्यावयाला पाहिजे होती तशी त्यांनीं करून घेतली नाहीं. तथापि राजिनामा देण्यास तशींच कारणें होतीं असें खात्रीनें सांगतों.

पुढें दिवाण कोण होणार याविषयीं चर्चा सुरू झाली न झाली तोंच एक भयंकर प्रकरण उपस्थित झालें.

" बडोद्यास कर्नल फेरी हे गायकवाड यांच्या दरबारांत इंग्रज सरकारचे रेसिडेन्ट होते. त्यांस विष घालण्याचा प्रयत्न मल्हारराव गायकवाड यांनीं केला. हा इंग्रज सरकाराविरुद्ध केलेला मोठा अपराध होतो म्हणजे ज्या शर्थींवर ते बडोद्याचे राजे मानिले जात होते त्यांचा भंग होतो म्हणून असा प्रयत्न करणें म्हणजे इंग्रज सरकाराविरुद्ध लढाई करण्यासारखें होतें. म्हणून मल्हारराव गायकवाड यांस १४–१–१८७५ रोजीं कैद करण्यांत आलें. "

या आरोपापासून मुक्त होण्याची संधि मल्हारराव यांस देण्याकरितां त्यांची चौकशी कमीशन नेमून करण्याचें सरकारनें ठरविलें होतें. राज्य खालसा करीत नाहीं, व राज्याचा कारभार हिंदी लोकांतील लायक मनुष्यांच्या हातीं देऊं असा गव्हर्नर जनरल यांनीं १४–१–१८७५ रोजीं जाहीरनामा काढला. त्यानें लोकांचीं मनें स्वस्थ झालीं.

पुणें, ठाणें, अहमदनगर, सातारा, वांइ, सोलापूर इ० ठिकाणीं लोकांच्या सभा होऊन वरील जाहिरनामा प्रसिद्ध केल्याबद्दल गव्हरनर जनरल यांचे आभार मानण्यांत आले. पुण्याच्या लोकांनीं सूचना केली कीं कमीशनमध्यें पंच असावयाचे ते मल्हारराव यांच्या दर्जाचे असावे आणि इंग्रज व हिंदी असे न्यायाधीश पंच नेमावे. त्यांत ठाण्याच्या सभेनें रावसाहेबांस पंच नेमावें म्हणून विनंति गव्हर्नर जनरल यांकडे केली होती. नेटिव्ह ओपिनियननें अशी

आग्रहाची सूचना केली होती कीं पंच हे न्यायखात्यांतील अधिकारी असून हायकोर्ट जज्जाहून कमी पायरीचे नसावे. त्यांत युरोपियन व हिंदी या दोहोंचा समावेश व्हावा व या खात्याच्या बाहेरचाच मनुष्य हवा असेल तर सर टी. माधवरावासारखा गृहस्थ घ्यावा.

पंचामध्यें तीन युरोपियन व तीन हिंदी नेमिले गेले. म्हणजे निम्मे हिंदी लोक व निम्मे युरोपियन झाले ते असे:—सर रिचर्ड कौच, कलकत्ता हायकोर्टाचे चीफ् जज्ज; जनरल मीड, म्हैसूर व कूर्गचे कमीशनर; मि. पी. एस. मेलव्हिल, पंजाबचे कमीशनर; श्रीमंत महाराज जयाजीराव शिंदे, अलिजा बहादूर; जयपूरचे महाराज व सर राजे दिनकरराव. यानें लोकांस चांगले वाटलें. मि. स्कोबल व मि. इन्व्हॅरॅरिटी सरकार तर्फे काम चालवीत होते. सारजन्ट बॅलन्टाईन हे विलायतेहून बॅरिस्टर आणले होते. त्यांचे बरोबर शांताराम नारायण, गायकवाड तर्फे काम करीत होते. सर्व पंचाचें एकमत झालें नाहीं. म्हणून मल्हारराव यांस नुसतें पदच्युत करण्यांत आलें. शिंदे सरकार, दिनकरराव व सर रिजर्ड कौच यांचें मत पडलें कीं, आरोप शाबित होण्याइतका पुरावा नाहीं. सार्जन्ट साहेबांनीं मल्हारराव यांस सोडविण्याबद्दल शर्थ करून दाखविली म्हणून मुंबईच्या लोकांनीं त्यांस मानपत्र अर्पण केलें.

पुढें मल्हारराव यांस मद्रासेकडे नजर कैदेंत ठेवण्यांत आलें. तुरुंगांतून गादीवर बसलेले राजे गादीवरून परत तुरुंगांत गेले ही दैवाची लीला होय !

पुढें खंडेराव महाराज यांची स्त्री श्रीमन्त राणी जम्नाबाईसाहेब यांस दत्तकाची परवानगी दिली; व त्यांनीं श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांस विधिपूर्वक मांडीवर घेतलें. तेव्हां मुहूर्त चांगला लागला होता. सर टी. माधवराव यांस श्रीमंत होळकर यांकडून मागून घेऊन त्यांस दिवाण नेमण्यांत आलें. तेव्हां आतांपर्यंत हिंदी जनतेची नाडी मनाचे तप्ततेनें जोरानें उडूं लागली होती ती स्वस्थपणें चालू लागली. एवढेंच नाहीं पण सर्व हिंदी प्रजा लार्ड नार्थब्रुक यांची कृतज्ञपणें तारीफ करूं लागली.

## प्रकरण ४७ वें.

# श्रीमंत सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल यांचा राज्याभिषेक.



। विद्वन्मानसपुष्करांबरमणिः सामन्तभूपावलि- ।
॥ प्रोद्यन्मौलिमहार्घरत्नसुषमाशोणीकृतांघ्रिद्वयः ॥
। राजत्पार्वणशीतरश्मिकिरणन्यक्कारिकीर्त्याश्रयः
॥ कारुण्यैकनिकेतनं विजयते श्रीमान् बडोदेश्वरः ॥ १ ॥

( श्री सयाजीराव गायकवाड सरकार काशीस गेले असतां तत्रस्थ विद्वान् शास्त्रिजनांनीं त्यांस संस्कृतांत मानपत्र दिलें त्यातील एक श्लोक* )

श्रीमंत सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल यांस २८-५-१८८१ रोजीं मोठ्या थाटानें राज्याभिषेक झाला. त्या प्रसंगीं रावसाहेबांस खास आमंत्रण होतें. एकंदर उत्सव एक आठवडा म्हणजे २६ तारखेपासून तो एकतीस तारखेपर्यंत झाला. त्यापैकीं मुख्य दिवशीं व आणखी एका दिवशीं असे रावसाहेब तेथें हजर राहिले होते. आपली व्यवस्था कशी काय झाली आहे ती पाहण्यास पुढें बापूसाहेब आठल्ये यांस पाठविलें होतें. गजानन कृष्ण भाटवडेकर ( सरसाहेबांचे बन्धू ) हे दक्षिणीमंडळीची व्यवस्था ठेवण्याकडे नेमलेले होते.

रावसाहेबांची उतरण्याची विशेष व्यवस्था एका बागेंत केली होती. रावसाहेबांची बडदास्त उत्तम रहावी म्हणून अप्पाजी काशीनाथ निमकर या

*हें मानपत्र बापुदेव शास्त्री यांनीं वाचून दाखविलें.हे बनारस कॉलेजमध्यें ज्योतिष विषयाचे अध्यापक होते. ह्यांस युरोपियन व हिंदी ज्योतिष अवगत होतें म्हणून ह्यांस डा. विल्सन दुसरे केरोपंत म्हणत.

नांवाच्या गृहस्थास मुद्दाम नेमण्यांत आलें होतें. त्यानें बंदोबस्त उत्तम ठेवली असें त्यास रावसाहेबांनीं शिफारस पत्र दिलें त्यावरून दिसतें.

एकंदर बेत छापील कार्यक्रमाप्रमाणें झाला.

| | |
|---|---|
| २६ तारखेस सकाळीं | घोड्याच्या शर्यती. |
| " संध्याकाळीं | दरबार |
| २७ तारीख | खाना |

२८ ,, रोजीं प्रात:काळीं राज्याभिषेक ८–३० वाजतां सशास्त्र झाला. मुंबईच्या गव्हर्नर साहेबांनीं स्वहस्तें राज्याचीं सूत्रें अर्पण केलीं.

या उत्सवांत मेजवान्या, शर्यती, दरबार, प्रदर्शनसमारंभ, गव्हर्नर साहेब व राजेसाहेब यांच्या भेटी व उलटभेटी, जवाहिराचें निरीक्षण, चित्त्याची शिकार, लोकांकरतां सार्वजनिक बाजार, तंजावरकडील वारांगनांचा नाच व गवायांच्या मजलशी हीं रोज चालू होतीं. यांशिवाय डफाच्या थापीवरचे मराठी तमाशे, कसरती खेळ, भांडांचीं भाषणें, गारुड्यांचे खेळ, कळसूत्री बावल्यांचे खेळ, माकडें व आस्वलें यांचे खेळ, फरीगत्क्याचा खेळ, पेहलवानांच्या कुस्त्या, गुरव व होलार यांचें वाद्यवादन, पतंग उडवून त्याबरोबर आकाशांत उडवलेली आतषबाजी व रोषनाई इ. अंगांनीं बडोदा नगरीला द्वारकानगरीचें रूप आलें होतें.

कोणी नजराणा नेऊं नये अशी विनंति महाराजांनीं केली होती. शेवटीं महाराजांची भेट घेऊन उत्सवाच्या दुसऱ्या दिवशीं रावसाहेब परत आले.भेटीचे वेळीं महाराजांची बुद्धिमत्ता पाहून रावसाहेब आनंदित झाले.

" गायकवाड सरकार यांची व माझी मुलाखत झाली. श्रीमंत सयाजीराव महाराज हे तरुण राजे फार होतकरू आहेत. मि. इलियट यांनीं कामगिरी करून ठेविली आहे ती इतकी मोठी आहे कीं पुढच्या पिढीचे लोक त्यांस दुवा देत राहतील. त्यांचा शिष्य सुविज्ञ, सुज्ञ, सुमनस्क, व सावधान झाला आहे. " ( ७–१–८२ चें मि. वेडरबर्न यांस इंग्रजींत पत्र. )

महाराजास उपदेशात्मक लेखी निरोप रावसाहेबांनीं एका स्नेह्याच्या हातीं मुद्दाम पाठविला होता. तो वाचण्यासारखा आहे. “ महाराजांस माझा निरोप कळवा कीं, धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार प्रवर्तक शक्ती आहेत. त्या महाराजांस विदित आहेतच. या चार शक्तींशीं संगत असे चार वर्ग मनुष्याचे केलेले आहेत. ते आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी. यांतलि जो श्रेष्ठ वर्ग आहे त्यांत गणिलें जाण्याच्या लालसेन जनक व भीष्म यांचा उच्च उद्देश मनांत धरूनच काय करावयाचें तें महाराजानीं करावें. ”

श्री सयाजीराव महाराज हे एक तरुण भूपति बाळपणापासून मि. इलियट सारख्या बुद्धिमान् उदार इंग्रज गुरूचे सान्निध्यांत असल्यानें पटाईत झाले होते. बुद्धिमान् हिंदी राजपुत्र खरें इंग्रजी शिक्षण मिळाल्यानें काय करामत करूं शकतात तिचें श्रीमंत सयाजीराव हे मूर्तिमंत उदाहरण आहेत. पौर्वात्य संस्कृतीचें उच्च ध्येय काय आहे तें त्यांस कोणी सांगणारा रावसाहेबांसारखा अधिकृत पुरुष, राजकारणी, समाजधोरणी, ज्ञानी, अनुभवी व महाराजांवर प्रेम करणारा भेटला. त्यांचा उपदेश सत्पात्रीं असल्यामुळें उत्कृष्ट फल देणारा झाला असलाच पाहिजे यांत संशय नाहीं. कारण,

**। पात्रविशेषे न्यस्तं गुणान्तरं व्रजति शिल्पमाधातुः ।**
**। जलमिव समुद्रशुक्तौ मुक्ताफलतां पयोदस्य ॥ १ ॥**

---

## प्रकरण ४८ वें.

# प्रिन्स आफ् वेलस यांचें आगमन.

**ना विष्णुः पृथिवीपतिः**

महाराणी व्हिक्टोरियासाहेबांचे ज्येष्ठ चिरंजीव ( जे त्यांच्या नंतर सातवे एडवर्ड म्हणून गादीवर बसले ते ) युवराजपदारूढ असतां १८७५—७६

सालीं हिंदुस्थानांत आपल्या भावि प्रजेस दर्शन द्यावयास आले होते. त्यांचें स्वागत फार प्रेमभावानें हिंदी लोकांनीं केलें. त्यांस राजेरजवाड्यांकडून मोठमोठे नजराणे त्यांच्या ऐश्वर्याला शोभतील असे लक्षावधि किंमतीचे मिळाले. मुख्य राजे रजवाड्यांच्या भेटी सेक्रेटॅरिएटमध्यें झाल्या. यांच्या आगमनांविषयीं रावसाहेबांनीं सर बार्टल फ्रियर यांस १२।३।७६ चें एक पत्र लिहिलें तें:— "युवराजांच्या आगमनानें लोक खूष व्हावयाला तशींच कारणें आहेत. एवढेंच नाहीं पण त्यांचें वास्तव्य लघुकालिक आहे म्हणून ते तक्रारच करतील, कारण युवराजांचा बहुतेक वेळ व लक्ष हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांनींच आपल्याकडे ओढून घेतलीं आहेत व तसें होणें साहजिक आहे. 'ना विष्णुः पृथिवीपतिः' अशी आमची म्हण आहे. पृथिवीपतीच्या अंगीं श्रीविष्णूचा अंश आहे अशी राष्ट्रीय भावना आहे. म्हणूनच सातासमुद्रांपलीकडील महाराणी साहेबांच्या पुत्राचें दर्शन घेण्याकरतां लाखों मनुष्यांचे थवे घसरले. युवराजांवर देवाची कृपा असो ही प्रार्थना."

"युवराजांच्या या भूमीवरील राजकीय प्रवासांत कांहीं अडचणी येतील अशी मला शंका केव्हांही नव्हती. माझ्या कांहीं विश्वासू मित्रांसमवेत ब्रिटिश इंडियाच्या वाटेल त्या भागांत जाण्याचें मी स्वतः होऊन वेळ पडल्यास केलें असतें." "जोंपर्यंत सरकार न्यायानें वागत आहे लोकांचे खाजगी कारभारांत हात घालीत नाहीं; एलफिस्टन साहेबांची दृष्टि कायम ठेवीत आहे तोंपर्यंत तीळभरही भय मनांत धरण्याचें किंचिदपि कारण नाहीं."

युवराज मुंबईस आल्यावर म्युनिसिपल कारपोरेशनकडून जें मानपत्र त्यांस अर्पण करावयाचें होतें तें तयार करण्याकरतां जी एक कमिटी नेमली होती, तिचे सभासद रावसाहेब होते. त्याचप्रमाणें लहान मुलांस मिठाई वांटण्याकरतां एक कमिटी नेमिली होती तिचेही सभासद होते.

पुष्कळ संस्थानिक, राजेरजवाडे, सरदार व श्रेष्ठ लोक यांस आमंत्रणें केलेलीं होतीं त्यांत पुढें दिलेल्यांचा समावेश होता.

हैदराबादचे निझाम सरकार; इंदूरचे होळकर सरकार; बडोद्याचे गायक-

वाड सरकार; कोल्हापूरचे छत्रपति; काठेवाड व कच्छ या प्रांतांतील संस्थानिक, ठाकूर व नबाब व राव; दक्षिण महाराष्ट्रांतील सर्व संस्थानिक; सर दिनकरराव; बोहरी लोकांचे मुल्लां; पवार, मुतालिक, प्रतापराव, गुजर, अमात्य, पंडितराव इ० इ०

कोल्हापूरच्या महाराजांच्या स्वागतार्थ रावसाहेब स्टेशनवर गेले होते. त्यावेळेस सरकारी अधिकारी, रोगे, केशवजी नाईक व बेचरदास अंबाईदास बरोबर होते.

प्रिन्स ऑफ वेल्स मुंबईस आल्यावर जी पौर्वात्य लोकांच्या चालीप्रमाणें चिरकाल स्मृति राहील अशा थाटाची मिरवणूक निघाली होती तींत खुद्द युवराज, गव्हर्नर जनरल व मुंबईचे गव्हर्नर असे एका गाडींत, मग मागें त्यांचा परिवार व मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या गाड्या होत्या. बालराजे श्रीसयाजीराव गायकवाड आपल्या सोन्यारुप्याच्या तोफा घेऊन आले होते. त्यांच्या मागून सरकारी अधिकारी म्हणजे हायकोर्टाचे जज्ज, काउन्सिलर व कांहीं गृहस्थ होते. त्यांत हिंदी गृहस्थ चारच होते. एक रावसाहेब, महमदअली रोगे, अंबाईदास बेचरदास व सरदार पदमजी पेस्तनजी. हा या सर्वांस मोठाच मान मिळाला होता यांत संशय नाहीं.

मुंबईस इतकी गर्दी झाली होती कीं एवढ्या मुंबईंत एक पाहुणे युवराज आले पण त्यांबरोबर घरोघर दर बिऱ्हाडांत एक एक तरी पाहुणा बाहेरगांवाहून मजा पहावयास आलेला होता.

दीपोत्सव छान झाला. भेटी परतभेटी झाल्या. भेटीचे वेळीं युवराजांनीं खडी ताजीम देऊन आपल्या हातानें पानसुपारी दिली.

परतभेटीचा समारंभाचा पृथक्पणें लाभ कांहीं राजांसच मिळाला. त्यांत सालरजंग, म्हैसूरकर महाराज, कच्छचे राव, छत्रपति, गायकवाड, व उदेपूरचे महाराज होते. यावेळीं एकमेकांची स्मृति रहावी ह्मणून उंची देहनग्यांचा विनिमय झाला. बाकीच्यांस सेक्रेटॅरिअटमध्यें परतभेट देण्यांत आली. एकंदरींत हा समारंभ अत्यंत संस्मरणीय झाला.

युवराजांच्या आगमनापासून बरेच फायदे झाले. महाराज्ञींच्या नंतर

हे युवराज जगांतील एक अति मोठ्या साम्राज्याचे अधिपति व्हावयाचे होते. कर वसूल करणारा कलेक्टर, न्याय देणारा जज्ज, बंदूकवाला सोजीर, छडीवाला शाळामास्तर, शंकुवाला इंजिनियर इत्यादि सुरळीतपणें राज्यकारभार करणारे, शांतता राखणारे, शिक्षणाचा प्रसार करणारे, रस्ते बांधून देशांत दळणवळणाबरोबर व्यापारवृद्धि करणारे सरकारी अधिकारी, पौर्वात्य देशांत राजनिष्ठेचे अप्रत्यक्ष उत्तेजक उपाय खरे, परंतु प्रत्यक्ष उपाय म्हणजे लोकांच्या पुढें प्रत्यक्ष राजाची मूर्ति उभी पाहिजे. तिचें दर्शन होतांच हे आपले भाविराजे व आपण त्यांची प्रजा या भावनेनें कोट्यवधि प्रजेला आनंद प्राप्त व्हावयाचा होता. १८७२ सालीं *अत्यवस्थ स्थितींत असतां ज्यांच्या आयुर्वृद्धीकरतां हिंदी प्रजेनें येथें बसून प्रार्थना केली त्या राजपुत्रास पुनर्जन्म देऊन परमेश्वर इकडे पाठवीत आहे ही कल्पनाच प्रेमोत्पादक होती. तद्वतच हिंदी संस्थानिकांची व साम्राज्याधिपतींची प्रत्यक्ष ओळख व्हावयाची होती. त्यांच्या वरची निष्ठा अहमहमिकेनें दाखविण्याची संधि त्यांस मिळावयाची होती. त्याचप्रमाणें आपल्या प्रजेच्या राजनिष्ठेचा अनुभव घेऊन त्यांस ममतेनें वागविणें हें आपलें कर्तव्य आहे हें तत्त्व युवराजांस मनावर बिंबवून घ्यावयाचें होतें. दोस्त संस्थानिकांचें प्रेम पाहून त्यांची दोस्ती प्रसंगीं हितप्रद होणारी आहे हें समजून घ्यावयाचें होतें. सारांश इग्लंदच्या पूज्य राजघराण्यांतील प्रजावत्सल युवराजांचें ज्ञान हिंदुस्थानाला झालें व राजनिष्ठ हिंदुस्थानचें ज्ञान युवराजांमार्फत इंग्लंडास झालें. **रावसाहेबांच्या** मतें युवराजांनीं जें जें दर्शनीय तें तें पाहिलें नाहीं—“ युवराज आले व गेले लोकांनीं पूजा केली. युवराजानीं देशांतील दर्शनीयांपैकीं पुष्कळसें पाहिलें कीं नाहीं याविषयीं शंका वाटते. ते फार बुद्धिमान दिसतात. ” ( १३।३।१८७६ चें **जेकब** यांस पत्र. )

*या साम्राज्यावरील संकटप्रसंगीं **मुं**बईच्या नागरिकांनीं परमेश्वराची प्रार्थना **मुं**बादेवीच्या देवळांत एकत्र जमून केली. निमंत्रणपत्रिका **राव**साहेबांच्या सहीनें निघाल्या होत्या. त्यांचे साथिदार सर **मं**गळदास **न**थुभाई, **वि**नायकराव **शं**करशेट **लक्ष्मी**दास **खि**मजी, **रघुनाथ नारायण खोटे, मुरारजी गो**कुळदास, **विनायक वासुदेव** इ० होते.

## प्रकरण ४९ वें.

# दिल्लीदरबार.

। द्रष्टुकामाः सभांचैव धर्मराजंच पाण्डवम् ।
॥ दिग्भ्यः सर्वे समापेतुः क्षत्रियास्तत्र भारत ! ॥
। तत्सदः पार्थिवैः कीर्णं ब्राह्मणैश्च महर्षिभिः ।
॥ भ्राजतेऽस्म तदा राजन्नाकपृष्ठं यथामरैः ॥ २ ॥

( महाभारत सभापर्व. राजसूय यज्ञाचें वर्णन. )

मुंबई इलाख्यांतील निवडक सरदार व नामांकित लोक यांस युव-
ाजाच्या सन्मानार्थ दिल्लीस भरलेल्या दरबाराचें आमंत्रण देण्याचें काम
हिंदुस्थान सरकारानें मुंबईचे गव्हर्नर यांकडे सोंपविलें होतें. गव्हर्नर साहेबां-
ारख्या मोठ्या मनुष्यानें आमंत्रण करावें व तें आमंत्रण ज्यास द्यावयाचें
यानें कांहीं कारणावरून नाकारावें यांत शोभा नसते म्हणून क्वचित् प्रसंगीं
ज्याला आमंत्रण द्यावयाचें त्यास आगाऊ सुचाविण्याची पद्धति असेल ती
माणें रावसाहेबांस एक पत्र पाठवून नामदार गव्हर्नर साहेबांच्या खासगी
ारभाऱ्यांनीं रावसाहेबांस १८७६ च्या आक्टोबर महिन्यांत आगाऊ
वेचारलें कीं जर करतां तुम्हांस दरबारास आमंत्रण करण्यांत आलें तर
याचा फायदा तुम्हांला घेतां येईल किंवा नाहीं तें कळवावें. रावसाहेबांनीं
आमंत्रणाचा स्वीकार करण्यापूर्वी " माझ्या एक दोन अडचणी आहेत त्या
कशा दूर होतील या विचारांत मी आहें. अडचणी काय आहेत तें खासगी
भेटीनें कळवितों " असें खासगी पत्र नामदार वुडहाऊस, मुंबईचे गव्हर्नर,
यांस लिहिलें. त्या अडचणी दूर होतील असें भेटीअंतीं निष्पन्न झाल्यावर
रावसाहेबांनीं आमंत्रणाचा साभार स्वीकार होईल असें कळविलें. त्याप्रमाणें

पुढें रावसाहेबांस सरकारांतून दिल्ली दरबाराचें आमंत्रण आलें व त्यांनीं तें आनंदानें स्वीकारिलें.

दिल्लीस युवराजांचें दर्शन व्हावयाचें होतें तसेंच नानाभूषणभूषित सामंत-मंडलाचेंही दर्शन व्हावयाचें होतें. त्याचें कल्पनातीत वैभव पाहून नयन-साफल्य व्हावयाचें होतें. परंतु याच वेळेला देहसाफल्य करण्याकरतां श्रीकाशी-विश्वेश्वराचें दर्शन घेऊन, गंगास्नान करून येण्याची इच्छा रावसाहेबांस झाली. नाताळची सुटी, दिल्ली दरबार व काशीयात्रा या दोहोंस पुरेशी नसल्या-मुळें हायकोर्टांतील कामासंबंधीं रजा घ्यावी लागली व ती अधिक आनंदानें देण्यांत आली. दिवाणी कामाची तहकुबी मिळाली; परंतु रावसाहेब या वेळेस सरकारी वकील होते. तेव्हां फौजदारी कामाची व्यवस्था सरकारच्या परवानगीनें करण्यांत आली. त्यांनीं आपलीं कामें शामराव विठ्ठल यांकडे सोंपविलीं होतीं. बहुत काल रोगानें जर्जरित व म्हणून परस्वाधीन झालेल्या आपल्या परम प्रिय पत्नीसही काशीयात्रेपासून उत्पन्न होणाऱ्या पुण्याईची वांटेकरीण करण्याकरितां बरोबर घेण्याचा विचार रावसाहेबांनीं केला.

जशी राजाची स्वारी निघते तशीच ही रावसाहेबांची निघाली होती, असें म्हटल्यास बिलकूल अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांनीं दिल्ली येथील अधिका-ऱ्यांस पत्रें देऊन दोन कारकून पुढें पाठविले. मुंबईकरांकरितां नेमिलेल्या जागेवर आपले तंबू मारून सामानसुमान आंत नीट लावून सर्व कुटुंबाची व्यवस्था अगोदर करून ठेविण्याचें काम त्यांच्याकडे सोंपविलें. पहिल्यानें आपल्या पत्नीच्या तैनातीला जरूर तेवढे नोकर ( स्त्रियांपैकीं व पुरुषांपैकीं ) घेतले. शिवाय एक मेणा व तो वाहण्याकरतां सहा भोई घेतले. आचारी, पाणके, दोन घोडेवाले बरोबर घेतले. शिवाय नेहमींचे डाक्तर घेतले. आणखी पांच सहा जवळच्या नात्याची मंडळी व घरांतील देवांची पूजा करणारे गुरुजी घेतले. खलवालदार व खजिनदार वगैरे नोकर घेतले. नेहमींचा नापित सेवक वगळला नाहीं. काशीस जाण्याचा यांचा बेत झाला आहे, चांगली

संधि आली आहे असें समजतांच, यांच्या घरीं कांहीं दिवस बागुलनाथाचें पाणी भरणारा कावडीवाला यानें आपणांस नेण्यास विनंति केल्यावरून त्यासही घेण्यांत आलें. बंगल्याच्या किंवा तंबूच्या बाहेर लावण्याकरतां नांवाच्या रंगविलेल्या पाट्या व दरवाजावरील शिपायांच्या गळ्यांत पट्यांतून अडकविण्याकरितां नांवाचे बिल्ले असल्या डौलाच्या सरंजामांतही कांहीं उणीव भासत नव्हती.

प्रत्येक बरोबर येणाऱ्या माणसाचे बोजे किती व त्यांत वस्तू काय काय होत्या यांची नीट यादी करून घेतली. संसाराला लागणाऱ्या भांड्या कुंड्या पासून मीठ मिर्ची मसाला व धान्य इत्यादि सर्व जिनसा थोड्या वेळच्या बरोबर घेतल्या.

नार्थ वेस्ट प्राव्हिन्सचे लेफ्टनंट गव्हर्नर यांस एक व मध्यप्रांतचे कमीशनर साहेब यांस एक अशीं पोलिटिकल खात्यांतून सरकारीरीत्या शिफारसपत्रें रावसाहेबांनीं १५।१२।७६ तारखेचीं घेऊन ठेवलीं होतीं, त्यांचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें होता-" नेक नामदार रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक मुंबई इलाख्याच्या कायदे काउन्सिलाचे जादा सभासद, दिल्लीस दरबाराला हजर राहून पुढें काशीस जाण्याकरितां निघाले आहेत. या पत्रावरून यांची आम्हीं ओळख करून देऊन म्हणतों कीं ते शिष्टाचाराच्या अनुग्रहास पात्र आहेत." दिवस फार थंडीचे असल्यामुळें इतक्या सर्व मंडळीस लोंकरीच्या कापडाचे कपडे शिंवविले होते. नंतर खाशा मंडळीकरतां दिल्लीपर्यंत फर्स्ट क्लासचा डबा राखून ठेविला होता व १५ तारखेला मुंबईहून निघून दिल्लीस पोहोंचत तोंपर्यंत मुक्काम कोठें व कोणच्या तारखेला करावयाचा व तेथून केव्हां निघावयाचें याबद्दलच्या कार्यक्रमाच्या प्रती छापून तयार ठेविल्या होत्या. वाटेंत जी. आय्. पी. रेलवेच्या मॅनेजरनें रावसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें अलाहाबादेपर्यंत व बनारस पासून पुढें इ. आय् रेलवेच्या व्यवस्थापकानें सोय केली होती.

**नेक नामदार रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचा मुंबईहून बनारस व तेथून अलाहाबादेकडून दिल्लीस व तेथून मुंबईस परत येतांना ठरविलेला प्रवासक्रम.**

| ठिकाण. | निघण्याची वेळा. | पोंचण्याची वेळा. | तारीख. | स्मरणार्ह लिखित. |
|---|---|---|---|---|
| मुंबई | रात्रौ ६ | ... | १८७६ दिसेंबर १५ | जी. आय. पी. रेलवेनें मेलगाडींतून ६ टिकिटांच्या कुटुंबाच्या सोईच्या डब्यांतून. |
| खांडवा | ... | ९-३५ सकाळीं | ,, १६ | खांडव्याला मुक्काम. येथून पुढें जबलपूरकडे जाणाऱ्या दुसऱ्या गाड्या बऱ्याच आहेत. असें दिसतें. निघण्याची तयारी आमची होईल त्याप्रमाणें जबलपुरास आम्हांस नेण्याची सूचना देणें. |
| ,, | १०-५ सकाळीं | ... | ,, १७ | |
| बनारस | ... | ११-१५ सकाळीं | ,, १८ | १८-१९-व २० तारखांस बनारस येथें मुक्काम. |
| 'कित्ता | १०-३० सकाळ | ... | ,, २१ | इ. आय. रेलवेनें स्पेशल ट्रेन काढून तिला जी. आय. पी. रेलवेचा कुटुंबाच्या सोयीचा डबा, ६ टिकिटांचा, मुंबईहून आणलेला जोडणें व शिवाय एक तिसऱ्या वर्गाचा ५ खणी डबा इ. आय. रेलवेचा जोडून घेणें. |
| अलाहाबाद | ... | २-३० दुपारीं | ,, २१ | |
| कित्ता | ९-५ रात्रौ | ... | ,, ,, | मेल गाडी इ. आय. रेलवेचा एक डबा आंघोळीचा व नोकरांकरतां राखलेल्या |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | सोयीचा, पहिल्या वर्गाच्या ७ टिकिटांचा. |
| तुंडला ... | ९-५ सकाळीं | ,, २२ | कित्ता. |
| कित्ता | १०-५० सकाळीं ... | ,, ,, | कित्ता. |
| दिल्ली ... | ६-५ रात्रौ | ,, ,, | |
| कित्ता | ११-३० ... | १८७७ जानेवारी २ | इ. आय. रेलवेचा नवा डबा कुटुंबाच्या सोयीचा, आंघोळीच्या व नोकरांच्या सोयीचा, सात पहिल्या वर्गाचीं टिकिटें काढून परत जाण्याकरतां या तारखेस राखून ठेवणें. |
| अलाहाबाद ... | ६-१० सकाळीं | ,, | ३,४,५,६ जानेवारी १८७७ अलाहाबादेस मुक्काम. येथून सात टिकिटें काढून कुटुंबाच्या सोयीचा, दुसऱ्या तारखेस दिल्लीस ठरविल्याप्रमाणें इतर सोयींचा, ७ जानेवारीला निघण्याकरतां जोडावयाचा. |
| कित्ता | १०-५५ रात्रौ ... | ,, ७* | |
| जबलपूर ... | ८-३० सकाळ | ,, ८ | एक डबा ७ जानेवारीला राखलेला मुंबईस परत जाण्यास |
| कित्ता | ९-१५ सकाळ ... | ,, ९ | |
| मुंबई ... | ११-४५ सकाळ | ,, १० | |

* १८७७ च्या ७ जानेवारी नंतरच्या तारखांत फरक करणें जरूर झाल्यास अलाहाबादेस ३ तारखेस जरूर कळवणें.

जनरल ट्रॅफिक मॅनेजर व घरीं राहून यांचें क्षेम चिंतून मार्गावर डोळे लावून राहिलेले आप्तेष्ट या सर्वांशीं पत्रव्यवहार तारेनेंच होत असे. वाटेंत जास्त मुक्काम करावयाचा झाल्यास आपले डबे सोडवून ठेवीत व पुढें सोईस पडेल त्या गाडीस जोडवीत, व त्या करतां जें जादा हांशील पडेल तें आनंदानें भरीत.

रावसाहेबांनीं पुढें पाठविलेल्या गृहस्थांनीं आग्र्यास जाऊन राव राजे दिनकरराव यांची भेट घेतली व रावसाहेब सहकुटुंब येतात असें त्यांस कळविल्यावर त्यांनीं असें मत दिलें कीं दिल्लीची हवा थंड आहे. आजारी मनुष्यास तेथें न नेणें बरें. कानपूरची हवा उत्तम आहे. प्रयागास ठिकाणाची सोय चांगली आहे.

यावेळीं दिल्लीस "सकाळीं पारा ४० अंशावर असे. दुपारीं ६० अंशावर असे. दिल्ली, जबलपूर, कानपूर व प्रयाग याठिकाणीं उतरण्याची वगैरे सोय राव राजे दिनकरराव यांनीं आपले कारकून पाठवून केली होती.

रावसाहेब प्रथम काशीस गेले. तेथें नित्य रीतीप्रमाणें धर्मादाय झालाच. त्यांत सुमारें २५० विद्वान संन्याशांस मोतीचुराचें भोजन घालून छाट्या अर्पण केल्या. येथील तीर्थविधि सर्व आटोपल्यावर आपल्या पत्नीस कांहीं लव्याज-म्यासह मागें ठेऊन रावसाहेब प्रयागावरून पुढें निघाले.

२३।१२।७७ रोजीं गव्हर्नर जनरल यांची स्वारी मोठ्या थाटानें नगरप्रवेश करणार असा कार्यक्रम होता. त्याप्रमाणें रावसाहेब ता. २२ रोजीं संध्याकाळीं ६–५ वाजतां दिल्लीस हजर झाले.

मुंबईतील शिष्टजन म्हणून रावसाहेबांशिवाय आणखी प्रमुख मंडळी राजनिमंत्रणावरून दरबारला गेली होती. त्यांत खालील मंडळी होती.

श्री विश्वेश्वरनाथ गोस्वामी; सर जमशेटजी जीजीभाई, बॅरोनेट; बैरामजी जीजीभाई; नामदार महंमद अल्ली रोगे; बेचरदास अंबाईदास; प्रोफेसर केरो

लक्ष्मण छत्रे; विनायकराव वासुदेवजी; कमरुद्दीन तय्यबजी; शांताराम नारायण व रघुनाथ नारायण इ०

या दरबाराच्या हकीकतीविषयीं रावसाहेबांनीं केलेलीं त्रोटक टिपणें सांपडतात. “२३ डिसेंबर रोजीं दुपारीं व्हॉईसराय साहेबांची स्वारी निघाली व त्यांचें स्वागत जुम्मामशीदींत झालें. तेथें मी गेलों, त्यावेळीं मजला मुंबईसमाचार, रास्त गोफ्तार व इंदुप्रकाशचे इंग्रजी एडिटर, बेचरदास, बद्रुद्दीन तय्यबजी, शांताराम नारायण, इत्यादि मित्र भेटले. स्वारींतील हत्ती उत्तम रीतीनें शृंगारलेले होते. या समारंभांत सर दिनकररावांच्या मुलाचा स्वतांचा हत्ती होता. सैन्याची सलामी वगैरे देखावा चांगला होता. कांहींनीं या समारंभास पांडवांच्या राजसूययज्ञाची उपमा दिली. लोकांमध्यें हुर्रा शब्द चालू झाला. पुढें सर्व शांतता झाली. दुसऱ्या दिवशीं सादरपणें मी भावनगरचे राजे व गौरीशंकर यांची भेट घेतली. नंतर शांताराम नारायण व रघुनाथ नारायण खोटे हे भेटले. रंगाचार्य यांची भेट म्हैसूरच्या कॅम्पमध्यें झाली. तेथें नरसीनीयंगार, महाराजांचे शिक्षक भेटले. रंगाचार्य यांच्या अंगीं बहुश्रुतपणा व कल्पकता दिसून आली. वैद्यक व इतर विविध विषयांवर अर्धातास आमचें भाषण झालें. बंगलोर व म्हैसूर याविषयीं बोलतांना त्यांच्या अंगावर सहर्ष रोमांच उभे राहिले व ते म्हणाले तुम्हीं एकदां इकडे या व हिंदुस्थानांतील सर्वांत पुरातन अशा तामीळ सुधारणेचा नमुना आमच्या प्रांतांत व मद्रास इलाख्यांत पाहून जा तरी! २५ तारखेस सर दिनकरराव व सर जमशेटजी यांस भेटावयाचें होतें व मला किंचित् ज्वरांश वाटल्यामुळें घरीं राहिलों. २६ तारखेस महम्मद अल्ली रोगे व भुस्कुटे भेटले.”

“ २७ तारखेस पंडित विश्वेश्वरनाथ नवल गोस्वामी यांच्या बरोबर अशोकस्तंभ व त्यावरील लेख पहावयास गेलों. हा एक बृहदाकृति शिलापिंड असून त्यावरील जुना लेख हळु हळु नाश पावत आहे असें दिसलें. ही एक जुन्या किल्ल्याची प्रगंडिका असावी असें त्यांचें मत आहे. स्तंभास

मूळ आधारभूत जो बुरुज त्याचीही स्थिति तशीच दिसली. दुरुस्ती करण्याची फार जरूर आहे. तुर्की दरवाजावरील लेख काय आहे तें डॉक्टर भाऊंच्या कागदांवरून मुंबईस गेल्यावर पाहिलें पाहिजे. बरोबर असलेले पंडित फार विद्वान दिसले. कुरुक्षेत्र, इंद्रप्रस्थ, तक्षशिला, सर्पसत्र व कुतुबमिनार यांवर त्यांनीं लेख लिहिले आहेत. बाळाजी पांडुरग हे त्यांच्या येथें उतरले होते. सर्व जातींतून चार वर्गाचे चार संघ करावे असें पंडित प्रतिपादन करीत होते. "

" २८ तारखेला बंडाच्या स्मारकाजवळील दुसरा अशोकस्तंभ पहावयास गेलों. तेथून हिंदुरावकी कोठीवरून विनायकराव यांच्या येथें आलों. "

" २९ तारखेला पंडितजींबरोबर कुतुब व योग–मायेचें देवालय पाहून आलों. सफदारजंगचें थडें पाहिलें. त्यास लोक मद्रेसा म्हणतात. जयसिंग याची मोडकळीस आलेली वेधशाला पाहिली. तिला यंत्रमंत्र म्हणतात. "

प्रयाग दिल्ली इ० ठिकाणीं मंडळीबरोबर रावसाहेब प्रेक्षणीय स्थळें पहावयास जात तेव्हां मोठ्या अधिकाऱ्यांकडून " हे सरकारचे पाहुणे आहेत, यांस हें स्थळ दाखवा " अशी शिफारसपत्रें घेत असत.

" ३० तारखेला व्हाइसराय साहेबांच्या तंबूकडे गेलों. तेथें आम्हांस विनायकरावानीं आंत बसविलें. व्हाइसराय साहेबांनीं मला रौप्य पदक दिलें. तेथें होळकरांच्या कॅम्पमध्यें गेलों. त्यांना मूर्तिमंत मराठा पहावयास सांपडला. माझें आडनांव म्हणजे त्यांस मराठी राज्यातलें एक राजाचिन्ह वाटलें व त्याचें मूळ तसेंच असावें असें वाटलें. परंतु मला त्याची माहिती नाहीं. ३ वाजतां सर दिनकरराव राजवाडे यांस भेटलों व त्यांनीं केलेल्या साहाय्याबद्दल मी त्यांचे आभार मानले. "

" १ ली जानेवारी ७७ रोजीं लॉर्ड लिटन यांच्या भेटीचा मोठा समारंभ झाला. तो छापील कार्यक्रमाप्रमाणें पार पडला. रात्रीं या बाजूला येण्यास निघालों. दिनकररावांनीं बांधलेल्या देवळाजवळील बंगल्यांत उतरलों. "

रावसाहेबांच्या मनांतून पुष्कळ क्षेत्रें पहावयाचीं होतीं परंतु पुरेशी रजा नसल्यामुळें कार्यक्रम आंखडता घ्यावा लागला. रेल्वेकडून त्यांची इतकी उत्तम व्यवस्था केली गेली कीं, रावसाहेबांनीं प्रवासाचे शेवटा जनरल ट्रॅफिक मॅनेजर, मि. हेन्री कॉन्डर, यांस मुद्दाम पत्र लिहून त्यांचे आभार मानले. "माझ्या दिल्लीच्या प्रवासांतील चिरस्मरणीय गोष्टींपैकीं आपण उत्तम व्यवस्था माझ्या मंडळीच्या स्वास्थ्याकरितां ठेवलीत ही एक होय."

रावसाहेब आपल्या रुग्णाईत पत्नीसमवेत काशीयात्राकरून सुखरूपपणें परत आल्याचें ऐकून रावसाहेबांच्या एका पार्शी मित्रास आनंद वाटून त्यानें लिहिलें:—

"आपल्या देहाचें सार्थक करणें ही जी प्रत्येक हिंदूच्या हृदयांत इच्छा वसत असते, ज्या इच्छेपुढें इतर सर्व मनोरथ तुच्छ वाटतात, तीच एकटी काशी-विश्वेश्वराच्या दर्शनाची व गंगास्नानाच्या लाभाची इच्छा सौ० अन्नपुर्णाबाईस एवढे कष्ट भर थंडीच्या दिवसांत सोसण्यास सामर्थ्य देती झाली. त्यांची ही श्रद्धा वाखाणण्यासारखी आहे. त्याप्रमाणें त्यांस फळ मिळालेंच असेल."

परत आल्यावर आप्त इष्टमित्रांस गंगाप्रसाद व काशींतील कांहीं वस्त्रें अशीं देण्यांत आली. मुरुडास जाऊन मांवद्री करून तिच्या प्रीत्यर्थ सहस्र भोजन रावसाहेबांनीं घातलें. दक्षिणा रुपया रुपया दिली.

## प्रकरण ५० वें.

# सरकारी वकिली.



Of law there can be no less acknowledged, than that her seat is the bosom of God, her voice the harmony of the world, all things in heaven and earth do her homage, the very least as feeling her care and the greatest as not exempted from her power.

( *R. Hooker Ecclesiastical polity* )

**। योलोकेषु तनोति शान्तिमपरां द्यौर्भूमिपूजास्थलम् ।**
**॥ आलानंमहतोलघोश्च नियतं संरक्षणं शक्तिमत् ॥**
**। सोधर्मोजगदीश्वरस्य हृदये कृत्वा निवासं स्थितः ।**
**॥ एतावद्यदि नाधिकं खलु भवेत् मान्यं जनानां सदा ॥ १ ॥**

( वरील इंग्रजी ओळींचे भाषांतर. )

इंग्रजांच्या चांगल्या चांगल्या संस्थापैकीं न्यायमंदिरांची संस्था सर्वोत्कृष्ठ आहे. तेथील न्याय देण्याच्या पद्धतीचें स्वरूप निर्दोष आहे. न्यायमंदिराचें दार सर्वांस उघडें आहे. एक स्वरूपाचा न्याय सर्वांस मिळतो. कारण जे कायदे आहेत ते निश्चित स्वरूपाचे आहेत व लिखित आहेत. हायकोर्टांतील न्यायाधीश बाह्यशक्तीवर अवलंबून नसल्यामुळें हायकोर्टाची पदवी फार श्रेष्ठ आहे. या कोडतांनीं आपल्या स्थापनेपासून मिळवलेली लोकप्रियता कायम राहिली आहे. अशा पवित्र ठिकाणीं १८ व्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें रावसाहेब १८६३ सालीं वकिली करूं लागले ती ते शेवटपर्यंत करीत होते. त्यांना तेथील न्यायपद्धति पसंत झाली.

“ हल्लींची न्याय पद्धति कित्येक बाबतींत हिंदुस्थानाचें पुनरुज्जीवन

करील. पुष्कळ नवे नवे प्रश्न लोक काढीत आहेत. समदर्शी न्याय व नीति हीं दोन्हीं विरुद्ध असल्यामुळें ज्या जुन्या चालींचें समर्थन करतां येत नाहीं त्यांवर मारा सुरू झाला आहे. उदाहरणार्थः—नुकतेंच गुजराथेंत एका पुरुषानें एका स्त्रीशीं तिचा पति जीवन्त असतांच लग्न लाविलें. पहिल्या पतीनें फिर्याद आणतांच तो नुकसानीची भरपाई करण्यास तयार झाला. त्या जातींत अशी अमंगल चाल आहे असा पुरावा त्यानें आणून दिला. जिल्हा जज्जानें ठरविलें कीं अशी चाल सिद्ध झाली आहे. परंतु हायकोर्टाकडे हें प्रकरण योग्य मार्गानें आलें तेव्हां असें ठरविण्यांत आलें कीं ही चाल सर्व कायद्यांच्या विरुद्ध असल्यामुळें ती न्याय्य धरतां येत नाहीं. परंतु अशा तऱ्हेचा खटला कोर्टापुढें पहिल्यानेंच आल्यामुळें शिक्षा जरा हलकी देण्यांत आली. ( २८।९।६४ चें जनरल जेकब यांस लिहिलेल्या इंग्रजी पत्राचें भाषांतर. ) रावसाहेबांची हाय-कोर्टांत दिवसानुदिवस प्रतिष्ठा वाढत गेली.

२६।११।१८६३ रोजीं मि. डनबार यांच्या मार्फत कायकोर्टच्या रिपो-र्टरची जागा पतकरण्याची खुषी आहे कीं नाहीं तें नामदार चीफ जस्टिस् यांनीं विचारलें. विचार करून सांगतों असें म्हणून दुसऱ्या दिवशीं पतकरतों असें रावसाहेबांनीं मि. डनबार यांस सांगितलें व ही नेमणूक करण्याबद्दल ‘ मी नामदार चीफ साहेबांचा आभारी आहें ’ असें कळविण्याची मि. डनबार यांस २७।११।१८६३ रोजीं विनंति केली.

“ यांत पैशाची प्राप्ति विशेष नव्हती पण स्वतःचें ज्ञान वाढावें ” हाच रावसाहेबांचा हेतु होता. ज्या खटल्यांत पूर्वींच्या सदर अदालतीचे ठराव रद्द करण्यांत येतील, त्या व १८६९ चा आक्ट आठवा या खालीं येणारे अथवा इतर महत्वाच्या, खटल्यांतील ठराव प्रसिद्ध करावे अशी सूचना नाम-दार साहेबांनी रावसाहेबांस केली होती.

कायद्याविषयीं सूक्ष्म तारतम्य ज्ञान वाढविण्यास या कामाचें रावसाहेबांस साहाय्य झालें व त्यांची कुशलता न्यायाधीशांच्या नजरेस या मार्गानें पडूं लागली.

१८६४ सालीं एक न्यायाधीश रजेवर गेले होते त्यावेळेस असें सांगतात

कीं रावसाहेब जरी नुकतेच वाकिली करूं लागले होते तरी त्यांची या जागेवर नेमणूक व्हावी अशी शिफारस कांहींनीं केली होती. पण जागा मिळाली नाहीं. पुढें याचसालीं त्यांस हायकोर्ट वकिलीच्या परीक्षेच्या कमिटीचे सभासद् नेमण्यांत आलें.

वकिली हाच मुख्य पोटाचा धंदा रावसाहेबानीं पतकरला होता. तरी त्यांच्या मित्रांस त्यांनीं तसें करावें असें वाटत नसे; म्हणून मधून मधून कोणी मित्र त्यांस अन्य विचार करावयास लावी; परंतु विचाराच्या बाहेर त्यांची मजल गेली नाहीं.

रावसाहेब नोकरींतून रिकामे झालेले पाहून लख्मीदास भेट देऊन म्हणाले " रावसाहेब तुम्हीं काठेवाडांत जाम साहेबांचे दिवाण होण्यास कबूल आहांत काय ? व असाल तर पगार किति मागाल ? तुम्हीं गेल्यानें देशाचें कल्याण होणार आहे. जामसाहेबांचें तर होईलच होईल. संस्थानचे पूर्ण अधिकार तुम्हांस देण्यास राजेसाहेब कबूल आहेत " रावसाहेब म्हणाले ही संधि विचार करण्यासारखी आहे. परंतु मी माझ्या धंद्याला चिकटून राहण्याचा निश्चय केला आहे. त्यांतच माझा भाग्योदय आहे. हिंदी लोकांना आतां हायकोर्टांत न्यायाधिशाची जागा उपलब्ध झालेली आहे. ती मिळण्याची आशा मी कां करूं नये याबद्दल कांहीं कारण दिसत नाहीं. अर्थातच मला पुष्कळ वर्षे सक्त परिश्रम करावे लागतील व ते फार खुषीनें करीन. तथापि योग्य मनुष्याची निवड करण्यांत राजेसाहेबांस मदत करण्याचें रावसाहेबांनीं कबूल केलें व ते म्हणाले प्रथम तुमचें म्हणणें काय आहे ते गव्हर्नर साहेबांच्या मार्फत येऊं द्या. ६।१।१८६४.

१८७६ सालीं मि. धीरजलाल, सरकारी वकील, यांच्या निधनानें सरकारी वकिलाची जागा रिकामी झाल्यामुळें त्या जागेकरतां दोन उमेदवार होते. एक रावसाहेब व दुसरे नानाभाई हरिदास. रावसाहेब नानाभाईचे एकाअर्थी अग्रज होते. रावसाहेबांस नानाभाईच्या अगोदर मुनसफ नेमण्यांत आलें होतें. नंतर चार वर्षें सरकारी नोकरी रावसाहेबांनीं उत्तम केली होती व कायदे काउन्सिलांत सुद्धां चांगली कामागिरी केली होती व त्यांनीं नानाभाईच्या

अगोदर वकीली करण्यास आरंभ केला होता. म्हणून ती जागा रावसाहेबांस मिळेल असें लोकांस वाटलें होतें व तशी कित्येक लोकांची आंकांक्षा होती असें दिसतें. गुजराथी वर्तमानपत्रांतून तशा शिफारशी होऊं लागल्या होत्या. परंतु नानाभाई हरिदास हेही एका अर्थी रावसाहेबांचे अग्रज होते. कारण वकीलीची सनद त्यांना रावसाहेबांच्या अगोदर मिळाली होती त्यांचें बुद्धि-सामर्थ्य व कायद्याचें ज्ञान चांगलें होतें. त्यांस सरकारी वकिलीची जागा पक्केपणीं देण्यांत आली व त्यांची जज्जाच्या जागीं बदली नेमणूक करण्यांत आली व रावसाहेबांस सरकारी वकीलाची जागा बदली म्हणून देण्यांत आली.

या जागेवर ८ आगष्ट रोजीं रावसाहेब रुजू झाले. प्राप्ति थोडी असे. मग ही जागा कां पतकरली तिचें कारण त्यांनीं मि. कॅन्डी यांस २५।८।१८७६ च्या पत्रीं कळविलें तें असें:—या जागेंत मेहनत फार पडत आहे त्या मानानें पैसे मिळत नाहींत. तथापि अपीलशाखेच्या वकील मंडळींत हा मान सर्वांत मोठा समजतात. म्हणून मी तिचा स्वीकार केला आहे.

इतकें झालें तरी रावसाहेबांस दुसरे ठिकाणीं संस्थानांत नेण्याची इच्छा कांहीं स्नेही प्रकट करीत "देसाई हरिप्रसाद संतोषराम यांनीं भावनगरची दिवाणागिरी पतकरतां कीं काय असें राजेसाहेबांतर्फे विचारलें " उत्तर कांहीं दिवसांनीं देईन असें रावसाहेबांनीं सांगितलें. ( २।१२।७८ रो. ) परंतु दिवाण होण्याचें त्यांनीं पतकरिलें नाहीं. पुढें १८८४ सालीं रावसाहेबांस ही जागा पक्केपणीं मिळाली.

कलकत्त्याचे उमेशचंद्र बॅनर्जी यांनीं या प्रसंगीं अभिनंदनपर पत्र पाठविलें. त्यांत त्यांनीं म्हटलें कीं तुम्हांला सरकारी वकिलाची जागा पक्के पणें मिळाली म्हणून मला तुमचें अभिनंदन करूं द्या. ही जागा केवढी लहान व तिच्यावर केवढ्या प्रचण्ड बुद्धीच्या मनुष्याची नेमणूक झाली आहे हें पाहून खेद होतो. हा सर्व कालमहिमा समजून याही जागेवर तुमची नेमणूक झाली हें पाहून मला आनंदच होतो.

या जागेवर रावसाहेब शेवट पर्यंत होते.

---

## प्रकरण ५१ वें.

# दुष्काळ.

—०—

( १८७६ व १८७७ )

**टाक मुखामधिं कांहीं। मज नाहीं म्हणती अन्न पंधरा दिनीं। जळा पिवुनि किति नळांत फुगले, पळांत वपु त्यागुनी। गळां पडुनि किति रडति, किति वरति बाळक मुडदे कंवटाळुनी॥ ( चाल ) करतील काय हो अन्नाविण गांजली। ही दुनिया सारी जठराग्नित भाजली। ही दुष्काळाची नौबद बरी वाजली॥ १॥ टा०**

( **राम**जोशीकृत दुष्काळाचें वर्णन )

**" लागेल तो पैसा खर्च करा पण दुष्काळांतून ( माझ्या प्रजेचे ) जीव वांचवा "**

( १८७३।७४ साली बंगाल्यांत भयंकर दुष्काळ पडला होता तेव्हां तेथील अधिकाऱ्यांस **म**हाराणी व्हिक्टोरिया साहेबांचा हुकूम )

१८७६ सालीं दक्षिण महाराष्ट्रांत फार उग्र स्वरूपाचा दुष्काळ पडला होता. त्यावेळेस **राव**साहेबांनीं दुष्काळपिडितांचें संरक्षण करण्याकरतां अटाकोट श्रम केले. दानशूर लोकांस उद्देशून त्यांनीं एक लेखी विनंतिपत्र आपल्या सहीनें काढून सर्वत्र वांटलें. त्यांत **इं**दापूर तालुक्यांतील हालांचें विशेष वर्णन केलेलें होतें. " अत्यल्प वृष्टीमुळें खरीपांच्या पिकाची नासाडी झाली आहे व राब्बींची पिकें हातीं लागली नाहींच. पुरेसा ओलावा जमिनींत नव्हता म्हणून तीं होण्याची आशा नाहीं. वरील तालुक्यांतील ८७ खेड्यांपैकीं $\frac{1}{3}$ वसति मुलांमाणसांसह गुरें ढोरें घेऊन वडिलार्जित घरादारांचा स्नेह सोडून व डोळ्यांत अश्रू आणून देशांतराला निघून गेलीं आहेत! बिचाऱ्या शेतकऱ्यांना आऊतें

ही विकावीं लागलीं आहेत ! धान्य मिळण्याची पंचाईत पडली आहे. पाण्याची मोठी टंचाई झाली आहे. तेणेंकरून गुरांची प्राणहानि फार होऊं लागली आहे. सरकारानें दुष्काळी कामें काढून सदृढ लोकांची सोय केली आहे; परंतु वृद्ध, बाल, पंगु, व अंध लोकांना त्याचा फायदा घेणें शक्य नाहीं; म्हणून भात व चटणी वांटावयाला कांहीं दयाळू लोकांनीं सुरवात केली आहे. कित्येक ठिकाणीं अन्नछत्रें ही अशाच दुबळ्या लोकांकरतां काढावयाचीं आहेत; म्हणून पैसे पाठवा व जितक्या लवकर ते पाठवाल तितकें चांगलें " अशी विनंति त्या पत्रकांत रावसाहेबांनीं केली होती. पैसे गोळा करण्याच्या कामांत त्यांचे मित्र नानाभाई राणिना व आर्देसर फ्रामजी मूस हे मदत करीत होते.

दुष्काळी कामें सरकारानें उदार प्रमाणांत काढलीं होतीं त्यांत एक सुधारणा रावसाहेबांनीं सुचविली होती ती ही कीं २४ शेरांपासून ३२ शेर धान्याचा भाव असतां २ आणे मजुरी कामकऱ्यांस रोज पुरेशी असे ती धान्याचे दर वाढल्यामुळें पुरत नाहीं याकरतां ती ३ आण्यापासून चार आणे प्रमाणें द्यावी. सोय असेल त्याप्रमाणें वर निर्दिष्ट केलेल्या दुबळ्या लोकांकरतां भात भाकरी किंवा कोरडा दाणा देण्याकरतां धर्मगृहें नीट जागा पाहून * बांधावीं व तेथें जमलेल्या लोकांचे आरोग्य नीट राहण्याकरतां कांहीं नियम करावे. मात्र त्यांची अम्मलबजावणी जरा सदय अंतःकरणानें करावी.

या व दुसऱ्या इष्ट योजना शक्य तितक्या लवकर अमलांत आणण्याकरतां परोपकारी लोकांशीं एकसारखा पत्रव्यवहार रावसाहेबांनीं सुरू ठेवला होता. कांहीं अब्रूला भिणाऱ्या लोकांस दुष्काळ कामावर जाण्याची, महागाईत चढाओढीच्या दरानें वाण्याकडील धान्य घेण्याची, व अन्नछत्रांत भिक्षा मागण्याची पंचाईत पडूं लागली होती. त्यां करतां स्वस्त धान्याची दुकानें काढविलीं होतीं. गुरांची प्राणहानि न होऊं देणें ही तर फार महत्वाची गोष्ट होती. कारण त्यांचा नाश झाल्यास पाऊस

* असें एक इंदापूर तालुक्यांत प्रथम काढलें होतें.

पडूनही पुढें कित्येक वर्षे शेतकीचीं कामें अडून पडावयाची भीति होती. या मुक्या जनावरांकरतां पाण्याची सोय असलेल्या ठिकाणांत चारा देण्याची व्यवस्था केली होती. १०० पासून ५०० गुरें एके ठिकाणीं ठेवावयाचीं होतीं. एका एका गांवांतील १५ गुरांबरोबर गांवांतील एका माणसाची राहण्याची सोय करावयाची होती. म्हणजे पाऊस पडतांच त्यानें गुरें गांवास परत नेऊन ज्याचीं त्यास पोंचवावीं. या संबंधें ठिकठिकाणच्या पांजरपोळाच्या व्यवस्थापकांशीं रावसाहेबांनीं पत्रव्यवहार सुरू ठेवला होता.* जनावरांकरतां कुरणें सरकारांतून घ्यावयाचीं होतीं. ज्यांचीं लिलावें आधींच झालीं होतीं तीं त्यांच्या जवळून सकारण नुकसानी भरून देऊन आपत्प्रसंग ह्मणून परत घेण्याकरतां कायदा करावा लागला तरीही करावा; कारण असा कायदा राष्ट्राची आपत्ति टाळण्याकरतां त्या वेळेपुरताच करावयाचा असतो अशी रावसाहेबांनीं सरकारास सूचना केली होती. लोकांस सरकाराशीं सहकार करावयास उपदेश केला होता.

या कामीं शेट अंबाईदास बेचरदास या गृहस्थांनीं धान्य विकत घेऊन कांहीं ठिकाणीं पदरचे हजारों रुपये लावून नफ्याशिवाय दुकानें पुणें व अन्य बरेच ठिकाणीं काढलीं होतीं.** त्यांनीं या दुष्काळाच्या कामांत रावसाहेबांबरोबर फार श्रम घेतले.

दुष्काळानिमित्त लोकांची मोठी सभा भरविण्यास विनंतिपत्रावर सही करून तें शेरीफकडे रावसाहेबांनीं लावून दिलें व जी सभा झाली ती मोठी झाली.

---

* रेलवेच्या नजीकच्या गांवचीं गुरें मुंबईस आणावयाची सूचना केली होती. कारण त्या योगानें ने आण करण्याचा खर्च कमी लागेल. मुंबईस सोय होणार नाहीं, कारण येथील पांजरा पोळांतील गुरें चेंबूर वगैरे ठिकाणीं ठेवावीं लागतात; म्हणून पुणें, नाशिक, कुलाबा, रत्नागिरि, कानडा इत्यादि जिल्ह्यांत मध्यवर्ती गोशाळा काढण्याची सूचना करून आपल्या मित्र वर्गाशीं पत्रव्यवहार सुरू ठेवला होता.

** अशीं दुकानें काढणाऱ्या लोकांस तोटा झाला. धनिकांस तो भरून देण्याची हमी घ्यावी अशी विनंति रावसाहेबांनीं लोकांस केली होती.

जितक्यांकडे पैसे वांटण्यास पाठविले होते तितक्यांनीं हिशोब पाठविले होते व कांहींनीं कोणास काय दिलें त्याची नांवनिशीवार पत्रकें पाठविलीं होतीं. सातारा जिल्ह्यांत दुष्काळाचीं कामें निघालीं होतीं त्यांतील एकाची व्यवस्था त्या जिल्ह्यांतील मुनसफ, महिर्जीभाई कुवरजी हे, तेथील एक सज्जन गृहस्थ भीमराव यांच्या मदतीनें पहात होते. ती त्यांनीं कशी ठेविली आहे हें पाहण्यास मिसेस मूर व मि. विन्गेट यांसह साताऱ्याचे कलेक्टर गेले होते. काम पाहून त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें वरील दोघां गृहस्थांची तारीफ केली " मि० भीमराव व कुवरजी यांस कामावर येणाऱ्या प्रत्येक इसमाची चांगली माहिती आहे, लठ्ठनिरंजन व आळशी मनुष्य धर्माचे पैसे उपटूं शकत नाहीं. काम करूं शकणाऱ्यांस कामच करावें लागतें. अशा प्रकारच्या धर्मादाय पद्धतीनें लोकांचें कल्याण होणार आहे."

( ४।२।७७ सातारा कलेक्टर. )

रानांत गुरें चारण्याची परवानगी देणारा एक सरकारी ठराव या दुष्काळांत झाला होता.

या दुष्काळाकरतां रक्कम जमाविण्यांत व तिचा योग्य ठिकाणीं विनियोग करण्यांत रावसाहेबांनीं स्वतां पुष्कळ खटपट केली. पुण्यास वस्त्रदान व अन्नदान रावसाहेबांनीं स्वतां जाऊन केलें. त्याशिवाय जागोजाग त्यांचीं विश्वासाचीं लोककल्याणकारी सत्यधर्मी अशीं माणसें होतीं त्यांच्यामार्फत पुष्कळ रक्कम वांटविली. त्याचें काम पुण्यास रावसाहेबांचे कारभारी बळवंतराव जोशी व मित्र बाळकृष्ण सायन्ना यांनीं केलें.

कलादगीस—शंकर पांडुरंग पंडित यानीं केलें.

खानदेश जिल्हा ,, ,,

इंदापुरास— ,, बळवंतवराव जावडेकर यांनीं केलें.

साताऱ्यास ,, { दाजीबा जोग<br>बाबाजी रामचंद्र घाणेकर, मामलेदार<br>बळवंत सिताराम नाईक, मामलेदार } यांनीं केलें.

| | | | |
|---|---|---|---|
| कोल्हापूर | ,, मोरोपंत ओक | | |
| दहिवडी | ,, नरहर गदाधार ओक | | यांनीं केलें. |
| तासगांव | ,, भाऊ बापट ( मामलेदार ) | | |
| पढंरपूर व अक्कलकोट | ,, आबाजी विष्णु काथवटे | | यांनीं केलें. |

" आपण पाठविलेला पैसा निरनिराळ्या जातीच्या व धंद्याच्या लोकांकडे खर्च झाला आहे. बहूतकरून पोटास धान्य वगैरे देण्याकडेसच या रकमेचा उपयोग झाला. अगदीं थोड्या प्रसंगीं वस्त्रें दिलीं. रोज पांच सहा गांव फिरून लोकांची स्थिति पाहण्याकरतां सरकारच्या हुकमावरून फिरत असतों. " ( २३–४–७९ चें **बळवंत सिताराम नाईक** यांचें पत्र. )

**शंकर पांडुरंग पंडित** यांनीं घोंगड्या व वस्त्रें वांटलीं. तो प्रकार त्यांनीं १२–२–७८ च्या पत्रांत असा वर्णन केला आहे. " आम्हीं दिलेलीं वस्त्रें घेऊन लोक बाजारांत वाटेल तेवढ्या कमी किंमतीला विकूं लागले. म्हणून तीं फाडून दोन भाग करून पुन्हा शिंववून तपकिरी रंगानें रंगवून दिलीं. लुगडीं, त्यांवर जाणार नाहीं अशी कांहीं खूण करून दिलीं. मालमंडीसारख्या गवताचें बीं खाऊन लोक रहात आहेत. "

**शंकर पांडुरंग पंडित** यांच्यामार्फत कलेक्टरनें **रावसाहेबांचे** आभार मानले.

" कांहीं रयत लोकांचें सर्वस्वीं नुकसान झाल्यामुळें ते नुसते मजूर बनले आहेत. सरकारकडून व लोकांकडून जर कांहीं साहाय्य झालें नसतें तर झाला त्याच्या दुप्पट नाश झाला असता. चार बायका शुद्ध पुरुषाप्राणें लंगोट्या नेसल्या होत्या. त्यांस खादीचे पट्टे दिले. केळीचे कांदे व कालें यांचें पीठ करून त्याच्या भाकरी लोक खात आहेत. उंबराचीं फळें खात आहेत ( **भाऊ बापट** यांचे पत्र ).

" बारीकसारीक कांदे, एखादें कणीस मुद्दाम चोरून पोटासाठीं चोरलें असे उघड लोक सांगत आहेत. नवीन पीक संभाळण्यास कठीण झालें आहे. ( **जावडेकर** यांचें पत्र ).

हा दुष्काळ सरकार व उदार लोक यांचे प्रयत्न व पर्जन्य वृष्टि यांनीं लुप्त झाला होता तरी मागून त्याचे गुप्त परिणाम लोकांस सोसावे लागत. तिकडेही रावसाहबांचें लक्ष असे.

रावसाहेबांवर अत्यंत विश्वास ठेवणाऱ्या एका उदार इंग्रज गृहस्थाची गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. हिंदुस्थानांत बरेच वर्षें राहिलेले व हिंदी लोकांवर प्रेम करणारे व स्वदेशीं गेल्यावर हिंदी लोकांची आठवण ठेवणारे एक इंग्रज गृहस्थ होते. त्यांनीं रावसाहेबांस १०।५।७७ चें एक पत्र लिहिलें त्याचा उतारा—

"दक्षिण हिंदुस्थानांत हल्लीं दुष्काळानें पुष्कळ गरीब रयत गांजली आहे. तिच्या स्थितीचें वर्णन ऐकून माझ्या मनाला मोठा जांच होत आहे. तो कमी करण्यास तुम्हीं मला साहाय्य कराल अशी आशा आहे. या पत्रासोबत मी ( २५०० ) अडीच हजार रूपयांची हुंडी दिली आहे. ती वटावून खऱ्या गरजू लोकांस तुम्हांला पसंत पडेल त्या प्रकारानें वरील रक्कम वांटून टाकावी. ती एकाद्या बड्या फंडांत सामील न व्हावी एवढीच माझी इच्छा आहे. पूर्ण विश्वासास पात्र असे तुमचे जे मित्र असतील त्यांच्या मार्फत दुष्काळग्रस्त प्रदेशांत खर्च करावी. ज्यांस इतर ठिकाणची मदत पुरी पडत नाहीं अशा स्त्रियांस, अर्भकांस, व ज्यां जवळचे शेतकीचे बैल नष्ट झाले आहेत, ज्यां जवळ बियाणें उरलें नाहीं अशा शेतकऱ्यांस साहाय्य करा असें मी सुचवितों. तरी तुम्हांला वाटेल त्या प्रकारानें या पैशाचा विनियोग करण्याची तुमची मोकळीक मी बिलकुल कमी करीत नाहीं. माझें बहुतेक आयुष्य दक्षिण हिंदुस्थानांत गेल्यामुळें तेथेंच माझे पैसे खर्च व्हावे अशी इच्छा आहे. एवढी सर्व रक्कम तुमच्या मनाप्रमाणें जर खर्च करूं शकलां नाहीं तर तिचा अवशिष्ट भाग एकाद्या फंडाला द्या; पण माझ्या नांवावर देऊं नका. देणेंच तर 'एन्' अशा नांवावर द्या."

मि० एन् ! तुमची धन्य आहे ! नांव जाहीर करण्याची तुमची इच्छा नाहीं म्हणून तें येथें देत नाहीं परंतु तुमच्या उदारपणाबद्दल व पत्रांतील उच्च विचारांबद्दल तुम्हीं स्तुतीस पात्र आहांत. इंग्रज व हिंदी लोक यांच्यामध्यें प्रेमवृद्धि करण्यास तुमच्यासारखे पुण्यात्मे कारण होतील यांत शंका नाहीं.

पैसे हिंदुस्थानांत पोचवण्याकरतां, ज्या ब्यांकेशीं वरील इंग्रज गृहस्थाचा व्यवहार होता त्या ब्यांकेला यांनीं आपले कांहीं व्यापारी कंपनींतील भाग ताबडतोब विकावयास सांगून अशी अशी मी पाठविलेली हुंडी येईल ती स्विकारावी असा हुकूम करून ठेविला होता.

इंग्रज लोक हे आपले ऋतुमानानें स्थलांतर करून हिंदुस्थानांत आलेले पक्षी आहेत! त्यांचें लक्ष उत्पत्तिस्थानाच्या प्रदेशाकडे नेहमीं राहतें, तें हिंदुस्थानांकडे कसे असेल? असे जे कांहीं लोक प्रश्न विचारतात त्यांस वरील सन्मान्य इंग्रजाचें उदाहरण हें उत्तर आहे.

सर्व साधारण नियमांप्रमाणें सरकार आपल्या प्रकारें दुष्काळग्रस्तांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांची मदत जेथें पोचूं शकत नाहीं तेथें खासगी प्रयत्नानें विशेष प्रकारानें मदत पोंचविणें हे धनिक व उदार लोकांचें जें कर्तव्य आहे तें कसें करावें याची दिशा याप्रकरणावरून लोकांस कळून येईल.

---

## प्रकरण ५१ वें.

# ऋष्याश्रम अथवा हर्मिटेज बंगला.



**। रसालानामन्तर्मदकलरणत्कोकिलकुलम् ।**
**॥ समन्तादुन्मीलद्बकुलमुकुलामोदभरितम् ॥**
**। घनस्निग्धच्छायं क्रमुककदलीशीतलतलम् ।**
**। तनुप्रीतिं धत्ते नवमिदमृषेराश्रमपदम् ॥ १ ॥**

**राव**साहेब पहिल्यानें मुंबईंत विद्या शिकावयास आले तेव्हां ते **अनंत ऋषीचे** वाडींत भाड्याच्या लहानशा खोलींत रहात असत. पुढें बिऱ्हाड करावयाचा प्रसंग आला व रोजगार लागून स्थिति चांगली सुधारली तेव्हां **मोठ्या**

बिऱ्हाडाची उणीव भासतांच ठाकूरद्वारीं झूस वाडींत १८६२ सालीं गोडबोले यांच्या घरांत भाड्यानें राहूं लागले. शेजारीं पाजारीं प्रतिष्ठित प्रभुलोकांचीं घरें होतीं. पुढें तेंच घर त्यांनीं १८६५ त विकत घेतलें. वाडींत शिरतांना लागणारा रस्ता अरुंद होता. पण घर दोनमजली प्रशस्त होतें. मागें व पुढें आंगणीं होतीं व दोन बाजूला मोठ्या वाड्यांची खुली जागा होती. पाण्याकरतां एक मोठी विहीर होती. तेथें गेल्यावर रावसाहेबांनीं घराच्या एका बाजूस मजला चढविला. नळाच्या पाण्याची टांकीं बांधविलीं कचेरीची जागा निराळी बांधविली व गुरांचा गोठा बांधविला.

हवाशीर जागेंत राहण्याची आवड रावसाहेबांस पहिल्यापासून असे. ते प्रथम जरूर लागल्यास वाळुकेश्वरीं भाड्यानें घर घेऊन असत. कांहीं दिवसांनीं अधिक चांगल्या हवेकरतां प्रसिद्ध शास्त्रीहॉलमध्यें भाड्यानें रहात असत. १८७४ सालीं शास्त्रीहॉल सोडून गवालिया तलावानजीक एका बंगल्यांत भाडें देऊन राहत असत. येथें भाडोत्री घराचें सौख्य पूर्णपणें समजलें. "भाड्याचा असा हा माझा शेवटचाच बंगला होवो! अशी मी आशा करतों." ( नानाभाई आर्देसर यांस २१–५–१८७५ चें पत्र. ) "एक रोगलुब्ध स्त्री व तिचा पुस्तकलुब्ध पति या दोहोंची सोय ज्यांत नीट असेल असें मला वाळुकेश्वरीं घर घ्यावयाचें आहे." असें रावसाहेब म्हणूं लागले व त्याप्रमाणें त्यांनीं महालक्ष्मीच्या रस्त्यावर हरमिटेज नांवाचा भव्य बंगला व आसपासची मुबलक जागा १८७७ सालीं विकत घेतली. या बंगल्याचें मराठी नांव कमानी बंगला असें होतें. कारण त्याच्या प्रवेशद्वारीं या मिळकतीच्या मोठेपणाची सूचक अशी दगड व चुना यांनीं बांधलेली उंच कमान होती. या बंगल्याचें इंग्रजी नांव जें हर्मिटेज (आश्रम) ह्मणून आहे तें यथार्थ आहे. बंगल्याच्या भोंवतीं डोंगराळ वन्यजागा पुष्कळ होती. तींत नानातऱ्हेचे वन्यवृक्ष होते. सरळ व उंच ताड व कंटकावृत शिंदीच्या वृक्षांचीं जाळीं होती. शुभ्र व रक्त पुष्पांचे शाल्मली वृक्ष होते. त्यांवरचीं कापसाचीं बोंडें जून होऊन उघडूं लागलीं कीं आंतील हलका कापूस उडून सर्व जमिनीस अस्तर घालीत असे.

रास्तरा, कर्णा, चिंच, बोर, वड, पिंपळ, बेहडा, इ. वृक्ष होते. त्यांत कांहीं औषधी वनस्पती असत. उः—धोतरा, डिकेमाली, रुई, गुळवेल, किराईत, अनंतमूळ, निवळीची वेल, गजकर्णी, पुननर्वा, टांकळा, तांबडा कांचन, कांटे रिंगणी इ. बागाईत वृक्षांपैकीं ५०।७५ कलमी आंबे होते.

पाण्याच्या टांक्यांतून बेडूक फार असत. सर्पास जागा फार सोईची होती. रावसाहेबांनीं डागडुजीला आरंभ केला तेव्हां विविध जातीचे सर्प वारंवार आढळत. एक अमेरिकन प्रोफेसर रावसाहेबांस भेटण्याला आले असतां जमिनींतून निघालेले साप मारतांना रावसाहेबांच्या नोकरांस पाहिलें. नंतर त्यांनीं एका पुस्तकांत लिहिलें कीं रावसाहेबांची वसति सर्पांतच आहे. पोपट, चिमण्या व मैना यांचीं घरटीं बंगल्याच्या खिडक्यांत, ( बाहेरील लांकडाचीं दारें, व आंतील कांचेचीं दारें या दोहोंमध्यें ) व छतांस भोंकें पाडून आंतील भागांत असत. कमानीपासून बंगल्यापर्यंत रस्ता चांगला खडी घालून केलेला होता व फुलझाडांकरतां दक्षिण व पश्चिम दिशेस चक्रें केलेलीं होतीं. दूर एका कोनांत विहिर होती. तरी बागेला पाणी बैलगाडींतून गवाळी तलावाचें आणावें लागे. पावसाळीं घोड्याची गाडी उभी करण्यास गच्ची, मोठे दिवाणखाने, गॅलऱ्या, खोल्या, मोठा थोरला बबरजीखाना अशा युरोपिअन थाटाच्या सोई या बंगल्यांत आहेत. बंगला जुना आहे. जुन्या मुंबईच्या वर्णनवृत्तांत या बंगल्याजवळून वाघ गेल्याचें वृत्त आहे. कारण इकडे फार वसति नव्हती. जागा अगदीं निवान्त होती. रात्रीं तर विशेषच. तिनसाना मात्र कोल्हे डोंगरांतून भक्ष्यार्थ निघाले असतां कुई कुई शब्द करून रोज एकवार शान्ततेचा भंग करीत. प्रथम रावसाहेबांनीं वरील दगड फोडून, मातीची भरणी घालून, सर्व डोंगराळ जागा साफ केली. देवांकरतां व स्वयंपाकाकरतां तात्पुरतें कुडामेढींचें घर बांधून नंतर मोठें दगडी घर बांधविलें. त्यावर देखरेख रा ब. वासुदेव बापुजी कानिटकर यांची होती. बबरजीखान्याचा गुरांचा गोठा बनविला. पाण्याचीं टांकीं बांधविलीं. या बंगल्याचे जुने तबेले होते. तेथें दागदुजी करून स्वतांची जोडीची गाडी, पत्नीकरितां स्वतंत्र गाडी व शाळेंत जाणाऱ्या मुलांची गाडी व

त्यांस जोडावयाचे घोडे इतक्यांची सोय करविली. मांजरें व पोपट, काकाकाऊ यांची विशेष सोय करावी लागली नाहीं. परंतु खबूतरांची व मोरांची करावी लागली. स्वयंपाक घराच्या अंगणाच्या बाजूला खबूतरां करतां उंच खांबावर घरें बांधविलीं. या बंगल्याच्या ग्यालरीच्या कोंपऱ्यांत मोरांच्या जोडप्या करितां पिसारा उभरल्यावर त्यास आंत सुखानें नाचतां यावें एवढा मोठा एक ताड्यांचा पिंजरा बसविला.*

मोरें व खबूतरें रावसाहेबांनीं १८६६ सालापासून बाळगलीं होतीं. परंतु त्यानंतर इतके दिवस कुतरे बाळगिले नव्हते. तथापि रावसाहेब या बंगल्यांत रहावयास आल्यावर तेथील माळ्याचे दोन कुतरे होते ते वरच राहूं लागले. व बंगल्याच्या दाराच्या दोन टोकांशीं बसून पहारा करीत. पुढें बरेच दिवसांनीं रावसाहेबांनीं या आश्रमास उचित असें हरिण बाळगिलें होतें तें इतकें माणसाळलें होतें कीं तें रावसाहेबांच्या मागें फिरत असे व लायब्ररींत ते वाचित बसले म्हणजे जवळ स्वस्थ बसे.

वाटोळीं देवतार्चनाच्या कामाची फुलझाडें लाविलीं. केळी लावविल्या. रावसाहेब भोजनोत्तर एकवेळ विडा खात असत, त्याकरतां पानवेल लावविली.

संग्रहीं आप्त इष्ट चाकर नोकर बरेच असल्यामुळें तें विविक्त स्थान असून माणसांनीं गजबजलेलें दिसूं लागलें

---

* याच्या पिंजऱ्याची लोखंडाची एक ताडी गंजून अशक्त झाल्यामुळें एकदां एका प्रबळ बोकोबानें ती वांकवून आंत प्रवेश करून रात्रौ मोराच्या पोटास मोठी जखम केली होती. ती पशुवैद्याकडून बांधविली होती. तो त्यांतून जगला व आपल्या प्रिय सहचरी समवेत अगदीं सुखानें जिवितावधि कालक्रमणा करीत होता. परंतु एक वर्षी वर्षासमयीं दीर्घ केकानीं " बहु आदरें करुनियां ये ये " असें मेघांस बाहत असतां पलीकडल्या बंगल्यांत राहणाऱ्या रावसाहेबांच्या इंग्रज स्नेह्याच्या दुखणाईत झालेल्या मुलीस त्रास होऊं लागल्यामुळें तिच्या पित्याच्या विनंतीवरून कांहीं दिवस वरील केकाकार मयूरपंताची मुस्कुटदाबी झाली होती.

याप्रमाणें सर्व व्यवस्था यथास्थित झाल्यावर रावसाहेबांस आनंद झाला तो त्यांनीं कोल्हापुरचे आपले स्नेही बळवंतराव लिमये यांस लिहिलेल्या एका पत्रांत व्यक्त केला आहे. " इकडे येण्याचा योग येईल तर माझी लहानशी मठीही आपल्या सहजीं दृष्टीस पडेल." (२०।६।१८८२ चें पत्र.)

---

## प्रकरण ५२ वें.

# धर्मादाय.

। दाता न दापयति, दापयिता न दत्ते।
॥ यो दानदापनपरो मधुरं न वक्ति॥
। दातृत्वदापनगुणो मधुराच वाणी।
॥ त्रीण्यप्यमूनि किल सत्पुरुषे वसन्ति॥ १॥

एक इंग्रजी म्हण आहे कीं× धर्मादायाचा आरंभ स्वकीयांस दान करून झाला पाहिजे. रावसाहेबांस हें तत्त्व मान्य होतें पण ते म्हणत " त्याचा शेवट तेथेंच होतां कामा नये ". रावसाहेबांस द्रव्यप्राप्ति व्हावयास लागली तों त्यांनीं स्वकीयांस व परकीयांस पात्र पाहून सारखाच धर्म करण्यास आरंभ केला. *बाबा परांजपे हे रावसाहेबांच्या वडिलांचे पहिल्या घरचे बन्धू. त्यांचें

---

× Charity begins at home.

* बाबाजींवर रावसाहेबांचें फार प्रेम असे. "माझे वडिलांचे पहिल्या घरचे बन्धू माझे काका—बाबा परांजपे-याणीं आपली दुःखाची कहाणी मला सांगितली. ते आतां आजारी असतात. अशक्त झाले आहेत. गेल्या ४६ वर्षें आमच्या घरीं आहेत. व आतां त्यांचें कसें चालावें याची काळजी त्यांस लागूं द्यावी ही मोठी करुणास्पद गोष्ट आहे. त्यांस मी माझ्या हातांत शेवटली कपर्दिका उरेतों मदत करीन. मी जीवन्त आहे व माझा हातपाय चालत आहे तों असें रडण्याचें कारण नाहीं.' (१५-५-६४)

कांहीं उत्पन्न होतें तें पोटाला नीटपणें पुरत नसे. वृद्धपणीं त्यांस दुसरा भरीला धंदा करतां येईना म्हणून त्याचा योगक्षेम नीट चालावा एतदर्थ एक ठिकाण बाबाजी यांच्या मुलाला १८७१ सालीं बक्षिस देऊन टाकलें.

त्याचप्रमाणें त्यांची तिसरी बहीण सौ. माईबाई दामली हिच्या चोळी बांगडी करतां एक बागायत ठिकाण घेऊन १८७२ त तिला बक्षीस दिलें.

" दुर्गाताई गोखली ", नानांची पहिल्या घरची बहीण, हीस सालोसाल द्रव्याची मदत करीत.

नातें उकरून काढणाऱ्यांचाही परामर्श घेत असत. भलुआका म्हणून एक आजोळाकडून बहिणीचें नातें असलेल्या एक वृद्ध बाई मधून मधून मुंबईस रावसाहेबांकडे " माहेरवाशीण आली हो " म्हणून येत असत, तेव्हां त्यांचें माघारपण आदरानें करवीत. व ती संतुष्ट होईल अशी रक्कम देऊन तिची पाठवणी करीत.

लहानपणापासून बाळा जोशी पांवसकर हा हरकामी नोकर यांच्या बरोबर कराचीस गेला होता. तेव्हांपासून वृद्धपणानें विश्रान्ति घेणें प्राप्त होईतों रावसाहेबांच्या जवळून दूर झाला नाहीं. त्यास एक घर व वाडी घेऊन १८७७त बक्षीस दिलीं. याचप्रमाणें दादा काळे म्हणून मुंबईस गृहस्थ होते. ते कांहीं जिनसांची ने आण करवून रावसाहबांचे उपयोगी पडत. त्यांची मुलगी विधवा झाली होती. तिला शेवटपर्यंत साहाय्य करीत. असल्याप्रकारचीं उदाहरणें अनेक आहेत. " बडीण बाई, म्हातारी, मुरूड मुक्कामीं गणपतीचे देवळांत होती तिला अन्न देण्याचें आपले मनांत आलेवरून कोलटकरीणबाईकडे ठेविली आहे. अन्न तुमचे घरांतून पोंचत आहे. अशक्त, डोळ्यांनीं दिसत नाहीं सबब तिची चाकरी कोलटकरीणबाईस सांगितली. काय द्यावयाचें तें ठरवावें. " (महादेव बाळ यांचें २०-११-६२ चें पत्र). हा धर्मादायाचा दुसरा प्रकार उत्तम आहे. तो आतां इंग्लंदमध्यें वृद्धावस्थेंत पेन्शन देण्याचें पार्लमेंत सभेनें शक्य तेव्हां ठरविल्यानें लोकांस मान्य झालेला दिसत आहे.

गांवांत कोणी गरीब मनुष्य आजारी असला तर त्याला मदत मागितल्या-शिवाय रावसाहेब करीत. " गांवांत कोणी पोटाकडून थकला तर कोणास न कळवितां २ पायली तांदूळ अथवा १ रु. पर्यंत द्यावें व मला कळवावें. " "एकास साजूक तूप व आंबेमोहोराचे तांदूळ द्या." " प्रांतांतील कोरान्नकरी आजारी पडला आहे त्यास शिजविलेलें अन्न, अन्नशुद्धि पुष्कळ घालून रोज पाठवावें. आंथरापांघरावयास घोंगडी नसेल तर द्यावी " असें सांगत.

आप्त व इष्ट यांच्या बाहेर धर्म करावयाचा म्हणजे हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें तृषितास जलपान कण्याची सोय करणें या धर्माची महती पुढें दिल्याप्रमाणें धमशास्त्रानें गाइली आहे.

**। वापीकूपतडागादौ धर्मस्यान्तो न विद्यते ।**
**॥ पिबन्ति स्वेच्छया यत्र जलस्थलचराः सदा ॥ १ ॥**

आरंभीं १८६९ सालीं कागवाड व नरसोबाची वाडी या वाटेवर एक विहीर बांधण्यास रावसाहेबांनीं मदत केली होती. पुढें सुवर्णदुर्ग तालुक्यांत वापीतडागादि सार्वजनिक लोकोपयोगी कामागिरी करावी अशी विनंति रत्ना-गिरीच्या कलेक्टरांस त्यांकडे हजार रुपये पाठवून १८७१ त केली ती आभारपूर्वक मान्य होऊन कशेळीच्या घांटांत कांहीं टांकीं व विसापूरच्या वाटेवर एक विहीर अशीं बांधविण्यांत आलीं. हीं कामें रत्नागिरीचे कलेक्टर मि. एल्फिन्स्टन यांच्याकडे सोंपवलेलीं होतीं. त्यांनीं तीं मोठ्या उत्साहानें केलीं. त्यांचा व रावसाहेबांचा पुढें चांगला स्नेह जमला.

जलदानानंतर अन्नदानाचा महिमा हिंदुधर्मशास्त्रांत फार गाइलेला आहे. तैत्तेरीय उपनिषदांमध्यें सृष्टीची उत्पत्ति सांगितली आहे. " पहिल्यानें, ब्रह्मचा-पासून आकाश झालें. त्यापासून वायू, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधी, ओषधींपासून अन्न व अन्नापासून पुरुष. हा पुरुष अन्नरसमय आहे. अन्न सर्वभूतांचे अगोदर अस्तित्वांत आहे असें सांगून पुन्हा असें सांगितलें आहे कीं,

**अन्नाद् भूतानि जायन्ते । जातानि अन्नाद् वर्धन्ते । अद्यते इति च भूतानि तस्मादन्नं तदुच्यते ॥ "**

सर्व भूतांची स्थिति व लय हीं अन्नापासून आहेत. म्हणून अन्नदान सर्व दानांत श्रेष्ठ मानलेलें आहे. ( अन्नमय प्राण व प्राणमय पराक्रम ही मराठी म्हण आहे. ) त्याच उपनिषदांत पुढें म्हटलेलें आहे. ' अन्नं न परिचक्षीत '. कोणी अन्नाचें दान करीत असेल तर त्याची विचक्षणा करूं नये. ' अन्नं बहु कुर्वीत. ' ह्मणजे नाना प्रकारचीं अन्नेंच वाढवावीं. या उपनिषदाचे आधारें हिंदूंची प्रवृत्ति अन्नदानाकडे म्हणजे अन्नछत्रांकडे आहे.

**राव**साहेबांनीं **जयगड**च्या जवळ एक अन्नछत्र महिना १००।१५० रुपये. खर्च करून ठेविलें होतें तें आपल्या हयातीपर्यंत ठेवलें होतें. " तर उतरल्याबरोबर वाटसरूंस खबर लागेल अशा ठिकाणीं होतें. सर्व जातीच्या आबालवृद्धांस--भात जेवणाऱ्यास भात, व भाकरी खाणाऱ्यास भाकरी--एकवेळची पोटभर मिळण्याची व्यवस्था केलेली होती. त्यावेळीं **मुं**बईकडील वाटसरूंस, बोटीचें येणें जाणें नियमित नसल्यामुळें बंदरावर उपाशीं तिष्ठत बसावें लागे. फराळांत तिकिटाचे पैसे खर्च केले तर गरीब लोकांस पुन्हा घरीं जावें लागे. अशा वेळेस या अन्नछत्राचा उपयोग पुष्कळ झाला.

**आसूद** मुक्कामीं वडिलांच्या इच्छेवरून एक सहस्र भोजन **राव**साहेबांनीं घातलें व काशीयात्रेहून आल्यावर गंगापूजन करून दुसरें सहस्रभोजन **मु**रूड मुक्कामीं घातलें. एका **मासू** नांवाच्या आपल्या खोती गांवीं सर्व जातीच्या लोकांस भोजन घातल्याचें वृत्त मागें ३६ व्या प्रकरणीं आलेंच आहे.

प्रथम सांगितलेले, **र**त्नागिरीचे कलेक्टर मि. **ए**ल्फिन्स्टन् यांस **र**त्नागिरी जिल्ह्यांतील महारोगानें पीडित झालेल्या लोकांची कींव येऊन त्यांच्या सुश्रूषेची कांहीं व्यवस्था करावयाची होती. त्यांचा व **राव**साहेबांचा वर सांगितल्याप्रमाणें स्नेह जडला होता, म्हणून **र**त्नागिरी जिल्ह्यांतील या व्याथित लोकांकरतां मुंबईच्या धानिक लोकांत खटपट करा असा शब्द **राव**साहेबांवर त्यांनीं टाकला. तेव्हां या गरीब रोगग्रस्तांतर्फे जोरदार लेख आपल्या वर्तमानपत्रांत लिहा अशी विनंति आपले मित्र

मि. वुड यांस पहिल्यानें रावसाहेबांनीं करून ठेविली व पुढें एका धनिक गृहस्थाकडे आपले मित्र मि. सोराबजी शापूरजी बेंगाली यांस घेऊन गेले. त्या गृहस्थांनीं १२,००० रुपये या रोग्याकरतां एक लेपर असायलम बांधण्यास देऊं केले. त्यास तीन शर्थी घातलेल्या होत्याः ( १ ) सर्व व्यवस्था होईतों दात्याचें नांव त्याच्या इच्छेप्रमाणें उघड करावयाचें नाहीं व (२) त्या इमारतीस दात्याचें नांव द्यावयाचें व ( ३ ) सार्वजनिक कामें करणाऱ्या खात्यानें आगाऊ केलेला अंदाज काम पुरें झाल्यावर खोटा ठरून मूळ देऊं केलेल्या रकमेवर खर्चाची वाढ झाल्यास दात्यास पुन्हा भीड न घालतां सरकारानें वाढ सोसावी. हे धनिक गृहस्थ म्हणजे प्रसिद्ध पारशी गृहस्थ दिनशा मा. पेटिट हे होत.

या सत्कृत्याबद्दल रत्नागिरीच्या लोकांनीं सभा भरून दिनशा मा. पेटिट यांचे आभार मानले. त्या सभेचे अध्यक्ष मि. बर्डवुड साहेब होते. सदरहू पेटिट यांनीं घातलेल्या अटींवर देऊं केलेल्या रकमेचा सरकारनें साभार स्वीकार केला.

१८७२।७३ सालीं दुष्काळ निवारणार्थ एक फंड जमविला होता तो विशेषेंकरून नाशिक व खानदेश या जिल्ह्यांकरतां होता.

हा दुष्काळ जवळचा होता. स्वदेशांतला होता; परंतु थोर लोक वसुधेला आपल्या कुटुंबाप्रमाणेंच मानतात, या न्यायानें रावसाहेब इतर देशांतील दुष्काळ फंडासही साहाय्य करीत. २।३।८२ सालीं आयर्लंदांत दुष्काळ पडला होता. लॉर्ड मेयरनें फंड काढला होता, त्यास रावसाहेबांनीं पैसे पाठविले होते.

रत्नागिरीस इंग्रजी शाळागृह १८६६च्या पूर्वीं बांधलें होतें. त्यास १२००रु. लागले. त्यांपैकीं रावसाहेबांनीं ५०० रु. एकट्यांनीं दिले होते. त्यावेळेस त्यांची प्राप्ति कमी होती. तथापि रत्नागिरीच्या शाळेंत आपण विद्यार्थी होतों या अभिमानानें एवढी मोठी रकम त्यांनीं दिली होती. १८६८ सालीं रत्नागिरीचे जज्ज मि. वेलरसाहेब यांनीं वकिलांच्या कायद्याच्या पुस्तकांच्या लाय-

ब्रीकारितां मदत मागितल्यावरून १००रु. पाठवून दिले. सरकारनें १०००रु. खर्च केले होते.

**गोकुळदास तेजपाळ** यांचा धर्मादाय फारच प्रसिद्ध आहे. त्यांची संस्कृत शाळा गवाळी तळया जवळ आहे. शाळेच्या इमारतीकरतां ती जागा ट्रस्टींनीं विकत घेतली. पुढें कांहीं भानगड उपस्थित होऊं नये अशी खबरदारी घेऊन त्यासंबंधें कागद पत्र जे कांहीं कायद्याप्रमाणें व्हावे लागतात ते सर्व रावसाहेबांनीं तयार केले. तेव्हां त्याचा माहिनताना म्हणून ट्रस्टी **राव**साहेबांच्या पदरीं मोठी रक्कम बांधूं लागले. **राव**साहेबांनीं ती घेण्याचें एका अटीवर कबूल केलें व ती अट ही कीं ट्रस्टींच्या मनांत तेथें संस्कृत कालेज स्थापावयाचें होतें त्याची स्थापना झाली कीं हे रुपये संस्कृत ग्रंथसंग्रहाकरतां ट्रस्टींनीं घ्यावे, त्याप्रमाणें **राव**साहेबांनीं सरकारी नोटी विकत घेतल्या व त्या विकत घेतांना जो बटवडा मिळाला त्यासह शेवटल्या तारखेपर्यंतच्या व्याजासह २४२६–८–० रु. ५।१२।७५ रोजीं ट्रस्टींच्या स्वाधीन केले.

एकदां **रत्नागिरी** जिल्ह्यांतील **संगमेश्वर** गांवीं अग्निप्रलय होऊन १७५ घरें व दुकानें जळून खाक झालीं. दुकानांत सांठविलेल्या दहापंधरा खंडी मिरच्या व त्यांची धुरी सर्वत्र पसरल्यामुळें आगीपासून कांहीं माल संरक्षण करण्यामध्यें फार अडचण प्राप्त झाली; त्यामुळें नुकसान फार झालें. त्याचा अदमास दीड लाखांवर गेला. शेंकडों लोक अगदीं निराश्रित झाले. त्यांस घरें बांधण्यास व निर्वाहास साहाय्य करणें प्राप्त झालें. या प्रलयांत त्या गांवांतील पिढिजात श्रीमंत गृहस्थ **आप्पा जोग** यांचा एक भाऊ व पुतण्या अशीं दोन माणसें दगावलीं. ते रोकड आणण्याकरितां आंत शिरल्यावर पुढून घर पेटलें व मागून पेटलेल्या मिरच्यांच्या धुरीचा लोट आला त्यांतून त्यांस पळण्यास मार्ग काढतां आला नाहीं. **आपा जोग** यांचें दुसरें राहण्याचें ठिकाण जयगड मुक्कामीं होतें. तेथून त्यांनीं धान्य आणून गरिबांस दिलें व पुन्हा व्यापार चालू करावयास पैसेही दिले. इतकेंच नाहीं तर अग्नीमध्यें ज्यांचीं घरें व दुकानें जळालीं त्यांच्यावर कोडतांत घातलेल्या फिर्यादीही काढून घेतल्या. कलेक्टर मि. **जे. वुइलसन्** यांनीं मुंबईच्या वर्तमानपत्रांत जाहीर विनंति

पैशाच्या मदतीकरतां उदार व धनिक लोकांस केली; व सरकारासही इमारती करतां जंगलांतील लांकूडसामान धर्मार्थ देण्यास विनंति केली व त्याच विनंतिपत्रांत लिहिले कीं " *रत्नागिरी जिल्ह्याच्या हिताकडे विशेष लक्ष

* "रत्नागिरी जिल्ह्याच्या हिताकडे लक्ष देणारे" अशी रावसाहेबांची तारीफ प्रसिद्ध रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनींही १८६६ सालीं एकदां केली होती. त्यावेळेस ते रत्नागिरीस मुख्याध्यापकाच्या कामावर तेथील हायस्कूलांत होते. मुलांची भोजनाची सोय नसल्यामुळें फार अडचण पडते असें नजरेस आल्यामुळें मुंबईच्या धर्मात्म्या लोकांकडून कांहीं वर्गणी जमवावी व कांहीं सरकारांतून घ्यावी व वसतिगृह बांधावें असा विचार करून त्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें त्याच वर्षी जानेवारीच्या २० तारखेस वर्गणी गोळा करण्याकरतां रावसाहेबांस पत्र लिहिलें. " एक गोष्ट तुम्हांस माहीत आहेच ती ही कीं या जिल्ह्यांतील लोक दरिद्री आहेत. दोऱ्या सैल करून पैशाच्या पिशवीचें तोंड सैल करण्याची त्यांना फार अनिच्छा असते. सार्वजनिक उपयोगाची कामें करण्याची हौस येथें असली तर तो कोणाचेच लक्षांत येत नाहीं. कोणांतही नाहीं हें मात्र प्रत्येकाच्या लक्षांत तेव्हांच येतें. तुम्हीं आपल्या लोकांची आधींच मोठी कामगिरी केली आहे. शाळागृहाकडे खर्च झालेल्या एकंदर १२०० रुपयां पैकीं ५०० रुपये तुम्हीं दिले आहेत. शिवाय तुमचे नेटिव्ह ओपिनियनही तुमच्या कामगिरीची साक्ष देत आहे. रत्नागिरीच्या शाळेशी असलेला तुमचा जुना ऋणानुबंधच तुम्हांजवळ येण्याला उत्तेजन देत आहे. " असें म्हणून वसतिगृहाकरतां मुंबईच्या धनिकांस भीड घालण्याविषयीं रावसाहेबांस विनंती करून पुढें लिहिलें. "भिक्षा मागत हिंडणें हा धंदा सुखावह नाहीं. यांत शंका नाहीं परंतु सुशिक्षित लोकांनी मुंबई इलाख्यांत ज्या सरकारी शाळा चालविल्या आहेत व इतर लोकोपयोगीं कामे चालविलीं आहेत तीं भिक्षावृत्तीनेंच म्हणून या वृत्तीला भिक्षावृत्ति म्हणूं नये. लक्ष्मीवन्तास सत्पात्र दान कोठलें व कोठल्या दानानें देशहित होईल याचें शिक्षण ही वृत्ति देत असते ती अपमानास्पद कशी होईल ?"

यावरून रावसाहेबांनीं मुलांची वाढ हायस्कूलमध्यें कशी होत गेली आहे त्याचे तक्ते मागविले होते व एक छापील वर्गणीची यादी प्रसिद्ध केली होती. मंगळदास वगैरे कांहीं लोक तयार आहेत अशीं हीं टिपणें आहेत. परंतु पुढें नक्की काय झालें तें समजलें नाहीं.

देणारे **राव**साहेब मंडलिक " यांस एक पैसे गोळाकरण्याकरतां पत्र लिहिलें व त्याप्रमाणें त्यांच्याकडून पैसे मिळतील अशी त्यांत खात्री प्रदर्शित केली. कलेक्टरांचें पत्र **राव**साहेबांस आलें व सरकारास त्यांनीं पत्र पाठविलें त्याची नक्कल सरकारांतून आली. **राव**साहेब लागलेच कामाला लागले. या फंडाला पहिला आंकडा २००० रुपयांचा सर **जेम्स फर्ग्युसन् मुंबइचे** गव्हर्नर, यांनीं घातला होता. सर राजे **दिनकरराव**, पेढीवाले **किबे** साहेब इ. गृहस्थांस **राव**साहेबांनीं पत्रें लिहिलीं. सर **राजवाडे** यांनीं २०० रुपये दिले. आपले मित्र मि. **शापुरजी बेंगाली** यांच्या मार्फत प्रसिद्ध दानशूर पारसी स्त्री बाई**मो**टलाबाई यांकडून **राव**साहेबांनीं मिळवलेली मदत मोठी होती.

दानप्रकरणांत तुला हें महादान आहे असें मत्स्यपुराणांत सांगितलें आहे व तें थोर थोर घराण्यांत करण्याची चाल आहे. इतिहासांत नमूद असें उदाहरण राज्याभिषेकानंतर श्री शिवाजी महाराजानीं सुवर्ण तुला केली होती हें प्रसिद्धच आहे. **राव**साहेबांनीं १८७९ सालीं चंद्रग्रहणाच्या मुहूर्तावर आपली व पत्नीची एकत्र बसून रौप्यतुला करविली. तोलून सुवर्ण किंवा रौप्य देवविण्याचा शास्त्राचा हेतु कदाचित् असा असेल कीं धनाढ्य लोकांनीं शक्यतर आपल्या भारंभार रुपये तरी दान करावे. तें कांहीं असो. **राव**साहेबांस मनुस्मृतीचा ग्रंथ प्रसिद्ध करतांना भिन्न स्मृतींच्या हस्तलिखित प्रति शोधतां शोधतां काशीपासून दक्षिण कोंकणापर्यंत पुष्कळ विद्वान लोकांचा शोध लागला व त्यामध्यें कांहीं प्रकरणें फारच जाडीं होतीं. त्या पुण्यशील पंडितांची कांहीं तरी संभावना आपल्या हातून व्हावी हा त्यांचा मानस असावा. प्रत्यक्ष तोलनविधीचे रुपये ८९९७ झाले. त्यांत दक्षिणेचे मिळून एकंदर ९४०८॥ नऊ हजार चारशें आठ रुपये साडेतीन आणे वांटण्यांत आले. काशीपासून कोंकण-पट्टीपर्यंत रुपये दान करण्यांत आले. त्यांत विद्वत्तेप्रमाणें दोन वर्ग ठर-विले होते.

**शामराव विठ्ठल कायकिनी** वकील यांनीं आंध्र देशांतील एका उत्तम शास्त्रीबुवांची शिफारस केली होती. त्याचप्रमाणें **शांताराम नारायण, महादेव**

**चिमणाजी आपटे** व **एस्. व्ही. धुरंधर** यांनीं विद्वान शास्त्री जनांचीच शिफारस केली व त्यांची संभावना **राव**साहेबांनीं आदरानें केली या शिवाय **महादेव गोविंद रानडे** व दुसरे लोक यांच्या शिफारशी आल्या होत्या. इतर बिन ओळखीच्या याचक वर्गानीं व संस्थांनीं विनंति पत्रें लिहिलीं होतीं. त्यांत कर्जबाजारी व अविवाहित लोकांपासून तों पंढरपूरआर्फनेजच्या चालकांपर्यंत मंडळी होती.

क्वचित्प्रसंगीं गुप्तदान म्हणून जो प्रकार सांगितला आहे त्याचेंही अवलंबन **राव**साहेब करीत. उदाहरणार्थ **ना**शिक येथील दुष्काळग्रस्तांस एक **मुं**बईकर हिंदू अशा नांवानें मि. **अर्स्किन पेरी** यांकडे **राव**साहेबांनीं रुपये पाठविले होते. ( ३-९-७२ चें मि. **अर्स्किन** यांस पत्र ).

सर्वांस शोभा आणणारा, त्यांतून विशेषेंकरून दान करणाऱ्यास असा जो सद्गुण विनय, तो **राव**साहेबांच्या अंगीं होता असें पुढील **हरिहर शास्त्री द्रवीड** यांस लिहिलेल्या २१।१२।८८ च्या पत्रांत दिसत आहे. “ ××× एक लहानशी पेटी आपणाकडे पार्सल करून पाठविली आहे. त्यांत दोन बंडळें आहेत. त्यांतून एक आपण स्वीकारावें व दुसरें ज्याच्यावर वेदमूर्ति भैय्याशास्त्री यांच्या नामाची चिठी आहे तें त्यांस देण्यांत यावें.×× चंद्रमा पुजावयाचा म्हणजे आम्हीं दोन सुतानीं पुजतों इतकी आमची शक्ति आहे. हें लक्ष्यांत ठेवून उणें, पुरें करून घ्यावें.”

जुनीं धर्मादायाचीं जीं तत्त्वें होतीं त्यांकडे **राव**साहेबांची पूर्ण नजर होती. त्याप्रमाणें आपण वागून दुसऱ्यासही तसें वागावयास उपदेश करीत.

**मन**सुखराम **त्रि**पाथी यांस कांहीं धर्मादाय करावयाचा होता. त्यासंबंधें **राव**साहेबांस त्यांनीं कांहीं प्रश्न विचारला होता. त्याला **राव**साहेबांनीं उत्तर दिलें तें असें:—

“ जे कोणी याचना करीत नाहींत म्हणजे जे अयाचितवृत्ति असतात अशानां साहाय्य होईल अशी कांहीं व्यवस्था झाली तर करावी. **सत्यां क्षितौ किं कशिपोः प्रयासे** इत्यादि जें शुकाचार्य म्हणतात तें ध्यानांत आणा.

आतां कालाचे परिवर्त्तन फारच त्वरेनें होत असतें हें खरें आहे. तथापि उच्चतम वेदांताचें जें तत्त्व आहे त्यास व्यावहारिक स्वरूप द्यावयाचें असेल तर जे अजगरवृत्ति पाळतात त्यांस साहाय्य झालें पाहिजे. असल्या मूर्ति अगदीं दुर्मिळ आहेत यांत शंका नाहीं परंतु त्या दुर्मिळ आहेत म्हणून आपण त्यांची सोय कांहींच करून ठेऊं नये असें नाहीं." ( ३–३–८५ )

देवालयांच्या जीर्णोद्धारास चांगलें साहाय्य करीत. गुजराथी लोकांच्या जीवदयासारख्या संस्थांस मदत करीत.

**राव**साहेबांनीं मोठेंसें यज्ञयागादि हवन कर्म केलें नाहीं. परंतु धाराग्नि कांहीं काळ संभाळला होता.

हे **राव**साहेबांनीं केलेल्या धर्मदायाचे प्रकार पाहिले म्हणजे असें आढळून येईल कीं त्यांची दानपद्धति मुख्यतः हिंदुधर्मशास्त्राला धरून होती. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दानधर्माचे मुख्यतः दोन प्रकार आहेत. (१) इष्ट म्हणजे हवनादि व ( २ ) पूर्त म्हणजे वापी तडागादि. दोघांचें वर्णन महाभारतांत दिलेलें आहे.

**॥ एकाग्निकर्महवनं त्रेतायां यच्च हूयते ॥**
**॥ अन्तर्वेद्यांच यद्दानमिष्टमित्यभिधीयते ॥ १ ॥**
**॥ वापीकूपतडागानि देवतायतनानिच ॥**
**॥ अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते ॥ २ ॥**

तथापि पाश्चात्य संस्कृतीचा परिणाम जो व्हावयाचा तोही त्यांच्यावर होऊन ती दानपद्धति त्यांनीं उचलली होती.

विद्वान मण्डळींच्या ग्रंथांच्या प्रती विकत घेऊन त्यांस उत्तेजन देत व विद्वान होऊं घातलेल्या विद्यार्थ्यांस द्रव्याची मदत करीत. शिक्षणसंस्थांस मदत करीत. लोकांनीं करावयाच्या स्मारकांचा प्रघात पडत चालला होता त्यांकरितां पैसे भरीत. **मुं**बईस कांहीं वर्षांपूर्वीं गरीब रोग्यांकरतां "बांबे नेटिव्ह डिस्पेन्सरी" म्हणून एक धमार्थ दवाखाना कांहीं उदार धनिकांनीं बरींच वर्षे चालविला होता. त्याच्या व्यवस्थापक मंडळींचे **राव**साहेब सभासद होते व वर्गणीदार होते. कांहीं कांहीं धर्मादाय शिष्टाचार म्हणून करावा लागे. तसा ते करीत असत, उदाहरणार्थः—घोड्याचीं प्रदर्शनें, फुलांचीं प्रदर्शनें, इत्यादिकांस वर्गण्या देणें.

---

## प्रकरण ५३ वें.

# स्त्रीविरह.

**। नेह चात्यन्तसहवासः कस्यचित्केनचित्सह ।**
**॥ राजन्स्वेनापि देहेन किमु जायात्मजादिभिः ॥**

(श्रीमद्भागवत)

सौ. अन्नपुर्णाबाई याची प्रकृति आतां दिवसानुदिवस अधिकच व्याधिग्रस्त होत चालली. "पत्नी आतां अंथरूणग्रस्त झाली. परंतु तिला जो त्रास होतो त्याला अंत नाहीं. असें मनुष्य कसें जगतें याची कल्पना करवत नाहीं, पण पहा हें असें जगतें." (३०।९।७८ चें ज. जेकब यांस पत्र) १८७८ सालीं एक अरबस्थानांतील नामांकित हकीम आला होता. त्याचा कांहीं इलाज चालला नाहीं. डॉ. हॅमिल्टन यांच्या होमिओपॅथिक औषधांचाही गूण आला नाहीं. या वर्षी व्याधींच्या शारीरिक पीडेंत आणखी मानसिक पीडेची भर पडली. मंडलिकीण बाईच्या सेवेंत तत्पर असलेली त्यांची मधली बहीण सौ० तापू आक्का करंदीकरीण यांनीं काहीं तासांच्या दुखण्यानें २८।३।१८७८ रोजीं स्वर्गलोक गांठिला. मंडलिकीण बाईंस फार दुःख झालें. तें त्यांच्या वयाचीं ४४ वर्षे लोटलीं होतीं म्हणून रुग्णाईत स्थितींत असह्य झालें.

रावसाहेबांनीं हें दुःख कांहीं कमी व्हावें म्हणून आपल्या गोड वाणीनें तंबुरा लावून आपले कारकून विष्णुपंत जोगळेकर व भाचे, बाबासाहेब कान्हेरे यांस साथीला घेऊन रोज रात्रौ कधीं भजन करीत व कधीं अध्यात्म रामायण वाचून दाखवीत व स्त्रीचें समाधान झालें तर पहात. "धांव रे! रामराया!" हें पद तर श्रोत्यांस व म्हणणाऱ्यांस गहिंवर आणीतसे. पुढें १८७९ त रावसाहेब पत्नीसह महाबळेश्वरीं गेले होते. त्याठिकाणीं दोघांनीं पुत्राहून अधिक मायेनें पाळलेल्या चिरं० धोंडूस त्यांच्या पित्याच्या परवानगीनें दत्तक

घेतलें. दत्तहोमाला विठ्ठल भटजी काळे आचार्य होते व ब्रह्मा राजाराम शास्त्री बोडस होते. परत येतांना खंडाळ्याच्या घाटांत अपघात होत होता. रावसाहेबांच्या व मुलाच्या जीवावर आलें होतें. ईश्वरानें ती वेळ टाळली. पुढें सौ. मंडलिकीणबाईची प्रकृति अशक्त होत गेली. विशेष कांहीं कारण झालें नव्हतें. नेहमींप्रमाणें कधीं कधीं उद्भवणारा दमा उचलला होता. येथील वैद्य व डाक्तर यांचा उपाय चालेना म्हणून डा. भिकाजींस रावसाहेब तार करणार इतक्यांत त्यांच्या पत्नीच्या प्रकृतींत फार चलबिचल होऊन, सर्व परिवार वाटोळा जमला असतां ५।१०।७९ रोजीं पहांटेस २॥ वाजतां त्यांचें देहावसान झालें. " माझी पत्नी २—३० वाजतां मला गुंतवून गेली. त्यांतून माझी सुटका एक परमेश्वर करूं शकेल. ती अगदीं प्राणोत्क्रमण होईतों शुद्धीवर होती. " ( ५।१०।१८७९ ची नोंद ) रावसाहेबांना पत्नीविरहाचें दुःख फार झालें. त्याचें वर्णन करणें कठीण आहे. त्याची कल्पना पुढें दिलेल्या पत्रव्यवहारावरून होईल.

" हा महिना फार दुःखाचा गेला. माझी बिचारी बायको पांचव्या तारखेस परलोकास गेली. तुम्हांला ठाउक आहेच कीं असें एक दिवस लवकरच घडून येणार होतें. परंतु ती गोष्ट घडून आल्याबरोबर मीं अगदीं अस्वस्थ झालों आहें. आम्हीं अशीं एकत्र बद्ध झालों होतों " ( मि. गिब्स यांस पत्र ).

" मी सात आठवडे स्वस्थ बसलों होतों. माझ्या बायकोचा आजारीपणा व तिच्या गेल्या महिन्याच्या पांचव्या तारखेस मृत्यु हें त्याचें कारण होय. तुम्हांला माहीत आहेच कीं ती बरीच वर्षे रुग्णावस्थेंत होती. खुर्चीत घालून फिरवावी लागे. तथापि मनुष्यस्वभाव असा आहे. पहा ! तिच्या निर्गमनानें माझ्या मनाचें स्वास्थ्य अगदीं उडून गेलें आहे व स्थिति फार भयंकर झाली आहे. हेंच पत्र जर मी दुसरे कोणास लिहिण्यास घेतलें असतें तर मीं येथेंच थांबलों असतों. परंतु तुम्हीं जाणतच अहांत कीं आपल्या दुःखग्रस्त स्थितींत सुद्धां एका जुन्या मित्राचें दुःख ऐकून त्यानें दुःखित व्हाल. माझ्या बायकोचे प्राण हरवले त्याबरोबर एक जन्माचा मित्रही हरवला. तिच्या दुःखण्यामुळें—त्याचा

प्रकार तुम्हास विदित आहेच—आमचीं उभयतांचीं मनें चांगलीं एकत्र जुळून गेलीं होतीं. जशीं सांखळीच्या दुव्यानेंच! अशा स्थितींत माझें दुसरें लग्न ( जें करावयास आमच्या दुष्टचाली रीतीची परवानगी आहे तें ) करून देण्याचे सृष्टिक्रमाविरुद्ध जे प्रयत्न माझ्या नातेवाईकांनीं केले त्यांमुळें तर तिच्या दुखण्यांत माझ्या प्रेमाची तिच्या प्रेमाशीं सांगड अधिक घट्ट बसली. गेलीं सहावर्षें तर तिचे नित्य विधी उरकून घेण्याससुद्धां तिला दुसऱ्याची मदत लागत असे. परंतु तिला मदत करण्यांतच मला सुख वाटत असे. तिनें आपले हाल सोसण्यांत दिव्य शक्ति दाखविली हें मी जाणून होतों."

" ती तर आतां जड देह टाकून गेली. तिनें आपल्या धाकट्या बहिणीचा मुलगा ( ज्याची जननी तो सहा महिन्यांचा असतांच निवर्तली होती, तो ) माझें मन वळवून दत्तक घेवविला. याला लहानाचा मोठा करून तिच्या मागून जाणें हें एवढेंच मला कर्तव्य उरलें आहे." ( ज. जेकब यांस पत्र )

" आपल्या शेवटल्या पत्राबद्दल मी आपला आभारी आहें. समदुःखी अशा आपल्या मित्राचें सांत्वन करण्याचा आपला हक्कच आहे. माझें दैव कांहीं विचित्र आहे. माझ्या समकालीन लोकांच्यापुढें जाण्यांत मीं यशस्वी झालों. मला बायको पण काय मिळाली होती! ती मंदोदरी व अहिल्या या दोघी जणींच्या सद्गुणांची खाणच होती. बिचारीच्या मागें दुखणीं लागून ती १८६० सालीं अंथरुणास खिळून गेली. इथले तिथले, जिकडले तिकडले उपाय तिला आराम पडावा म्हणून केले. तिच्या परस्वाधीनपणामुळें मी तिच्याशीं दृढपणें प्रेमबद्ध झालों. मी तिच्याकरतां बरोबर मंडळी घेऊन स्पेशल ट्रेन काढविली व तिला दिल्ली, बनारस व अलाहाबाद या यात्रा १८७६।१८७७ सालीं करून आलों. आमचे देह दोन पण जीव एकच होता."

" तिचे हाल काय वर्णावे! तिला खुर्चीत घालून आज दहा वर्षें फिरवावें लागे. हे सर्व हाल तिनें आनंदानें सोसिले. शारीरिक कष्ट तरी थोडे कमी होतील असा विचार करून होती. पण तसेंही व्हावयाचें नव्हतें. शेवटीं

आम्हीं तिचा एक लहान भाचा गेल्या उन्हाळ्याच्या सुटींत दत्तक घेतला. त्याच्या शिक्षणाची आतां सुरवात करणें आहे. आतां पत्र पुरें करतों. पत्रविस्ताराची सारी सीमा आधींच उलंघून झाली आहे अशी भीती वाटत आहे. याच कारणामुळें ज्यांस मी काहीं ग्रंथ नजर म्हणून पाठवीत असतों, त्या बाबू राजेन्द्रलाल मित्रांची भेट घेऊं शकलों नाहीं."

"मी फक्त म्युनिसिपल कारपोरेशनच्या सभांना जात असतों, कारण मला कारपोरेशननें अध्यक्ष निवडलें आहे व पुढल्या महिन्यांत तब्बेत ठीक राहिल्यास पुन्हा थोडा वेळ कामकाज पुन्हां पहावयास लागणार आहें. ( कलकत्तेकर मित्रास पत्र १८।११।१८७९. )

या अत्यन्त दुःखदायक प्रसंगीं १२।१२।७९ चें कुमारी जर्ट्रूड जेकब ( जेकब साहेबांची पुतणी व दत्तक मुलगी ) हिचें पत्र वाचण्यासारखें म्हणून दिलें आहे:—" × × × स्वतां तुम्हांस पत्र न लिहितां तें लिहिण्याचें काम काकांनीं मला सांगितलें आहे. इकडच्या कडक थंडीचें प्रमाण वाढलें आहे त्याबरोबर काकांची सर्व दुखणींही त्या प्रमाणांतच वाढलीं आहेत. ते अगदीं अशक्त झाले आहेत व जे न घेतले असतां चालेल ते सर्व मानसिक अथवा शारिरिक श्रम करण्याचें ते टाळीत असतात. तुमच्या सतरा तारखेच्या पत्रांत जें अत्यंत दुःखदायक वृत्त कळविलेंत त्याबल सहानुभूतीचें प्रदर्शन करावयाचें तें स्वतां करावयाचें असा हेका धरल्यास उलट टपाल नेणारी आगबोट चुकेल या भीतीनें काकांनीं मलाच हें पत्र लिहावयास सांगितलें आहे व त्याला तरी कारण त्यांची पराधीन स्थिति हें तुम्हांस सहज कळून येईल."

"गरीब बिचारी तुमची पत्नी अगदी परस्वाधीन होती ही एकच गोष्ट प्रेमाचें बन्धन इहलोकीं व परलोकीं दृढ होण्याला कारण झाली होती हें काका जाणून आहेत. ज्यांच्याकरतां आपण अत्यन्त क्लेश करतों त्यांचा विरह तर अत्यंत क्लेशदायक होतो. जे आम्हांस चिकटून राहून आमच्यावरच अवलंबून राहतात, त्यांची दुर्बलताच आमच्या आंगांतील खरे खरे उत्कृष्ट गूण प्रकट करावयास लावून आम्हांला बलवान करते."

स्वत:च्या प्रकृतीविषयीं तुम्ही कांहींच लिहिलें नाहीं. तुमची प्रकृति जरा बरी झाली आहे असें म्हणण्यापेक्षां पहिल्या दु:खावेगाची तीव्रता शमन झाल्यावर बरी होईल अशी काकांस आशा वाटत आहे."

'तुम्ही एक मुलगा दत्तक घेतला म्हणून काकांस आनंद वाटत आहे. तुमच्या प्रिय पत्नीचा तो इतका जवळचा आप्त आहे व मुख्यत: तिच्याच इच्छेनुरूप तुम्हीं त्याला दत्तक घेतला आहे, यामुळें तो एक तिचाच मागें राहिलेला अवशिष्ट अंश आहे अशी तुमची भावना होईल व तुम्हांस मोठ्या समाधानाचें तो कारण होईल व त्याच्या प्रत्यहीं नवोदित तारुण्याकडे पाहून तुमचा तद्द्वारा पुनर्जन्मच होत आहे ( तुम्हींच पुन: जन्मास आले आहांत ) असें तुम्हास वाटेल अशी आशा आम्हीं उभयतां करीत आहोंत."

"तुम्हीं चालविलेल्या वाङ्मयविषयक परिश्रमावर काकांची आसक्ति बसली आहे व त्या कामीं जें तुम्हांस यश मिळत आहे तें त्यास सुखावह व अभिमानास्पद झालें आहे."

आपली विश्वासार्ह.
**जर्ट्रूड. ली. जेकब.**

मिस **जर्ट्रूड ली जेकब** आपल्या वृद्ध काकांच्या सेवेंत जागरूक होती व **राव**साहेब आपल्या पत्नीच्या सेवेंत जागरूक होते. या साम्यावरून **राव**साहेबांनीं तिला एक पत्र लिहिलें होतें त्यांत असल्या सेवेचें रहस्य दिलेलें आहे.

" माझा असा समज आहे ( व जे कोणी रुग्ण मनुष्याची सुश्रुषा आनंदानें सतत जागरूकपणें करतात त्यांचाही असाच समज असतो ) कीं आमचा जन्म इतरांपेक्षां उच्चतर कांहीं ध्येय साध्य करून घेण्याकरतां होय. जर असें नसतें तर इतके कष्ट व दु:ख सोसावें लागतें तें कां याचा उलगडा होत नाहीं. "

ज. **जेकब** यांच्या पत्रास **राव**साहेबांनीं उत्तर लिहिलें तें:—

आपल्या स्वत:च्या चरित्रानें मला जो धडा शिकविला आहे तो मी

कधीं विसरणार नाहीं. परंतु तुमच्या दत्त ( Datta ) मुलीनें ( जिला आपण याच नांवानें हांक मारीत असां असें वाटतें व आमच्या शास्त्राप्रमाणें ज्याविषयीं मला जे शोध लागले आहेत त्याप्रमाणें जिला तें नांव तुम्हीं देऊं शकाल तिनें ) तुमच्या इच्छेवरून मला एक सानुरूप स्वानुभूतिपूर्वक सानुकंप सरस पत्र लिहिलें आहे त्यानें माझा जीवच काढला. त्याच्या वाचनानें मी क्षणभर आत्मविस्मृतिमग्न झालों. आत्मसंयमन करून राहाणाऱ्याचें चित्र त्यांत हुबेहुब रेखाटलेलें आहे. माझी बायको आत्मसंयमन करून आयुष्याचे दिवस काढीत होती. तिच्या करतां मीही आत्मसंयमन करून दिवस काढीत होतों व पुढें तसेच काढण्यास मला शक्ति येईल असा भरंवसा वाटत आहे. माझी प्रकृति बरीच खराब झाली आहे. लेखनाचे कामानें दुसऱ्या विचारांचा विसर पडतो तरी प्रकृतीवर जो परिणाम होतो त्यानें अशक्तता येते. ( ३।१।१८८० )

रावसाहेब खंबीर मनाचे होते. त्यांनीं आपली पुढील जबाबदारी मनांत आणून शोक गिळून टाकिला असें सांगून एक विलक्षण गोष्ट देण्यासारखी आहे ती देऊन हें शोकमय प्रकरण पुरें करण्यांत येत आहे.

आपल्या पत्नीचे आंखडलेले हातपाय कसे सुटतील हा एकच विचार रावसाहेबांच्या मनांत पत्नीच्या हयातींत सारखा रात्रंदिवस घोळत होता. पत्नी हयात असतां तर ते हातपाय सुटले नाहींत. परंतु पत्नी मृत झाल्यावर ४।५ महिन्यांनीं त्यांचे पाय पूर्ण बरे झालेले त्यांनीं स्वप्नांत पाहिले:—

"आज पहांटेस एक आणि तीन यांच्या दम्यान माझी स्त्री मला स्वप्नांत दिसली. तिनें मला आपले पाय दाखविले व ते अगदीं साफ लांब करून ह्मणाली:—मीं आतां चांगली बरी झाल्यें किंवा होणार आहें, असें कांहीं तरी—ईश्वर करो व ती जेथें असेल तेथें सुखी असो." ( रो. उ. )

पुढें दोन वर्षांतच चिरंजीवांसह प्रयागास जाऊन तेथें प्रिय पत्नीच्या अस्थीचें विसर्जन करून आले. धार्मिक विधी नेपाळ सरकारचे उपाध्याय आलोपीदिन बिन बाबुराव डुमाइ यांच्याकडून करविला.

## प्रकरण ५४ वें.

# चिरंजीवांचें लग्न.

। प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति ।
। गुणाद् रूपगुणाच्चापि प्रीतिर्भूयोऽभिवर्धते ।

( रामायण, वालकाण्ड, )

पत्नीनिधनानंतर चिरंजीवांची काळजी एकट्या रावसाहेबांवर पडली. " महाबळेश्वरीं असतांना गेल्या मेच्या सुटींत मी एक मुलगा दत्तक घेतला आहे. त्याचें नांव नारायण असें ठेविलें आहे. त्याची मला आतां काळजी घेतली पाहिजे, बिचाऱ्यावर मातृविरहाचा हा दुसरा प्रसंग आला आहे. " ( मि. गिब्स् यांस पत्र ).

पत्नीच्या निधनानंतर चार महिन्यांनीं चिरंजीवांचा व्रतबंध श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वरीं जाऊन रावसाहेबांनीं केला.

रावसाहेबांनीं चिरंजीवांचें मराठी शिक्षण ( म्हणजे इंग्रजी शिक्षणास प्रारंभ करण्यापूर्वीं अवश्य वाटलें तेवढें ) घरीं पंतोजी ठेवून पुरें करून घेतलें. चिरंजीव बुद्धिमान् असल्यामुळें रोज तास दोन तासांच्या शिकवणीपेक्षां अधिक शिकवणीची जरूर वाटली नाहीं. इंग्रजी शिक्षणसुद्धां घरींच मास्तर ठेवून ६–७ इयत्तेपर्यंत करून घेतलें. तेवढ्यानें एकदम एल्फिन्स्टन हायस्कूल मध्यें मॅट्रिकच्या वर्गात चिरंजीवांस बसतां आलें. या पद्धतीचा मोठा फायदा म्हणजे अभ्यासाचें ओझें चिरंजीवांवर फार पडलें नाहीं; काल बराच वांचला व प्रकृति उत्तम राहिली.

मध्यंतरीं चिरंजीवांच्या लग्नाचा विचार रावसाहेबांच्या मनांत आला. " चिरंजीवांस अकरावें सरून बारावें वर्ष लागलें आहे. आतां त्याचा विवाह करून आपण *मध्यस्थ रहावें. " ( वे. बा. जोशी यांस पत्र. )

*वानप्रस्थाश्रम स्वीकारावा.

फार मुली पहावयास पडल्या नाहींत. तासगांवचे प्रसिद्ध पिढीजात व कुलीन सावकार गणपतराव जोग, पुणें येथील पेढीवाले, यांची ५।६ वर्षांची कन्या मथु, ही पहावयाची ठरली. "रामदास ( मुनीम ) यांस कळवावें कीं, टीपण बरें आहे परंतु मुलगी पाहिली पाहिजे" ( बळवंतराव जोशी यांस पत्र.) मुलगी पहावयास रावसाहेब स्वतां पुण्यास गेले होते. मुलगी पसंत झाली.

रावसाहेबांनीं हुंडा घेतला नाहीं. पित्यानें पसंत केलेली स्त्री गुणांनीं चांगली निघाली म्हणून या दंपत्याचें प्रेम त्यांच्या वयाबरोबर वृद्धिंगतच होत गेलें. बालविवाह हा जुन्या पिढींतील लोकांस अनिष्ट वाटत नसे. उलट नीतिबंधनें शिथिल होत नाहींत म्हणून इष्टच वाटत असे. त्या काळीं लग्नसमयीं जरी विवाहसंस्कार करून टाकीत असत तरी मागणी घालून ठेवण्याची जी चाल असे तिच्या पलीकडे विवाहाचें व्यावहारिक स्वरूप जात नसे. अशाच बालविवाहाची प्रजा जुन्या पिढींतील लोक होते व त्यांतूनच बुद्धीनें व शरीरानें बळकट असे कर्ते पुरुष निर्माण झाले होते. तथापि आतां एवढें मात्र खरें आहे कीं, बालविवाह हल्लींचे लोकांस रुचत नाहींसा व मानवत नाहींसा झाला आहे.

लग्नसमारंभ मोठ्या थाटाचा झाला. रावसाहेबांच्या ओळखी मुंबईंत व बाहेरगांवीं पुष्कळ झालेल्या होत्या. आमंत्रितांत गरिबापासून तों थोर राजे-रजवाड्यापर्यंत मंडळी होती. मुरूड गांवचे रावसाहेबांचे शाळासोबती व मित्र यांस आप्तइष्टांबरोबर खास आमंत्रण होतें. आमंत्रण चिठ्या इंग्रजी, गुजराथी व मराठी अशा तीन भाषांत होत्या. लग्नसमारंभास कांहीं संस्था-निक हजर होते. त्यांपैकीं जव्हारचे राजे हल्लींच्या राजेसाहेबांचे वडील यांची सोय आपल्याच आवारांत तंबू मारून केली होती. प्रसिद्ध नानाशंकर-शेट यांच्या चौकाजवळील बंगल्याची जागा व्याह्यांस जानविशाकरितां मिळ-विली होती व खुद्द लग्नसमारंभाच्या दिवचीं व्यवस्था कांहीं उणें पडूं नये म्हणून आपल्याच हातांत ठेविली होती. इकडे आपल्या राहत्या बंगल्यांत

मोठीच तयारी केली होती. बाहेरील रस्त्यांतून बंगल्यांत प्रविष्ट होण्याचा मार्ग व बंगल्यातील आमंत्रित लोक बसावयाची जागा मुंबईच्या तऱ्हेनें सुशोभित केली होती. तें सर्व काम त्यांचे स्नेही मार्गन बाळकृष्णा या पुणें येथील कंपनीचे मालक बाळकृष्ण सायन्ना यांकडे होतें. रोषनाईच्या कामीं हांड्या व मोठालीं झुंबरें यांचाच फक्त उपयोग करण्यांत आला होता कारण राकेल तेलाला रावसाहेबांच्या घरीं मज्जाव असे.

देवक, सीमान्तपूजन वगैरे करण्यास जेवणघराचे मागेंपुढें प्रशस्त अंगणी करून मांडव उभारले होते. त्याला कोंकणांत दिपवाळीच्या सणांत कागदाच्या जाळीचे कंदील करतात तसले करून सर्वत्र टांगले होते. जाळींतून आंतील दिव्यावर टांगलेल्या कागदाच्या पायल्या गरागर फिरूं लागल्यावर त्यांवरील दशावतारांचीं रंगित चित्रें फिरतांना दिसतांच मुंबईकर मंडळीस आश्चर्य वाटलें. देवकाचे दिवशीं आहेराचा समारंभ झाला. त्यांत राजेरजवाड्यांकडील आलेले आहेर पाहण्यासारखे होते. जसदणच्या ठाकोर साहेबांनीं ' सुसमयमां पोषाख सारूं ' रोकड पाठविली होती.

लग्नाचे वेळेस रावसाहेब स्वतः मंगलाष्टकें म्हणत होते तें पाहून मुंबई-करांस आश्चर्य वाटलें.

भोजनसमयीं पक्तींत मांडण्याकरितां एका आकाराचे कोरे पाट रत्नागिरीहून नवे करवून आणविले होते. त्याप्रमाणें पळ्यापंचपात्र्या नाशिकाहून आणव-लेल्या होत्या. या नव्या संचाची विशेष शोभा आली होती. रावसाहेबांनीं पंक्तींत स्वतः श्लोक म्हटला. त्याचें सर्वांनीं कौतुक केलें. इतर मंडळीस श्लोक म्हणावयास सांगतांच नेहमीं श्लोक म्हणणारी मंडळी देखील स्तिमित झाली. या प्रसंगाला रावसाहेबांसारख्याच्या पंक्तीला शोभेल असा श्लोक म्हटला पाहिजे. तो आठविण्यांत व तो म्हणण्याचें अवसान आणण्यांत जरा वेळ गेला. तितक्यांत अंगण्यांत बसलेला प्रसिद्ध सनईवाला गणू यानेंच सनईत श्लोक वाजविला. तेव्हां सर्वांस त्याची गम्मत वाटून हंसू आलें व मग दोघांचौघांनीं श्लोक म्हटले.

रहात्या बंगल्यावर लग्नानिमित्त हिंदूंस हिंदूंच्या तऱ्हेचीं "पार्टी" झाली व पार्शी व यूरोपियन यांस त्यांच्या तऱ्हेची झाली. निमंत्रित पाहुण्यांचें स्वागत बाहेरील दरवाजापासून तो स्थानापन्न होईतों पायरी पायरीनें होत असे. बड्या पाहुण्यांच्या आगमनाची सूचना खालीं असलेला इंग्रजी बँन्ड करीत असे. गायनपटु **बाळकृष्णबुवा** इचलकरंजीकर व तन्तुवाद्यनिष्णात **विश्वनाथबुवा ऊाळे** हे दोन ठिकाणीं बसून लोकांचें मनोरंजन करीत होते. **युरोपिअन** लोकांकरितां फिडल वगैरे वाद्यें कुशलतेनें वाजविणारी मंडळी होती. गळ्यांतील फुलांचे हार व तुरे व गजरे पुण्याहून आणविले होते. पार्टीच्या अंतीं लोक चिरंजीवांच्या नांवाचा जयघोष करून घरोघर निघून गेले.

---

## प्रकरण ५५ वें

# विश्वस्त कार्ये.

**॥ न विश्वसेदविश्वस्ते विश्वस्तेनाति विश्वसेत् ॥**
**॥ विश्वासाद् भयमुत्पन्नं मूलादपि निकृन्तति ॥ १ ॥**

( मनुस्मृति )

पैशाचा, विशेषतः अज्ञानाच्या पैशाचा भरवंसा नाहीं. म्हणून त्या पैशाचा धनी इह लोकांतून प्रयाण करतांना मागें राहिलेल्या अज्ञानाच्या कल्याणाकरतां त्याच्या भरंवशाचा स्नेही शोधून त्याच्या स्वाधीन जिनगी करून सुखानें प्राण सोडतो. तथापि अशा निक्षेपाचें धारण करणाऱ्यास सुख होत नाहीं. त्यानें केलेल्या व्यवस्थेपासून फायदा झाला तर त्याचे झालेले उपकार जितके दिवस जनांच्या स्मरणांत टिकतात त्याहून अधिक त्या व्यवस्थेपासून झालेल्या नुकसानीमुळें लोकांनीं दिलेलें दूषण टिकतें. असा ह्या कामांत धोका असतो. म्हणून सार्वजनिक कामांत पडणाऱ्या मनुष्यास असलीं कामें उपयोगाचीं नाहींत. तथापि आप्तेष्टांच्या प्रेमाला व स्नेह्यांच्या स्नेहाला गुंतून **रावसाहेबांनीं** असलीं कांहीं कामें

पतकरलीं होतीं व त्यांनीं इतक्या उत्तम तऱ्हेनें तीं केलीं कीं मनूनें वरील श्लोकांत विश्वास टाकण्यांत भय आहे असा जो साधारण नियम घालून दिला आहे तो अपवादानें सिद्ध केला.

**बा**बाजीपंत **प**रांजपे, **रा**वसाहेबांच्या वडिलांच्या पहिल्या घरचे बन्धु, हे मृत झाले तेव्हां त्यांचा मुलगा **मो**रोबा हा ६ वर्षांचा होता. तो वयांत येईपर्यंत त्याच्या इष्टेटीची वहिवाट करण्यास रत्नागिरि जिल्हा कोर्टानें **राव**साहेबांस त्यांच्या अर्जावरून १५।२।७४ रोजीं हुकूम दिला होता. त्याचें घर **कु**वेशी येथें होतें व दुसरा जमीनजुमला इतर ठिकाणीं होता. त्याची व्यवस्था **रा**वसाहेब पहात असत. दुसरा कोणी डोकें वर करणारा नसल्यामुळें माझ्यावर ही खटपट पडली आहे तिचें ओझें आपण कांहीं वेळ पतकरल्यास मला सहाय्य होईल व अज्ञानाचें हित होईल." ( कुवेशीजवळच असलेल्या **रा**जापूर गांवच्या **भि**काजीपंत दादा **प**टवर्धन यांस पत्र. २७।१।८४ ) या जबाबदारींतून **मो**रोबा वयांत आल्यावर त्याच्या स्वाधीन इष्टेट करून रावसाहेब मोकळे झाले.

**का**न्होबा **ग**णपतराव ( **ग**णपतराव **कृ**ष्णाजी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या छापखान्याच्या मूळ मालकांचे चिरंजीव ) यांनीं आपल्या जिनगीचे **रा**वसाहेबांस १८६५ सालीं ट्रस्टी नेमिलें होतें.

**का**न्होबानें **रा**वसाहेबास बोलावणें पाठविलें. **का**न्होबा आजारी होते. **डॉ. भा**ऊंना घेऊन **रा**वसाहेब त्यांजकडे गेले. **भा**ऊ पहातात तों एक फुप्फुस घट्ट झालें होतें. **भा**ऊ ह्मणाले हे १५ दिवस काढतील पण नियम नाहीं, २ दिवसांतही जातील. **भा**ऊ गेल्यावर **रा**वसाहेबांनीं विचारलें मला कां बोलाविलें. **का**न्होबांनीं मृत्युपत्र करावयास सांगितलें व तुम्हीं एक्सिक्यूटर झालें पाहिजे असें **रा**वसाहेबांस सांगितलें. **रा**वसाहेबांनीं आपल्याबरोबर **गो**विंद **गं**गाधर **फ**डके यांस नेमून घेतलें. मग त्यांच्या मनांत काय व्यवस्था करावयाची तें विचारून त्यांच्या कारकुनाकडून मसुदा लिहून घेतला नंतर डा. **भा**ऊंना आणविलें.

त्यांनीं मसुद्यासंबंधें पुष्कळ प्रश्न कान्होबास विचारले व त्यांच्या समजूती-प्रमाणें मृत्युपत्र आहे असें पाहून त्यावर कान्होबांस सही करण्यास सांगितलें. भाऊंनीं साक्ष घातली. तशीच लखमीजीनीं घातली व त्रिंबक वैद्य यांनीं घातली. १३।२।१८६५. ( रो. उ. )

यांत मुख्य जबाबदारी म्हटली म्हणजे छापखाना चालविणें ही होती. ती करतां रावसाहेबांस पहिल्यानें श्रम पडले. तथापि एक पायाशुद्ध रीत बसविल्यावर मग विशेष श्रम पडले नाहींत. छपाईच्या कागद वगैरे सामग्रीचा आगाऊ संग्रह करण्याकरतां घाउक मालाच्या व्यापाऱ्यांचें झालेलें देणें व लोकांत ज्या पुस्तकांचा खप असतो तीं छापवून त्यांच्या विक्रीचें किरकोळ पुस्तकांची विक्री करणारे दुकानवाले यांकडे येणें, यांसंबंधीं त्यांनीं याद करविली व पुढें सरकारी पद्धतीप्रमाणें वेळोवेळीं जमाखर्च तपासून तो सशास्त्र असल्याबद्दल वर सही करीत असत. ह्या कामांत त्यांस चांगलें यश आलें. शेवटीं कायद्याप्रमाणें ॲडव्होकेट जनरल यांचें मत घेऊन वारसांच्या ताब्यांत ते सज्ञान झाल्यावर जीनगी स्वाधीन करून रावसाहेब मोकळे झाले.

डाक्टर नारायण दाजी, भाऊ दाजींचे बन्धु ह्यांची इहलोकींची यात्रा फार दीर्घकालीन नव्हती. काल समीप आला असें जाणून त्यांनीं एक मृत्युलेख करून आपल्या जिनगीची व्यवस्था करण्याचें काम रावसाहेब व शामराव विठ्ठल कायकिनी या दोघांवर सोंपविलें होतें. तेंही काम रावसाहेबांनीं यथायोग्य केलें.

१८७६ सालीं सरकारनें एलफिन्स्टन् फंडाचे आपण ट्रस्टी होतां का म्हणून विचारलें. तेव्हां त्यांनीं प्रथम त्या फंडाची काय स्थिति आहे त्याविषयीं माहिती मागवली व ती आल्यावर होय म्हणून म्हणाले. त्याची हकिकत अशा होती.

" मुंबई नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी " या नांवाची एक मंडळी १८२३ सालीं स्थापन झाली. तिचा हेतु मुंबईंत एक मध्यवर्ती शिक्षणसंस्था स्थापून

शिक्षणाचा प्रसार करावयाचा होता. या मध्यवर्ती संस्थेंत प्रथम इंग्रजी व मराठी शिक्षण देण्यास आरंभ झाला. इतर मुंबई बेटांत मराठी व गुजराथी शिकविण्याच्या शाळा वरील संस्थेच्या शाखा म्हणून विस्तरण्यांत आल्या. यांच्या खर्चाकरतां लोकांनीं वर्गणीनें मोठा द्रव्यानिधि* गोळा केलेला होता.

१८३३ मध्यें नामदार माउंट स्टयुअर्ट एल्फिन्स्टन यांनीं पहिला प्रोफेसर विलायतेहून आणविला तेव्हां कालेजाची स्थापना झाली. पुढें १८४० त कालेजची स्थिति नीट राहिली नाहीं. झणून शाळा व कॉलेज हीं दोन्हीं एक करण्यांत येऊन त्या एकीकृत संस्थेचें नांव एल्फिन्स्टन इन्सिटयूट् असें ठेवण्यांत आलें. प्रो. हार्कनेस, बेल, प्रो. हिन्डर्सन, प्रो. ग्रँन्ट इ. नामांकित प्रोफेसरांचा भरणा विलायतेहून मुद्दाम करण्यांत आला. यांच्या परिश्रमानें चांगले नागरिक निर्माण झाले. एल्फिन्स्टन इन्स्टिटट् व वरील द्रव्यनिधी यांची व्यवस्था वर्गणीदारांनीं निवडून दिलेल्या व सरकारनें मागाहून मान्य केलेल्या पंचाकडे होती या पंचास बोर्ड आफ् एज्युकेशन झणत. त्याचे

* तो पुढें पुढें वाढत गेला.

| | |
|---|---|
| बेल प्राइझ् फंड | २०००. |
| क्लेअर स्कॉलरशिप फंड | ३८,८००. |
| एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट फंड | १,१९,८००. |
| एल्फिन्स्टन प्रोफेसर फंड | ४,४४,३००. |
| गायकवाड स्कॉलरशिप फंड | ६०००. |
| गणपतराव विठ्ठल बुक फंड | २०००. |
| पेरी स्मारक फंड | ५२,२००. |
| धारचे महाराजांचा फंड | १०००. |
| सुंदरजी जीवा फंड | १५००. |
| एल्फिन्स्टन स्मारक फंड | ५५००. |
| वेस्ट स्कॉलरशिप फंड | २८,४००. |
| | ७,०१५०० |

सहा सभासद् असत. तीन नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीमधील व तीन सरकारनें नेमलेले असत. या सहा जणांस एलफिन्स्टन फंडांचे ट्रस्टी मानलें जाई. १८६४ सालीं बोर्ड ऑफ एज्युकेशन कडून शिक्षणविषयक सर्व व्यवस्था शाळाखात्याचे डायरेक्टर म्हणून एक स्वतंत्र अधिकारी नेमून त्यांकडे सरकारनें सोंपविली. बोर्डाच्या सभासदांकडे फक्त वरील फंडाच्या ट्रस्टचें तेवढें काम राहिलें.

या फंडाचे ट्रस्टी नेमले जाणें हा मोठा मान समजला जाई. सर जमशेटजी जीजीभाई, भाऊ दाजी व विनायकराव जगन्नाथ शंकरशेट यांच्या हातीं ट्रस्ट पुष्कळ दिवस होता; परंतु अखेरीस या फंडाची चांगली कायमची व्यवस्था करण्याकरतां सरकार, तिघे ट्रस्टी आणि अकाउन्टन्ट जनरल यांच्यामध्यें एक करार झाला. त्यांत असें ठरलें कीं करारांत नमूद केलेल्या फंडाचें व्याज या ट्रस्टींनीं किंवा यांच्या जागीं नेमलेल्या दुसऱ्या ट्रस्टीनीं सरकार खातीं जमा करावे व त्याचा विनियोग सरकारनें शिक्षणकार्यांत फंडांतील पैसे देणाऱ्या दात्यांच्या ईच्छेप्रमाणें करावा व अकाउन्टन्ट जनरलनें ट्रस्टींस हिशेब द्यावा.

ज्या संस्थेपासून रावसाहेबांचा उदय झाला तिच्याच पोषकनिधीचे ट्रस्टी होण्याचा जो मान रावसाहेबांस मिळाला तो सर्व मानांत अभिमानास्पद होय.

यांच्याबरोबर मंगलदास नथूभाई व सोराबजी शापूरजी बंगाली हेही ट्रस्टी होते. या दोघांच्या मान्यतेनें वरील रकमांच्या नोटा रावसाहेबांच्या नांवें होत्या. पुढें सरकारनें कळविलें कीं त्या नोटा अकाउन्टन्ट जनरल यांच्या ( हिशेबनीसाच्या ) नांवें करून द्या, त्यावर रावसाहेबांनीं लिहिलें कीं मी लोकनियुक्त ट्रष्टी आहें मला तसें करतां येणार नाहीं. म्हणून व्याज वगैरे घेण्यास व जमाखर्च परस्पर करण्याकरतां हिशेबनीस यांस मुक्त्यारपत्र रावसाहेबांनीं देऊन ठेविलें होतें.

या उदाहरणावरून रावसाहेब असलीं कामें किति बारीक नजरेनें करीत असत तें दिसून येत आहे. यानंतर ते डेक्कन एजुकेशन सोसायटीसारख्या कांहीं संस्थांचे कित्येक वेळां ट्रस्टी होते.

प्रसिद्ध युरोपियन विद्वान महर्षि एडवर्ड ह्वियाटसेक यांनीं आमरणान्त जमविलेल्या पैशाचे ट्रस्टी रावसाहेबांसच नेमिलें होतें. रावसाहेब युरोपियन लोकांच्यासुद्धां विश्वासासपात्र होते असें ही गोष्ट सिद्ध करते. परंतु रावसाहेब त्यांच्या हयातींत निवर्तल्यामुळें त्यांनीं तें काम रावसाहेबांच्या चिरंजीवांकडे सोंपविलें व तें ते फार दक्षतेनें करीत असतात.

---

## प्रकर ५६ वें.

# रावसाहेबांचा ग्रंथसंग्रह.

। तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद् रक्षेच्छिथिलबंधनात् ।
॥ मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ १ ॥

रावसाहेबांना पुस्तकाचा नाद त्यांच्या पूज्य प्रोफेसरांनीं प्रथम लावला. ते त्यांस आपल्याबरोबर रॉयल एशियॅटिक सोसायटीच्या लायब्रींत घेऊन जात असत. हें वृत्त मागें एका ठिकाणीं सांगीतलेंच आहे. शिवाय त्यांस ग्रंथाचा संग्रह करण्याचा नाद एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें असतांच लागला होता. व तो फार पद्धतवार होता. संगृहीत केलेल्या ग्रंथांची एक यादी त्यांच्या कागदपत्रांत आहे. ती एकाद्या ग्रंथसंग्रहालयाच्या नोंदणी बुकाप्रमाणें आहे. तींत अनुक्रम, ग्रंथाचें नांव, त्याचे भाग किती, व कोणी वाचावयास नेलें त्याची शेवटल्या रकान्यांत सही. इतकी माहिती आहे. ती यादी येणेंप्रमाणें:—

### वि. ना. मंडलिक यांच्या संग्रहांतील इंग्रजी व मराठी ग्रंथांची यादी.

| क्रम. | ग्रंथाचें नांव. | भाग. | कोणाला वाचावयास दिला. |
|---|---|---|---|
| १ | हॅलमकृत मध्ययुग. | २ | |

| क्रम. | ग्रंथाचें नांव. | भाग. | कोणाला वाचावयास दिला. |
| --- | --- | --- | --- |
| २ | हॅलमकृत इंग्लंदच्या राज्यव्यवस्थेचा इतिहास. | २ | |
| ३ | स्ट्यूअर्टकृत मानवमानसशास्त्र. | १ | |
| ४ | ऑर्नोल्डकृत प्रजाप्रभुत्वाचा इतिहास. | २ | |
| ५ | जोतिर्विषयक हर्श्शलनें लावलेले शोध. | १ | |
| ६ | कायद्याचें रहस्य. | १ | |
| ७ | चेम्बर्सकृत भूगर्भशास्त्राचीं मूलतत्त्वें. | १ | |
| ८ | गिबन्सकृत रोमच्या राष्ट्राचा इतिहास. | १ | |
| ९ | क्रोकृत फ्रान्स देशाचा इतिहास. | ३ | गणपतराव भास्कर. |
| १० | मिलसकृत लक्ष्मी शास्त्र. | १ | |
| ११ | उर्सकृत शिल्पकलाकोश. | १ | |
| १२ | उर्सकृत कलाकौशल्यांत नूतन सुधारणा. | १ | |
| १३ | फ्रान्सकृत लघुरसायनशास्त्र. | १ | ना. बल्लाळ लिमये. |
| १४ | मरेकृत ब्रिटिश हिंदुस्थान. | १ | नारायण बल्लाळ लिमये. |
| १५ | क्लिफ्टकृत लक्ष्मीशास्त्र. | १ | |
| १६ | थाम्सनकृत रसायनशास्त्र. | २ | |
| १७ | बटलरकृत धर्मसमानता. | १ | पेस्तनजी |
| १८ | सामनकृत शंकुपरिच्छेदावर निबंध. | १ | ग. भास्कर. |
| १९ | गिवझोटकृत युरोपांतील सामान्य सुधारणा. | १ | |
| २० | रिचर्डसननें छापलेले लार्ड बेकन-कृत निबंध. | १ | कित्ता. |

| क्रम. | ग्रंथाचें नांव. | भाग. | कोणाला वाचावयास दिला. |
|---|---|---|---|
| २१ | मेलासकृत इंग्रजी अंमलाचें ऐतिहासिक निरीक्षण. | १ | |
| २२ | एल्फिनस्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास. | १ | हरी केशवजी. |
| २३ | लोक्सचे लेख. | १ | गणपत भास्कर. |
| २४ | इ.कृत प्रश्नोत्तरमाला. | १ | ग. |
| २५ | शिल्पशास्त्र. | १ | म. बर्वे. |
| २६ | चेम्बर्सकृत भूमिति. | १ | महादाजी. |
| २७ | नैतिक ग्रंथ. | १ | महादाजी. |
| २८ | कालविवेचन ( सोदाहरण ). | १ | महादाजी. |
| २९ | वाचनपाठ माला. | १ | |
| ३० | पाठमाला. | १ | |
| ३१ | कुलोक्सकृत व्याकरण. | १ | |
| ३२ | जान्सन्कृत कोश. | १ | दिनकर वामन. |
| ३३ | चेम्बर्सकृत ब्रिटनचा इतिहास. | १ | |
| ३४ | वेब्स्टरकृत हॉयड्रोस्टॅटिक्स. | १ | |
| ३५ | तर्क शास्त्रावर सुलभ पाठ. | १ | |
| ३६ | सिसमान्डिसकृत इतलींतील प्रजासत्ताक संस्थानें. | १ | |
| ३७ | शिलरकृत त्रयोदशवार्षिकी युद्ध. | १ | |
| ३८ | ग्विझोटकृत राज्यक्रान्ति ( इंग्लदांत घडून आलेली ). | १ | निळकंठ महादेव. |
| ३९ | यंगकृत डिफरेन्शल कॅलक्यूलस. | १ | |
| ४० | ग्रेटन्कृत नेदरलन्डचा इतिहास. | १ | |
| ४१ | जातिभेदावर निबंध. | १ | |

४२ बक्षिसाचा निबंध. ( विषय किता ) १
४३ तिसरा रिपोर्ट. ( एस. पी. एस. एस. ) १
४४ डेक्कन व्हर्नॅक्युलर सोसायटी
( दुसरा रिपोर्ट ). १
४५ एक व्याख्यान. १

**मराठी व संस्कृत.**

४६ संस्कृत इसापनीति. १
४७ प्रबोधचंद्रोदय नाटक. १
४८ व्याख्यानसंग्रह. १
४९ पदार्थविज्ञानशास्त्र. १

याच लघुसंग्रहांत **राव**साहेबांच्या प्रचंड ग्रंथसंग्रहाचें मूळ होतें.

पुढें **मुं**बईस वकिली करूं लागून कायमचे **मुं**बईचे रहिवासी बनल्यावर **राव**साहेबांस हा पुस्तकसंग्रहाचा नाद पुरा करण्यास सोईचें झालें.* आपल्याला काय काय पुस्तकें पाहिजेत तीं ते पुढें नमूद केलेल्या पुस्तकविक्रेत्यांच्या मंडळ्यांस लिहून कळवीत.

आर्देसर मूस आणि कंपनी; ट्रबनर आणि कंपनी; } लंदन
स्मिथ एल्डर आणि कंपनी; दादाभाई आणि कंपनी. }

थॅकर स्मिथ आणि कंपनी; } कलकत्ता.
श्रीनाथ बॅनर्जी आणि कंपनी. }

हिजिन बोथॅम आणि कंपनी. मद्रास.

---

* **राव**साहेबांच्या ह्या पुस्तक संग्रहाच्या नादाची प्रसिद्धि नामदार **बार्टल फ्रि**यर, **मुं**बईचे गव्हर्नर, यांच्या कानापर्यंत लवकरच गेली. तेव्हां त्यांनीं **राव**-साहेबांस मुद्दाम बंगल्यावर बोलावून नेऊन आपल्या खासगी ग्रंथसंग्रहांत नव्या ग्रंथांचा भरणा करून व्यवस्था लावण्याची विनंति केली तें काम त्यांनीं हौसेनें केलें.

कधीं कधीं यांच्या अभिरूचीप्रमाणें पुस्तकें आढळलीं तर तीं घेण्याची परवानगी **राव**साहेबांजवळ वरील कंपन्या मागून ठेवीत. **मुंबईत हाजी अहंमद मुसा** म्हणून एक मेमन होता. तो विलायतेस पेन्शन घेऊन जाणाऱ्या युरोपियन गृहस्थांच्या सामानाचें लिलांव झालें म्हणजे तेथें हजर राहून पुस्तकें विकत घेऊन त्यांतील **राव**साहेबांस पाहिजेत तीं त्यांना विकीत असे.

जेथून मिळतील तेथून **राव**साहेब जुने ग्रंथ मिळवीत असत. एका ठिकाणीं १० पानांचा ग्रंथ मिळाला. " हा जुन्या मोडी लिपीचा आहे असें म्हणतात येथें कोणास वाचतां येत नाहीं व त्यांत विषय काय आहे तो समजत नाहीं. खानदेशापासून दौलताबादेपर्यंत या लिपीची व्याप्ति असावी असें अनुमान आहे. यास्तव आपल्या क्षेत्रीं कोणी जाणणारा भेटेल तर ह्या ग्रंथांतील विषय काय व कर्ता कोण हा शोध करून कृपा करून कळवावें. ( वैद्य गणेश शास्त्री तर्टे यांस पत्र ७।९।१८८२ )

कधीं कधीं फसत असत. " पाठविलेलीं पुस्तकें केवळ कचरा आहे. मातीप्रमाणें आहे. एकही ग्रंथ पुरा नाहीं आणि पुरे आहेत त्यांत अर्थ नाहीं. आपण कोणापासून घेतला त्यानें फसविलें. " ( ५।८।१८७४ चें **अ. कृ.** बिवलकर यांस पत्र. )

उत्तम ग्रंथांचा संग्रह करून त्याची व्यवस्थाही **राव**साहेबांनीं उत्तमच करून ठेवली होती. पुस्तकें ठेवण्याच्या सोयीचीं अशीं मोठमोठीं कपाटें करविलीं होतीं व तीं ठेवण्याकरितां रहात्या बंगल्यांतील दोन विस्तीर्ण दिवाणखाने तळमजल्यावर राखून ठेविले होते. ती जागा न पुरल्यामुळें कांहीं ग्रंथ माडीवर ठेवलेले होते. दिवाणखान्याच्या चारी उंचाभिंतींना पाठ टेंकून मध्यें खिडक्यांची जागा रिकामी टाकून उंच कपाटें उभीं ठेवलेलीं होतीं. दिवाणखान्यांत मध्यें असलेली जागा कपाटाच्या रांगांनीं जाण्यायेण्यास वाट ठेऊन भरलेली होती. बंगल्यांत शिरल्यावर डाव्या बाजूच्या दिवाणखान्यांत खिडकीशीं **राव**-साहेब स्वत: बसत व उजव्या हातच्या दिवाणखान्यांत कोणी मोठा मनुष्य भेटीस आला तर मध्यें बसण्याची जागा ठेवलेली होती.

डाव्या बाजूच्या दिवाणखान्यांत शिरतांच नवा मनुष्य हें ज्ञानभांडार पाहून व मध्यें **रावसाहेबांची** मूर्ति चिच्छक्तीप्रमाणें बसलेली पाहून फारच आश्चर्य-मग्न होत असे. **रावसाहेबांनीं** हा ग्रंथसंग्रह शोभेला ठेवला नव्हता. यांतील पुष्कळ ग्रंथ त्यांनीं स्वतः वाचले होते व विद्वान लोकांस ते वाचावयास देत असत. ह्या पुस्तकांची नामावळीही त्यांनीं छापून काढिली होती. कसरी-पासून संरक्षण करण्यास तरपेन्टाईन लावण्यास व पुस्तकें नीट साफसुफ ठेव-ण्यास माणसांची नित्य नेमणूक केलेली होती. एवढा मोठा संग्रह असून कोणतें पुस्तक कोठें आहे तें **रावसाहेब** नेमकें सांगत असत.

मोठमोठ्या सार्वजनिक ग्रंथसंग्रहांपेक्षां **रावसाहेबांचा** हा खासगी ग्रंथसंग्रह मोठा आहे. पुस्तकांची निवड फारच शोधक बुद्धीनें केलेली आहे. तिची कांहीं कल्पना होण्याकरतां पुढील माहिती दिली आहे. मुख्य भरणा इंग्रजी पुस्तकांचा आहे. त्याच्या खालोखाल संस्कृत पुस्तकांचा आहे व थोडासा मराठी पुस्तकांचा आहे.

## इंग्रजी पुस्तकें.

हीं पुस्तकें पुढील विषयांवर लिहिलेलीं आहेत:—काव्य, नाटक, पद्य, कादंबऱ्या, चरित्रें, धर्म, हिंदुदेवताख्यानें, भाषाविज्ञान, शब्दव्युत्पत्ति, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, इंग्लंदचा पुरातन इतिहास, युरोपचा हल्लींचा इतिहास, हिंदुस्थानचा इतिहास*,

* या विषयावरील पुस्तकांत इष्ट व उपलभ्य तेवढी माहिती दिसून येते. तींत विषयाचे प्रकार आहेत तेः—अखिल हिंदुस्थानांतील प्रवास, हिमालयांतील प्रवास, बलुचिस्थानचा प्रवास इ. ब्रिटिशसत्ता, महंमदीसत्ता, मोंगलाचा इतिहास, गोंव्याचा इतिहास, शीखांचा इतिहास, दख्खनचा इतिहास, गुजराथचा इतिहास, कोचीनचा इतिहास, अफगाणिस्थानचा इतिहास, बंडाचा इतिहास, कांहीं मिशन्सचा इतिहास, इलियट व इतर ग्रंथकारांनीं लिहिलेला हिंदुस्थानचा इतिहास, तंजावरचा इतिहास, शिपायांच्या युद्धाचा इतिहास, शास्त्रीवंशाचा इतिहास, ( बेंगाल, औंध, ओरिसा इ. प्रांतांचा पृथक् पृथक् इतिहास ), राजस्थानचा इतिहास, वुइलसनकृत इतिहास इ.

**रावसाहेबांच्या** ग्रंथसंग्रहांत ऐतिहासिक ग्रंथांचा भरणा इतका पुष्कळ असण्याचें

इतर देशांचा इतिहास, मराठ्यांशीं युद्धें, टिपूवर स्वारी, भरतपूरचा वेढा, नंदकुमार, वारन् हेस्टिंग्स, निझाम, म्हैसूर व सातारा यां संबंधें कागद पत्र, लार्ड हेस्टिंग्स याचें जर्नल, हिंदुस्थानांत वसाहत केलेल्या ब्रिटिशांचीं पत्रें, फारेस्टनें छापलेला पत्रव्यवहार, मराठा कँप मधून लिहिलेलीं पत्रें, एका ब्रिटिश अधिकाऱ्याचें जर्नेल, जहानगीर बादशहाचे स्मृतिलेख, वारन् हेस्टिंग्सचा कारभार, रसेल यांची रोजनिशी, सर जॉन शोअर यांचे लेख, वेलस्ली यांचे खलिते, वेलिंग्टन्चे खलिते, हिंदी राजानें लिहिलेलीं पत्रें, हिंदुस्थानचा पुरातन भूगोल, नेपाळचें राज्य, मि. मेटकाफ यांचें चरित्र, प्राचीन हिंदुस्थान, हिंदुस्थानांतील जाती, निलगिरीच्या पहाडांतील रानटी जाती, ठगांची भाषा, पेंढाऱ्यांचे मूळ, हिंदी राजे, ईस्ट इन्डिया कम्पनीचे कायदे इ. इ.

प्राचीन हिंदी कलाकौशल्य+, इतर देशांतलि प्राचीन कलाकौशल्य, लक्ष्मीशास्त्र व राजनीति, ‡ पदार्थ विज्ञानशास्त्र, ज्योतिःशास्त्र, वनस्पतिशास्त्र,

---

कारण असें आहे कीं " रावसाहेब एल्फिस्टन इनस्टिटयूटमध्यें विद्यार्थी असतांना १८४९ सालीं जी परीक्षा झाली तींत त्यांना एल्फिस्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास हें पुस्तक बक्षिस मिळालें. तें त्यांस इतकें आवडलें कीं त्यांनीं त्याचें भाषांतर मराठींत व गुजराथींत केलें तेव्हांपासून त्यांना इतिहासाचा फार नाद लागला. बापूसाहेब बिनीवाले त्यांच्याकडे आले म्हणजे परशरामभाऊ पटवर्धन व खडर्याची लढाई, मालोजीराजे व त्यांचे पुत्र यांची आपसांत लढाई, बापू गोखले यांच्या चारित्रांतील ठळक गोष्टी, शिरूर अथवा घोडनदी येथील एका सातारकर सरदाराचें वर्तन इ. विविध ऐतिहासिक गोष्टी सांगत असत ". ( ४।४।१८६५ रो.उ. )

+ दिल्ली, अलाहाबाद, आग्रा, मदुरा, इ. प्रसिद्ध ठिकाणचे देखावे, मवालिपुरम् साष्टी व एलिफंटा येथील कोरींव लेण्यांचे देखावे, कोलर येथील पुरातन टांकें, दिल्ली येथील वेधशाळा, कुतुब मिनार, पालिटानाच्या जवळचीं शत्रुंजय देवळें इत्यादिकांचे देखावे धारवाड जिल्ह्यांतील कांहीं कलाकौशल्याचे देखावे, हिमालयांतील, गौरीशंकर व कांचनगंगा इत्यादिकांचे देखावे, टिबेटांतील देखावे, बुद्धाचे पुतळे, शेक्सपीयर एलिझाबेथ राणीच्या दरबारांत मॅक्बेथ नाटक वाचून दाखवीत आहे, असा देखावा इ. इ.

‡ या विषयावरील ग्रंथ, मे. कॅम्प्बेल, चॅपमन्, दत्त, इलियट, ग्रॅन्ड डफ, हंटर, मेन, सदरलंड, स्मिथ, रानडे, मिल, मॉल्कम, मॅलेट इत्यादींनीं लिहिलेले आहेत.

पशुशास्त्र, बागाईत विद्या, गणित, त्रिकोणमिति, खेळ, खेडेगांवांत वसति इ. इ. शाळा खात्यांतील, इंग्रजी, संस्कृत व लॅटिन भाषांत सर्व विषयांवरील पुस्तकें.

हॅन्सर्डचे पार्लमेंतरि रिपोर्टः—हे फार दुर्मिळ आहेत §. पार्लमेंतने वेळोवेळीं बसविलेलीं कमीशनें व कमीट्या यांचे रिपोर्ट, ब्लूबुकें व इतर रिपोर्ट*, हिंदुस्थान सरकारच्या व मुंबई सरकारच्या व मद्रास सरकारच्या व नार्थवेस्ट प्राव्हिन्सच्या दप्तरांतील निवडक कागदपत्र. ×

कोशः—( लॅटिन, इंग्रजी, संस्कृत, मराठी, पर्शिअन, गुजराथी, ग्रीक, रोमन, सिंधी, हिंदुस्थानी इ. भाषांचे ); जिल्हेवार गॅझेटीअर; कायदा †, कांहीं रिव्ह्यू व मासिकें ( इंग्लंद, हिंदुस्थान व अमेरिका या देशांतील ) संस्कृत हस्तलिखितांच्या नामावळ्या + विविध ग्रंथ संग्रहालयांतील पुस्तकांच्या नामावळ्या,

---

§ यांत नार्मन कान्क्वेस्ट पासून म्हणजे १०६६ पासून १८०३ पर्यंत सर्व पार्लेमेन्टचा इतिहास आहे. १८०३ पासून १८८९ पर्यंतचे पार्लमेंत सभेंत झालेले वादविवादाचे भाग छापलेले आहेत. एकंदर भाग ४४२ आहेत.

* इतर रिपोर्ट पुढील विषयांवर आहेतः—व्यापार, सैन्य, प्रचलित नाणीं, खाणी, रानें, रेल्वे, आरोग्य, इ. राज्य कारभारावर ३२४ रिपोर्ट आहेत.

× यांत पुढील विषय येतातः—जमीन महसूल, देवी काढणें, आरोग्य रक्षण, दुष्काळ इ. व इतर खातीं; शिवाय खाने सुमारीचे व इतर राज्यकारभार विषयक अंकप्रमाण ३०० रिपोर्ट आहेत.

† यांत मद्रासच्या व बेंगालच्या काउन्सिलांतील ॲक्ट आहेत. अमेरिकन कायद्याचीं पुस्तकें आहेत. निरनिराळ्या कोडतांचे रिपोर्ट ( यांत इंग्लंदमधील चॅन्सरी रिपोर्ट, क्राउन केसिस, कोर्ट ऑफ् एक्श्चेकर, ॲड्मिरल्टी, प्रोबेट इ. किंग्स् व क्वीन्स बेंचचे रिपोर्ट इ. १०० पुस्तकें आहेत. )

+ कोठें काय काय संस्कृत हस्तलिखित ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांच्या याद्या, बंगाल सरकार, बिकानेरचे महाराज, बेंगाल रॉयल एशियॅटिक सोसायटी, डेक्कन कॉलेज पुणें, बनारस संस्कृत कॉलेज, डा. किलहार्न इत्यादींनीं केलेल्या नामावली, पाली, सिंहाली, व संस्कृत या भाषांतील ग्रंथांची सिलोन सरकारनें

इंग्रजी वैद्यक, गव्हर्नमेंट गॅझट, कांहीं इंग्लंदमधील व येथील वर्तमानपत्रांच्या फैली, किरकोळ निबंध व व्याख्यानें+.

## संस्कृत ग्रंथ.

ऋग्वेद, यजुर्वेद, व सामवेद, ब्राह्मणांसहित उपनिषदें ( भाष्यांसह ); भगवद्गीता [ विविध टीकासमवेत ], सूत्रें, मिमांसा, दर्शनें, स्मृती, व धर्मशास्त्रें, व्याकरण, इतिहास, पुराणमाहात्म्य इ. काव्य, नाटक, वैद्यक, ज्योतिष, कोश ( विविध ).

जर्मन व फेंच, ग्रंथकारांचें संस्कृत विद्येवरील ग्रंथ, संस्कृत, पल्हवी इ. भाषेंतील प्राचीन ग्रंथांचीं भाषांतरें, पौर्वात्य भाषाविषयक इंग्रजी ग्रंथ.

## संस्कृत हस्तलिखित ग्रंथ.

वेद, वेदांग, वेदान्तसूत्रें, मिमांसा, न्याय, वैशेषिक सांख्य इ. स्मृतिधर्मशास्त्र, इतिहास, पुराणें, काव्य, नाटक, व्याकरण, ज्योतिष, वैद्यक या संबंधी हस्तलिखित प्रती. तंत्र व मंत्र व रोजचे संस्कार. कोरींव लेखांच्या नकला भाषांतरासहित.

## मराठी पुस्तकें.

यांचा संग्रह अल्प आहे. पहिल्यानें मराठींत झालेलीं इंग्रजी कायाद्याच्या पुस्तकांचीं भाषांतरें. ज्ञानप्रसारक, शालापत्रक, लोकहितवादी इ. जुनी पुस्तकें व कांही नवीन. विस्तार भयास्तव त्रोटक वर्णन दिलेलें आहे. परंतु एवढ्यानें विचारवृद्धीला हा संग्रह किति कारण झाला असेल व होईल तें कळेल.

---

केलेली यादी, गुजराथेंतील ग्रंथ, म्हैसूर व कूर्ग प्रांतांतील ग्रंथ यांच्या याद्या व डा. भाण्डारकरांचा रिपोर्ट.

+ डा. ब्लेनी, धनजीभाई, इलियट, फॉसेट, सर अ. ग्रॅन्ट, सर हॉबहाऊस, राबर्ट नाइट, डा. कीर्तिकर, म. मो. कुंटे, सर मॅलेट, राजेन्द्रलाल मित्र, मॉनिअर वुइल्यमस्, मुकरजी आशुतोष, म. गो. रानडे, का. तेलंग, वेडरबर्न, सर आर. टेंपल, वडस्वर्थ, वुड इत्यादिकांचीं.

हा सर्व ग्रंथ रावसाहेबांचे चिरंजीव **बाळासाहेब मंडलिक** यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ १९०७ सालीं फर्ग्युसन कालेजला नजर केला. तें पाहून प्रो. **सेल्बी**, डे. ए. सोसायटीचे अध्यक्ष, यांनीं कॉलेज मधील दोन प्रोफेसर मुद्दाम आभारप्रदर्शक पत्र बरोबर देऊन **बाळासाहेब मंडलिक** यांकडे पाठविले. त्या पत्रांत थोडक्यांत **बाळासाहेबांचा** असा गौरव केला आहे:—जेव्हां (प्रसिद्ध **रोमन** वक्ता) **सिसरो** यानें आपले ग्रंथ घरांत व्यवस्थेनें लावलेले पाहिले तेव्हां त्यानें आपल्या मित्रास लिहिलें कीं माझ्या घरांत विचारांचें स्थान जें मन त्याची प्रस्थापना झाली, त्याप्रमाणें तुमच्या वडिलांचा ग्रंथसंग्रह आपल्या नव्या मंदिरांत लावलेला **फर्ग्युसन** कालेजमधील प्रोफेसर जेव्हां पाहतील तेव्हां तसेंच म्हणतील.

---

## प्रकरण ५७ वें.

# ( शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां सुचविलेल्या कायद्याचा मसुदा. )

Princes and Lords may flourish, or may fade;
A breath can make them, as a breath has made;
But a bold peasantry, their country's pride,
When once destroyed, can never be supplied !

( Goldsmith )

। पावोत वृद्धि अथवा क्षय ते राजे तसेच अधिराजे ।
॥ शब्दें इच्छामात्रें निर्मू येतात सार्वभौमा जे ॥ १ ॥
। कृषिकर्मशूर परि ते शेतकरी गर्वहेतु देशास ।
॥ झाल्यास नष्ट फिरुनी येतिल निर्मावया न कोणास ! ॥२॥

( वरील गोल्डसमिथकृत चरणांचें भाषांतर. स्वकृत )

दक्षिणेंतील शेतकरी वर्गाच्या कर्जबाजारी स्थितीकडे सरकारचें लक्ष फार वर्षांपासून गेलेलें आहे व ती सुधारण्याकरतां कमी अधिक मानानें सरकार यशस्वी उपाय योजीत आहे. ही स्थिति सुधारण्यास कांहीं उपाय योजिले पाहिजेत, या समजाचें बीज १३।३।१८५९ रोजीं मि. अर्स्किन यांच्या एका भेटीच्या प्रसंगीं रावसाहेबांच्या मनोभूमींत पेरलें गेलें.

" मि० अर्स्किन यांस भेटावयास गेलों होतों. भागिदारी पद्धतीवर पेढ्या स्थापन करून शेतकऱ्यांस पैसे कर्जाऊ देण्याची व्यवस्था करावी असें म्हणून शिकलेले लोक हें काम हातीं कां घेत नाहींत ? अशी पृच्छा केली. मुंबई ॲसोसिएशननें असलीं कामें हातीं घेतलीं पाहिजेत व कांहीं तरी काम केलें पाहिजे. उगाच व्यापक स्वरूपाच्या साधारण विषयांवर नुसतें बोलत बसण्यांत काय आहे. ? "

" यांचें म्हणणें मला शहाणपणाचें वाटलें. परमेश्वर तडीस नेईल तर आपण केलेल्या कांहीं सूचना अमलांत आणण्याचा प्रयत्न करीन असें त्यांस आभारपूर्वक सांगितलें. " ( १३।३।१८५९ रो. उ. )

ही मूळची कल्पना अमलांत अंशतः आणण्याचा प्रयत्न करण्याची वेळ सुपा येथील शेतकऱ्यांच्या दंग्यानंतर व १८७६ च्या दुष्काळानंतर आली. त्यावेळेस रावसाहेबांनीं एक कायद्याचा मसुदा प्रास्ताविक लेखासह तयार केला होता, त्याचा सारांशः—

दक्षिण हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांच्या अंगीं कर्जबाजारीपणा हा दीर्घकालस्थायी व प्राणनाशक रोग जडून गेलेला आहे हें सर्वांस कबूल झालें आहे. त्याचे परिणाम काय झालेले आहेत ते १८७७।७८ च्या दुष्काळासंबंधें बसलेल्या कमीशनच्या व तसल्या इतर सरकारी रिपोर्टांत बरोबर दिलेले आढळतें.

सरकारचें लक्ष १८२७ पासून या गोष्टीकडे गेलेलें आढळतें. रयतेची ही स्थिति सुधारावी व तीस मदत व्हावी म्हणून १८२७ चें रेग्युलेशन

१७, कलम १३ एल्फिन्स्टन कोडमध्यें घातलेलें होतें व शेतकऱ्यांस कर्जानें आलेला थकवा जाऊन जरा त्यांस तकवा यावा म्हणून त्यांस तगाई देण्याची व्यवस्था केलेली होती. ही तगाई परत वसूल कशी करावी या विषयाकडे बरेंच लक्ष सरकारानें दिलेलें आहे. शेतकी मोठ्या प्रमाणांत व्हावी, शेतकीच्या आउतांत सुधारणा व्हावी इ० आणखी हेतू मनांत धरून सरकारानें १८७१ सालीं एक कायदा केला होता. त्याचें काम कसें काय झालें त्याचें १८७५।७६ च्या सरकारी कामाच्या रिपोर्टांत वर्णन दिलेलें आहे. व्याजाचा दर माफक म्हणजे शेंकडा सवासहा असे व कर्जाची फेड बऱ्याच वर्षांनीं करावी अशी अट असे तरी लोक तगाई घेण्यास पुढें येत नसत. त्याचीं कारणें वरील रिपोर्टांत अशीं दिलेलीं आढळतात. "या बाबतींत या देशांतील लोकांस सरकारापासून दूर राहणेंच आवडतें. अहमदाबाद जिल्ह्यांत नुकतीच पुरानें जी नासाडी उडविली ती भरून येण्यास सरकारानें एक लाख रुपये बिनव्याजी शेतकऱ्यांस देण्यास काढून ठेविले, परंतु कोणीही त्याचा फायदा घेण्यास पुढें आला नाहीं. मंजूर झालेले अर्ज पैसा हातांत पडण्यापूर्वीं लोकांनीं काढून घेतले."

"कदाचित् सावकारांचे डोळे उघडून आपलीं कुळें आपल्या हातांतून निसटून सरकाराच्या हातांत पडतील म्हणून ज्या सवलती पहिल्यानें ते कुळांस देत नसत, त्या देण्यास ते कबूल झाले असतील." खेडा व सुरत जिल्ह्यांच्या कलेक्टरांनीं लोकांनीं याबाबतींत दाखविलेल्या अविचारीपणाचें वर्णन चांगलें केलें आहे. मि. प्रॅट म्हणतात—"तगाई मिळण्यापूर्वीं जे अर्ज करावे लागतात जी दीर्घसूत्री चौकशी होते व ज्या अटी घालण्यांत येतात त्या रयतेस पतकरत नाहींत. मागेल तेव्हां लग्नाकार्याला सावकार जोंपर्यंत लागलेंच कर्ज देत आहे तोंपर्यंत कर्जमुक्त होण्याचें सूख काय आहे तें रयतेला नकोच असतें. आम्हीं कर्ज फेडण्याची मुदत कमी केली नसती तर सावकार व त्यांचीं कुळें यांचे तंटे लांबणीवर पडले असते."

फॅमिन कमीशनच्या रिपोर्टांत तगाईच्या कायद्याचा उपयोग कां झाला नाहीं त्याचीं कारणें दिलीं आहेत. तीं अनेक आहेत:—" तगाई घ्यावयाला जाणें म्हणजे आपलें आपणच काम वाढवून घेणें आहे या समजुतीनें हाता खालचे हिंदी अधिकारी प्रथमच बऱ्याच हरकती काढितात. पहिल्यानें अर्ज करा, त्याला स्टँप लावा, कर्ज फेडण्याचें खत लिहा, त्याला स्टॅंप लावा, मग तें रजिस्टर करा व आपली एकंदर सांपत्तिक स्थिति कशी काय आहे त्याची इत्थंभूत चौकशी करवून घ्या ! हप्तेबंदी करा व शेतकीला या तगाईपासून फायदा होऊं लागण्यापूर्वींच हप्त्याला सुरवात करा ! इत्यादि गोष्टी रयतेला अप्रिय वाटून तो तगाईच घेत नाहीं. घेतल्यास अल्प स्वल्प घेतो व शेतींत खरी सुधारणा होत नाहीं इ० "

फॅमिन कमिशनरांनीं पुढें उपाय सुचविले होते ते असे—वैदेशिक मारवाडी सावकाराची निंदा पुष्कळ होत आहे व ती उचित आहे. पण त्याची उपमा खेड्यांतील ग्रामस्थ सावकारास देतां यावयाची नाहीं. त्याचा शेतकऱ्यास चांगला उपयोग होत आलेला आहे. जबरदस्त नियम करून त्याला आपलें भांडवल शेतकीच्या कामांतून काढावयास लावलें, तर शेतकीला तोटा होण्याचा संभव आहे. त्याचा धंदा जितका कायदेशीरपणानें चालत आहे, तितक्यास सरकारांतून मदत झाली पाहिजे. योग्य तेवढा वसूल करण्यास त्याला सवलती दिल्या पाहिजेत, म्हणजे व्याजाचा दर कमी होईल. कोठें शेतकरी फसत आहे व त्याच्या गरजू स्थितीचा कोठें गैरशिस्त रीतीनें फायदा घेण्यांत येत आहे त्यावर नजर ठेविली पाहिजे व त्याच्यावर जुलूम होणार नाहीं अशी व्यवस्था केली पाहिजे. सावकारास तर त्याच्या पैशाचा योग्य मोबदला मिळावा पण तो वसूल करतांना शेतकऱ्यास कैदेची भीति घालणें किंवा त्याच्या जवळ असेल नसेल त्याची विक्री करूं देणें इत्यादि दुष्ट उपायांचा अवलंब होऊं देतां कामा नये. कोडतांकडून मिळणारी मदत स्वस्त पडण्याची व्यवस्था व्हावी व मुलकी अधिकाऱ्यांची कर्जाची फेड करून देण्यास मदत व्हावी.

रावसाहेबांनीं जो कायद्याचा मसुदा केला होता तो वरील फॅमिन कमीशनच्या रिपोर्टांत जीं तत्त्वें नमूद केलीं आहेत त्यांस धरून होता. १८६६च्या इन्डियन कंपनीच्या ॲक्टान्वयें लोकांना लिमिटेड लायेबिलिटीची कंपनी काढण्याची सवलत दिलेली होती. अशा कंपनीला समाईक तत्त्वावर दोन लाखांचें भांडवल गोळा करण्याचा व जरूर तसें वाढविण्याचा अधिकार द्यावयाचा होता. तिची मुख्य कचेरी मुंबईस ठेवावयाची होती व शाखा पुण्यास उघडावयाची होती. कंपनीच्या दर भागाची किंमत शंभर रुपये ठेवावयाची होती. शेतकऱ्यांस सवलतीनें कर्ज देऊन त्यांची स्थिति सुधारण्याचा हेतु होता. मात्र कर्ज देण्याचें काम तगाईच्या रूपानें जें सरकार करतें त्याच्या बद्दल या कंपनीनें करावयाचें होतें. स्टॉम्प व रजिस्ट्रेशन फी माफ करून घ्यावयाची होती. सावकारांचें व कुळांचें नुकसान न होतां सलोख्यानें शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याचा हेतु होता. कंपनीचा वसूल, जरूर पडल्यास, सरकारी मुलकी अधिकाऱ्यांमार्फतच व्हावयाचा होता. या कायद्यानें कुळाची पत वाढवावयाची होती. सावकार लोकांवरचा उडता विश्वास पुन्हां बसेल अशी व्यवस्था करावयाची होती. असें झाल्यानें शेती सुधारून सरकाराचा वसूल वाढवावयाचा होता व या कामाकरतां सरकारी भांडवलही अडकवून ठेवावयाचें बंद पाडावयाचें होतें.

कृष्णराव जोग ( तासगांव ), बळवंतराव गोळे ( सातारा ), गोविंदपंत दादा खांबेटे (सातारा) व केसोपंत गोखले, बळवंतराव जावडेकर (इंदापूर) इ० कांहीं दख्खन प्रांतांतील सावकारांकडे पत्रें पाठवून अगोदर चालू असलेल्या शेतकऱ्यांच्या कायद्यापासून नफे तोटे काय झाले त्यांची दाखले सूद माहिती मागविली होती. तिचा योग्य विचार करून ही सर्व योजना रावसाहेबांनीं आपले धनिक व्यापारी स्नेही यांच्या विचारानें केली होती. त्यांचा कांहीं इंग्रज मित्रांबरोबर पत्रव्यवहार चालू होता. रावबहादुर रानडे यांची पुण्यास एक योजना तयार होत होती. तीकरतां सावकारांची सभा पुण्यास भरली होती. व रावसाहेबांच्या बंगल्यावर मि. वेडरबर्न, सोराबजी फ्रामजी पटेल, मंचरजी

**मा**णकजी **ब**नाजी, **अ**हमदभाई **ह**बीबभाई, **ना**नाभाई, **न**रोत्तमदास, **गो**कलदास **ज**गमोहनदास इत्यादि गृहस्थांची भरत असे व सिमल्यास या प्रश्नावर कांहीं अधिकारी लोक पुष्कळ चर्चा करीत असत.

या पेढ्यांचा पहिला प्रयोग **पुरंदर** तालुक्यांत करून पहावयाचा होता. व तेथें वेळ पडल्यास **रा**वसाहेबांनीं स्वतां जाऊन तेथील लोकांची सहानुभूति मिळविण्याची खटपट करण्याचें ठरविलें होतें. ( ६।४।८३ चे मेजर **बे**अरिंग यांस पत्र ).

**रा**नडे यांनीं **पु**ण्याची म्हणून जी योजना तयार केली होती तींत व मुंबईकराच्या ह्मणजे **रा**वसाहेबांच्या योजनेंत फरक होता*. **मुं**बईचे लोक जीं डिबेन्चरस काढणार होते त्याला सरकारची हमी पाहिजे होती. या कामांत त्यांस मि. **वे**डरबर्न यांचा पाठिंबा होता. यांचा दक्षिण जिल्ह्यांत वास बराच काल झाला होता व तेथील लोकांच्या स्थितीचा चांगला परिचय झाल्यामुळें त्यांच्या बद्दल यांच्या मनांत फार सहानुभूति वसत होती. शेतकऱ्यां-विषयीं प्रश्न निघाल्यास यांच्या एवढी माहिती इतरांस फार नव्हती. शेतकऱ्यां-करितां जर पेढ्यांची स्थापना झाली असती तर त्यांत भांडवल घालण्यास विला-यतच्या लोकांची मनधरणी करण्याची जरूर पडल्यास यांची तयारी होती.

परंतु पुढें ह्या सर्व योजना हातीं घेण्यासारख्या नाहींत असें ठरलें.

---

## प्रकरण ५८ वें.

# लोकमत.

**राजवल्लभ**—महाराज ! आपण सर्वसत्ताधीश आहांत !

**राजा कॅन्यूट**—हा मीं केवळ हांजी हांजीचा मासला समजतों.

---

* " पेढ्यांच्या योजनेस अनुकूल असलेल्या मंडळींत भेद पडावा हें शोच्य आहे. पुणेंकरांच्या योजनेसंबंधें तुह्मांला ज्या कांहीं थोड्याबहुत सूचना करावयास असतील त्या कळवा." ( इंग्रज मित्रास पत्र. )

**राजवल्लभ**—नाहीं महाराज ! आपली आज्ञा महासागरासमुद्धां शिरसामान्य झाली पाहिजे.

**राजा**—तर मग मी या समुद्रतीरीं भरतीचे वेळीं खुर्चीवर बसून समुद्रास आज्ञा करतों कीं खबरदार पुढें येशील तर !

**राजवल्लभ**—बेलाशक !

परंतु फार वेळ झाला नाहीं तोंच राजाच्या खुर्चीवर लाटा आदळूं लागतात, आपल्या राजास घेऊन सर्व राजवल्लभ, पळून जातात व राजानें चांगली कान उघडणी केली म्हणून शरमतात.



या ऐतिहासिक प्रसंगाचा अर्थ दुसऱ्या रीतीनें सांगतां येतो तो असा कीं खऱ्या लोकमताच्या भरतीच्या विरुद्ध जाणें इंग्लन्डच्या राजाचें शील नाहीं. निदान रावसाहेब असाच अर्थ करीत असत.

" समुद्रावर कॅन्यूट राजा हुकमत चालवीत नाहीं. सेनेटमध्यें गेल्या शनवारीं स्थानिक वेळाप्रमाणेंच राजाबाई टावरवर बसविलेलें घड्याळ लावावयाचें असा ठराव पास करून घेतला. ( १६-४-८३ चें सुरेंद्रनाथ बानर्जी यांस पत्र. )

लोकमताची जागृति करून लोकमताला योग्य वळण लावण्याकरतां नेटिव्ह ओपिनियन पत्र काढून तें इंग्लंदमध्यें सुद्धां प्रशस्त होईल अशा तऱ्हेनें बरीच वर्षें चालवून लोकमताची भरती राजवंद्य करून घेण्याची आपली इच्छा रावसाहेबांनीं सफल करून घेतली त्याचें वृत्त २० व्या प्रकरणांत आलें आहे. तथापि संधि येईल तेव्हां तसाच लोकमतजागृतीचा प्रयत्न दुसऱ्या कोणाच्या हातून होत असेल तर ते नेहमीं त्यास सर्वप्रकारें उत्तेजन देण्यास तयार असत.

मि. वुड हे टाईम्सचे एडिटर होते. त्यांस सरस लेखनकला साध्य होती. रावसाहेबांच्या स्नेहामुळें म्हणा अथवा हिंदी लोकाविषयीं मुळापासून हृदयांत वसणाऱ्या सहानुभूतीमुळें म्हणा ते टाइम्समध्यें हिंदी लोकांच्यातर्फें लेख

लिहीत असत. पुढें कांहीं कारणानें १८७८ च्या पावसाळ्यांत ते त्या संस्थे-तून निघाले. तेव्हां त्यांच्या प्रतिपक्षांस वाटलें 'आतां हा काय एकटा आहे. याचें स्वताचें कांहीं लोकांत फार वजन नाहीं. याला कोण विचारतो ! नवीन वर्तमानपत्र काढण्याची व त्याला लोकाश्रय मिळविण्याची ताकद याला कोठें आहे !' असा उपहास त्यांच्या समाजांत झाल्याचें त्यांचे कानीं आल्यावर एक वर्तमानपत्र काढावयाचें व तें लोकाश्रयावर चालवून दाखवावयाचें असा त्यांनीं निश्चय केला व तो **रावसाहेबांस** कळवून त्यांचें साहाय्य मागितलें. **रावसाहेबांस** लोकमताचें बरोबर प्रदर्शन झालें पाहिजे हें तत्त्व फारच मान्य होतें. मि. **वुड**सारखा कसलेला लेखक, आपला स्नेही, हिंदी लोकांचा पक्ष उचलून धरणारा असा आपला सर्व वेळ वर्तमानपत्राकडे खर्च करणारा मिळाला हें पहातांच त्यांनीं लागेल तें साहाय्य करण्याचें कबूल करून महिन्याचा खर्च काय लागेल त्याचा अंदाज तयार करविला. आरंभ करण्यास ८००० रुपये पुरतील असें आश्वासन मिळतांच **रावसाहेबांनीं** एक हस्तपत्रक छापून प्रसिद्ध केलें. पत्राचें नांव '**बाम्बे रिव्ह्यू** व **ॲडव्हर्टा**-यझर' असें ठेविलें. आकार **पालमॉलगॅझेट** एवढा १२ पानीं ठेवण्याचा ठरविलें. वार्षिक वर्गणी रु. २०, सहामाही रु. १०॥ व तिमाही रु. ५॥ घेण्याचें ठरविलें. "पत्रांत राजकीय, सामाजिक, शास्त्रीय व ऐतिहासिक विषयांवर मनोरंजक लेख, व्यापारी बातम्या, वाङ्मयविषयक नवीन प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांवर टीका व जागोजागची खरी खुरी बातमी आल्यानें हें वर्तमानपत्र सर्वांसच प्रिय होणार आहे. उद्योगवृद्धीस उत्तेजन देण्यांत येईल. यांत व्यक्तिशः मत—मग तें कितिकां भिन्न असेना—छापलें जाईल व तेणेंकरून ज्याच्या अंगांत लेख लिहिण्याची धमक आहे त्यास आपलें हृद्गत प्रगट करण्याची उघडपणें संधि देण्यांत येईल. इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशामध्यें पैशाच्या ज्या उलाढाल्या होतात त्याच्या परिणामाकडे विशेष लक्ष दिलें जाईल. सैन्य व रेलवे यांच्या व्यवस्थेविषयीं विचार केला जाईल. आणखी

ज्यास हिंदी लोकांच्या भावना नीट कळत होत्या व म्हणून ज्यास हिंदी लोक मान देत होते अशा महात्म्यांनीं हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्याची संस्थापना ज्या उदार तत्त्वांवर केली तीं प्रचारांत आणून इंग्लंद व हिंदुस्थान यांची चिरकाल मैत्री राहील असें धोरण ठेवण्यांत येईल. ”

**रा**वसाहबांचे मित्र **सो**राबजी **शा**पूरजी **बें**गाली व सर **दि**नशा **पे**टिट यांनीं आपला वांटा उचलावयाचें कबूल केलें. सहा महिने हें पत्र कसें काय चालतें तें पाहून पुढें काय करावयाचें तें ठरवावयाचें होतें. मि. ए. एफ़. मूस व मि. **टॉ**मस **लि**डबिटर यांस हिशेब तपासनीस नेमिलें. पत्र सुरू झालें व त्यांत सणसणीत लेख येऊं लागले. मि. **वु**ड यांच्या तावडींत पहिल्यानें, ‘ स्पर्शजन्य रोग-प्रतिबंधक ’ कायदा सांपडला. “ स्त्रियांची सक्तीनें तपासणी करून विडंबना करण्याचा जो अधिकार या कायद्यानें देतां येतो तो एक गुलामगिरीच्या युगांतच घडून येणारा प्रकार आहे व शास्त्रीय भूतदयेच्या नांवाखालीं दिवसाढवळ्या अशी विडंबना चालूं देण्याचे दिवस आतां उरले नाहींत ” असे लेख त्यांत येऊं लागले. हें पत्र वर्षभर चांगल्या तऱ्हेनें चाललें व पुढेंही चालण्याची खटपट **रा**वसाहेबांनीं चालू ठेवली होती. “ हें पत्र फार स्वतंत्र मताचें म्हणून फार उपयोगी आहे तें मरूं देतां कामा नये ” अशीं पत्रें इंदूरचे मित्र **ग**रूड व पालिटाण्याचे जे. एस. **की**र्तिकर यांस **रा**वसाहेबांनीं लिहिलें होतीं. तुमच्या मित्रांनीं केलेल्या मदतीमुळें आणखी वर्षभर हें पत्र निभाव धरील अशी मला खात्री आहे असें पत्र मि. **वु**डनें ३।१०।७९ **रा**वसाहेबांस लिहिलें. पुढें कांहीं काळानें मि. वुड यांस विलायतेस जावें लागलें. तेव्हां या पत्राचें काय झालें तें समजलें नाहीं.

पार्लमेंतमध्यें आपल्या वतीनें सभासद निवडून पाठविण्याचा अधिकार असलेला अथवा नसलेला इंग्लंद मधाल अगदीं लहान असा प्रान्त घेतला तरी इंग्लंदांतील बहुजनसमाज आपल्या हिताविषयीं जेवढी कळकळ बाळगतो व जितका विचार करतो, तितकी कळकळ व तितका विचार, समग्र हिंदी साम्रा-

ज्याच्या हिताविषयीं तो बाळगीत नाहीं व विचारही करीत नाहीं. याला उपाय काय हा प्रश्न येथील लोकांपुढें होता. **लार्ड रिपन** यांच्या वेळीं हिंदी वर्तमानपत्रांची एक जूट व्हावयास लागली होती व लोकमताचें दिग्दर्शन त्यांच्या मार्फत हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत होऊं लागलें होतें.

परंतु या पत्रांचा इंग्लंदमध्यें खप नव्हता. खप होता तो येथील इंग्रजी दैनिकांचा. पण त्यांच्या मार्फत हें कार्य साधण्यासारखें नव्हतें. बंगाल, मद्रास, मुंबई, पंजाब, मध्यप्रांत इ० प्रांतांतील लोकमत एकदम एका विषयावर कसें पहावयास मिळेल याविषयीं एका हिंदुस्थानच्या इंग्रज हितचिंतकानें एक युक्ति काढिली ती अशी—" मुंबईसारख्या मध्यवर्त्ति ठिकाणीं एक मासिक अथवा पाक्षिक काढावें. त्यांत सर्व ठिकाणच्या प्रमुख वर्तमानपत्रांतील येणाऱ्या लेखांचा सारांश प्रसिद्ध करावा. या पत्रानें आपलें स्वताचें धोरण कांहींच ठेवावयाचें नाहीं, असें म्हटलें तर त्यानें एकच धोरण ठेवावयाचें तें हें कीं ठिक ठिकाणचीं प्रमुख वर्तमानपत्रें काय म्हणतात तें जशाचें तसेंच आपलें म्हणणें कळविल्या शिवाय द्यावयाचें म्हणजे लोकमतप्रकाशक अशीं जीं किरणें सर्वत्र प्रसृत असतील त्यांचा एकत्र संग्रह करून या मासिकरूपी सूर्यकान्त मण्यांतील एका बिंदूवर त्यांचा प्रकाश पाडून खरें प्रखर तेज उत्पन्न करावयाचें व त्याच्या प्रभावानें लोकांच्या स्थितीचें खरें ज्ञान इंग्लंडमधील लोकांस करून द्यावयाचें. पण असें करतांना त्या किरणांच्या सरलगामी गतीस वक्रता न येईल अथवा त्या किरणांत दुसराच रंग न भरेल इतकी काळजी घ्यावयाची. प्रमुख पत्रकारांनीं या मासिकाच्या चालकाला आपल्या पत्रांतील उतारे पाठवून मदत करावी व इभ्रतदार वर्तमानपत्रकार जे लेख पाठवतील त्यांस जागा द्यावयाची म्हणजे सभांची हकीगत देणाऱ्या बातमी-दाराप्रमाणें एकांगी स्वरूप याला प्राप्त होणार नाहीं. येथील लोकांस अशा पत्राचा उपयोग होणारच पण विलायतेंतील लोकांसही होणार. कारण येथील इंग्रजी पत्रांतील उताऱ्यांतून हिंदी लोकांचें मत विलायतेंत कळतच नाहीं. कदाचित् त्यांस वाटत असेल कीं हिंदी लोक केवळ मुके नसतील पण त्यांस स्फुटाक्षरा

वाचा नाहीं ! हो, आहे कुणी म्हणावें ? जनांवरांप्रमाणें एकस्वरी ओरड **करून** जवळच्या लोकांना आपलें मत काय तें कळवीत असतील. हा त्यांचा समज अथवा गैरसमज दूर करण्याच्या कामीं या **भारतध्वनि** पत्राचा उपयोग चांगला होईल. हा आपल्या स्फुटिताक्षर व मंद्रवाणीनें हिंदी लोकांच्या मताचा घोष करून विलायतच्या लोकांस ऐकवील व तेणेंकरून शांतता मार्गानें प्रगति करण्याचें सरकारी धोरण आहे त्यास साहाय्यच होईल. ”

दादाभाईनीं आपल्यावर सारी जबाबदारी घेतली होती. व त्यांस प्रसिद्ध पारशी लेखक मि. **पी. एम्. मलबारी** यांनीं पत्राची व्यवस्था करण्याचें कबूल केलें होतें व शिवाय कांहीं मित्रांनीं जर यांस कांहीं तोटा झाला तर तो भरून काढण्याची जबाबदारी घेतली होती. **रावसाहेबांकडे** हें हस्तपत्रक पाठविण्यांत आलें होतें व त्यांचें साहाय्य मागण्यांत आलें होतें. त्यांस ही युक्ति पसंत झाली होती. त्या कामीं आपल्या **कलकत्ता, अलाहाबाद, मद्रास** इ० दूरस्थ मित्रांची मदत यांनीं मागितली होती.

बाबू **खिस्तोदास पॉल** यांच्याशीं व इतर मित्रांशीं पत्रव्यवहार **राव**-साहेबांनीं सुरु केला तो असा:—“ राजकीय विषयांचें निरीक्षण करणारें मासिक काढावें असें फार मनांत आहे. हिंदुस्थानच्या चारी दिशांकडून लेख पाठविणारी मंडळी मिळवावयाची आहे. मी येत्या हिवाळ्यांत तिकडे येईन ( येण्याचा जरा संशयच आहे. ) तेव्हां राजधानीय मित्रांशीं या मासिकाविषयीं चर्चा करीन. लोकशिक्षण जरा प्रक्षुब्ध करावयाचें आहे. ”

“ जरा चळवळ करण्याची, जरा कांहीं कठीण काम अविश्रांतपणें करण्याची लोकांस संवय लावावयाची आहे. सूर्य, चंद्र, तारे यांचें अनुकरण त्यांनीं केलें पाहिजे. जनक, भीष्म व रामचंद्रजी यांच्यावेळीं जशी सत्यदेवतेची पूजा करीत असत तशी आतां चालविली पाहिजे. ” ( २२।९।८३ चें बाबू **मोतिलाल घोष** यांस पत्र. )

“ सोबत **दादाभाई नवरोजी** यांच्या पत्राचा उतारा आहे. आपल्या मित्रांस

जरा खटपट करावयास लावून या मासिकाचा यथार्थ 'भारतध्वनि' करून दाखवाल अशी आशा आहे. ( सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांस पत्र. )

या पत्राबद्दल रावसाहेबांच्या मनांत फार उत्साह भरला होता. असें पत्र आम्हीं काढणार आहोंत अशी गोष्ट त्यांनीं लार्ड रिपन यांसही कळविली होती. राजेन्द्रलाल मित्र यांस ते स्वतां भेटले होते. या पत्राकरतां रावसाहेबांनीं एक व्यवस्था करण्याचें योजिलें होतें. एका मित्राकडून ( ज्याचें नांव केव्हांही बाहेर यावयाचें नव्हतें त्याकडून ) नऊ हजार रु. या पत्राच्या कामाकरतां घ्यावयाचे होते व हें पत्र रावसाहेब स्वतां एक, दुसरे मि. पी. एम्. मलबारी व तिसरे मि. नानाभाई राणिना या तिघांचें कार्यकारी मंडळ नेमून त्यांच्या स्वाधीन करावयाचें ठरवून छापण्याचें काम मि. राणिना याजवर सोंपवावयाचें होतें. दात्याची विशेष इच्छा काय असेल ती या मंडळास रावसाहेबांच्या मार्फत कळावयाची होती. त्यास कांहीं व्याजाची अपेक्षा नव्हती. एवढेंच नाहीं पण मुद्दल रक्कम त्यास परत केल्यावर पत्राची मालकी आपलेकडे घेण्याची मुभा या मंडळास मिळावयाची होती. हा बेत दादाभाईंस कसा काय पसंत पडेल त्यावर पुढचा क्रम अवलंबून होता. परंतु पुढें काय झालें त्याचा उल्लेख मिळत नाहीं. उलट हा बेत सोडून दिला असावा असें मानण्याला जागा आहे. हें पत्र निघालें होतें परंतु तें मि. मलबारी यांच्या स्पेक्टेटर पत्रांत सामील झालेलें होतें.

---

## प्रकरण ५९ वें.

# ड्यूक ऑफ कॅनाट यांचें या देशीं आगमन.



। एवं गृहाविरोधेन राजपुत्रो वसन् गृहे ।
॥ शनैः शनैः प्रवर्धेत शुक्लपक्षमृगांकवत् ॥ (कामंदकीय नीतिसार)

वरील महत्वाची गोष्ट १८८३ सालीं घडून आली. त्यावेळीं रावसाहेब

व त्यांचे मित्र नानाभाई, बहिरामजी जीजीभाई वगैरे मंडळींनीं राज्ञीपुत्र ड्यूक ऑफ कॅनाट यांचें स्वागत उत्तम रीतीनें कसें करावें तें ठरविण्याकरतां एक म्युनिसिपल कारपोरेशनची सभा २५ अक्टोबर रोजीं भरविली. हवेंत कडकपणा असल्यामुळें माथेरान व महाबळेश्वर येथें कारपोरेशनचे कांहीं सभासद् गेल्यामुळें राहिलेल्या सभासदांच्या अंगांत थोडी ग्लानि आली होती कीं काय कोण जाणे ! कारपोरेशननें फक्त मानपत्र देण्याचा ठराव केला. आणि लोक जर सार्वजनिक उत्सव करण्याकरतां फंड जमवतील तर कांहीं रक्कम त्या खर्चाकरतां देऊं केली. अशा रीतीनें दाखवलेला कंजूषपणा रावसाहेबांना आवडला नाहीं. प्रिन्स ऑफ़ वेल्स यांच्या भेटीच्या चांगल्या परिणामाचा अजून विसर झाला नव्हता. तो त्यावेळच्या लोकांच्या स्मरणांत होता. म्हणून कारपोरेशनच्या या ठरावामुळें स्वस्थ न बसतां त्यांनीं 'प्रत्यक्ष राणी साहेबांच्या अंकुरास' शोभेल असा सार्वजानिक उत्सव करण्याचा निश्चय केला व आपल्या इंग्रज व हिंदी मित्रमंडळास या गोष्टीचा विचार करण्याकरतां ताबडतोब निमंत्रणें पाठविलीं. पुढें कशी काय व्यवस्था करावयाची त्यासंबंधें म्युनिसिपल हालमध्यें सभा भरविली. त्यांत नागरिकांच्या सर्व पुढाऱ्यांची एक कमिटी नेमण्यांत आली. तिच्या वतीनें 'वेळ जरी थोडा आहे तरी तितक्यांत आमच्या राजभक्तीला शोभेल असें स्वागत करण्याची हमी' रावसाहेबांनीं घेतली. स्वतां एकहजाराचा आंकडा घातला त्याबरोबर पैसे भराभर जमले व पुष्कळ लोकांनीं साहाय्य करण्याचें ताबडतोब वचन दिलें. या चळवळींत मुंबईंतील सर्व पुढारी पडले होते. त्यांत दिनशा माणकजी पेटिट, सर मंगळदास, अंबाईदास बेचरदास, सोराबजी फ्रामजी पटेल, महंमद अली रोगे; जमशेटजी जिजीभाई, त्रिभुवनदास, रघुनाथ नारायण खोटे, डा. आत्माराम पांडुरंग इ० प्रमुख लोक होते. कित्येकांनीं तर तारेनें पैसे पाठवून दिले व थोडक्याच वेळांत जरूर तेवढा पैसा मिळाला.

कापाच्या मैदानांत मोठी जत्रा भरविली होती. त्यांत लहानापासून थोरापर्यंत करमणूक होऊन आनंद होईल अशा तऱ्हेचे खेळ व देखावे केले होते.

जत्रेची रचना फार कुशलतेनें केली होती. तें काम रावसाहेबांचे मित्र एलाप्पा बाळाराम व मि. मर्झबान यांच्या देखरेखीखालीं चाललें होतें. मध्यभागीं एक उच्चस्थान केलें होतें तेथें बसून राजीपुत्रास सर्व जत्रा दिसावी अशी व्यवस्था केलेली होती. याशिवाय चर्चगेटच्या नजीक उत्तम दारुकाम सोडण्यांत आलें. तें अद्यापिही पुष्कळांच्या स्मरणांत असेल. रस्त्यामध्यें लोकांचे थवे जमत असत. रावसाहेब व त्यांचे मित्र यांच्या मताप्रमाणें सर्व व्यवस्था झाली. डचेस ऑफ कॅनाट यांना मराठी तऱ्हेचा आहेर अर्पण करण्यांत आला. आपल्या प्रजाजनांचा चांगुलपणा ओळखण्याइतकें औदार्य ड्यूक ऑफ कॅनाट यांच्या अंगीं साहजिकच होतें. पुढें यांची नेमणूक मुंबईतील सैन्याच्या अधिपतीच्या जागीं झाली होती तेव्हां त्यांनीं लहानशा शिपायापासून मोठ्या शहरवासिजनापर्यंत दाखविलेली प्रेमाची बाजू अद्यापिही लोक स्मरत आहेत.

एकवार अमुक गोष्ट करणें अवश्य कर्तव्यांतील आहे अशी रावसाहेबांची खात्री झाली म्हणजे ती केल्याशिवाय व करवल्याशिवाय ते रहात नसत व तें काम ते आपल्या सरळ मार्गानें करीत असत ही गोष्ट वरील प्रकार सिद्ध करीत आहे. रावसाहेब व त्यांचे मित्र यांचें मत या नागरिकोचित उत्सवाचें काम म्युनिसिपॅलिटीनें आपल्या अंगावर घेऊन करावें असें होतें तें फसलें म्हणून त्यांस खाजगी रीतीनें वर्गणी जमविण्याची व्यवस्था करावी लागली. या कामीं उत्सव करण्याचा आपला हेतु मि. फिरोजशहा मेथा यांस एका पत्रीं कळवितांना रावसाहेबांनीं त्यांत लिहिलें:—‘ माझ्या अंगांत युद्धकौशल्य नाहीं.’ ‘व्यूहरचनानैपुण्य नाहीं म्हणून मला ही भानगड * पडली. फिरोजशहा मेथानीं रावसाहेबांस लिहिलें कीं ‘ तुम्हीं जें जें कराल तें तें मला पसंत पडेल. तुम्हीं मला जें जें सांगाल तें तें काम मी करीन. जरी तुमच्या अंगांत युद्धकौशल्य नाहीं तरी प्रसंगाला क्षुद्र मनोभावनांचा स्पर्शही न होऊं देण्याइतकी तुमच्या मनाची श्रेष्ठ प्रवृत्ति आहे.’

---

* I am afraid I am no strategist. hence my troubles.

## प्रकरण ६० वें.

# श्रीगंगा.



। निधानं धर्माणां किमपिच विधानं नवमुदां ।
॥ प्रधानं तीर्थानाममलपरिधानं त्रिजगतः ॥
। समाधानं बुद्धेरथ खलु तिरोधानमधियां ।
॥ श्रियामाधानं नः परिहरतु पापं तव वपुः ॥

( जगन्नाथकृत गंगालहरी )

श्रीगंगेचें माहात्म्य प्रत्येक हिंदूला विदितच आहे. रावसाहेबांची भक्ति गेवर फार होती. काशीयात्रा घडल्या दिवसापासून ते रोज पिण्याकरतां गंगेचें णी आंतून कल्हई लावलेल्या मोठमोठाल्या कांसड्यांतून आणवीत असत.* शी ज्या पुरुषाची भक्ति त्यास या तीर्थांत सोडलेले ओंगळ पाण्याचे नळ एका संगीं पाहून लोकांच्या हातून "या सद्वंशज भगीरथप्रयत्नप्राप्त पुण्यपावन खिलपातकभस्मकारक अशातीर्थाची विडंबना होत आहे." असें वाटून नाला फार उद्वेग प्राप्त झाला. हें सर्व नाले येथून काढून अन्यत्र कोठें ऊन सोडून देतां येतील कीं नाहीं याचा ते विचार करूं लागले. ×तें

* गंगोदक रेल्वेनें पाठविण्याचें काम नेपाळ सरकारचे उपाध्ये आलेपीदिन डोमई रीत असत.

×या भ्रष्टतेचा प्रतिबंध कसा करतां येईल हें पाहण्याकरतां सर्व घाटांची तपासणी वतः पायीं हिंडून रावसाहेबांनी केली. त्यांची नोंद त्यांनीं करून ठेविली आहे तीः—

१ रळामिश्राचा घाट, पंजाबी. २ लोलार्क घाट; कोणी बांधला, माहिती लब्ध ाही, वर कूप व पुष्करणी आहे. ३ तुळसीदास घाट, खुद्द तुळसीदास यांनीं बांधिला; र मारुतीचें मंदिर, पादुका व खडावा आहेत; एक होडी जिला डोंगी म्हणतात, ीतून ते नदी पार जात होते असें म्हणतात. ४ मध्यें जागा रिकामी आहे. ५

शक्य आहे असें त्यांस वाटत होतें. अर्थात मोठ्या खर्चाचें हें काम आहे हेंही ते जाणून होते. परंतु द्रव्यसाहाय्य मिळेल अशी त्यांची खात्री होती. कांहींतरी खटपट केली पाहिजे असें ठरवून त्यांनीं १२।२।८३ रोजीं आपले प्रयागस्थ मित्र मुनशी हनुमानप्रसाद यांस १३।२।८३ रोजीं काशीहून असें पत्र लिहिलें. 'सोबतच्या टिप्पणांत माझा मनोदय काय आहे तो कळेल. तुम्हीं बनारसला

---

राणी सुरसरीचा घाट; काम चालू आहे. ६ गबद्दराय घाट व पुस्ता. ७ प्रभूदासाचा घाट, ( जैन ). ८ शिवालय घाट; ( यांत चेतसिंग राजे राहत होते. येथें शिवालयें आहेत. त्यांत आतां मुसलमान लोक राहतात. देवालयांत कबुतरें व कोंबडीं आहेत ) ९ निर्वाण निरंजनी घाट. १० रिकामी जागा; सांडपाण्याचा नळ आहे. ११ हनुमान घाट ( तैलंग ) वर हनुमंताचें मंदीर आहे; कोणी कधीं बांधलें समजत नाहीं. १२ रिकामी जमीन, लहान सांडपाण्याचा नळ. १३ डोंबाचा घाट व त्याचें घर व स्मशान घाट. १४ केदार घाट, कुमारस्वामीनें ( कोणी एका दक्षिण हिंदुस्थानांतील राजानें) बांधिला. १५ वग्रीचा घाट; जागा रिकामी आहे. १६ कुमारस्वामीचा पुस्ता व मठ येथें लांकडें उतरतात. मोठा घाणेऱ्या पाण्याचा नळ गंगेंत रिकामा होत आहे. १७ मानस सरोवर घाट, तेलंग राजानें बांधिला आहे. १८ नारद घांट, अमृतराव साहेबांनीं बांधला, छत्तर घाट. सत्र आहे. १०० ब्राम्हण जेवतात एक नळ मैला पाण्याचा आहे. १९ पांडे घाट; दोन दोन नळ दरएक बाजूला मिळून चार. २० धोंडोपंत घाट; यास नाठोर घाट म्हणतात. २१ चतुषःष्टी घाट; वर देवी योगिनीचें देवालय आहे. २२ राणी घाट; उदेपूर वर वाडा आहे. २३ मुनसी घाट; वर देऊळ आहे व वाडाही आहे. २४ अहिल्याबाई घाट; वर सात वाडे ब्राह्मणांस दिले आहेत. त्यांस ब्रह्मपुरी म्हणतात. वेदशाळा आहे. येथें विशुद्धानंद स्वामी राहतात. येथें दशाश्वमेध तीर्थ आहे २५ शीतळाघाट—वर शीतळामंदीर आहे. दशाश्वमेधेश्वर. २६ प्रयाग घाट. शूलटंकेश्वर. २७ घोडा घाट; प्राचीन मोठा मैलापाण्याचा नळ. येथें दगड व लांकडे उतरतात. २८ मानमंदी घाट; वर वाडा आहे; वेदशाळा आहे. प्राचीन नाम समेश्वर घाट या नांवानें प्रसिद्ध. शेवटीं लहान मैलापाण्याचा नळ आहे. २९ मीर घांट; फार मोडकळीस आला आहे. दोन्हीं बाजूस लहान लहान मैलापाण्याचे नळ आहेत.

निघून या म्हणून आतांच तार दिली आहे. माझे मनांत एक मोठी सभा भरवावयाची आहे व अखिल हिंदुस्थानवासी जनांचें साहाय्य या कामीं घ्याव-याचें आहे. बरोबर जावळाप्रसाद यांस घेऊन या. ”

“ बनारस येथील नाल्यांचा तपास केला असतां ते कमी अधिक मानानें नव्यानेंच बांधिलेले आहेत. आमच्या मताला कोणी मान देवो. कोणी दोष देवो. ते नाले शक्य तितक्या त्वरेनें तेथून काढून पवित्र गंगा वाहाच्या दूर त्यांस कोठें तरी लावून देणें हा आमचेपुढें एक महत्वाचा प्रश्न आहे. मी या संबंधें कांहीं चौकशी चालविली आहे. तीवरून पाहतां ८ लक्ष रुपये आतांच्या आतां जमविल्यास हें काम तेव्हांच होईल. येथील प्रमख लोक साहाय्य कर-ण्यास राजी आहेत परंतु हा खर्च त्यांच्या आवांक्याच्या बाहेर आहे. स्वच्छता व आरोग्याच्या दृष्टीनें या गोष्टीचें महत्त्व जेवढें आहे त्याहून राष्ट्रीय दृष्टीनें फारच जास्त आहे. या एका गोष्टीनें आरोग्याचा नाश होत आहे. तसाच पावित्र्याचाही होत आहे, अशी अपकीर्ति पसरत आहे. आतांच्या आतां तुम्हीं स्नेहभावानें मला साहाय्य कराल अशी अपेक्षा आहे. तुम्हीं जागोजाग सभा भरवा, वर्गणी गोळा करा, व ती मुंबईस माझ्याकडे पाठवून द्या. अथवा मुंबईच्यांकेंत त्या कामाकरतां खातें काढून ठवितों. त्यांत पैसे भरा. अशी तुम्हांस मी अगत्याची विनंति करतों. माझें हातांत काम सुरू करण्यापुरते पैसे जमतांच मीं या नगरीच्या अधिकाऱ्यांशीं या संबंधें पत्रव्यवहार चालू करीन. ”

नंतर १४।२।८३ रोजीं आधीं तार करून नंतर राजे रघुनाथराव दिनकर-राव राजवाडे यांस पत्रीं रावसाहेबांनीं २२।२।८३ रोजीं बनारसहून लिहिलें. “ गंगानदींतील नाले काढून टाकण्याच्या बेताविषयींचा मजकूर तारेनें कळवि-लाच आहे. नदीचे कांठीं महाराज शिंदे सरकार यांचे वाडे अनेक आहेत. त्यांतील नाल्यांपासून तीर्थाचें पाणी फार अस्वच्छ होत आहे. तें न होऊं देण्याकरतां योजलेलें काम हातीं घेण्याकरतां महाराजांचें मन वळवाल तर सर्व हिंदुस्थानचें मोठेंच कार्य केल्याचें श्रेय प्राप्त होईल. ” पुढें कलकत्त्यास मि. बकू नांवाच्या गृहस्थास लिहिलेल्या पत्रावरून असें दिसतें कीं रावसाहेबांनीं या प्रश्नासंबंधें

कांहीं कागदपत्र बनारस येथील अधिकाऱ्यांकडे होते ते वाचावयास आणिले होते व एक १८८० सालीं यासंबंधें कांहीं माहिती देणारा लेख सदरहू गृहस्थाजवळ होता त्याची नक्कल अमुक कामाकरतां पाहिजे असें कळवन मागितली होती. बनारसला महाराज ऑफ बनारस यांच्या अध्यक्षतेखालीं, गंगा नदीच्या शुद्धीकरतां आंत जे नाले मिळविलेले आहे ते दूर नेऊन सोडाविण्या-करतां काय केलें पाहिजे तें ठरवून तें कार्य करण्याकरतां एक कमिटी १८८६ सालीं बसली होती.

हें कार्य कार्यबाहुल्यानें अगर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मागें पडलें तें पड-लेंच. एवढी अपुरी हकीकत देण्याचें कारण एवढेंच कीं कोणा महात्म्याच्या मनांत प्रेरणा झाली तर हें कार्य हातांत घेण्यासारखें आहे.

---

## प्रकरण ६१ वें.

# गोरक्षण.



**अक्षैर्मा दीव्यः कृषिमित्कृषस्व । वित्ते रमस्व बहुमन्यमानः ।**
**तत्र गावः कितव तत्र जाया । तन्मे विचष्टे सवितायमर्यः ॥**

( ऋग्वेद )

या विषयाकडे **रावसाहेबांचें** लक्ष १८८६ पर्यंत लागलेलें आढळत नाही. १६।१०।८६ रोजीं शेठ **खिमजी**, शेट **चतुर्भुज** व शेट **दामोदरदास थॅकरसी** व दुसरे तीन स्नेही यांनीं **रावसाहेबांची** भेट घेतली व गोरक्षणाविषयीं कांहीं चर्चा केली व शेट **हरकिसनदास** यांचा सहकार मिळवा म्हणून **रावसाहेबांस** विनंति केली. त्याप्रमाणें त्यांनीं दुसऱ्या दिवशीं शेट **हरकिसनदास** यांस पत्र लिहिलें त्यांत वरील हकीकत देऊन आम्हीं सारे तुम्हांस भेटण्यास मधल्यावेळे पर्यंत येतों असें लिहून म्हटलें कीं "हा प्रश्न सोडवावयास कठीण आहे. पण

लक्ष देण्यास योग्य आहे व नीट व्यवस्था झाल्यास माझ्यापुरता मी सहकार करीन असें त्यांस वचन दिलें आहे. आमच्या पाउलांची गति मंद असली तरी मार्ग गांठूं तो पक्का पाहिजे. माहिती अंकबद्ध मिळविली पाहिजे. विश्वासू लोकांची कार्यकारी मंडळींत नेमणूक केली पाहिजे व उगाच पोकळ ओरड करतां कामा नये. ”

पुढें मि. बैरामजी दिनशाजी या पारशीगृहस्थानें लोकांत वांटण्याकरतां एक विनंतिपत्र तयार केलें व रावसाहेबांकडे पसंतीकरतां पाठविलें. हे गृहस्थ फार मेहनती होते. यांनीं आपल्या स्नेह्यांत प्रारंभ केल्यापासून एक महिन्यांतच ३००० रुपये जमविले होते. पुढें तें पत्र छापून लोकांत वांटण्यांत आलें. एक मुंबईनजीक पांजरापोळ बांधून मोठें जंगल खरेदी करणें, अज्ञानामुळें कसायांना लोक गाई विकतात त्यांस त्यापासूनचे होणारे तोटे समजावून सांगणें व द्रव्यसाहाय्य करणें, व वांद्र्याकडे गाईचा वहात असलेला ओघ शक्य तेवढा रोड करणें, वांद्र्यास कसाईखान्यांत उन्हाच्या तडाक्यापासून किंवा जोराच्या वृष्टीपासून वध होण्यापूर्वीं जे वध्य जनावराचे हाल होतात ते म्युनिसिपालिटी-कडून अर्ज करून छपरें बांधवून कमी करणें. इ. कामें करण्याकरतां लोकांनीं द्रव्यसाहाय्य करावें अशी विनंति त्यांत केलेली होती.

गोरक्षण मंडळीची स्थापना १८८७ सालांत झाली असावी. तिला सभासद पुष्कळ मिळाले असावे. नुसत्या विधायक कमिटींत २१० लोक होते. पुढें पुढें हिंदू व पार्शी यांबरोबर मुसलमान लोकही या मंडळाचे सभासद झाले. रावसाहेबांनीं म्युनिसिपल सेक्रेटरीकडून वांद्रें येथील प्राणिवधाचे तीन वर्षांचें कोष्टक मागविलें होतें तें:—

| साल. | १८८३।४ | १८८४–८५ | १८८५।६ |
|---|---|---|---|
| शिंगवालीं जनावरें | २०,९४७ | २२,६५९ | २५,७०२ |
| शेळ्या मेंढ्या | ४३५,६५२ | ४६०,०४० | ४७०,१३३ |
| डुकरें | ७६० | ८७९ | ९२० |
| खासगी ठिकाणीं मारावयास नेलेलीं | | | |
| | ८७६ | ७८१ | ५९१ |

सर मंगळदास नथूभाई यांनीं सोडविलेलीं गुरें कच्छमधील संस्थानांत बाळगण्यास पाठविण्याची व्यवस्था केली होती ती कशी काय होती ती कळण्याकरितां तो सर्व पत्रव्यवहार पहावयास रावसाहेबांनीं मागितला होता. ( २६।११।८६ चें पत्र. ) माहिमचे धोंडोपंत दांडेकर यांस समक्ष मुंबईस बोलावून त्यांच्याशीं चर्चा करीत असत. (१९।१२।८६ चें पत्र.) डाक्तर वेअर, मुंबई म्युनिसिपालिटीचे आरोग्य खात्याचे मुख्य, यांच्याकडून अखिल हिंदुस्थानांत गोमांस किती खपतें यांचा शोध रावसाहेबांनीं चालविला होता. ( २६।११।८६ चें पत्र )

त्याचप्रमाणें कमिसॅरिअट खात्यांत सोल्जरांकरतां किती गुरें लागतात हें शोधण्याकरतां गॅझेटीअरचे सर्व भाग रावसाहेबांनीं वाचून पाहिले.

रावसाहेबांनीं आपल्या मित्रांस पत्रें पाठवून गोरक्षण कोणत्याप्रकारें उत्तम होईल त्याविषयीं मतें मागविलीं होतीं व १८।१।८७ रोजीं गोरक्षण मंडळाकडे एक टिपण रावसाहेबांनीं पाठविलें. त्यांत गोरक्षणार्थ पुढील कामें सुचविलीं होतीं.

उन्हाळ्यांत ज्या ठिकाणीं पाण्याचें दुर्भिक्ष्य होतें तेथें विहिरी बांधणें. गुरांच्या संहाराचे तीन मार्ग (अ) एकाद्या खेड्यांतून गुरें लांबवर हांकून पळविल्यावर ज्या ठिकाणीं पळविलेलीं गुरें ओळखतां यावयाचीं नाहींत अशा ठिकाणीं कसायांच्या दलालांस विकण्यांत येतात. ( २ ) ढोर पोसवत नाहीं म्हणून जाणून बुजून लोक कसायांच्या दलालांस तें विकतात ( ३ ) व कातड्याकरितां व हाडांकरितां विषप्रयोगानें दुष्ट लोक गुरें मारतात, हे तीन मार्ग बंद करणें; म्हणजे गुरें चोरील त्यास पकडून शिक्षा करविणें, जो दरिद्री मनुष्य ढोर विकील त्यापासून तें गोरक्षण मंडळीच्या मुक्त्यारांनीं विकत घेणें व जागच्या जागीं प्रतिष्ठित लोकांस पाहिजे असल्यास पोसावयास देणें. विष घालणाऱ्यांस शिक्षा करविणें डहाणू,उंबरगांव व शहापूर इकडे रानें आहेत त्यांच्या मालकांकडून गुरें पोसण्याचें काम करवणें. गोरक्षणमंडळावर खर्च कमी

पडेल असें करणें. " नागोठणें व महाबळेश्वर याच्या दरम्यानच्या प्रदेशांत वरीलप्रमाणें व्यवस्था करण्यांत संभावित व सधन लोकांस सांगणें. ठाणें जिल्ह्यांत ५००० रुपये मंडळीनें खर्चाकरितां देणें. दर एक जिल्ह्याकरतां मुख्य कामगार नेमणें. त्यानें मंडळीच्या गांवोगांव फिरणाऱ्या उपदेशकांवर व मुक्त्यारावर नजर ठेवणें. लोकांच्या जरूरीप्रमाणें ठायीं ठायीं गोशाळा बांधणें. याचप्रमाणें रत्नागिरी, चिपळूण, दापोली, वेंगुर्लें, येथें व्यवस्था करणें. तिकडे फार गुरांची विक्री होत नाहीं म्हणून ५०० रुपये पर्यंत जी मदत लागेल ती दर ठिकाणास देणें. घाटावर तर जागोजाग गुरांचे बाजार भरतात तेथें गुरें सोडविण्याची व्यवस्था करणें.

डहाणूपासून सुरतपर्यंत काय व्यवस्था करतां येईल तें सुचविण्याचें काम कृष्णमुखराम मेथा यांकडे सोंपविलें होतें.

पुढें गोरक्षण उपदेशक नांवाची एक मंडळी होती तिच्या पासून व आर्यसमाजाच्या उपदेशकांपासून मुंबई गोरक्षण मंडळीस काय मदत होईल त्याचा विचार चालला होता.

९ । ४ । ८८ रोजीं लॉर्ड डफरिन, हिंदुस्थानचे गव्हर्नर यांस मुंबई गोरक्षण मंडळीनें एक अर्ज पाठविला होता त्याचा संक्षेपार्थ:—

नेकनामदार सर फ्रेडरिक टेम्पल हॅमिल्टन टेम्पल ब्लॅकवुड अर्ल ऑफ डफरिन. के. पी. जी. सी बी;पी. सी. एफ. आर. एस; डी. सी. एल. जी. एम्. एस् आय, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय व गव्हर्नर जनरल यांच्या सेवेशीं.

शिंगें असणाऱ्या जनावरांच्या संरक्षणार्थ मुंबई येथें स्थापन झालेल्या गोरक्षण मंडळीचा नम्रतापूर्वक सादर केलेला अर्ज ऐसा जे. अत्यंत नम्रपणें कळविण्यांत येतें कीं, आम्हीं खालीं सही करणार हिंदू, मुसलमान, पारशी इ० मुंबईतील भिन्न भिन्न वर्गांतील लोक नामदारांची परवानगी मागून त्यांच्या नजरेला आणतों कीं कांहीं गोमांसभक्षक लोकांच्या उपयोगाकरतां होणारा ढोरांचा वध दर वर्षास वाढत्या प्रमाणावर आहे. त्याचा परिणाम काळजी वाटण्यासारखा

शेतकीच्या ऱ्हासांत होत आहे; हिंदुस्थानच्या हवेला गोमांस हें विशेषतः युरोपियन लोकांस पथ्यावह असें नाहीं व इतरांस निर्वाहास अवश्य लागतें असें नाहीं. तरीही वरील लोकांचें गोमांस अगदीं तोडावें अथवा त्याचा पुरवठा नियमित होईल अशी व्यवस्था करण्याचा अर्जदारांचा मानस नाहीं. गाई ढोरें मग तीं सदुग्ध असोत अथवा शुष्कदुग्ध असोत त्यांचा हिंदुस्थानांत शेतकीच्या कामास व समाजास फारच उपयोग होतो म्हणून त्यांचा सरसकट वध न करतां, येथील गोमांसभक्षक लोकांस गोमांसाचा पुरवठा करणें शक्य आहे असें अर्जदारांचें म्हणणें आहे. गोरक्षण हा विषय राष्ट्रीयमहत्वाचा आहे. हिंदुस्थान देश हा शेतीवर अवलंबून आहे हें नामदार जाणतच आहेत. शेतीची सुधारणा जशी जशी होत जाईल तशी तशी या देशाची सुधारणा व संपत्ति वाढेल हें उघड आहे. या देशांतून जो माल बाहेर देशांत जातो त्यांतील बहुतेक शेतांत पिकणारा आहे व हें शेतकीचें उत्पन्न जसें जसें मापानें व गुणानें वृद्धि पावेल तशी तशी देशाच्या व्यापारांत सुधारणा होईल.

शेतांचा विस्तार अल्पप्रमाण असल्यामुळें या देशांतील शेतकरी मोठ्या प्रमाणावर शेतकीचीं मूल्यवान आयुधें आणून तशीच मोठ्या प्रमाणावर शेती करूं शकत नाहींत. भारी किंमतीच्या खताचें नांव त्यांच्याजवळ काढावयास नको. मग पाणी काढावयाचीं यंत्रें व वाफेचे रूळ यांचें नांव कशाला! अजून बरीच वर्षें गाईढोरांवरच शेतकीचें काम अवलंबून राहिलें पाहिजे. जेणेंकरून गाईढोरांची वाढ होईल व तीं स्वस्त मिळतील तो उपाय अगोदर विचारांत घेतला पाहिजे असें अर्जदाराचें नम्र मत आहे.

विलायतेंत शेतकऱ्याच्या कामीं घोडा जसा येतो तसा हिंदुस्थानात शेतकऱ्याच्या कामीं बैल येतो. हल्लीं हल्लीं तर शेतकीच्या कामीं येणारीं व न येणारीं अशा गुरांची संख्या या इलाख्यांतील बहुतेक भागांत कमी झालेली आहे असें तुमच्या अर्जदारांस वाटत आहे. व त्याला प्रत्यंतर ठाणा गॅझेटीअर भाग ८ पृष्ठ ६२३ देत आहे. त्याप्रमाणें बेळगांवच्या हद्दीं-

तील परसगड तालुक्याचा रिव्हिजन रिपोर्ट २०।३।८० रोजीं प्रसिद्ध झाला आहे. त्यांत सर्व्हेचे सुपरिन्टेन्डेन्ट मि. फ्लेचर यांनीं नमूद केलें आहे का शेतकीच्या कामीं येणाऱ्या गुरांची संख्या शेंकडा ३२ नीं कमी झाली आहे व शेतकीच्या कामीं न येणारीं म्हणजे गाई, म्हशी, व वांसरें इत्यादिकांची संख्या ६४–१२ नीं कमी झाली आहे. अशीच हकीकत गोकाक तालुक्याविषयीं मि. फ्लेचर यांनीं दिली आहे. अशी हानि व्हावयाची कारणें अर्जदारांच्या समजुतीप्रमाणें अनेक आहेत. १–१८७५।७६; ७६।७७, व ७७।७८ सालांतील दुष्काळ. २ गुरचाराचा तुटवडा. शेतकरी लोकांची संख्या वाढल्यानें गायरानांत शेतकरी पेरण्या करीत आहेत. ३ जंगलामुळें गुरचारास धोका आला आहे. ४ आनियमित चारा मिळाल्यामुळें म्हणजे उन्हाळ्यांत उपासमर व पाऊस पडला कीं फाजिल खाणें यांनीं गुरांस रोग होऊन त्यांची हानि होत आहे. ५ शेवटीं गोमांसभक्षक लोकांच्या वाढत्या संख्येस अन्नाचा पुरवठा करण्याकरितां वर्षास वाढत्या प्रमाणावर होणाऱ्या गायांच्या व बैलांच्या वधानें हानि होत आहे.

नंबर एक व दोन यांत नमूद केलेल्या कारणांकडे १८८३ मध्यें हिंदुस्थान सरकारचें लक्ष गेलें होतें हें अर्जदारांस विदित आहे. १।३।१८८३ चा १६ अ नंबराचा जळवणाविषयींच्या व खाद्य संग्रहाविषयींच्या ठरावांतील तिसऱ्या वाक्य खंडांत असें म्हटलें आहे कीं, दुष्काळ असूनही ज्या भागांत गुरांची जमीन मुबलक होती त्याभागांत जनावरांचा बचाव होऊन पुढें होणारा तोटाही बचला. गांवच्या लोकांचा गखलेल्या रानांतून गुरें मोफत चारण्याचा हक्क हा एक नेक नामदार लॉर्ड रे यांनीं नेमलेल्या फॉरेस्ट कमीशन पुढें विषय होता. कमीशननें सरकारांस शिफारशी बऱ्याच केल्या आहेत. त्यावर सरकारचा ठराव काय निघत आहे, इकडे अर्जदारांचें लक्ष लागून राहिलें आहे. रोगांपासून गुरांचें रक्षण करण्याकडे सरकार चांगलेंच लक्ष देत आहे अशी अर्जदारांची खात्री आहे. बाई साकरबाई दिनशा पेटिट यांच्या उदार देणगीनें रुग्ण पशुसुश्रूषेकरितां चालविलेलें रुग्णालय आहे त्याला लागून

व्हेटरनरी कॉलेजाची स्थापना झालेली आहे. त्यासंबंधी अर्जदारांची विनंति एवढीच आहे कीं गुरांस होणाऱ्या मुख्य मुख्य रोगांवर योग्य व स्वस्त उपाय काढून त्याची माहिती देशी भाषांतून हस्तपत्रकें काढून प्रांतोप्रांतीं वांटावीं. अर्जदार आतां गुरांच्या ऱ्हासाच्या पांचव्या कारणाकडे वळून अर्जाच्या प्रारंभीं केलेल्या विधानांची पुनरुक्ति करून पुन्हा स्पष्टपणें कळवीत आहेत कीं, त्यांच्या मनांत गोमांसाचा पुरवठा अगदीं बंद करावयाचा नाहीं; बहुजन समाजाच्या जुन्या धार्मिक समजुती दुखविल्याशिवाय शेतकीच्या कामाला लागणाऱ्या व दूधदुभत्याला लागणाऱ्या जनावरांवर घाला घातल्याशिवाय जरूर तो गोमांसाचा पुरवठा कसा करतां येईल याला उपाय योजण्याकडे सरकारनें लक्ष द्यावें. खाण्याकरितां मारलेल्या शंभर गुरांत ८० गाई व २० बैल असतात. हें गाईचें प्रमाण भीति उत्पन्न करतें म्हणून अर्जदार हे पुढील महत्त्वाच्या गोष्टी ( ज्या सरकारच्या ध्यानांत आहेतच असें मानण्याला कारणें आहेत त्या ) सरकारच्या नजरेस आणीत आहेत.

१ हिंदुस्थानांत बैल व रेडे यांस शेतकीच्या कामीं उपयोग करण्याकरितां पोषीत असतात; व गाई व म्हशी यांस दूधदुभत्याकरितां पोषीत असतात. दोहोंचाही खताच्या कामीं उपयोग होतोच. परंतु युरोपांत जशी गुरांची निरोगी उत्पत्ति करून त्यांची वाढ करणाऱ्या संस्था लोकांनीं आपल्या खर्चानें निर्माण केल्या आहेत, तशा हिंदुस्थानांत नाहींत.

२ एक गाय किंवा म्हैस मारली कीं तेवढी शेतकीच्या कामीं येणाऱ्या बैलांच्या व रेड्यांच्या संख्येला व दुभत्याच्या कामीं येणाऱ्या गाईच्या व म्हशीच्या संख्येला हानि येत आहे.

३ याचा प्रत्यक्ष परिणाम असा झाला आहे कीं दूध, लोणी व तूप यांचा पुरवठा मनुष्यांच्या वाढत्या वाढीला अवश्य तेवढा होत नाहीं. मुंबईस $\frac{1}{2}$ पासून १ आण्यापर्यंत दुधाच्या शेरास पैसे पडत होते ते आतां २ पासून ४ आण्यापर्यंत पडूं लागले आहेत. गेल्या पस्तीस वर्षांत लोण्याची किंमत १५० पटीनें

वाढली आहे. परंतु एवढी वाढलेली किंमत देऊनही पाहिजे तेवढें लोणी मिळत नाहीं. अशा रीतीनें पुरवठा नियमित झाल्यामुळें व त्याची किंमत वाढल्यामुळें विक्रीच्या दुधांत व तुपांत पाणी व चरबी अनुक्रमें मिश्र होत असल्याची कुरकूर इतकी वाढत गेली आहे कीं बंग देशांत तुपांत अशुद्ध चरबीचें मिश्रण बंद करण्याकरितां कायदा करावा लागला त्याप्रमाणें मुंबई सरकारापुढें ही असाच कायदा करण्याचें घाटत आहे.

५ दुभत्या जनावरांचा सरसगट असा संहार जर होता नाहीं तर दुभत्याचे जिन्नस मुख्यतः लोणी, तूप, गोठवलेलें दूध इ. पदार्थ बाहेरदेशीं पाठवितां आले असते.

६ पावसाळ्यांत शेतकीच्या कामीं येणाऱ्या व उन्हाळ्यांत ओढकामास लागणाऱ्या बैलांची किंमत वाढत जात आहे व त्यांच्या शक्तीचा ऱ्हास झालेला दिसून येत आहे. मुख्यतः दक्षिणेंतील व इतर ठिकाणच्या कर्जबाजारी शेतकऱ्यांच्या शेतकीच्या कामांत या गोष्टी म्हणजे मोठीं विघ्नेंच उत्पन्न झालीं आहेत.

७ शेणाचा उपयोग पावसाळीं खताकडे व उन्हाळीं जळवणाकडे होत असे; त्याचाही तोटा फार भासत आहे. शेणाच्या खतानें जसें उत्पन्न वाढतें तसें दुसरें कोणत्याही खतानें वाढत नाहीं. मि. ओझेनी शेतकी खात्याचे डिरे-क्टर यांच्या मतें ( फारेस्ट कमीशनच्या रिपोर्टाचे परिशिष्ट पृष्ठें २१९।४१ पहा. ) भातशेतांच्या बिघाभर जमिनीस ४ रेड्यांचे शेण खताकरतां लागतें या मानानें पाहिलें म्हणजे ठाणें जिल्ह्यांतील $\frac{1}{6}$ शेतीस पुरेल इतकाच शेणाचा पुरवठा खताच्या कामीं होऊं शकतो.

८ कसाई खान्यांत मारण्याकरितां जाणाऱ्या गुरांची संख्या नियमित केल्यानें गोमांस खाणाऱ्या मनुष्यांच्या वाढत्या संख्येला ( म्हणजे सोल्जरादि लोकांची ) विशेष गैरसोय होईल अथवा त्यांच्या ऐषआरामांत कमतरता पडेल असें अर्जदारांस वाटत नाहीं. त्याचप्रमाणें विदेशीं गुरें जीं पाठविलीं जातात त्यांचीही संख्या नियमित केली पाहिजे.

९ अर्जदार सरकारच्या परवानगीनें असें पुढें प्रतिपादन करीत आहेत कीं कोणते पक्षी मारावे व कोणते मारूं नये याकरतां कायदा करण्याचें सरकारास अवश्य वाटलें म्हणून पाक्षिसंरक्षणाकरतां सरकारनें कायदा केला आहे. म्हणूनच गाई व म्हशी हीं जनावरें नियमित प्रमाणानें मारावीं असें ठरविण्यांत जर महाराणी साहेबांच्या कोट्यावधि प्रजेचें हित होत आहे, त्यांस सुख प्राप्त होत आहे व समाधान वाटत आहे तर हें कारण तसें करण्यास ह्मणजे गाईह्मशींच्या ( विशेषतः गरोदर असलेल्यांचा ) वध नियमित प्रमाणानें करावा असा कायदा करण्यास अधिक सबळ कारण आहे असें तुमच्या अर्जदारांस खात्रीनें वाटत आहे.

१० अर्जदारांनीं सुचाविलेले हे उपाय अंमलांत आणल्यास दुभत्याचे पदार्थ शुद्ध व पुष्कळपणें मिळूं लागतील. झाड तोडून टाकावयाचें व त्याचीं फळें मुळें वांटून खावयाचीं व पुन्हां त्यापासून सतत फळें व मुळें मिळण्याची आशा करावयाची हें सृष्टिक्रमाच्या विरुद्ध आहे.

११ अर्जदार नम्रपणें सरकारच्या नजरेस आणखी असें आणून देत आहेत कीं गाईस हिंदू लोक पवित्र मानीत आले आहेत व तसा तिचा मान ठवीत आहेत.

कसायांच्या हातांत गाई जाऊं नयेत व वृद्ध व अशक्त झाल्यामुळें यजमानास नकोशा झालेल्या गुरांचें संरक्षण व्हावें ह्मणून हिंदू व जैन लोकांनीं पांजरपोळ स्थापन करून मोठ्या खर्चानें चालविले आहेत. गोवधाला हिंदुधर्मशास्त्रांत सक्त शासन सांगितलें आहे; व रजपूत संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत गोवधास कायद्यानें निर्बंध ठेविला आहे. भावनगर संस्थानांत गोवध करणाऱ्यास तीन वर्षें सक्त मजुरी व १००० रु. दंड करणारा कायदा आहे. जुनागड व काठेवाड येथील महंमदी संस्थानांतही गोवधास सक्त निर्बंध आहे. असा निर्बंध काश्मीर, जयपूर, गोण्डल, मोर्वी, राजकोट, लिंबडी व इतर काठेवाडांतील संस्थानांतही

आहे जशी महाराणी साहेबांस त्यांच्या ख्रिश्चन प्रजेकडून धर्मसंरक्षक ही पद्वी लावण्यांत येते तशी संस्थानांतील रजपूत राजांस गोब्राह्मणप्रतिपालक ही पद्वी उपजतच मिळत असते. कच्छच्या रावांशीं ब्रिटिश सरकारनें १८१५ त तह केला तेव्हां १६ व्या कलमांत जें वचन दिलें आहे त्यावरून असें उघड दिसतें कीं ब्रिटिश सरकारास संस्थानिकांच्या या धर्मसमजुती दुखवूं नये हें तत्त्व मान्य आहे. १८१९ मध्यें झालेल्या तहांत गाई व बैल यांबरोबर मोरेंही अवध्य ठरविलीं आहेत. मुंबईच्या रोजनिश्या प्रसिद्ध झाल्या आहेत, त्यांवरून ( भाग २ पृष्ट ३१ पहा ) असें दिसतें कीं नामदार इस्ट इंडिया कंपनी सुद्धां आपल्या राज्यांत गोवध बंद करण्याविषयीं हुकूम सोडीत असे.

किल्ले मुंबई शुक्रवार ता. ३० सप्तंबर १७२०:—नुकत्याच पडलेल्या दुर्भिक्षामुळें आरमारांतील लोकांस गोमासांचा पुरवठा करण्याकरितां जन्टूं जवळून गाई नेणें भाग पडलें. तेविषयीं कंपनीच्या अध्यक्षांकडे तक्रारी आल्या व आम्हीं गुरांचा वध होऊं देण्यापेक्षां दर गुरामागें ४।४ रुपये देण्यास सिद्ध आहों असें निवेदन करण्यांत आलें; व शिद्धीच्या मुलखांतून पुरवठा होईल अशी खात्री करण्यांत आली. त्यावरून कंपनीला वार्षिक उत्पन्न करून देणारी एक बाब निर्माण झाली, असें समजून असा जाहीर हुकूम करण्यांत येत आहे कीं जन्टूंच्या मालकीची कोणतीही गाय मारण्यांत येऊं नये व त्याबद्दल मालकानें दर गुरामागें चार रुपये कलेक्टर साहेबांकडे भरावे. हिंदूंच्या धर्मसमजुतीस मान देण्याकरितां कांहीं सहनशीलपणा दाखवून लोकांत स्नेहभाव संपादन करण्याकरितां गोवधाचा निर्बंध करण्याची वेळ ब्रिटिश अम्मलाच्या पहिल्या अमदानींत येत असे. अर्थात ब्रिटिश मुत्सद्यांनीं धर्मसमजुतींस मान देण्याची जी उदार नीति अवलंबिली होती तिचाच भाग वरील हुकूम हा होय व त्याच नीतिचें तेंच तत्त्व १८५८ च्या जाहीरनाम्यांतही ग्रथित केलेलें आहे.

अर्जदार विज्ञप्ति करणारे.

हा अर्ज उक्तीनें स्पष्ट, प्रमाणानीं शुद्ध, व भाषेनें प्रौढ असा कोणीतरी अभ्यस्त लेखकानें आपली जबाबदारी ओळखून लिहिला आहे, हें उघड आहे.

गाईची व दूध दुभत्याची अनास्था होत आहे या विषयीं रावसाहेबांच्या मनास हुरहुर लागून राहिली होती असें त्यांनीं शिशिरबाबूंस लिहिलेल्या एका इंग्रजी पत्रावरून दिसतें. त्याचें भाषांतर पुढें दिलें आहे. " या कलकत्ता नगरींत, आणखी दुभत्यावर इंग्रज मनुष्याचें व्याख्यान ! व्याख्याता म्हणे बुद्धिवान होता ! त्याच्या व्याख्यानांतील मुद्यांचा नीट समाचार घेण्याचें सामर्थ्य कोणाही हिंदी गृहस्थास नाहीं काय ? परंतु तितकेंही करणें म्हणजे वेळाचा अपव्यय, अगदीं निव्वळ अपव्यय करणें होय ! ताक, दहीं इ. दुभत्याचे प्रकारांत इतकीं इतकीं मूलद्रव्यें असतात इ. गोष्टींवर यांनीं येऊन या भरतखण्डांत, या गोपाळ कृष्णाच्या भूमींत, चर्चा करावी ! ती आम्हीं ऐकावी ! ही उठाठेव आम्हांस कशाला पाहिजे ? एकीकडे पोळी व भाकरी यावर व्याख्यानें द्या, शेतकीवर चर्चा करा व गाई व बैल यांचा संहार लक्षांवारी चालूं द्या ! "

" पत्र फार लांबलें त्याची माफी असावी. "

फेब्रुआरी १८८६

मोठाल्या गाईंचे जीव वांचविण्यास जितकें महत्त्व रावसाहेब देत तितकेंच वांसरांचे जीव वांचविण्यास देत असत.

" येथील गौळवाड्याकडे तुमचें लक्ष गेलें आहे कीं नाहीं तें मला माहित नाहीं. मला वाटतें त्यांत सुधारणा करण्यास पुष्कळ जागा आहे. गाईच्या पारड्यांस व म्हशीच्या रेडकांस पुढें ठेविलेल्या मृत्यूपासून जरी नाहीं तरी पुष्कळ हालांतून सोडवितां येईल. सकाळच्या प्रहरीं फिरावयास जातांना वाटेंत एक गौळवाडा दिसला व आंतील देखावा पाहून मन भयचकित झालें; परंतु असले प्रकार बहुशः नित्य मुंबईत दर ठिकाणीं अगणित घडून येत असले पाहिजेत. असल्या घरच्या गोष्टींकडे आम्हीं लक्ष द्यावयास नको काय ? धर्माचा उदय येथून सुगम होईल. ( शेट दामोदरदास यांस ३।२।८८ चें

इंग्रेजी पत्र ) वामनराव जोशी यांच्या पत्रांत या गौळवाड्यांतील अनर्थाचें वर्णन करून पुढें रावसाहेबांनीं लिहिलें कीं " जर गोरक्षिणी सभा कांहीं व्यवस्था करील तर अशीं वांसरें पोसण्याकरितां लोक घेतील किंवा नाहीं ? त्यांत शर्थ हीच कीं वाईट लोकांस तीं विकूं नये. किती उमरीचीं बाळगतां येतील तें आतांच सभेच्या चिटणीसांस लिहीत आहें ( ३।२।८८ )

चेम्बूर येथें असलेल्या गोरक्षिणी सभेच्या गोशाळेंतून मिळतील तेवढीं गुरें दापोली व चिपळूण तालुक्यांतील आपल्या स्नेह्यांस पाळण्याकरितां रावसाहेब मिळवून देत असत. गोरक्षणार्थ पुढील प्रयत्न रावसाहेबांच्या आजारामुळें थांबले.

---

## प्रकरण ६२ वें.

# रावसाहेब व वैद्यविद्या.

। मस्ते दुःसहवेदनाकवलिते मग्ने स्वरेऽन्तर्गलम् ।
॥ तप्तायां ज्वरपावकेनच तनौ तान्ते हृषीकव्रजे ॥
। दूने बन्धुजने कृतप्रलपने धैर्यं विधातुं पुनः ।
॥ कः शक्तः कलितामयप्रशमनोवैद्यात्परोविद्यते ॥ १ ॥

देशबांधवांचे प्राण वांचविण्याकरतां रणांत लढणाऱ्या शिपायाचा धंदा सर्व धंद्यांत श्रेष्ठ दर्जाचा होय. केलेल्या कामागिरीचें बक्षीस त्यास जीवन्तपणीं समयीं मिळतें. समयीं रणांत प्राणाची आहुति द्यावी लागत असल्यामुळें तसें मिळणें शक्य नसतें.

अशा शिपायाच्या धंद्याच्या खालोखाल श्रेष्ठ दर्जाचा धंदा म्हटला म्हणजे वैद्याचा होय. रोगरूपी शत्रूशीं वैद्य लढत असतो. मस्तकाला असह्य वेदनांची बाधा झाली असतां, स्वर खोल गेला असतां, ज्वराच्या आगीनें स्पर्श करवत

नाहीं इतकें अंग तप्त झालें असतां किंवा सर्व इंद्रियगण दुर्बल झाला असतां, आप्तेष्ट निराश होत्साते तोंड झांकून रोदन करूं लागले असतां, सर्वांस धीर देऊन झालेल्या रोगाचें प्रशमन करण्यास वैद्याशिवाय कोणी समर्थ नाहीं असा अनुभव येतो. तिकडे लक्ष दिलें म्हणजे वैद्य व वैद्यविद्या इतकी श्रेष्ठ कां गणिली जाते तें समजेल.

रावसाहेबांना वैद्यकीचें ज्ञान चांगलें प्राप्त झालें होतें. त्याचें एक कारण असें होतें कीं, रावसाहेबांच्या वडिलांस वैद्यकाचा नाद असे.

त्या विषयावरील जुन्या संस्कृत ग्रन्थांचा संग्रह त्यांनीं केला होता. मात्रा व भस्में ते घरीं तयार करवीत असत. रावसाहेबांचे बन्धू रावजी यांसही तोच नाद होता. सोन्याचा वर्ख, मोतीं, गंधक, सोरा, कवड्या, हरताळ, बचनाग, मनशीळ, अभ्रक, मोरचूत, टांकणखार व सुवर्ण मुखी इ. पदार्थ रावसाहेबांकडून ते नेहमीं मागवून नेत.

रावसाहेबांच्या मातोश्रींस कांहीं बाळरोगांवर व स्त्रीरोगांवर देण्यांत येणाऱ्या वनस्पतींचें चांगलें ज्ञान होतें.

जन्मभूमींतील उत्तम हवा व पाणी सोडून प्रथम रत्नागिरि व तेथून मुंबई येथें लहान वयांतच विद्याभ्यासाचे कष्ट पडल्यामुळें रावसाहेबांच्या शरीरास ज्वरादि पीडा प्रथम झाली होती. कच्छ भूज येथें गेल्यावर प्रकृतींत सुधारणा झाली नाहीं. ठाणें जिल्ह्यांत फिरत्या नोकरीवर असतां संग्रहणीचा विकार जडला होता. या व्याधीवर उपाय करीत असतां डाक्तर व वैद्य यांच्या सहवासानें साधारण रोगांवरील उपायांचें किंचित् ज्ञान त्यांस झालें असावें. तरी मागेल त्यास औषध देण्याच्या अथवा थोड्यानें पुरा गुण न आल्यास पुढें बदल करून औषध देण्याच्या भानगडींत ते पडत नसत.

" येसू कृष्णा शिपाई, यास ताप आला होता. पहावयास गेलों. त्यास एरंडेल व काढा करून दिला. तो पुरा बरा झाला नाहीं असें दिसतें. वैद्याकडून आणून त्यास औषध दिलें. " ( १२।११।५८ रो. उ. )

" एक व्याधिग्रस्त आला होता. त्यास माझ्यानें औषध देववलें नाहीं. कारण

त्यास रोग काय आहे तें समजेना. सबब त्यांस चार आणे धर्मादाय दिले हा मनुष्य मुसलमान असावा. ” ( २९।८।५८ चा रो. उ. )

“ आज सकाळीं कारकून नारायण हा औषध मागावयास आला. परंतु त्यानें सांगितलेल्या रोगाचें स्वरूप समजेना. यामुळें त्यास वैद्याकडे जावयास सांगितलें. ” ( १७।१२।५८ चा रो. उ. )

परंतु पुढें यांस अधिक औषधिज्ञान प्राप्त व्हावें म्हणूनच कीं काय यांच्या स्त्रीचें शरीर म्हणजे बहुविध व्याधींचें आश्रयस्थान परमेश्वरानें बनविलें. त्यामुळें डॉ० भाऊ व त्यांचे बन्धु नारायण दाजी, डाक्तर आत्माराम पांडुरंग, डा० अनंत चंद्रोबा, डा० भिकाजी अमृत चोभे; अश्विनीकुमार बापू साहेब मेंहेंदळे, वैद्य जेठाशंकर, वैद्य रामभाऊ गोरे सातारकर व वैद्य तर्टे शास्त्री नाशिककर, यांच्या सारख्या अनेक वैद्यविद्याकुशलांशीं सहवास घडून आल्यामुळें रावसाहेबांस वैद्यकीचें ज्ञान उत्तम झालें, त्या योगानें त्यांची स्वतांची प्रकृति फार सदृढ झाली व इतरांचें व्याधिहरण करण्यांत ते आपल्या ज्ञानाचा उपयोग करूं लागले. चाकरनोकरांस साध्या रोगांवर स्वतां औषधोपचार करीत. रसायनें, तैलें, मात्रा व भस्में हीं घरीं उत्तम वैद्यांकडून शास्त्रोक्त रीतीनें करवून घेत. त्या करितां विलें पालर्याहून रानशेणींचीं ओझींच्या ओझीं आणवीत असत. गांवढ्या लोकांकडून कांहीं माहिती मिळेल तर पहात असत.

“ घोड बंदरच्या एका ठाकोरास पीनसावर औषध ठाऊक आहे. परंतु तो पैसा देऊन अथवा धाक दाखवून ही कोणास त्याचें नांव सांगत नाहीं. समजूत घालून तें मिळेल तर माझ्या करतां पहावें. ”

“ तुम्हीं रानवट प्रदेशांत रहात असल्यामुळें रानटीजातीचे लोक जीं कांहीं औषधें वापरीत असतात त्यांचा शोध करीत जा. ” ( डा. स्वरूपलाल यांस पत्र )

१८५८ पासून जीं औषधें विविध रोगांवर आपल्या स्नेह्यांस त्यांनीं लिहून कळविलीं अथवा पाठवून दिलीं त्या सर्वांची यादी केल्यास एक लहानसा ‘ घरच्या वैद्यका ’ सारखा ग्रंथ होईल. त्यांतील कांहीं निवडक दिलीं आहेत.

रावसाहेबांच्या संग्रहीं कांहीं फारच चमत्कारिक व दुर्मिळ वस्तू असत.

" १४ व १८ तारखांचीं पत्रें वेळेवर पोंचलीं. आज पार्सल होत नाहीं उद्यां करवतों. त्यांत ५ तोळे जुनें तूप * पाठवीत आहे. तें शिवाजी महाराजांच्या वेळचें आहे. २०० वर्षें झालीं. एका जुन्या किल्ल्यांत सांठवून ठेवलेलें होतें. माझ्या पत्नीकरतां मीं तें दीर्घ प्रयासांनीं मिळविलें होतें. "

"रान डुकराची चरबीही लवकर मिळवून पाठवितों. "

( बाबू राजेन्द्रलाल मित्र यांस २१।२।८८ चें पत्र )

## नारूवर औषध.

निवडुंगाच्या जातीची स्थुवर म्हणून एक वनस्पति आहे ती उगाळून बाह्योपचार म्हणून वर लेप करावा. पोटांत मासाभार नवसागराची पूड दह्यांत घ्यावी व फक्त दहीं भाताचें पथ्य करावें. याप्रमाणें तीन दिवस.

## संजीवनी गोळया.

या गोळया त्यांच्या नांवाप्रमाणें गुणकारक आहेत असा रावसाहेबांचा भरंवसा होता. त्यांचा पाठ शार्ङ्गधरांत दिलेला आहे. त्यांचा मुख्य उपयोग कालरा, आमांश, अतिसार इत्यादिकांवर चांगला होतो. यारोगांबरोबर ज्वरांश असला तरीही या गोळयांत बचनाग असल्या मुळें त्या गुणावह होतात. यांतील दुसरें मुख्य द्रव्य जो बिब्बा त्याचा कोळसा करून पोटांत तुपाबरोबर शक्ती-प्रमाणें दिल्यास वरील रोगांवर गूण देतो. प्रवासास कोणी घरचा मनुष्य निघाल्यास " संजीवनी " बरोबर घेतल्या आहेत कीं नाहीं याची चौकशी रावसाहेब आधीं करीत.

शहाराणपूर येथें एक रेव्हरेन्ड प्रिन्स म्हणून मिशनरी रहात असत. त्यांना या गोळयांचा अनुभव चांगला आल्यावरून त्यांस यांची कृति कशी काय आहे ती रावसाहेबांनीं सांगितली होती.

गुरांस ताप आला असतां दहा गोळया सुंठ वाटून तींत देण्यास सांगत.

---

* जुनें तूप म्हणजे उत्तम मलम आहे. कोणतीही जखम तें रोज एक वेळ लावलें असत। आपोआप सुखानें भरून येते.

## दमा.

काळ्या धोत्र्याची साल रावसाहेबांनीं आपले मित्र जेकब साहेब यांस ११।७।७५ रोजीं पाठविली होती. तिचे गूण रावसाहेबांनीं पत्रीं असे वर्णन केले होते:—" ही दम्यावर रामबाण आहे. लहान नळींत घालून एका वेळेस चवलीभार जर ओढीत जाल, तर आपली व्याधि अजिबात नाहींशी होईल. निदान बराचसा आराम आपल्याला वाटेल. या वनस्पतीनें पुष्कळांना फार चमत्कारिक रीतीनें गूण आलेले आहेत. पांढऱ्या किंवा कोणत्याही इतर जातीपेक्षां काळा धोत्रा उत्तम व त्याच्या पाठीची साल फार प्रशस्त. तिनें शुद्धि जात नाहीं किंवा इंद्रियांस जाड्य येत नाहीं. नेहमींचे जे चिरूट धोत्र्याचे म्हणून मिळतात ते स्वापकारक असतात व त्यापलीकडे त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं; पण ही साल रोगाची जागा गांठून गूण देते. सत्तरांवर दहा वर्षें ज्याचीं उलटलीं आहेत अशा वृद्ध मनुष्यास चाळीस वर्षांचा व्याधि जुना असतां देऊन पाहिली आहे. "

साधारण परिचियांतील काहीं औषधांचा रावसाहेब विशेष प्रकारानें उपयोग करीत असत.

## हेमगर्भ.

" हेमगर्भ प्रायः शेवटीं देतात. परंतु मला अनुभव आला आहे त्याप्रमाणें ही मात्रा वातहरण करणारी फुप्फुस आणि यकृत् या दोहोंना शक्ति आणणारी आहे. " ( २६।८।८५ चें तर्टे शास्त्री यांस पत्र )

## गाईचें तूप.

गाईचें तूप जीर्णज्वरावर सांगत असत.

## लाइम वाटर.

" १० तोळे दुधांत अर्ध तोळा लाइमवाटर घ्यावें. × मौक्तिकापासून जें कार्य होतें तें यानें होतें.

× एक गॅलन डिस्टिल्ड वाटर घेऊन त्यांत २ औंस कळीचा चुना टाकून, निवळल्यावर गाळून ठेवलेलें.

## हलकें भात.

साठ्ये तांदूळ साठ दिवसांत पिकतात ते पचनाला हलके. सोनफळी म्हणून लांब तांदूळ मिळतात ४।५ सडणांनीं हलके होतात.

## बेलिया.

" नेहमीं वापरण्यास पसंत. सुवासिक व थंड. "

## पौष्टिक अन्न.

सृष्टिक्रमाप्रमाणें अन्नाची रासायनिक क्रिया जी पोटांमध्यें व्हावयाची ती अगोदरच रसायन शाळेंत ज्यांची झालेली आहे अशीं हल्लीं पुष्कळ पौष्टिक अन्नें मिळतात. पण **रावसाहेबांचें** पौष्टिक अन्न निराळेंच असे तें:—

" साजक तूपभात व दूधभात व विश्रांति हें माझें अनुभवशीर औषध आहे. त्याच्या एवढें दुसरें पौष्टिक कांहीं नाहीं. "

## मधुमेह.

" अमरकंदाचें पीठ व गुळवेलसत्व गाईचे तुपांत लाल होईतों परतून घेणें. **गणेशपंत वैद्य** या औषधानें व्याधिमुक्त झाले. "

## कृमिविकार.

प्रथम सॅन्टोनाईन व मागाहून एरंडेल हे उपचार कृमिविकारावर प्रसिद्धच आहेत तथापि **रावसाहेब** एक काढा सांगत तो असाः—वावडिंगें, इंद्रजव व किर्मणी ओंवा यांचा काढा करून आंत कापराचा खडा टाकून ठेवावा. बोंडलेंभर एक वेळ द्यावयाचा. हा काढा फार गुणावह व सौम्य आहे.

## आंवळेल तेल.

" आंवळ्याचा पावशेर रस शेरभर खोबरेल तेलांत घालून तो रस मंदाग्नीवर आटवावा. सज्ज झालेल्या तेलांत एका बोंडाचा कापूस विंचरून बुडवावा व मस्तकावर ठेवून वर एरंडीचें पान बसवावें म्हणजे निद्रेला आमंत्रण दिल्यासारखें होऊन त्याचा मान होतो व नित्य झोंप आल्यानें प्रकृति सुधा-

रणें सुलभ जातें. मला तर या उपायानें निःस्वप्न निद्रा येते." (२२।२।१८८५ चें. डा. राजेंद्रलाल मित्र यांस पत्र. )

## लक्ष्मीविलास तेल ( कस्तुरीमिश्र )

हें तेल अर्धांगवायूवर रावसाहेब देत असत. वे॥ पांडुरंगोपाध्याय गुर्जर शास्त्री यांस व. डा. राजेंद्रलाल मित्र यांस गूण आला होता. रावसाहेबांच्या पत्नीच्या वातरोगावर थोडासा उपयोग याच तेलाचा होत असे.

## लक्ष्मीनारायण.

बालग्रह अथवा आंकडी या रोगावर लक्ष्मीनारायण म्हणून एक रस रावसाहेबांच्या संग्रहीं असे. हें औषध काळकादेवीच्या जवळ त्यावेळीं रहात असलेले प्रसिद्ध जामनगरचे वैद्य जेठाशंकर यांनीं शोधून काढलेला आहे. आंकडीची पीडा रावसाहेबांच्या चिरंजीवांस लहानपणीं झाली होती. डाक्तरी उपाय सर्व थकल्यावर या रसानें गुण त्वरित व कायमचा आला. वैद्यबुवांजवळून रावसाहेबांनीं बरेंचसें वरील औषध विकत घेऊन ठेवलें होतें व तें गरजूंस धर्मार्थ देत असत. हें औषध महिनेच्या महिने ध्यावें लागत नसे. गुण यावयाचा असल्यास तीन पुड्यांनींच येत असे. "लक्ष्मीनारायण याच्या तीन पुड्या करून पाठविल्या आहेत. जर ज्वर येत असेल तर नागाचे गोळीबरोबर द्याव्या. मलावरोध असेल तर हरडा उगाळून घ्यावा. विकारांची पूर्व चिन्हें होतांच किंवा वैद्याच्या मतें जी योग्य वेळ दिसेल तेव्हां द्याव्या." ( विनायक पंत दादा केळकर यांस पत्र )

या औषधाचे मूळशोधक जेठाशंकर हे हें औषध अतिविष थोडें उगाळून त्याबरोबर देत असत. रावसाहेबांनीं या औषधाची शिफारस त्यांच्या पार्शी मित्रांस केलेली आढळते.

असाच विकार स्त्रियांस मोठेपणीं होतो. त्यास अज्ञलोक पिशाच्चबाधा म्हणतात. वैद्यलोक उन्माद वायु म्हणतात व डाक्तरलोक हिस्टेरिया म्हणतात.

त्यावर रावसाहेबांनीं याच पुड्या देऊन पाहिल्या होत्या व त्याचा गुण आल्याचा उल्लेख आढळतो. मात्र उपचार बरेच दिवस चालवावा लागला.

रावसाहेबांच्या हिंदी वैद्यकाच्या ज्ञानाचा फायदा कधीं कधीं त्यांच्या इंग्रज मित्रांस होत असे. मि. स्कॉट म्हणून एक त्यांचे परम मित्र होते. त्यांस रावसाहेब कडुनिंबाचें औषध देत असत.

मत्प्रिय स्कॉटः—

" सोबत निंबाची साल व पाला पाठविलीं आहेत. यांतील एक औंस बारीक कुटून ती पूड सहा औंस पाण्यांत चांगली कढवावी. दीड तोळा काढा दर वेळेस घ्यावा. "

## ज्वर व शोष.

भाताच्या लाह्या बारीक कराव्या आणि एक शेर लाह्यांस सोळा शेर पाणी घालून निम्मे कढवून आटवावें. बाकी गाळून गार करून रोगी मागेल तितकें द्यावें.

## आक्षारिष्ट ( वेहळ्यांचें )

ह औषध हल्लीं कोठें प्रचारांत नाहीं. परंतु याच्या इतकें श्वासकासादींवर गुणावह व निरुपद्रवी असें औषध नाहीं. वेहळयाच्या सालींच्या सोळा पट पाणी घालन अष्टमांश काढा उरेल त्यांत धायटीचीं फुलें, व काढा गोड होई तों मध अथवा जुना गूळ घालून शिशांत भरून तो शिसा बंद करून शंभर दिवस भातांत पुरून ठेवावा. प्रमाण ५ ते २० थेंब पाण्यांत दिवसांतून दोन तीनदां जरूरी प्रमाणें घ्यावें.

## नैमित्तिक ज्वर.

ओली गुळवेल २ तोळे, ५।७ गोडी मिरें, ३ मासे धने व एक सुंठीचें कुडें अशीं औषधें चार तोळे पाण्यांत वांटून चोंथा टाकून पिणें. सौम्य व गुणावह आहे.

प्रवाळ, माक्षिक, वसंत, सूतशेखर, अभ्रक इत्यादि शास्त्रोक्त औषधें संग्रहीं असत. लांब लांबचे स्नेही रावसाहेबांचा सल्ला घेत व उपचार सांगून रावसाहेब औषधेंही आस्थापूर्वक फुकट पाठवून देत.

" जें अस्वास्थ्य देवजीनाथ शास्त्री यांच्या घरीं तें आम्हां सर्वांच्या × × × आंवळयांच्या रसांत अभ्रक भस्म सहस्र पुठी घ्यावा. शक्तिकर होईल. स्वतांकरतां अभ्रक प्रयासानें करविला होता त्यापैकीं १॥ मासा पाठविला आहे. "

## शेवटलें औषध.

काळजी सोडून देवावर भरंवसा ठेवावा हें एक औषध आहे. ( विनायकपंत दादा फडके वेंगुर्लें यांस पत्र )

पुढील पत्र आर्यवैद्यकावरील शेवटपर्यंत असलेली रावसाहेबांची श्रद्धा दाखवितें.

मत्प्रिय राजेंद्रलाल,

तुमच्या रोगाचें निदान प्रसिद्ध होतांच मी माझ्या कलकत्तेकर मित्रांस पत्र लिहून कळविलें कीं काशी येथें एक नामांकित वैद्यराज आहेत ते अर्धांग वायूसारख्या क्लिष्ट रोगांवर योजना करण्यांत कुशल आहेत. त्यांचें नाम कन्नैय्यालाल दिक्षित. अथवा तेथील लोक म्हणतात, त्याप्रमाणें दिच्चित असें आहे. त्यांनीं बऱ्याच लोकांचे दुर्धर व्याधी घालविले आहेत. मागच्याच वर्षीं त्यांनीं माझा विषारी ताप बरा केला. तेवढ्याकरितांच मी तेथें गेलों होतों. ते तेथें आहेत कीं नाहीं याची चौकशी करून तुम्हीं त्यांकडे स्वतंत्र डबा करून जाव अथवा त्यांस तुमचेकडे आणावें. कदाचित् तुमच्या प्रांतांत निष्णात कविराज असतील, तथापि माझा भरंवसा बनारस येथील वैद्यावर अधिक आहे. मला या कामांत जी कामगिरी सांगाल ती मी आनंदानें करीन. तुमच्या प्रकृतीचें मान आम्हांस वारंवार कळविण्याचें तुमच्या चिरंजीवांस सांगन ठेवावें. तुमच्या प्रकृतिस्वास्थ्यास आम्हीं फारच किंमत देतों.

( ३।२।१८८८ )

वर सांगितल्या प्रमाणें रावसाहेबांची श्रद्धा वैद्यांवर होती. परंतु ती अंधश्रद्धा नव्हती. त्याप्रमाणें त्यांच्या अंगच्या कांहीं दोषांकडेही त्यांचें लक्ष जात असे. त्यांच्या शेवटल्या दुखण्यावर जस्त जें कलखापरींत असतें तें मानवत

असे. म्हणून त्यांस उत्तम वसंताची जरूर वाटली. " वसंत हा कलखापरीचा करतात. तिचें पृथक्करण करतां जींत जस्त व कांहीं लोह व चुना अशीं द्रव्यें आढळतात ती कलखापरी वसंत करण्यास फार प्रशस्त. ती आपण कोठून आणतां " म्हणून तर्टेशास्त्री यांजवळ रावसाहेबांनीं चौकशी केली.

कांहीं ठिकाणची कलखापरी रावसाहेबांनीं आणविली. तिचें पृथक्करण करून घेतलें असतां त्यांत शिसें सांपडलें. त्यावेळेस रावसाहेबांनीं एका मित्रास लिहिलें, " अशा रीतीनें पुष्कळ वैद्यांनीं केलेल्या वसंतामध्यें शिसें जात आहे. त्याची शंका सुद्धां कित्येक वैद्यराजांस नसते त्याला काय करावें ? याविषयीं त्यांची समजूत करून देण्यास शस्त्रप्रयोगाचीच जरूर पडेल ! "

आर्यवैद्यकासंबंधें रावसाहेब व वै॥ तर्टेशास्त्री यांचा बराच पत्रव्यवहार झालेला आढळतो. "वाग्भटकृत अष्टांगहृदयांत सूत्रस्थानांत ' सिरा ' संबंधीं २७ वा अध्याय आहे तेथें त्या ग्रंथाचे व्याख्याकार अरुणदत्त यांनीं सिरा शब्दाची व्युत्पत्ति लिहिली आहे ती अशीः—सराति आभिः रक्तम् इति सिराः. याहून प्राचीन ग्रंथ जो सुश्रुत त्याच्या शारीरस्थानांत सिरावर्णन अध्याय सात यांत ' सृग्वाहास्तु रोहिण्याः सिराः ' असें आहे. "

" आमच्या वैद्यशास्त्रांत हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या अनेक प्रकारच्या पदार्थांचें विवेचन आहे. त्यांचा अभ्यास ज्या वैद्यांनीं चांगला केला आहे त्याच वैद्यांनीं आमच्या लोकांच्या आरोग्याचें संरक्षण केलें पाहिजे, हें सयुक्तिक आहे. ईश्वरी संकेत असा दिसून येतो कीं जे प्राणी जेथें उत्पन्न केले त्यांच्या सर्व सोयी तेथेंच उत्पन्न केल्या आहेत. ज्या ईश्वरानें आम्हांस या देशांत उत्पन्न केलें आहे त्यानें याच देशांत रोग निरसनार्थ हजारों औषधी निर्माण केल्या आहेत व त्याच परमेश्वराच्या प्रेरणेनें आत्रेय, धन्वंतरी, हारित, सुश्रुत, पाराशर, भोज, भेड, भृगु, अग्निवेश्य, चरकादि महानु भावऋषींनीं उत्तम वैद्यतंत्रें लिहिलीं. त्यांत पदार्थांचें उत्तम वर्गीकरण, गुणदोषविवेचन, रोगनिदान, साध्या-साध्य विचार, यांचा चांगला विचार केला आहे. या देशांतील लोकांच्या प्रकृती,

दोष, बल व आहार इत्यादिकांचा सूक्ष्म विचार करून निरनिराळ्या रोगांवर निरनिराळ्या औषधांची योजना पथ्यापथ्य विचार करून केलेली आहे. या शास्त्राधारानें सिद्ध केलेल्या औषधप्रयोगापासून भरतखंडांतील लोकांस जसा उपयोग होईल तसा अन्यदेशांतील लोकांच्या प्रकृतीवर प्रयोग करून बसाविलेल्या वैद्यकापासून होणार नाहीं. ”

“ **उचितो यस्य यो देशस्तज्जं तस्यौषधं हितं** असें वृद्ध वाग्भटांत सांगितलें आहे. त्याचा अर्थ जो देश ज्यास जन्मतः मानवला आहे त्याच देशांतील औषधें त्याच्या प्रकृतीस मानवतात. याकरतां आयुर्वेदानुयायी सद्वैद्यांची अवश्यकता आहे. ”

“ पूर्वींचे राजे व श्रीमान लोक यांनीं दिलेल्या सन्मानपूर्वक आश्रयामुळेंच धन्वंतरि उपजला. साहसांक राजापाशीं भट्टार हरिश्चंद्र होते. त्यांनीं चरकतंत्रावर व्याख्या केली. हमीर राजापाशीं प्रमोदनामक वैद्य होते. रुद्रभट हे मीरखान यांच्या पदरीं होते. नृसिंह पंडित काश्मीरच्या राजाजवळ वैद्य होते. हेमाद्रि वैद्य रामराजाचे आश्रित कर्नाटकांत होते. तशांची उत्पत्ति हल्लीं झाली पाहिजे व आमच्या वैद्यकांत हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या अनेक प्रकारच्या पदार्थांचें सविस्तर विवेचन आहे त्याचा अभ्यास ज्या वैद्यांनीं केला आहे त्याच वैद्यांनीं आमच्या लोकांचें आरोग्य रक्षण करावें असें ” तर्टेशास्त्री यांनीं १६।२।१८८६ च्या पत्रीं दिलेलें मत रावसाहेबांस फार पसंत पडलें.

तथापि आंग्लवैद्यकांतही उपयुक्त ज्ञानाचा सांठा आहे व त्याचाही फायदा आमच्या लोकांस झाला पाहिजे असें त्यांचें मत होतें. म्हणून पौर्वात्य व पाश्चिमात्य वैद्यक शास्त्रांचा मिलाफ करून दोन्हीं जातींचें शिक्षण ज्या संस्थेंत मिळेल अशी संस्था काढण्याचा बेत रावसाहेबांनीं मनांत आणिला. त्यांनीं ही गोष्ट थोरले होळकर सरकार तुकोजीराव महाराज यांजवळ १८८७ साली काढली होती. “ मी एक वैद्यशाळा काढावयाचें मनांत आणलें आहे तें महाराजांच्या कानांवर घातलेलेंच आहे. ती शाळा माझ्या प्रांतांतच काढणार आहें.

वैद्यशाळेला जोडून चिकित्सालय व औषधालय काढावयाचें आहे. वनौषधीच्या विस्तीर्ण बागा बनवावयाच्या आहेत. एक कोंकणांत व एक घांटावर. आंग्लवैद्यकाचे शाखेवर डाक्तर देशमुख* हे देखरेख करतील."

"हें काम फार खर्चाचें आहे. हें पत्र महाराजांस दाखवावें व साहाय्य करूं शकतील कीं नाहीं तें विचारावें. त्यांनीं साहाय्य केलें किंवा नाहीं तरी मला हें कार्य करण्यास शिकस्त करून पाहणें आहे." (एका इंदूरकर मित्रास पत्र.)

"प्रत्येक शास्त्राचीं ( त्याच्या त्याच्या प्रकारचीं ) अनुष्ठान, जप, निदिध्यास आणि अनन्यसेवा हीं झालीं पाहिजेत. तशीं कितिकांची होतात ? त्यांतच वैद्यशास्त्र. त्याचा क्षय होत आहे असें दिसतें. परमात्मा काय करील तें खरें. आपण म्हणतां तशी म्युनिसिपालिट्या मदत करतील असें दिसत नाहीं. तथापि मुंबईस आमचे बहुत लोक मदत करावयास तयार आहेत, असें मलाही माहीत आहे. लोकांची सर्व दिनचर्या बदलून शास्त्रानुसार वर्तणूक झाल्याशिवाय आयुष्यवृद्धि होईल असें दिसत नाहीं. ( गणेशपंत वैद्य मु. सातारा यांस ८।२।८५ चें पत्र ).

लोकांकडून मदत मिळेल अशी खात्री वाटल्यावरून रावसाहेबांनीं वैद्यशाळेची योजना हातीं घेतली होती. तींत अध्यापकाचे जागीं तर्टेशास्त्री यांची योजना झाली होती. तर्टेशास्त्री यांनीं शाळेची इमारत कशी असावी त्याची योजना केली होती ती अशी:—प्रशस्त व स्वतंत्र बांधलेली जागा. तींत ४।५ दालनें. पुढें पाठिमागें परसांव व विहिरी. शिक्षण देण्यास वैद्यशास्त्रांत व क्रियेंत निष्णात असे गुरू चार असावे. विद्यार्थी घेणें तें हुशार पाहून घ्यावे. त्यांस संस्कृत शिकवावें. व्याधींची परीक्षा करण्यांस व त्यांवर औषध देण्याकरितां औषधालय सुरू करावें. तेथें औषध देण्याकरितां ४।४ विद्यार्थी आळीपाळीनें ठेवावे. पुढें ते शिक्षित झाल्यावर तेंच काम त्यांस उपयोगी पडावें. कपाटें व काचपात्रें, खल, औषधें घोटण्यास व कुटण्यास दगडी व लोखंडी.

---

* ह्मणजे हल्लीं प्रसिद्ध असलेले मोरेश्वर गोपाळ देशमुख एम्. डी. हे होत.

पाहिल्यानें खर्च लागेल परंतु संस्था लोकोपयुक्त ठरल्यावर सामर्थ्यवान रोग्यांजवळून पैसे घेतां येतील. माधवनिदान, शार्ङ्गधर, भावप्रकाश, वाग्भटकृत अष्टांगहृदय व शुश्रुत व चरक हे ग्रंथ शिकवावे.

रुग्णालय ( इस्पितळ ) यांतील रोग्यांची व्यवस्था. शाखा २

१ आर्यवैद्यकाप्रमाणें रोगचिकित्सा व औषधयोजना.

( अ ) एक वैद्यशास्त्रसंपन्न अनुभविक वैद्य दर तीस रोग्यांच्या व्यवस्थेकरितां नेमणें. अवश्य तर १५ रोग्यांमागें, नेमणें. ( ब ) सुश्रूषेकरितां, विद्यार्थी नोकर व कारकून ठेवणें.

२ आंग्ल वैद्यकाप्रमाणें रोगचिकित्सा व औषध योजना.

( अ ) एक आंग्लवैद्यकांत निष्णात असा पदवीधर नेमणें.

( ब ) सुश्रूषे करितां विद्यार्थी, नोकर व कारकून. नुसतें औषध घेऊन जाणाऱ्या रोग्यांची व्यवस्था वर लिहिलेल्या दोघांनीं म्हणजे वैद्यांनीं व डॉक्तरांनीं करावी. औषधें देण्यास निराळे मिश्रणकार असावे.

## औषधांचा कारखाना.

रुग्णालयांतील व बाहेरील रोग्यांस अथवा लोकांस पुरविण्याकरितां भस्में, मात्रा वगैरे सर्व खात्रीलायक औषधें आर्यपद्धतीप्रमाणें तयार करविण्याकरितां स्थापणें.

## इंग्रजी औषधें.

शक्य तेवढीं आंग्लपद्धतीप्रमाणें औषधें तयार करण्याकरतां रसायनशाळा चालविणें. तीवर चांगल्या रसायन शास्त्रवेत्त्याची नेमणूक करणें.

## औषधींचा संग्रहालय.

यांत सर्व औषधींचा संग्रह नित्योपयोगाकरितां व लोकांस दाखविण्याकरितां करणें.

वैद्यशाळेंतील शिक्षण आर्य व आंग्लपद्धतीनें प्रमाणें देणें. त्याचे विषय शारीरशास्त्र ( Anatomy ) शरीरविज्ञानशास्त्र ( Physiology ), रसायन-

शास्त्र (Chemistry), रोगनिदानशास्त्र ( Pathology ), व शस्त्रक्रिया (Surgery) व आर्य व आंग्लपद्धतीप्रमाणें औषधीज्ञान, ऐच्छिक विषय म्हणून इंग्रजी शिकवणें, मराठी सहा यत्ता पास झालेले विद्यार्थी घेणें.

वरील सर्व व्यवस्था संक्षिप्त टिप्पणींवरून दिली आहे.

शाळा निघण्यापर्यंत वेळ आली असती तर वरील व्यवस्थेंत इष्ट ते फरक झाले असते. परंतु **रावसाहेबांची** प्रकृति याच वर्षापासून थोडी थोडी बिघडूं लागली होती. ती न बिघडती व त्यांस आणखी कांहीं वर्षें परमेश्वरानें आयुष्य दिलें असतें तर ही योजना त्यांनीं आपल्या पारसी, गुजराथी व संस्थानिक मित्रांच्या साहाय्यानें तडीस नेली असती.

डाक्तर( सर ) **भाटवडेकर** हे एक वैद्यकीची नवी शाळा काढणार होते व त्या संस्थेच्या अध्यक्षाचा मान **रावसाहेबांस** देणार होते. अध्यक्ष होण्याचें **रावसाहेबांनीं** नाकारिलें परंतु त्यांस पत्र लिहिलें:-- "ही तुमची कल्पना चांगली आहे, व जर नीट व्यवस्था झाली तर लोकांना जी एक उणीव भासत आहे ती भरून येईल. एकंदर जी तुम्हीं योजना केली आहे तींत फरक करणें इष्ट आहे. परंतु तितकें करण्यास मला वेळ नाहीं." (३०।३।८८. डा. **भाटवडेकर** यांस पत्र.)

जी गोष्ट तडीस गेली नाहीं तिची एवढी सविस्तर हकीकत देण्याचें कारण एवढेंच कीं सदैव देशहिताचें चिंतन करणारे जे **रावसाहेबांसारखे** लोक असतात त्यांची दृष्टि फार दूर पर्यंत जात असते. त्यांस जें आधीं दिसतें तें इतरांस मागूनही दिसत नाहीं किंवा दिसलें तर उशिरां दिसतें. याकरतां **रावसाहेबांची** योजना वर दिली आहे. अनुकूल काल आल्यास कोणीतरी ती पुरी करील.

---

## प्रकरण ६३ वें.

# हिंदुधर्मशास्त्र अथवा मयूख



### याज्ञवल्क्यस्मृति.

**। हनुमानेव विजानाति श्रमं सागरलंघने ।**
**॥ तथैव ग्रंथकर्तैव ग्रन्थकर्तुः परिश्रमम् ॥ १ ॥**

( रामचंद्र, मनुस्मृतीवरील प्रसिद्ध टीकाकार )

रावसाहेबांची कीर्ति, लेखक अथवा ग्रंथकार म्हणून जितका दीर्घकाल टिकेल तितका दीर्घकाल दुसऱ्या कोणत्याही नात्यानें टिकणार नाहीं. त्यांस साधारणतः लेखनाची व विशेषतः ग्रंथलेखनाची आवड होती, हें त्यांच्या ग्रंथलेखनाचा वृत्तान्त १७, २०, ३१, ३४, इत्यादि प्रकरणांत दिला आहे त्यावरून समजेल. हिंदुधर्मशास्त्रावर त्यांचा प्रथमपासून भर होता. त्यांनीं १८६५ सालींच त्यावर एक ग्रंथ लिहिला होता. तेव्हांपासून त्यांची कुशाग्र बुद्धि हिंदुधर्मशास्त्राच्या व्यासंगांत गढून गेलेली होती, व हिंदुधर्मशास्त्रविषयक त्यांचें ज्ञान परिपक्व झाल्यावर १८८० सालीं वर निर्दिष्ट झालेला ग्रंथ त्यांनीं लिहिला तो त्यांच्या बुद्धीच्या आत्यंतिक प्रभावाचें स्मारकच होऊन बसला आहे.

या ग्रंथांत रावसाहेबांनीं नीळकंठ भट्टकृत व्यवहारमयूखाचें व याज्ञवल्क्य स्मृतीचें इंग्रजींत समग्र भाषांतर दिलें आहे व जागोजाग वीरमित्रोदय, मिताक्षरा, व्यवहारमाधव, कमलाकर व जिमूतवाहन यांच्या दायभागाविषयक वचनांचा स्थलनिर्देश केला आहे व एक विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना लिहिली आहे. शेवटीं परिशिष्टें जोडलीं आहेत त्यांत हिंदुधर्मशास्त्रावर टिप्पण्या दिल्या आहेत. त्यांत हिंदुधर्मशास्त्रविषयक कित्येक महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय कसा दिला पाहिजे व हल्लीं चुकीनें कसा होत आहे तें दाखविलें आहे. हें दाखवून

देण्याकरतां देशाचार कसा आहे तो निश्चित करण्याकरतां पुष्कळ माहिती काशीपासून रामेश्वरापर्यंत पत्रें पाठवून त्यांनीं गोळा केली होती.*

आमचे पूर्वज जे आर्य, त्यांच्या विद्या, कला, तत्त्वज्ञान इ. गोष्टींची जेवढी कळकळ युरोपियन पंडितांस आहे तितकी आम्हांस नाहीं. या गोष्टीस कांहीं थोडे अपवाद होऊन गेले त्यांपैकीं रावसाहेब एक होते असें त्यांचा हा ग्रंथ सिद्ध करतो.

इंग्रज सरकारचीं कोडतें स्थापन झाल्याबरोबर इतर सर्व तऱ्हेचा न्याय इंग्रज न्यायाधीशांस स्वतां देतां येत असे. मात्र हिंदुधर्मशास्त्राच्या कामीं तसें करणें

* १ सर्व जातींत दत्तविधानविधि करतात काय ? करीत नसतील तर कोणत्या जातींत ? त्याचीं उदाहरणें.
२ मोठ्या भावानें धाकट्या भावास दत्तक दिल्याचीं उदाहरणें.
३ भावानें आपला भाऊ दत्तक दिल्याचीं उदाहरणें.
४ दोन्हीं दत्तक घेतल्याचीं उदाहरणें.
५ बहिणीचा मुलगा दत्तक घेतल्याचीं उदाहरणें.
६ ज्येष्ठ पुत्र दत्तक घेतल्याचीं उदाहरणें.
७ एकच पुत्र असून तो दत्तक दिल्याचीं उदाहरणें.
८ वाईट लक्षण लागल्यामुळें पिंपळावर मूल ठेवल्याचीं उदाहरणें.
९ स्वयंदत्त झाल्याचीं उदाहरणें.
१० सपिंडसंकोच.
११ मातुळाचे कारणें विवाह.
१२ मातुळासीं व दुसरे विवाहसंबंध.
१३ मयत बायकोची संतति असतां तिच्या सख्ख्या बहिणीशीं विवाह.
१४ निरनिराळ्या वर्णाच्या ब्राम्हणांचा परस्पर विवाह.
१५ दोघां सख्ख्या बंधूंचे दोघ्या सख्ख्या बहिणींशीं विवाह.
१६ भिन्न वर्णाचे परस्पर विवाह.
१७ काडी मोडून घेण्याचे प्रकार. इ० इ०

शक्य नव्हतें. म्हणून हिंदुधर्मशास्त्राचा विषय आला कीं त्याचा निर्णय कर-ण्याकरितां कोडतांत विद्वान शास्त्र्यांची नेमणूक करण्यांत येत असे व तो सांगेल तसा निकाल देण्यांत येई. परंतु इंग्रज न्यायाधीशांच्या अंगीं स्वतां काम करण्याची हौस, निश्चित निर्णय देण्याची योग्यता, सूक्ष्मभेद करण्याची हातोटी व विषय समजून घेण्याची इच्छा इ० अनेक गूण असतात म्हणून त्यांस दुसऱ्याच्या हातून सतत पाणी पीत बसण्याची पद्धति अर्थात आवडण्या-सारखी नव्हती. म्हणून त्यांनीं एकच उपाय योजला. तो कोणता ? तर ज्या स्मृतींच्या आधारानें शास्त्री निर्णय करीत असत त्यांचें भाषांतर करणें हा होय. त्या कामावर फार उत्तम विद्वान इंग्रजी पंडितांची योजना झाली. सर वुइल्यम जोन्स यांनीं कुल्लुक भट्टांच्या टीकेसह भृगुकृत मनुस्मृतीचें भाषांतर १८०७ मध्यें लंदन येथें छापिलें. मि. कोलब्रूक यांनीं जीमूतवाहनकृत दायभागाचें भाषांतर १८१० सालीं कलकत्त्यास छापिलें व याज्ञवल्क्य स्मृतीचें ( भाग दोन, श्लोक १३४ ते १४९ यांवर विज्ञानेश्वरकृत मिताक्षरानामक टीकेचें ) भाषांतर वरील पंडितानेंच १८१० सालीं कलकत्त्यास छापविलें. यांनीं अगो-दरच १८०१ सालीं जगन्नाथकृत निबंधांचें भाषांतर छापिलें होतेंच.

नंतर ( श्रीकृष्णतर्कालंकारकृत ) दायक्रमसंग्रहाचें भाषांतर मि. विंच यांनीं केलें. व्यवहारमयूखाचें मि. बोरोडेल यांनीं १८२५ मध्यें भाषांतर छापिलें. त्याच प्रमाणें नंदपंडितकृत दत्तकचंद्रिकेचें मि. सदर-लन्ड यांनीं छापलें. मे. स्टील, स्टोक्स, स्ट्रेंज व मेन यांचे या कामांतील उद्योग प्रसिद्धच आहेत. पुष्कळ लोकांचें मत असें आहे कीं वरील भाषांतरें कित्येक ठिकाणीं इतकीं चांगलीं झालीं आहेत कीं त्यांत सुधारणा करणें शक्य नाहीं. एवढें पाहिलें म्हणजे इंग्रज पंडितांची विद्येची हौस व उद्योगक्षमता या गुणांचें कौतुक करावें तितके थोडेंच आहे. या भाषांतरांनीं न्यायाधीशांचें काम सुलभ केलें. शास्त्रीबुवांचें काम उरलें नाहीं. शास्त्री घरोघर गेले; पण काय होऊं लागलें तिकडे रावसाहेबांचें लक्ष गेलें व त्यांस पुढील गोष्ट आढळून आली.

हिंदुधर्मशास्त्र हें हिंस्दुथानांतील आर्यांचें धर्मशास्त्र आहे व हल्लीं न्यायाच्या कोडतांत ज्या धर्मशास्त्राला हिंदुधर्मशास्त्र असें समजलें जातें व जें न्यायाच्या कोडतांत प्रमाण धरलें जातें तें शास्त्र ह्मणजे खऱ्या समग्र हिंदुधर्मशास्त्राचा एक भाग आहे. या धर्मशास्त्राचे आचार, व्यवहार व प्रायश्चित्तें असे तीन भाग आहेत. परंतु ते एका धर्मरूपी सूत्रानेंच ओंवलेले आहेत. ते विभाग **याज्ञवल्क्य, मनु**, व **नारद** यांनीं आपल्या स्मृती लिहिल्या तों पर्यंत झालेले नव्हते. त्यांच्यापूर्वीं आर्यांचा भर आचार व प्रायश्चित्तें यांवरच होता. व्यवहाराची ( दिवाणी कायद्यांची ) त्यांस फार जरूर पडत नव्हती; कारण त्यांचे भानगडीचे व्यवहारच नसत. साधारणपणें त्यांचा आयुष्यक्रम संन्यस्त स्वरूपाचा होता. गृहस्थानें १५ दिवसांच्यावर घरांत सामग्रीच बाळगावयाची नव्हती. मग त्याच्या वारसाविषयीं कशाला भानगडीचे प्रश्न उपस्थित होतात ? आर्यानें लग्न केलें कीं नवा आश्रम स्थापावयाचा व विकांराची शांति झाली कीं चतुर्थाश्रमांत शिरावयाचें अशा आर्यांच्या साध्या आयुष्यक्रमांतील व्यवहाराकडे हल्लींच्या कायद्याच्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. कारण हल्लींच्या काळांतील कायदे व समाजपद्धति त्या काळीं आढळणें शक्य नाहीं.

परंतु धर्मशास्त्राचें पुरातन स्वरूप जितक्या अंशांनीं हिंदुस्थानांतील आर्यांनीं प्रचारांत अखंड ठेविलें आहे तितक्या अंशांनीं आपल्या धर्मशास्त्राचें पुरातन स्वरूप पृथ्वीवरील कोणत्याही इतर राष्ट्रानें ठेविलें नाहीं, हें जसें खरें आहे, तसेंच हिंदुस्थानांतील आर्य सर्व बाजूनें जेथें होते तेथेंच अगदीं स्थिर राहिले नाहींत हेंही खरें आहे. तेव्हां एकाच काळीं कांहीं धार्मिक संस्थांचें स्वरूप अगदीं पुरातन काळीं असलेलें आढळून येतें व काहीं संस्थांचें स्वरूप अगदीं विकृत झालेलें आढळतें याचा उलगडा परकीय न्यायाधीशांस होत नाहीं म्हणून ते आमच्या संस्थांच्या प्राक्‌कालिन स्वरूपाचें पुनरुज्जीवन करावयास पहातात अथवा युरोपियन सुधारणेच्या आधुनिक कल्पनांप्रमाणें त्यांचीं जीं मतें आहेत त्यांप्रमाणें

आमच्या धर्मशास्त्रांतील मूळ श्लोकांचा अर्थ करूं पहातात* असें कां घडतें? त्याला उत्तर हेंच कीं आर्यधर्मशास्त्राच्या विस्तृत स्वरूपाचा संकोच केल्यामुळें असें घडतें असें सांगून रावसाहेबांनीं पुराणें व आचार यांपासून संभूत झालेलें हिंदुधर्मशास्त्राचें समग्र स्वरूप केवढें मोठें आहे तें दाखविलें. त्यावरून हल्लींचे कोडतांत मान्य झालेलें स्वरूप किति संकुचित आहे तें दाखवून दिलें आहे.

कोडतांस मान्य झालेली **मिताक्षरा** ही **याज्ञवल्क्यस्मृतीच्या** दुसऱ्या भागांतील ( **दाय** प्रकरणांतील ) ३०७ श्लोकांपैकीं फक्त ३६ श्लोकांवरच केलेली टीका आहे व समग्र **याज्ञवल्क्य** स्मृतींत १००९ श्लोक आहेत. एवढें असून **याज्ञवल्क्य** हा खुद्द बहुसंख्य स्मृतिकारांपैकीं एक आहे व त्याचें माहात्म्य त्याच्या शाखेंतील लोकांच्या बाहेर वास्तविक नाहीं. मिळून अनेक स्मृतींतील एका स्मृतिकाराच्या स्मृतींतील एका लहानशा भागावरच हिंदुधर्मशास्त्राची मोठी थोरली इमारत कोडतांच्या हातून रचली गेली आहे. असें कां झालें म्हणाल तर मागें सांगितल्या प्रमाणें १८१३ सालीं संस्कृत मूळासह **दायभाग** प्रकरणाचें भाषांतर सरकारनें छापविलें व या शिवाय आणखी जीं एक दोन भाषांतरें सरकारमार्फत प्रासिद्ध झालीं तेवढींच काय तीं **युरोपियन** वाचकांस उपयोगी झाल्यानें हिंदुधर्मशास्त्रविषयक कोडताच्या कामाचें वाङ्मय काय तें तेवढेंच असें ठरलें व **युरोपियन** पंडित, डा. **बुल्लरसारखे** सुद्धां, असें मानूं लागले कीं हिंदुधर्मशास्त्राविषयक प्रश्नांचा निकाल करणें झाल्यास आधारभूत मानावयाचे ग्रंथ म्हटले म्हणजे हे वर सांगितलेलीं सरकारमार्फत छापलेलीं भाषांतरें व त्यांचे मूलग्रंथ. म्हणजे यांच्याच मतानें १८६८ पर्यंत सुद्धां **मिताक्षरा**,

* ॥ **अहार्यं ब्राह्मणद्रव्यं राज्ञा नित्यमिति स्थितिः** ॥ ही मनुस्मृति **सांगते** कीं संतत्यभावात् ब्राह्मणाचें वित्त राजसात् होऊं शकत नाहीं. असें असतां त्या वचनाचा अर्थ **मच्छलीपट्टणचा कलेक्टर** विरुद्ध. **कावलीवेंकट** या कज्जांत प्रीव्ही काउन्सिलनें उलट केला आहे. ईंडियन मूर्स अपिलें पृष्ठ ५०० पहा.

**मयूख** व **निर्णयसिंधु** इतकेच कायते ग्रंथ खऱ्या निर्णयाचा रस्ता दाखविणारे ठरले. समग्र **याज्ञवल्क्य** स्मृति व तिच्या एका भागावर केलेली टीका जी **मिताक्षरा** यांचें भाषांतर करण्याचा सरकारचा जो मूलहेतु तो बाजूला राहिला व जो नुसता प्रास्ताविक भाग समजला गेला होता तो आतां खुशाल समग्र हिंदुधर्मशास्त्राचा अखंड सांठा असें मानलें जात आहे. ही, **रावसाहेब** म्हणतात, चूक झाली.

**याज्ञवल्क्य** हा हिंदुधर्मशास्त्राचें विवेचन करणाऱ्या अनेकांपैकीं एक स्मृतिकार आहे. व **विज्ञानेश्वराची मिताक्षरा** ही यांतील कांहीं भागावर उत्तम टीका आहे एवढेंच. परंतु इतक्यांत सर्व हिंदुधर्मशास्त्र आलें व तेंच सर्वांस मान्य झालें असें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. म्हणून हिंदुधर्मशास्त्राचा अभ्यास शोधक बुद्धीनें व्हावा या हेतूनें व त्याबद्दल झालेला लोकांचा गैरसमज दूर करण्याच्या हेतूनें **याज्ञवल्क्य**स्मृति नमुन्याकरतां घेऊन या ग्रंथांत हिंदुधर्मशास्त्राचा विस्तार केवढा मोठा आहे तें दाखविण्याचा प्रयत्न **रावसाहे-बांनीं** केला आहे. व मधलींच वचनें घेऊन त्याचा अंशतः उपयोग केल्यानें हिंदुधर्मशास्त्रांतील मुख्य मुख्य प्रश्नांसंबंधें निर्णय देतांना कशी अन-वस्था होते हे दाखविण्याकरतां परिशिष्टें जोडलीं आहेत व त्यांत कांहीं मुख्य विषयांवर चर्चा केली आहे. तींत **रावसाहेबांची** खरी विद्वत्ता बरोबर दिसून येत आहे. चार परिशिष्टें दिलीं आहेत त्यांतील पहिल्यांत १८ स्मृतींचें सार दिलें आहे. बाकीच्यांत धर्मादाय, सपिण्डता व आचार हे विषय घेऊन त्यांचें सांगो-पांग विवेचन केलें आहे. तें करतांना मे. **मेन**, **स्ट्रेन्ज** वगैरे **युरोपियन** ग्रंथ-कर्त्यांनीं वरील विषयांचीं अंगें सोडून दिल्यानें जीं अपूर्ण राहिलीं त्यांस त्या अंगांचें विवेचन करून संपूर्णता आणली आहे. शिवाय कांहीं वरील ग्रंथ-कारांचे गैरसमज झाले आहेत ते दाखवून दूर केले आहेत व हिंदुधर्मशास्त्रावर कोठें चुकीचे निर्णय झाले आहेत ते दाखवून दिले आहेत. पूर्वीं एकुलत्या एक मुलाचें दत्तविधान कोडतें अशास्त्र मानीत आलीं होतीं तें आतां प्रिव्ही काउन्सिल पर्यंत सशास्त्र ठरलें आहे. अशा चुक्या व गैरसमज **रावसाहेबांनीं**

कांहीं बाबतींत दाखवून दिले आहेत. ज्या बाबतींत दाखवावयाचे आहेत त्यांचें त्यांनीं दिग्दर्शन करून ठेविलें आहे. तथापि आपल्या मतांच्या खरे खोटेपणाविषयीं निर्णय करणें लोकांवर सोंपविण्याचा त्यांचा हेतु होता.

मी हिंदुधर्मशास्त्रावर ग्रंथ लिहिण्याकरतां व वेदकालीन आर्यलोकांवर कांहीं निबंध लिहिण्याकरतां मूलाधारभूत माहिती गोळा करीत आहें. त्यांत माझ्या मताचा पुष्कळ युरोपियन पंडितांच्या मतांशीं विरोध होईल अशी भीति वाटत आहे. परंतु मीं माझीं मतें सप्रमाण देऊन तीं खरीं कीं खोटीं हें ठरविणें लोकांवर सोंपवीन. (२६।२।१८७२ चें ज. जेकब यांस पत्र )

" आम्हीं इकडे थंडींत कुडकुडत आहोंत व सारमेयांस व भपकेदार पुस्तकांस उन्हांत शेकावयास मिळत आहे. " अशी नेहमीं ग्रंथकारांची तक्रार असते. तशी पाळी रावसाहेबांवर आली नाहीं. ग्रंथास राजाश्रय, व लोकाश्रय चांगला मिळाला.

हायकोर्टाच्या ठरावांत यांतील प्रमाणांचा निर्देश होत असतो. हा मान लहान नाहीं. श्रुतिस्मृतींचा संक्षिप्त इतिहास, प्रचलित आचार, धर्माची उत्पत्ति व वाढ, हीं ज्यास पहावयाचीं असतील त्यानें हा ग्रंथ वाचावा.

---

## प्रकरण ६४ वें.

---

# कलकत्ता.



**। कोऽतिभारः समर्थानां किं दूरं व्यवसायिनाम् ।**
**॥ को विदेशः सविद्यानां कः परः प्रियवादिनाम् ॥ १ ॥**

( सुभाषित. )

१८८२ सालीं फेब्रुवारी महिन्यांत रावसाहेब पाहिल्यानेंच कलकत्त्यास गेले होते. तेथील व्यवस्था अगोदर करून ठेवण्यास पुढें मनुष्य पाठविला

होता. सामानसुमानानें सुशोभित असा स्वतंत्र बंगला भाड्यानें घेऊन पंधरावीस दिवस राहिले होते. कार्यक्रम इतका आगाऊ ठरविला होता कीं कोठल्या तारखेचें टपाल कोठें पाठवावयाचें तें निश्चित केलेलें होतें.

रावसाहेब स्टेशनावर उतरतात तों मि. घोस आपली गाडी घेऊन आले होते. त्यांच्या घरीं प्रथम जाऊन नंतर बिऱ्हाडीं गेले.

कलकत्ता शहर नीट अवलोन केल्यावर रावसाहेबांनीं त्याचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे. "एकदांचा येथें येऊन पोहोंचलों. या शहराचा मुंबईशीं अगदीं पुरा विरोध आहे. हें निरुत्साह, क्लिन्न, निर्वात, मलवाहनाच्या दुर्व्यवस्थेमुळें व दाटवस्तीमुळें व ( बंगाली व युरोपियन ) लोकांच्या संवयीमुळें दुर्गन्धीनें भरलेलें आहे. अमित व्यापार चालला असून निर्जीवता उघडपणें दृष्टोत्पत्तीस येत आहे. विद्वत्ता मुबलक ! लेखांची वाण नाहीं ! शिक्षणाचा अभाव नाहीं ! अगदीं इंग्लंदप्रमाणें महासंपत्ति व निकृष्ट दारिद्र्य शेजारीं शेजारीं !                    ( मि. बॅरो यांस पत्र )

ना. गिब्स यांचे बरोबर सरकारी बंगल्यांत गेले होते तेथें त्यांनीं लार्ड रिपन, मि. टप्पर, मि. रिव्हर्स थांपसन्, मि. व्हिटले स्टोक्स, जोतिन्द्र. मोहन टागोर, दुर्गाचरण लॉ, इत्यादि मोठ्या गृहस्थांची स्वतः ओळख करून दिली व ५ दिवशीं पुन्हां भेटावयास येतां येईल का म्हणून विचारलें. दुसऱ्या भेटीच्या वेळीं लार्ड रिपन यांनीं रावसाहेबांस सांगितलें कीं माझे जवळ तुम्हीं मन मोकळें करून बोला. त्याप्रमाणें म्युनिसिपॅलिट्या, शिक्षण-कमीशन, लोकस्थिति व कांहीं चळवळी या विषयांवर संभाषण झालें.

येथें त्यांच्या जुन्या मित्रांपैकीं एक मि. आर. डी.* मेहता म्हणून पार्शी व्यापारी होते त्यांस ते वारंवार भेटत.

---

*यांच्या सर्व कुटुंबांतील माणसांचा व रावसाहेबांचा घरोबा असे. मि. मेहता यांचीं वृद्ध व पूज्य मातापितरें रावसाहेबांवर फार लोभ करीत असत. मि. मेहता हे एक सार्वजनिक कामांत मन घालणाऱ्यांपैकीं होते. त्यांचा व रावसाहेबांचा सार्वजनिक प्रश्नांसंबंधीं पत्रोपत्रीं विचारविनिमय होत असे.

शिशिरबाबू, उमेशचंद्र बॉनर्जी दर्भंग्याचे महाराज रामेश्वरसिंग, राजेन्द्रलाल मित्र, ख्रिस्तोदास पॉल, सर रिचर्ड गार्थ, मि. होप (काउन्सिलचे सभासद), मि. प्लौडन व अनंद मोहन बोस यांच्या भेटी झाल्या.

*सुरेंद्रनाथ बॉनर्जी हे मुंबई म्युनिसिपालिटीच्या ड्रेनेजसंबंधें व वसूल करण्याच्या पद्धतीसंबंधें माहिती नित्य विचारीत असत. त्यांच्या विनंति-पत्रावरून कलकत्त्याचें ड्रेनेज रावसाहेब नीट पाहून आले.

बाबू ख्रिस्तोदास यांनीं त्यांची या खेपेची विशेष व्यवस्था लागेल तीं केली होती. "माझें फार सदयपणें आदरातिथ्य केल्याबद्दल व येथें असे तों मनापासून साहाय्य केल्याबद्दल मी आपला फार आभारी आहें."[१५।२।८२चें बाबू ख्रिस्तोदास यांस पत्र. ]

लालमोहन घोस व मदनमोहन घोस हे दोघे बन्धू रावसाहेबांच्या स्वास्थ्याकडे विशेष लक्ष देत असत.

"मी इकडे येण्यास निघण्यापूर्वी लालमोहन यांस कलकत्ता सोडून दुर्दैवानें जावें लागलें व मनमोहन हे त्यांच्याही अगोदर कामाप्रीत्यर्थ तसेच दूर गेले होते. तरी दोघे घोस बन्धू मी निघत्यावेळीं स्टेशनावर मला पोंचवावयास आले होते. मला त्यांनीं फार ममतेनें वागवलें. त्यांची गाडी घर, आणि नोकर हीं सर्व माझ्या उपयोगाकरतां त्यांनीं सादर केलीं होतीं. माझें वास्तव्य फार अल्पकाळ होतें, तरी पुष्कळ बोध घेण्यासारखें माझ्या नजरेस पडलें. पुष्कळानें माझें मनोरंजन झालें. माझ्या मनांतून डार्जिलिंगला पटकन जाऊन यावयाचें

*सुरेन्द्रनाथ बानर्जी यांची व रावसाहेबांची ओळख जुनीच होती. "बाबू सुरेन्द्रनाथ बॉनर्जी यांची तुमच्या परवानगीने ओळख करून देत आहें. हे मुंबईस आतां येत आहेत पण यांची कीर्ति तेथें अगोदरच जाऊन पोंचली आहे. त्यांच्या मनांत सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा दोहोंकडे भरविण्याविषयीं चळवळ करावयाची आहे. उत्तर हिंदुस्थानांत त्यांस चांगल्या यशाची प्राप्ति झाली आहे व मुंबईस आपल्या सारख्यांचा इतर पुढाऱ्यांचा पाठिंबा मिळाल्यास तेथेंही त्यांस यश येईल म्हणून आपणही चांगली मदत करावी. (१७।११।७७ ख्रिस्तोदास पॉल यांचें पत्र)

होतें. परंतु आणखी एक आठवडा लागला असता तेवढा मजजवळ रिकामा नव्हता. [ डा. आत्माराम पांडुरंग यांस पत्र. ]

रावसाहेबांस कलकत्त्यास गेल्यावर तें शहर लोकवस्तीच्या प्रकारावरून आवडलें नाहीं. परंतु तेथें असलेल्या बंगाली बाबूंविषयीं त्यांचें मत चांगलें झालें. ते बाबू शिशिर कुमार घोष यांस एकापत्रीं ह्मणाले "एखाद्याला शरसंधान करावयाचें असेल तर खुशाल करावें पण तें विषदग्ध शरांनीं करूं नये. माझ्या-मतें तुमच्याशीं कुरापत काढण्याला फार कारण मिळत नाहीं. ह्मणून मी तुह्मांला उत्तेजन देऊन असें ह्मणतों कीं तुमची भरभराट होवो व हल्लीं जर एकादा मनुष्य तुमच्यावर शिंतोडे टाकील तर खुशाल तुमच्या संरक्षणार्थ माझ्या मताकडे बोट दाखवा. माझ्या या मताला पुष्टि आणणारा २७ वर्षांचा वर्तमानपत्रांत लिहिण्याचा व ३५ वर्षें सार्वजनिक कामाचा अनुभव आहे." १८८३ सालीं रावसाहेब फिरून कलकत्त्यास कांहीं कामानिमित्त गेले होते. प्रयागास उतरल्यावर मुनशी हनुमानप्रसाद यांचेकडे प्रथम जाऊन नंतर सर दिनकरराव यांच्या बगीच्यांत उतरावयास गेले. त्यासालीं तेथें ( कल-कत्त्यास ) एक अंतर्राष्ट्रीय प्रदर्शन भरलें होतें. मुंबई इलाख्यांतील सर्व उपयोगी वस्तूंचा संग्रह त्यांत पूर्णपणें केला जाईल अशी व्यवस्था करण्या-करितां सरकारनें एक मंडळ नेमिलें होतें. त्याच्या सभासदाचा भान रावसाहे-बांस मिळाला होता.

या खेपेस रावसाहेब प्रथम सरकारी बंगल्यांत गेले होते. तेथें गव्हर्नर जनरल यांचे खासगी सेक्रेटरी मि. प्रिमरोज यांच्या जवळ विविध विषयांवर बोलणें झालें. त्यांत सॅल्व्हेशनिस्ट्स, मुंबई म्युनिसिपॅलिटी, स्थानिक स्वराज्य इ. विषयांवर संभाषण झालें. मेजर बेअरिंग व स्टयुअर्ट बेली व मि. बक यांजवळ शेतकऱ्यांच्या बँकांविषयीं रावसाहेबांनीं चर्चा केली. "समाधानकारक ठराव झाला. दुसरे दिवशीं लॉर्ड रिपन यांची भेट झाली तेव्हां रानाबद्दल मी माझी योजना अगदीं उघड करून सांगितली. १ मोठाले तुकडे राखणें २ खर्च कमी करणें व लोकांस त्रास कमी होईल अशी व्यवस्था करणें इ. 'हवा सुधारण्याचा व

लोकांचें हित साधण्याचा हेतु आहे व वसूल वाढावण्याचा नाहीं ' असें निष्पन्न झालें. "

"याचप्रमाणें हत्यारांच्या कायद्याविषयीं बोलणें झालें. हिंदुस्थानाला एक मुख्य पाहिजे असें मि. ब्राइट म्हणतात तो विषय निघाला होता."[१।२।८३ रो.]

लार्ड रिपन यांची कारकीर्द फारच लोकप्रिय होऊं लागली होती. ' त्यांच्या महत्कृत्यांबद्दल त्यांचे आभार मानून स्थानिक स्वराज्याच्या कामांत त्यांस पुष्टि देण्याकरतां मुंबईच्या हिंदी शेतकरी सभेनें एक छापील मानपत्र लार्ड रिपन यांस अर्पण करावयाचें ठरवून त्याची छापील प्रत आपल्या वतीनें लार्ड रिपन यांस अर्पण करण्याचें मंगलकार्य रा. ब. लोखंडे वरील सभेचे चालक यांनीं रावसाहेबांकडे ७।२।१८८३ रोजीं पत्रद्वारें सोंपविलें'. हें काम रावसाहेबांनीं आनंदानें केलें. त्याच्या आणखी प्रती काउन्सिलच्या इतर सभासदांना लोखंडे यांच्या विनंतीवरून वांटल्या.

"शिशिर कुमार ( अमृत बझार पत्रिकेचे एडिटर ) यांस भेटलों ते म्हणाले ' तुम्हीं बाबू भूदेव मूकरजी सारखे दिसतां. ते कायस्थ होते. तुम्हीं ब्राम्हण अहांत. ते सर्व हिंदुस्थानांतील लोकांत देशाभिमानी होते. ' मीं त्यांचे या गौरववचनाबद्दल आभार मानले." नंतर शिशिर बाबूंचे व लार्ड रिपन यांचें नवीन सुधारणांविषयीं झालेलें बोलणें बाबूनीं रावसाहेबांस सांगितलें. सुधारणांविषयीं लार्ड रिपन यांचे बेत व १८५० च्या विसाव्या ॲक्टावर जनरल ॲक्टाची प्रक्रिया आणून त्यांची फसवणूक हा विषय निघाला होता. त्यावर रावसाहेबांनीं मत दिलें कीं **मिळत आहे तें घेतलें पाहिजे.**

राजा शिवप्रसाद, राजा नरेन्द्रकृष्ण बहाद्दर इत्यादि लोक भेटीस येत असत. दुसरे बाबू महेशचन्द्र चौधरी हे एक या खेपेस नवीन स्नेही झाले होते. त्यांच्या बरोबर रावसाहेब बोटींत फिरावयास जात. समवेत दुसरे स्नेही लाल मोहन घोस असत. यावरून असें दिसतें कीं या खेपेस कलकत्त्यास तेथील श्रेष्ठ नागरिक व सरकारी श्रेष्ठ अधिकारी यांत रावसाहेबांना कोणी परका उरला नव्हता.

---

## प्रकरण ६५ वें.

# कलकत्ता काउन्सिल.

। चतुरान् ब्राह्मणान् वैद्यान् प्रगल्भान् स्नातकान् शुचीन् ।
॥ क्षत्रियांश्च तथा चाष्टौ बलिनः शस्त्रपाणिनः ॥ १ ॥
। वैश्यान् वित्तेन संपन्नानेकविंशतिसंख्यया ।
॥ त्रीन् शूद्रान् विनीतांश्च शुचीन् कर्माणि पूर्वके ॥ २ ॥
। अष्टाभिश्च गुणैर्युक्तं सूतं पौराणिकं तथा ।
॥ पञ्चाशद्वर्षवयसं प्रगल्भमनसूयकम् ॥ ३ ॥
(राजसभेची कौन्सिलची रचना वर्णन करणारे शान्ति पर्वांतील श्लोक. महाभारत.)

मुंबईच्या काउन्सिलांत उत्तम रीतीनें कामगिरी रावसाहेबांनीं केली तिचें बक्षिस म्हणनच कीं काय, गव्हर्नर जनरल लार्ड रिपन यांनीं कलकत्त्याच्या कौन्सिलांत रावसाहेबांची नेमणूक १८८४ सालीं केली.* हा मान या प्रांतांतील लोकांपैकीं रावसाहेबांस प्रथमच मिळाला. ही नेमणूक म्हणजे लार्ड रिपन यांच्या नव्या राजनीतिची तुतारीच फुंकली गेली. पुढें हातीं पडणाऱ्या कल्याणकारक देणग्यांचा लोकांस बयाणाच वाटला. सर्व लोकांची हृदयें हर्षभारित झालीं.

मुंबईकरांना या नेमणुकीबद्दल फार संतोष वाटला. तो व्यक्त करण्याकरतां त्यांनीं रावसाहेब कलकत्त्यास जाण्यापूर्वीं त्यांना मोठ्या थाटाची पानसुपारी दिली. सभेला सर्व मुंबईचे पुढारी हजर होते. अध्यक्षाचा मान सर

*रावसाहेबांचें लार्ड रिपन यांच्या विषयीचें मत चांगलें झालेलें होतें:— " कलकत्त्यास आम्हांला एक मोठे मनुष्य लाभले आहेत. ते राज्यनौका हांकण्यास प्रामाणिक कर्णधार आहेत. ते कोण म्हणाल तर लार्ड रिपन होत. "
( एका इंग्रज मित्रास पत्र )

जमशेटजी जीजीभाई बॅरोनेट यांस मिळाला होता. त्यांनीं भाषण केलें त्याचा सारांशः—“गव्हर्नर जनरल यांच्या सभेंत प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार या इलाख्यास असावा हें तत्त्व लार्ड रिपन यांस मान्य झालें ही गोष्ट फार अभिनंदनीय आहे व आतां एकवेळ अशी एकदां नेमणूक करण्यांत आली आहे. तोच प्रघात पुढें पडेल असा भरंवसा वाटत आहे. तुम्हांसारख्या सर्वथैव योग्य मनुष्याची नेमणूक झाली म्हणून आम्हांस अधिकच सुख वाटत आहे. वर्षानुवर्ष तुम्हीं जीं सार्वजनिक कामें करीत आलांत व ज्यांमुळें तुम्हीं आपलें नांव सर्व इलाख्यांत फार लोकप्रिय करून ठेवलें आहे त्यांचें क्रमवार वर्णन करीत बसण्याची ही वेळ नव्हे. मनांत आणिलें तरी थोडक्यांत साध्य होण्यासारखें नाहीं. ज्या उच्च पदावर तुमची नेमणूक झाली आहे त्यावर अधिष्ठित होऊन या इलाख्यांतील भिन्नभिन्न हितसंबंधाच्या लोकांचे प्रतिनिधि म्हणून काम करण्याची लायकी तुम्हीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें, सतत उद्योग करीत बसण्याच्या उत्साहानें, स्वतंत्र मताभिमानानें व प्रामाणिक वर्तनानें सिद्ध केली आहे, असा जो सार्वत्रिक समज आहे, त्याचें दिग्दर्शन करून मी स्वस्थ बसतों. सार्वजनिक कल्याण करणाऱ्या तुमच्या सारख्याची नेमणूक लार्ड रिपन यांनीं करून लोकांचे खरेखरे प्रतिनिधी सभेंत घेण्याची आपली इच्छा आहे असें जाहीर केलें आहे. त्यांनीं केलेली ही तुमची नेमणूक तुमचा सन्मान करून तुमची नेमणूक करणाऱ्याचा सन्मान करीत आहे. व सर्व वर्गाच्या लोकांस ती मान्य झाली आहे. तुम्हीं उदयिक कलकत्त्यास प्रयाण करीत अहांत. तेव्हां येथें जमलेल्या सर्व लोकांच्या तर्फे मी असें आश्वासन देत आहे कीं तुम्हांस जो हा नवीन लोककल्याण करण्याचा मार्ग उपलब्ध झाला आहे, तो तुम्हीं आक्रमीत असतां आम्हां सर्वांच्या शुभेच्छा तुमच्या बरोबर साथिदार म्हणून येत आहेत.”

रावसाहेबांचा सन्मान जसा मुंबईकरांनीं केला तसा मुंबईच्या बाहेरील लोकांनींही केला. निफाडच्या स्टेशनवर नाशिक जिल्ह्यांतील जहागीरदारांच्या

तर्फे त्यांस मानपत्र अर्पण करण्यात आलें. त्याच प्रमाणें कलकत्त्यास दाखल झाल्यावर तेथील इन्डियन असोशिएशननें त्यांचा मोठ्या थाटानें गौरव केला.

१८८५ सालीं जानेवारींत कलकत्त्यास काउन्सिलची बैठक व्हावयाची होती. सरकारी वकीलीच्या कामाची व्यवस्था करावी व कलकत्त्यास काउन्सिलच्या कामाकरतां परवानगी द्यावी असा अर्ज सरकारांत केला तो मान्य झाला.

या जागेवर असणाऱ्या सभासदाला सरकारांतून वर्षाचे दहा हजार रुपये मिळत असत. त्याचा विनियोग या मोठ्या दर्जाला शोभेल अशा रीतीनें रहाण्यांत रावसाहेब करीत असत. आपल्या सोईचा बंगला स्वतां पाहून पसंत करण्याकरतां रावसाहेबांनीं आपल्या एका कारकुनास आगाऊ कलकत्त्यास कामावर रुजू होण्यापूर्वी रवाना करून दिलें होतें. तेथें सखाराम पंत दांडेकर म्हणून एक मित्र होते. तेही बंगल्याची व्यवस्था करीत. " मला स्वतंत्र स्वयंपाकघर पाहिजे तो नवीन आपल्या खर्चानें बांधावा." अशा ज्या कांहीं विशेष सोयी लागत त्या ते करून घेत असत. रावसाहेबांनीं अगदीं आपणाकरतां नवा पाण्याचा नळ एकदां घालविला होता.

तेथें जातांच रावसाहेबांनीं व्हाइसरॉय लार्ड रिपन यांची भेट घेतली तेव्हां "व्हाइसरायांनीं त्यांची ममतेनें सर्व चौकशी केली. व तुमचा उत्तरोत्तर उत्कर्ष होईल अशी आशा प्रगट केली. "

कामाच्या राशी पडत त्या काढतांना इतर कांहीं गोष्टींकडे वळण्यास रावसाहेबांस वेळ मिळत नसे. तेथील कांहीं लोक पानसुपारीच्या अथवा साखरपाण्याच्या समारंभास निमंत्रणें देत. त्यांचा स्वीकार कामामुळें करीत नसत. "या काउन्सिलच्या अधिवेशनांतील मुख्य कायद्याचा मसुदा काउन्सिलांत आला म्हणजे आम्हांस रोज सहा तास काम करावें लागेल. एवढा कोंडमारा पुरेसा आहे "( २०।१।८५ चें मि. बॅरा, म्युनिसिपल सेक्रेटरी, मुंबई यांस पत्र ) व कामांत गढून जाण्यांतच हौस मानीत. "मजा उडाली ! कामच काम !" असें त्यांनी मि. बॅरो यांस ७।२।८५ च्या पत्रीं कळविलें होतें. त्याप्रमाणें यासालीं

तेथें गेल्यावर रावसाहेबांच्या हातांत फार कामें होतीं. शेतकऱ्यांकरतां पेढ्या काढण्याची योजना त्यांच्या हातांत होती. तीसंबंधें त्यांना सर कॉल्व्हिन व नामदार गव्हर्नर जनरल यांस भेटावयाचें होतें. ( इंग्रज मित्रास पत्र ).

दुसरें काम मि. मलबारी यांनीं हिंदुसुधारणेविषयीं सरकाराकडे पत्रें पाठविलीं होतीं. त्यांवर मुंबईसरकाराकडे रावसाहेबांस आपलें मत पाठवावयाचें होतें. तें काम हातांत होतें, तें पुरें करावयाचें होतें. " मला या एकंदर गोष्टीचा कंटाळा आला आहे. या एकाच बाबीवर वेळ खर्चून मी पाप केलें आहे. परंतु याशिवाय सुटका नाहीं. (३।२।८५ चें बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे बंगाल्यांतील टेनन्सी बिलावरील वादविवाद होय. त्यांत जमीनदार व कुळें यांच्या विषयीं बिकट प्रश्नांचा विचार काउन्सिलांत करावयाचा होता. कायम धाऱ्याची पद्धत तिकडे असल्यामुळें या बिलाला फार महत्त्व आलें होतें. याशिवाय किरकोळ कायद्याचे मसुदे आले होते. या सर्व कामाकरतां त्यांस श्रम फार करावे लागले. प्रथम प्रथम रावसाहेबांस येथील हवा बरोबर मानवली नाहीं. " येथील हवा मला बरोबर मानवत नाहीं परंतु मी एकसारखा कामांत गुंतलों असल्याकारणानें माझे दिवस समजल्याशिवाय जात आहेत. [ २७–१–८५ मि. सोराबजी पटेल यांस पत्र ] "तोळे वजनी राहतों. हा वेळपर्यंत ठीक आहे. सुमारें ४½ वाजल्यापासून रात्रौ ७ वाजत तोंपर्यंत श्रम करतों. असें हवेंत सामर्थ्य आहे. एकंदर भगवत्सत्ता प्रमाण." [ २१।२।८५ बाबा कान्हेरे यांस पत्र. ]

" माझ्या मनोमय दृष्टीला तुम्हीं इकडे धांव तिकडे धांव असें करीत आपल्या कार्यांत गढलेले दिसतां. आमच्या खाजगी सभा दिवसांतून चार वेळां होतात. व काउन्सिलांत एकदां खोगीर चढविलें कीं ५½ तासांशिवाय उतरीत नाहीं. " ३।३।८५

" ध्यानांत ठेवा. आतां पुष्कळ सूत्रें हातांत घेऊन बसलों आहे. तीं सर्व

मला गुंडाळीत आणलीं पाहिजेत. नाहींतर माझे सर्व श्रम व्यर्थ जातील. ”
[ ६।३।८५ चें दाजीसाहेब खरे यांस पत्र. ]

या खेपेस रावसाहेबांची भेट घेण्यास पुष्कळ मोठ मोठे लोक येत, त्यांत पुढील मंडळी होतीः—

महाराजा सर जतिंद्रमोहन टागोर*; मि. आर. सी. मिटर+; महेशचंदर चौधरी; सर. एस्. जे. सी. कॉटन; गिरिजाभूषण मुकर्जी; द्वारकानाथ मुकर्जी.; तालुकदार ऑफ ममताबाद; मि. अमीर अली; दामोदरदास बर्मन; मि. जे. घोसल; मोतीलाल घोष; इ० इ०.

कलकत्त्याच्या काउन्सिलांत रावसाहेबांनीं जीं भाषणें केलीं त्यांचा संक्षिप्त सारांशः—

## जन्म, मरण व लग्नें यांची नोंद ठेवण्याविषयींचा कायदा.

सर्व जातीच्या लोकांस या कायद्याचीं कलमें लागू करावीं अशी सूचना ना. मि. अमीर अली यांनीं आणिली. तेव्हां रावसाहेब म्हणालेः—“ अमीरअली यांच्या म्हणण्यास मला पुष्टि देतां येत नाहीं. खर्चाच्या वाढीची सबब ही मोठीच आहे. ती सोडली तरी दुसऱ्या हरकती पुष्कळ आहेत. हिंदुस्थानांतील सर्व हिंदू पुढारी—बंगाल्यांतील कदाचित् अपवादात्मक असतील त्यांस सोडून—जन्ममरणादिकांची नोंद ठेवण्याच्या विरुद्ध आहेत. मि. इल्बर्ट यांनीं निर्दिष्ट केलेले तेवढेच तर्फे आहेत. सिव्हिल सर्व्हिसला उमेदवार विलायतेस पाठविण्याचा जो प्रश्न आहे तो महत्वाचा असेल. परन्तु असे लोक थोडे असल्यामुळें त्यांचें वय नक्की सिद्ध करण्यास अडचण पडणार नाहीं. ह्या कायद्याची कलमें हिंदूंना व मुसलमानांना लागू करावयाचीं आहेत. त्यांची संख्या व हा कायदा अंमलांत आणण्याकरितां लागणारा खर्च आणि हिंदू व मुसलमान हे ह्या मसुद्याला किंमत किति अल्प देतात तें सर्व लक्षांत घेतां मी हिंदुस्थानांतील सर्व

*ब्रिटिश इन्डियन असोशिएशनच्या चालकांपैकीं एकजण.

+ अलौकिक बुद्धीचे वाङ्मयात्मक लेखक व भाषणकर्ते.

प्रांतांतील हिंदूंच्या व मुसलमानांच्या मतांचें प्रदर्शन करून सांगतों कीं निरनिराळया इलाख्यांतील सरकारांचीं मतें घेतल्याशिवाय या कायद्याचीं कलमें मि० **अमीर अल्ली** म्हणतात त्याप्रमाणें लागू करावीं असें मला वाटत नाहीं."* १६–१–१८८५. [ सूचनेचा स्वीकार झाला नाहीं. ]

## बंगाल टेनन्सी बिल.

हा कायद्याचा मसुदा फार महत्त्वाचा होता तो काउन्सिलांत आल्या दिवसापासून त्याचें नांव घरोघर आबालवृद्धांच्या मुखीं जाऊन बसलें. बंगालमध्यें त्यावेळीं जमीनदार अथवा रयत मिळून सहा कोटी लोकांची उपजीविका प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें जमिनीवर अवलंबून होती. त्यांतील फार मोठी संख्या रयतेची होती व अगदीं अल्प संख्या रयतेकडून वसूल झालेल्या उत्प-

---

* " मतप्रिय **आपा**

जनन, मरण व लग्नें इत्यादि रजिष्टर करावीं अशा विषयीं निर्बंध करणाऱ्या कायद्याच्या मसुद्यावरील माझ्या भाषणाचा रिपोर्ट तुम्हांला आजच्या सकाळीं प्रसिद्ध होणाऱ्या इंडियन **मिरर**च्या अंकांत वाचावयास सांपडेल. एक अत्यंत लहान वर्गाच्या लोकांनीं विनंति केल्यावरून या मसुद्याचा कायद्याच्या सभेंत प्रवेश करण्यांत आला आहे. या वर्गांतील लोकांजवळ असल्या गोष्टींचा कागदोपत्रीं पुरावा ठेवण्याचीं दुसरीं साधनें नाहींत. ते काय करीत आहेत तें त्यांस पूर्णपणें कळत आहे त्यांच्या मनाप्रमाणें व्यवस्था झाल्यास तिचा खर्च कोणास द्यावा लागेल तेंही ते जाणत आहेत. कांहीं दिवसांनीं हा कायदा जे हिंदू आपण होऊन खुषीनें पुढें येतील त्यांना लागू पडेल. परिणाम काय तो पहा. कोट्यावधि लोकांची काय बरें स्थिति होईल ! त्यांना खुषी व सक्ति या दोहोंतील भेद समजण्याचें शहाणपण आहे काय ? असून तो भेद त्यांस कळेल काय ? प्रथम गांवकामगाराच्या हातून काम कसें काय होईल तें बघतील मग आस्ते आस्ते नोंद करणाऱ्या मुख्य अधिकाऱ्याकडून काम वाढत आहे अशी तक्रार येऊं लागेल मग ह्मणतील त्याच्या खर्चाची व्यवस्था करा. नवे कारकून ठेवा. या करतां दर नोंदीला फी ठेवा. हा कायदा अशा रीतीनें कराच्या वाढीला कारण होणार व हेंच ह्याचें भविष्य. " ( **आपा आठल्ये** यांस पत्र )

न्नावर पोट भरणाऱ्यांची होती. यांचे परस्परांचे हक्कसंबंध पूर्वापार असल्यामुळें त्यांवरून निरनिराळ्या ठिकाणीं परिस्थितीच्या मानानें तंटे बखडे उत्पन्न होत. म्हणजे बिहार प्रांतांत जमीनदार प्रबळ व कुळें दुर्बळ म्हणून कुळांकडून वसूल निर्दयपणें करण्यांत येई, अथवा समयीं गैर कायदा वर्तन जमीनदारांच्या हातून घडून येई. पूर्व बंगाल्यांत जमीनदार दुर्बळ व रयत प्रबळ तेथें जमीनदार वसूल करण्यास आला असतां एकजूट करून त्याच्या मार्गांत कुळें अडथळे उत्पन्न करीत. मिळून एकीकडे जुलूम व दुसरीकडे संप. त्यांची वाट नीट लावण्याजोगें समाधानकारक सामर्थ्य त्यावेळीं आस्तित्वांत असलेल्या कायद्यांच्या कलमांत नव्हतें. म्हणून एक १८५९ त कायदा ( रेन्ट ॲक्ट ) करण्यांत आला. परंतु हा शुभहेतु व उपयोगी कायदा यशस्वी झाला नाहीं. त्यानंतर बारीक एक दोन कायदे केल्यावर ही स्थिति सुधारली नाहीं म्हणून एक रेन्ट कमीशन १८७९ सालीं बसलें. त्याच्या शिफारशीवरून जुन्या कायद्यांत फरक करण्याचें ठरून या नव्या कायद्याची उभारणी झाली. या कामीं न्या. फील्ड यांची मेहनत वाखाणण्यासारखी होती. फॉमिन कमीशनचें मत सुद्धां नवा कायदा करावा असें पडलें व त्यांतील मुख्य धोरणें दोन होतीं.

( १ ) कुळांस जमिनीची वहिवाट करण्यांत व उपभोग घेण्यांत योग्य तितका सुरक्षितपणा प्राप्त व्हावा.

( २ ) कुळांशीं त्यांच्या कडून येणाऱ्या उत्पन्नाविषयीं करार करण्याचें काम व त्याचा वसूल होण्याचें काम अशीं दोन्हीं कामें योग्य तितकीं सुलभ व्हावीं.

बंगाल्यांतील जमीनदारांस वाटलें कीं त्यांच्या कायम धाऱ्याच्या पद्धतीवर गदा आली. बाबू ख्रिस्तोदास पॉल यांनीं भडिमाऱ्याची तयारी केली. बाबू प्यारी मोहन मुकरजी व दर्भंग्याचे महाराज, लचमेश्वरसिंग, यांनीं त्यांस पाठिंबा दिला. मसुद्यातर्फे नामदार मि. रेनाल्ड्स, मि. इल्बर्ट, सर. बेली. मि. गिबन, मि. हन्टर इ. इतर सभासदांनीं यांस तोंड देण्यास आपली शिकस्त केली. १७९३ सालीं कायम धाऱ्याची पद्धति सुरू झाल्यापासून १०० वर्षांत काय परिस्थिति होत गेली तिची चर्चा झाली. ‘ तेव्हां सरकारतर्फे हा मसुदा

पुढें आणत्यावेळीं त्यावर भाषण करणाऱ्यांचें लक्ष, शतकापूर्वी १७९३ सालीं कंपनी बहादुरच्या अमदानींत ज्या उदार इंग्रज सरदारानें कायम धाऱ्याची पद्धति सुरू केली त्याच्या काउन्सिल हालांतील भींतींवर टांगलेल्या तसबिरीकडे जेव्हां जेव्हां गेलें असेल तेव्हां तेव्हां त्यांस लॉर्ड कार्नवालिस यांचें भूत पुढें उभें ठाकून कायम धाऱ्याची पद्धति ठरवितांना त्यांच्या मनांत काय होतें त्याचा थांग आतां हे कसा लावतात तें हंसत पहात आहे असें वाटलें असेल.'

बंगाल्यांतील जमीनींत हितसंबन्ध मुख्यतः पुढील तिघांचा आहे. १ कायम धाऱ्याचे मालक सरकार; २, कुळां जवळून मक्ता घेऊन सरकाराला कायम ठरलेला धारा भरून शेष राहील त्याचा उपभोग घेणारे जमीनदार व ३, जमीनदारांस मक्ता देणारी रयत. शेवटल्या वर्गांत पुन्हा दोन भेद आहेत. ( अ ) जमीनदार व रयत यांच्या मध्यें असणारे मक्तेकरी ( Tenure holders. ), हे स्वतां जमीनींची लागवड करीत नाहींत पण ती इतर कुळांस ( रयतेस ) लागवडीस देऊन त्यांपासून जो मक्ता येईल त्यांतील कांहीं अंश जमीनदारांस देऊन शेष भागावर उपजीविका करतात. त्यांतील कित्येक मक्ता वाढविण्याचा प्रसंगविशेषीं हक्क सांगतात; व ( ब ) अगदीं मूळचीं जमीनींची लागवड करणारीं कुळें ( Occupancy tenants ) असून आतां पोटकुळें ( Sub tenants ) आणून त्यांकडे पोटमक्त्यानें जमीन लागवडीस देणारीं. यांतील काहीं कुळांचा मक्ता कायमचा ठरलेला असतो त्यांस खुद्दखस्त म्हणतात. कांहींचा कांहीं शर्थींवर वाढवितां येणारा असतो त्यांस पैखरत म्हणतात. याशिवाय ज्यांस जमीन लागवड करण्याचा हक्क प्राप्त झाला नाहीं अशीं कुळें ( nonoccupancy tenants ) आहेत यांस उपरी कुळें म्हणतां येईल.

जसे कुळांत भेद आहेत तसे जमिनींत भेद आहेत. उदाहरणार्थः—खमार जमीन म्हणजे जमीनदाराची अगदीं खासगी जमीन म्हणावयाची. तिची लागवड जमीनदारांनीं स्वतां करावी अथवा दुसऱ्या वाटेल त्या कुळांकडून कर-

वावी किंवा ती पडित ठेवावी. इतर सर्व जमीन रयती समजावयाची म्हणजे ती रयतेकडे लागवडीस प्रथम सांगितल्या प्रकारानें असावयाची.

या वर्णनांत जे पारिभाषिक शब्द आले आहेत त्यांच्या व्याख्या प्रथम मसुद्यांत कराव्या लागल्या त्या करतांना बरीच पंचाईत पडली. बंगालमधली जमीनदारी निराळी. इंग्लंदमधली निराळी. तेव्हां बंगाली शब्दांच्या व्याख्या इंग्रजी शब्दांत देऊन सूक्ष्मभेद दाखविणें कठीण झालें. म्हणून हा मसुदा पुढें आणणारे नामदार सभासद म्हणाले " मला आतां केम्ब्रिज येथील एका परीक्षेला बसलेल्या विद्यार्थ्याची आठवण होते. त्याला परीक्षकांनीं वर्तुळाच्या मध्यबिन्दूची व्याख्या देण्यास सांगितलें. त्याला देतां येईना; तथापि त्याला त्यांनीं नाडल्यामुळें त्यानें बोटानें हवेंतच वर्तुळाची आकृति काढून त्याच्या मध्याकडे बोट दाखविलें व तो म्हणाला तो पहा मध्यबिन्दु ! "

परंतु हें काम ज्यांच्याकडे होतें ते फार बुद्धिमान होते. त्यांनीं फार परिश्रम केले होते. ह्मणून तें काम प्रशंसापात्र युक्तीनें त्यांनीं पार पाडलें होतें.

इतक्या भानगडीमध्यें ही तिरस्थळी यात्रा—जमीनदारांची, मध्यस्थांची व रयतेची—सुरळीत व हितावह रीतीनें पार पाडण्याकरतां मसुद्यांत तीन प्रकारची योजना केली होती. उपरीं कुळें ह्मणजे जमीनदाराचीं जीं इच्छामात्रजीवित कुळें त्यांस जमीन लागवड करण्याचा हक्क कसा व केव्हां प्राप्त होईल तें ठरविण्यांत आलें. ह्मणजे प्रथम त्यांस जमीन लागवडीस देतेवेळीं मक्तेचिठ्या कराव्या व त्या पांच वर्षांच्या मुदती पेक्षां कमी मुदतीच्या नसाव्या असें ठरविलें. यानें त्यांच्या हक्कास थोडें स्थैर्य आलें व पुढें दोघांचें पटल्यास कांहीं फायदेशीर करार करण्याची संधि दिली. या योगानें उपरी कुळांस, जमीन लागवड करण्याचा हक्क ज्या कुळांस असतो त्यांच्या वर्गांत येण्याची सवड करून त्यांची स्थिति सुधारली. त्याच प्रमाणें ज्या कुळांस जमीन लागवड करण्याचा हक्क आहे त्यांस खुद्दखस्त कुळांच्या ( ज्यांस जमीन लागवड करण्याचा कायमचा ठराविक मक्ता देऊन कायमचा हक्क प्राप्त झाला आहे त्यांच्या ) वर्गांत शिर

ण्याची संधि दिली. उदाहरणार्थ हा कायदा होण्यापूर्वी १२ वर्षें पर्यंत ज्या कुळांनीं जमीनीची लागवड केली त्यांस खुद्दखस्त कुळांचा दर्जा प्राप्त करून दिला. व तसें करतांना अमूक एक विवक्षित जमीनीच्या भागाची लागवड बारा वर्षें केली पाहिजे अशीही शर्थ ठेविली नाहीं. गांवांतील कोठलीही जमीन त्यांकडे लागवडीस असली तरी चालेल असें ठरविलें; कारण कांहीं जमीनदार कुळांकडे लागवड करण्यास एक जमीन देतील व बारा वर्षे होण्यापूर्वीं त्याच्या कडून ती काढून लागवड करण्यास आणखी दुसरीच जमीन देतील. व बारा-वर्षांची मुदत भरणार नाहीं अशी व्यवस्था करून त्यांच्या नव्या हक्काच्या प्राप्तीच्या आड येतील. आणखी असें ठरविण्यांत आलें कीं कुळाकडे जमीन लागवडीस असली कीं ती बारावर्षें पर्यंत आहे असें अनुमान विरुद्ध पुरावा होईतों काढावें. जमीन लागवड करण्याचा हा हक्क वंशपरंपरा पुढें चालावा असें ठराविलें व तो हक्क आपल्या इतर स्थावर मिळकतीप्रमाणें कुळास विकतां येतो असें ठरविलें; व तसें करतांना जमीनदारास त्याचा तो हक्क सर्वांच्या आधीं विकत घेण्याचा अधिकार दिला. पोट मक्तेदाराला मक्ता वाढविण्याचा हक्क असे. त्यास कांहीं शर्थी घालण्यांत आल्या. विशेष करार करून आपला हक्क गमाविण्याचेंही कुळांच्या स्वाधीन ठेविलें नाहीं. कुळांचे हक्क खरेदी विक्रीस पात्र ठरविल्यावर अशा हक्कांची नोंद सर्वत्र करण्याची व्यवस्था केली. वर्षांच्या मुदतीच्या, वाढीच्या प्रमाणाच्या व कांहीं योग्य कारण दाखविण्याच्या अटी घालून मक्ता वाढविण्याची व्यवस्था केली. त्याचप्रमाणें योग्य कारण दाखविल्यास मक्ता कमी करण्याची व्यवस्था केली. मक्त्याच्या फिर्यादी वारंवार म्हणजे दर महिन्यास हप्ता थकल्यास आणतां येत, तशा येऊं नयेत असें ठरवून मध्यें तीन महिने गेल्याशिवाय पुनः आणूं नयेत असें ठरविलें. कोणाची तक्रार आल्यास योग्य ठराव करण्याचा अधिकार मुलकी अम्मलदारांस देण्यांत आला. कुळास काढून टाकण्याच्या कामीं सकारण अटी घालण्यांत आल्या. वहिवाटदार कुळाला जमीनींत सुधारणा करण्याचा

अधिकार दिला. व योग्य कारण दाखवून त्यास काढण्याच्या प्रसंगीं त्यानें जमीन सुधारतांना केलेला खर्च त्यास भरून मिळण्याची व्यवस्था केली.

जमीनदाराचा वसूल कायद्याप्रमाणें होण्याकरतां त्याला योग्य प्रकारें जप्ति आणण्याचा अधिकार दिला. मागें सांगितल्याप्रमाणें खमार ही जमीनदाराची खासगी मिळकत आहे. जींत लागवड करण्याचे हक्क कुळास केव्हांही प्राप्त होत नाहींत त्या जमिनीचें क्षेत्र वाढवीत जाणें जमीनदाराच्या पथ्यावर असे ह्मणून तें वाढविण्याकडे त्याची प्रवृत्ति नेहमीं असे. ह्मणून एकवार अशा जमिनीची नोंद करण्याचें ठरविलें. व अशी नोंदलेली जमीन वृद्धि पावणार नाहीं अशी व्यवस्था केली.

या कायद्याचें स्वरूप फार व्यापक आहे. थोडक्यांत त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. रयतेला वहिवाटींत स्थिरता प्राप्त व्हावी. वाजवी तेवढाच मक्ता द्यावयास पडावा, व आपल्या हक्काची विक्री करतां यावी असें जें कांहीं इंग्लंदच्या किंवा आयर्लन्डच्या कायद्याचें धोरण* आहे तें यांत उतरलेलें आहे. हा अत्यंत परिश्रमानें तयार केला गेला. त्यांत अनेक मुत्सद्यांचें हस्तलाघव आहे व तें प्रशंसेस पात्र आहे.

रावसाहेब कलकत्त्यास गेले तेव्हां ह्या बिलाचा मसुदा निवडक कमिटी-कडे सोंपविलेला होता तिचा रिपोर्ट झाल्यावर त्यावर चर्चा व्हावयाची होती त्या वेळेस रावसाहेबांनीं बिलासंबंधीं काय धोरण ठेवलें होतें त्याचा उल्लेख एका पत्रीं आढळतो तो—

" मी न्यायाधीशाप्रमाणें हें बिल वाचीत आहें. फक्त न्यायाधीशाप्रमाणेंच वाचीत आहें. " ( बापूसाहेब आठल्ये यांस ४।२।१८८५ चें पत्र. )

" येत्या शुक्रवारीं कमिटीचा रिपोर्ट सादर होईल व चर्चा सुरू होईल. मी अति सर्वत्र वर्जयेत् या न्यायानें वागेन. जेव्हां राष्ट्राला अपाय आहे असें

---

* त्या धोरणास fixity cf tenure, fair-rent and free sale म्हण-तात अथवा या तीन शब्दसमुच्चयाचें आद्याक्षर एफ् असल्यामुळें त्रिसंख्य एफ़् असें म्हणतात.

दिसेल तेव्हां सामोपचारानें बोलेन परंतु जेव्हां मौन स्वीकारणें शहाणपणाचें दिसेल तेव्हां त्याचाच स्वीकार करीन. " ( गणपतराव भास्कर यांस पत्र. )

या बिलाचें वर्णन रावसाहेबांनीं विनोदानें एका पत्रीं केलें होतें तें:–

" याला काय मासा समजूं कीं कोंबडा समजूं कीं दुसरा कोणी मांसमय प्राणी समजूं तें मला कळत नाहीं. जो येतो तो त्याकडे पाहून पाय उगारीत आहे. मग तो रयत असो अगर जमीनदार असो आम्हांला बरेच श्रम पडतील परमेश्वर मार्ग दाखवील. " ( १९।२।८५ बाळकृष्णदादांस पत्र. )

" सरकारचें बहुमत आहे तेव्हां रेन्ट बिल पास होईलच. सर्व मानवी क्रियांप्रमाणें तें चांगल्या वाईटाचें मिश्रण आहे. परंतु देशाचा फायदा होईल कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. पण वकिलांचा फायदा होईल. "

( २१।२।८५ हरकिसनदास यांस पत्र. )

बहुमत हिंदी सभासदांचें नाहीं म्हणून त्यांनीं स्वस्थ बसावें असें रावसाहेबांचें मत नव्हतें. दरभंग्याचे महाराज व बाबू प्यारी मोहन मुकरजी हे जमीनदार असून यावेळेस कलकत्ता काउन्सिलचे सभासद होते. म्हणून रावसाहेबांनीं मि. मुकरजी यांस पत्र लिहिलें:—तुम्हीं व महाराजा मिळून सुचनांचा व उपसुचनांचा ज्या मानानें मारा कराल त्या मानानें शेष राहिलेल्या कायद्याची वाट लावण्यांत येईल. ७।३।१८८५

हा कायदा होतेवेळीं रावसाहेबांनीं मोठें भाषण केलें त्याचा सारांश:—

" या कायद्याविषयीं मी संक्षिप्त व सरळ असा पंथ स्वीकारणार आहे. या कायद्याचा मसुदा, निवडक कमीटीचा रिपोर्ट, व भिन्नमतप्रदर्शन करणाऱ्या सभासदांच्या नोंदी आमच्या हातांत पडून पंधरा दिवस झाले. तितक्यांत त्यांचें निरीक्षण करून या कायद्याच्या मूळच्या मसुद्याचें कसें रूपान्तर होत गेलें व त्यास आतांचें स्वरूप कसें प्राप्त झालें तें समजण्याचा मार्ग फार कठीण झाला आहे, असें नामदार स्टय़ूअर्ट बेली यांनीं जें गुणदोषविवेचनात्मक भाषण केलें त्यावरून समजेल. त्यांच्या मागून ज्या नामदार सभासदांचीं भाषणें झालीं त्या सर्वांस निवडक कमीटींत वर्षभर असण्याचा फायदा एका

शिवाय मिळाला आहे. तसा मला मिळाला नाहीं. म्हणून स्थूलमानाचें मला अवलंबन कोठें कोठें करावें लागलें त्याला नाइलाज आहे. जिल्ह्यांतन सूचिविरहित कागदपत्र आले आहेत, त्यांचें वाचन निरनिराळ्या दृष्टीनें केलें पाहिजे. कमिटीच्या सभासदांनीं व माझ्या आधीं जे काउन्सिलचे सभासद बोलून गेले त्यांनीं आपसांत वादविवाद करतांना व भिन्नमतप्रदर्शक नोंदी करतांना पुष्कळ महत्वाच्या तत्त्वांचा आंत समावेश केला आहे. तें पाहतां मला ह्या मसुद्यावर सांगोपांग विचारांनीं परिपूर्ण असें विस्तृत भाषण करतां यावयाचें नाहीं. तथापि याविषयावर **मी जितका प्रकाश पाडूं शकेन तितका पाडून मी सरकारास साहाय्य करण्यास बांधलेला आहें** त्याचप्रमाणें पुष्कळ अधिकाऱ्यांनीं जिल्ह्यांतून माहिती पाठविली आहे व मोठे श्रम करून मतें दिलीं आहेत त्यांचें मला चीज केलें पाहिजे. या दोन गोष्टी केल्या ह्मणजे माझ्या कर्तव्यांतून मी मोकळा होईन."

"हिंदुस्थान सरकारानें आपले कायदे करतांना सुरक्षित व स्थिर मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे" असें सांगून रावसाहेब पुढें म्हणाले:—

"मी एक नाजुक सूचना करणार आहें. तिच्याविषयीं माझीं मतें विशिष्ट तऱ्हेचीं बनलेलीं आहेत. त्यांतील तत्त्वें हिंदुस्थान सरकारानें मान्य करून ठेवलींच आहेत. कायम धाऱ्याची पद्धति राजकीय व आर्थिक उपायांत उत्तम म्हणून व आमची राज्यनौका राजकीय महासागरांत वाहूं न देतां स्थिर ठेवण्याचा भरंवशाचा नांगर म्हणून, उचित समयीं एकाद दुसरी अट असली तर ती पुरी झाल्यावर सर्वत्र लागू करण्यांत येईल अशी आशा आहे."

नंतर निरनिराळ्या प्रांतांच्या कमीशनरांनीं या मसुद्याच्या विरुद्ध मतें दिलीं त्यांचें निरीक्षण रावसाहेबांनीं केलें. बोलून चालून अदूरदर्शी कुळांस जमीन वहिवाटण्याचा हक्क* दिल्यानें वसूलाच्या संबंधें फिर्यादींची संख्या वाढेल असें

* असे हक्क प्राप्त झालेल्या रयतेला कर्जाऊ दिलेल्या रकमा वसूल करण्याकरतां सावकार जे दिवाणी दावे घालतात त्यांचें एकदर दिवाणी दाव्यांच्या संख्येंत शकडा ऐशीं प्रमाण दक्षिण परगण्यांत होतें, असें मि. ओल्डॅम म्हणतात.

राजसहायींच्या कमीशनरांनीं मत दिलें त्याचा उल्लेख केला. पुढें रावसाहेब म्हणाले. "रेव्हिन्यू बोर्डाचें मत असें आहे कीं योग्य वसूल तर व्हावा पण तो गैरकायदा होऊं नये अशी व्यवस्था झाली पाहिजे. कायदेशीर रीतीनें विभाग करण्याजोग्या जमिनी असतील त्यांचे विभाग झाले पाहिजेत."

"जमेचा भरणा ज्या वसुलावर अवलंबून आहे तो नीटपणें होईल अशी व्यवस्था या कायद्यानें करतां येईल असें दिसत नाहीं. आह्मांला अंकप्रमाण माहिती पुरविली पाहिजे होती. ती घेत बसण्याचा हट्ट मी धरीत नाहीं. हक्कांची नोंद बंगाल्यांत नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे व तशी नोंद असती तर तंट्यांची वाढ अशक्य झाली असती असें बंगाल सरकार ह्मणतें. माझें मत निराळें आहे. तंट्यांच्या कारणांचीं मुळें खोल आहेत. जसे जसे भानगडीचे कायदे करण्यांत येतील, जशी जशी लोकसंख्या वाढेल, जसे जसे जीवनोपाय संकोच पावतील व हल्लींची सुधारणा जशी जशी वाढेल तशी तशी तंटे करण्याची प्रवृत्ति वाढेल, असें ह्मणतांना मला इतिहासाचें पाठबळ आहे."

"एकंदरींत पहातां कमीशनरांचें असें म्हणणें आहे कीं हा कायदा अनवश्यक आहे. मूळ हेतूंच्या पलिकडे याची मजल गेली आहे. जमिनींत असलेल्या हक्कांमध्यें ढवळाढवळ झाल्यानें जी हानि होणार आहे, तिची वजावाट करण्यास कांहीं फायदा होणारा नसून तंटे वाढणार आहेत. लेफ्टनन्ट गव्हर्नर या कायद्याच्या विरुद्ध आहेत. नामदार रेनाल्ड्स हा कायदा अल्पायु होणार असें जातक वर्तवीत आहेत. तरी ज्यांस जमीन वहिवाटण्याचे हक्क देऊं नयेत असें जिल्हा अधिकारी म्हणतात त्यांस तसे हक्क देण्यांत येत नाहींत म्हणून मि. अमीर अल्ली नाराज आहेत. नामदार गिबन म्हणतात जमीन कसण्याचा कुळाचा हक्क त्यास वाटेल त्यास फरोक्त करण्याचा अधिकार अगदीं पुरता द्यावा. त्याशीं कोडताचा किंवा मामूल वहिवाटीचा संबंध नसावा. यांस पुढले परिणाम दिसून आले नाहींत. सामाजिक व आर्थिक घडामोडी करणें झाल्यास त्या हळू हळू स्थिरपणें घडवन आणल्या पाहिजेत व त्या अंत:प्रवृत्तीच्या द्वारें

झाल्या पाहिजेत. असले वीर्यवान कायदे करण्यांत वेळ खर्च करण्यापेक्षां शेतकऱ्यांस शेतकीचें शिक्षण देण्यांत खर्च केलेला बरा. त्यांना अधिक कष्टाळु, स्वावलंबी व सत्यधर्मी बनविलें पाहिजे. ईश्वराची भीति धरण्यास शिकविलें पाहजे. जमीनींत प्राप्त असलेल्या लोकांच्या हक्कांची गाडाभर निर्भर्त्सना करीत बसण्यापेक्षां वरील शिक्षण दिल्यास त्याचा परिणाम चांगला होईल. त्याच्या योगानें जी नैतिक क्रांति होईल ती मान्य करण्यास सरकारच सर्वांच्या अगोदर तयार होईल."

"१८७१ त कालव्यांसंबंधें हिंदुस्थानसरकारनें कांहीं कागदपत्र प्रसिद्ध केले आहेत, त्यांत कांहीं वर्षांनीं जमाबंदीचे नवे नवे ठराव करण्यांत काय धोका आहे तें दाखवून दिलें आहे. आतां येथें वेळीं अवेळीं न्यायखात्यामार्फत अथवा रेव्हिन्यू खात्यामार्फत सरकारास मध्यें पडण्याची शिफारस होत आहे. कोडताच्या बाहेर आपसांत समजुतीला वाव नाहीं. शिवाय नवीं खातीं वाढवून खर्च वाढणार आहे तें निराळेंच. बिहार प्रांताला फायदा होणार नाहीं असें दुर्भाग्याचे महाराज व नामदार प्यारी मोहन मुकरजी म्हणतात. बंगालचा तरी फायदा होईल काय? या प्रश्नास अपवादरहित 'होय' असें उत्तर मला देतां येत नाहीं. फायदा होईल कीं नाहीं हें ठरवीत बसण्यांत आणखी नवा पुगवा गोळा करण्यांत अर्थ नाहीं. जमीनदारी म्हणजे कांहीं जड चैतन्यरहित वस्तु नव्हे. तशी असती तर कालनिरपेक्ष जसे जड पदार्थावर तसे तिच्यावर प्रयोग करीत बसतां आलें असतें. जमीनदार व कुळें यांच्या स्थितींत फरक होत आहे; परंतु इतक्यांतच म्हणजे अधिकाऱ्यांचे रिपोर्ट आल्यानंतर आणखी कांहीं गोठा फरक झाला आहे असें नाहीं. ह्मणून एकवार रिपोर्ट आल्यावर पुन्हां लगेच दुसरा रिपोर्ट मागण्यांत अर्थ नाहीं. माझें ह्मणणें मी आणखी स्पष्ट करून सांगतों. बंगाल्यांतील हाताखालच्या अधिकाऱ्यांचे रिपोर्ट वाचून मला तर नवल वाटत आहे. असा अधिकारी प्रथम आपल्या प्रांतांतील दोन सद्गृहस्थांचीं मतें मागवितो. त्यांस अवधि दोन दिवसांची देतो. व आपला रिपोर्ट सज्ज करतो. तो ह्मणतो 'मी कायद्याचा मसुदा

समग्र वाचला, त्यांत जमीनदारांपासून कुळांचें संरक्षण होण्याची मुबलक तजवीज केलेली आहे. कुळांना जेवढे हक्क देणें अवश्य आहे त्याहूनही अधिक देण्याची व्यवस्था आहे. आतां जमाबंदीचा वसूल करण्याचें काम सोपें झालें! कुळें गैर कायदा हैराण होण्याचा संभव नाहीं ! गैरशिस्त वाढ वसुलांत होईल ? मुळींच नाहीं!' असें ह्मटल्यावर आपण प्रमाणातीत कायद्याची स्तुति केली असें त्यास वाटूनच कीं काय कोणजाणे तो उलट ह्मणतो ' पोट वहिवाटाचे प्रकार वाढणार आहेत ! रयतेचें नुकसान होणार आहे ! फायदा किति होईल तें अनिश्चित आहे. व दिवाणी दावे वाढणार आहेत ! ' मग यावर शेवटला सफाईचा हात फिरवून ह्मणतो. ' हा कायदा अगदीं परिपूर्ण आहे. ' अमूक एकादी दुरुस्ती करणें राहिलें आहे असें ह्मणण्यास मी असमर्थ आहें ! यांतलें खरें वर्म असें आहे कीं या अधिकाऱ्याच्या अंगांत आत्मविश्वास नाहीं. मग दुसरे त्याच्यावर भरंवसा ठेवतील अशी आशा त्यानें कां करावी ? ओरिसा प्रांतांतील कांहीं रयती अर्जदार अनुचित भाषा वापरण्यास शिकले आहेत. ती पार्लमेंतच्या शिष्टाचारास धरून नाहीं. ह्मणून अधिक पुरावा मागविण्याच्या भानगडींत माझें आंग नसावें. जिल्ह्यांतून रिपोर्ट येऊन वर्ष झालें नाहीं. इतक्यांतच सामाजिक व आर्थिक परिस्थितींत मोठाल्या घडामोडी झाल्या नाहींत. असत्या तर स्थानिक सरकारांनीं त्यांच्याविषयीं कागदपत्र पाठवून दिले असते. "

" आतां कोणते अपायकारक प्रकार या कायद्यानें नाहींसे होतील व कोणते उपायकारक प्रकार अस्तित्वांत येतील त्यांची चिकित्सा करून रावसाहेब म्हणाले " खुद्दखस्त " जीं कुळें आहेत त्यांच्या वाटेस न जावें हें बरें. " ठरावबंद " अथवा ' रहिवासी कुळें ' हे " खुद्दखस्त कुळें " या शब्दांचे समानार्थ शब्द नव्हत. ह्या शब्दांचा अर्थ प्रसिद्धच आहे. "

" बंगाल्यांतील जमिनीच्या दहा हिशांतील नऊ हिस्से जमीन लागवडीस आलेली आहे. एकहिस्सा पडित आहे. तिची लागवड करतांना जमीनदारांनीं दुसऱ्या कुळांस हव्या त्या शर्थीवर ती कसण्यास दिली, तर हल्लींच्या कुळांचें

काय नुकसान आहे ? उलट ती पडित राहिल्यानें जमीनदारांचें नुकसान आहे. तें होऊं नये अशी त्यांची इच्छा असल्यास ते सोयीवार शर्थीवरच कुळांना कसण्यास जमीन देण्यास मोकळे असले पाहिजेत. पडित जमीन लागवडीस आणतांना नव्या शर्थी सरकारानें कां घालाव्यात ? व त्या घालतांना पूर्वीच्या राजसत्तेकडे कां बोट दाखवावें ? मी सरकारचा जो एकंदर वसुलावर देखरेख ठेवण्याचा अधिकार आहे तो अमान्य करीत नाहीं. परंतु असें विचारतों कीं अठराव्या शतकांतील क्षीणबल झालेल्या बंगाल सरकारचा नमुना नक्कल करण्यास आमच्या आतांच्या सनदशीर व सुव्यवस्थित सरकारानें अस्सल म्हणून कां पुढें ठेवावा ? म्हणून बे अदबी न होऊं देतां मीं असें म्हणतों कीं तुलनात्मक पद्धति अशा बाबतींत सदोष होईल. ”

“ घरठाण जमिनींसंबंधें मात्र मी असें म्हणतों कीं वहिवाटीस घेतलेल्या शेतजमिनीशीं संबंध असल्याशिवाय बाहेरच्या कुळाकडे त्यांची वहिवाट देऊं नये. असा अधिकार जमीनदारास नसावा. कुळासही नसावा. शेजाऱ्यां शेजाऱ्यांत असले तंटे सर्व देशांत अत्यंत जाचक होतात; परंतु या तंट्यांशीं आणखी सामाजिक अथवा धार्मिक कारणांचा संबंध जुळला कीं पापाचे घडे भरून जातात व एकंदर ग्रामसंस्थेचा नाश होतो. ”

पुढें रावसाहेब म्हणाले:—“ मला थोडें साधारणपणें करार करण्याचें जें स्वातंत्र्य असतें त्यावरील निर्बंधांविषयीं बोललेंच पाहिजे. करार करण्याचें जें स्वातंत्र्य असतें त्याला कांहीं प्रांतांपुरतें अथवा कांहीं विवक्षित वर्गापुरतें योग्य कारण दिसून आल्यावर, सरकार निर्बंध घालतें. वास्तविक कायद्याप्रमाणें करार करून जी जमीन वहिवाटली जाते ती वहिवाटण्याचा हक्क फरोक्त करून देतां येत नाहीं. तथापि हल्लींच्या कायद्यानें कुळांना जी सवलत दिली जात आहे, ती कुळांच्या दृष्टीनें तात्पुरती सोय केली आहे असें समजावयाचें. परंतु मागें निर्दिष्ट केलेल्या पडित जमिनीला(जी कोणीही करार करून वहिवाटीस घेतली नाहीं तिला )ही सवलत देतां उपयोगी नाहीं. करार करण्याचें स्वातंत्र्य अशा पडित जमिनीविषयीं जमीनदाराला पूर्णपणें असलें पाहिजे. मात्र तें कायदेशीर असलें

म्हणजे झालें. बंगाल्यांतील मुलकी अधिकारी तें हिरावूं पहात नाहींत. मग कांहीं अधिकाऱ्यांच्या काल्पनिक वर्तुलांत बसविण्याकरतां जमीनदाराला चतुष्कोणी आकार देण्यांत काय मतलब आहे ? ”

“ या मसुद्यांत कांहीं कलमें आहेत त्यांपासून उपयोग होईल तो कसा काय या विषयीं संशय आहे. कांहींनीं जिल्हा अधिकाऱ्यांचें काम वाढणार आहे. कांहींनीं इष्ट नसतां, अवश्यक नसतां, लोकांच्या खासगी व्यवहारांत सरकारला हात घालतां येणार आहे. तरी जेथें कुळांस व जमीनदारांस कांहीं सवलती देणें इष्ट आहे, तेथें तशी देण्याची व्यवस्था झालेली नाहीं तीं व्हावी. हीं बाब कोणची म्हणाल तर पोट भाड्यानें देण्याची विशिष्ट पद्धति होय. जमीनदार आपला हक्क मक्तेदारांस देतात. त्याप्रमाणें कुळेंही आपला जमीन कसण्याचा हक्क पोट मक्त्यानें देतात; त्याच्या योगानें कुळांना एकाहून अधिक जमीनदारांना मक्ता घालावा लागतो. याचा बंदोबस्त झाला पाहिजे. जीं कुळें आपली आपणच जमीन कसतात त्यांची स्थिति चांगली आहे. म्हणून आज कायदा बदलण्याची जी संधि आली आहे तिचा फायदा घेऊन जमिनीचे विभाग करून निरनिराळया कुळांच्या माथ्यावर जर जबाबदारी टाकतां येईल तर तसें करण्याचा विचार केला पाहिजे. ”

“ माझ्या वांट्याला जेवढा वेळ यावयाचा त्याच्याहून अधिक मी घेतलाच आहे. आमच्या देशांतील हवा पाण्याचें मान लक्षांत घेतां हल्लींच्या समजुतीप्रमाणें जितके श्रम करतां येतात तितके, किंबहुना अधिकच मी घेतले आहेत. आणखी कोणी या मसुद्याचें विवरण करील तर आनंदानें ऐकून घेऊं ” असें सांगून या मसुद्याचा पुढें विचार व्हावा असें मत रावसाहेबांनीं दिलें.

* * * *

नंतर नामदार मुकरजींनी सूचना आणली कीं कलम २० पोट कलम ७ हें काढून टाकावें. कारण एकादें कूळ एखाद्या गावांत १२ वर्षें एकाद्या जमीनीची लागवड करीत आहे किंवा नाहीं हा प्रश्न निघाला असतां तें तशी लाग-

वड करीत आहे असें अनुमान, विरूद्ध बाजूचा पुरावा येई तों काढणें व तें तसेंच सिद्ध आहे असें धरणें म्हणजे पुराव्याचा बोजा भलत्याच पक्षकारावर टाकण्यासारखें आहे. तीस रावसाहेबांनीं पुष्टि दिली व ते म्हणाले “ या पासून जें अनुमान निघणार आहे, त्यांनें जमीनीची मालकी जमीनदाराकडून कुळाकडे जाणार आहे. हें अनुमान भयावह आहे असें न्यायमूर्ति फील्ड यांनीं मत दिलें आहे. तसेंच मि. डॅम्पियर, पूर्वींचे बोर्ड ऑफ रेव्हिन्यूचे सभासद, यांनीं दिलें आहे. ” ( ही सूचना नामंजूर झाली. )

* * * *

दर्भंग्याच्या महाराजांनीं सूचना आणली कीं २३ कलमांत चवथ्या ओळींतील ‘अयोग्य’ शब्द काढून ‘कायमची कमीयोग्य’ हे शब्द घालावे. कारण या कलमाचा उद्देश कूळ जर जमिनीची नासाडी करूं पाहील तर त्यापासून जमीनदाराचें संरक्षण व्हावें असा आहे. कुळाला कायदेशीर रीतीनें काढून टाकतांना जर त्यानें केलेल्या सुधारणांकरतां त्याची नुकसानी भरून द्यावी असें आहे, तर मग कुळानें जमीनीची नासाडी केली तर उलटपक्षीं जमीनदाराचें संरक्षण कां करूं नये ? रावसाहेबांनीं हिला पुष्टि दिली. व मि. नामदार बेली यांनीं एक दर्भंग्याच्या महाराजांच्या सूचनेप्रमाणें सूचना आणिली ती मंजूर झाली.

नंतर नामदार अमीर अल्ली यांनीं वहिवाटदार कुळास आपली जमीन वहिवाटण्याचा हक्क दुसऱ्या कोणत्याही स्थावर जमीनीवरचा मालकी हक्क विकतां येतो तसा विकतां यावा अशी सूचना आणली. तिला विरोध करतांना रावसाहेब ह्मणाले असा फरक करण्यांचें योजणाऱ्यांनीं देशाचा त्यापासून फायदा आहे असें सिद्ध केलें पाहिजे. वहिवाटण्याचा हक्क फरोक्त करतां येत नाहीं असें बंगाल हायकोर्टानें ठरविलें आहे. त्याच्या पुढें बंगाल सरकारास व हिंदुस्थान सरकारास जाण्याची इच्छा नाहीं. हल्लींची सूचना मान्य केल्यास दुसरीं कित्येक कलमें काढावीं लागतील व कित्येकांस निर्बंध घालावे लागतील. नंतर नामदार मुकरजी, ना. मि. गिब्बन, ना. मि. हन्टर व व्हाईसरॉय यांचीं भाषणें झालीं.

( ही सूचना परत घेण्यांत आली. )

नंतर दर्भंग्याच्या महाराजांनीं सूचना आणली तींत कलम ४३ गाळावें अशी शिफारस केली. तीस अनुमोदन देतांना रावसाहेब म्हणाले, " ज्या रयतेला जमीन वहिवाटण्याचा हक्क प्राप्त झाला नाहीं त्या रयतेपासून होणारा वसूल वाढविण्याच्या कामीं कांहीं अटी घालणें न्यायाचें कसें आहे तें मला समजत नाहीं असें मि० फील्ड म्हणतात. विवक्षित शर्थींवर जो जमीन कसण्यास घेतो त्याला जमीन वहिवाटण्याचा जादा हक्क कसा प्राप्त होणार ?"

नंतर नामदार सर स्टयुअर्ट बेली यांनीं सूचना आणली कीं कलम २९ वें काढून त्यांत नवें कलम घालावें. जमीन वाहिवाटण्याचा हक्क ज्याला प्राप्त झाला आहे तें कूळ जर पैशाच्या रूपानें खण्ड देत असेल तर तो खण्ड लेखी व रजिष्टर करारानें कांहीं प्रमाणांत कांहीं अटींवर वाढवितां यावा. या सूचनेंत कांहीं संदिग्धार्थ शब्दसमुच्चय होता. उदाहरणार्थ ' खण्ड अगदीं कमी असेल तर ' 'वाजवी खण्ड ' इ. त्यांस हरकत घेऊन रावसाहेबांनीं सांगितलें कीं यांच्या योगानें तोंडीं पुराव्याला वाव मिळणार आहे. त्यामुळें या कायद्यांतील कांहीं मुख्य तत्त्वांचें परिवर्तन होणार आहे. "

शेवटीं रावसाहेबांनीं एक स्वतां अशी सूचना आणली कीं, सरकार जेव्हां जेव्हां या कायद्याचें कलम ११२ याची अम्मल बजावणी करावयास निघेल तेव्हां मुलकी अधिकाऱ्यांनीं केलेल्या जमाबंदीच्या ठरावांच्या रेकार्डास गव्हर्नर जनरल यांच्या मंजुरीशिवाय कायमपणा येऊं नये.

या सूचनेच्या समर्थनार्थ रावसाहेब म्हणाले:—" हा कायद्याचा भाग अपवादात्मक आहे असें या कायद्याची ज्या नामदार सभासदाकडे कामगिरी सोंपविली आहे तेच म्हणतात. या भागाची अम्मल बजावणी करण्याचे प्रसंग जितके येतील, तसेच जितक्या लवकर लवकर येतील असें लेफ्टनन्ट गव्हर्नर म्हणतात तितके व तितक्या लवकर ते येणार नाहींत अशी आशा करतों. तथापि सरकारी अधिकाऱ्यांना आपल्या बलाचा उपयोग करून कधीं कधीं कुळें व जमीनदार यांच्या मधील तंटा वसुलासंबंधीं ठराव करून मोडावा लागेल व कायद्याच्या नेहमींच्या कलमास बाजूला सारावें लागेल. हें खरें आहे म्हणून माझें ह्मणणें

असं आहे कीं रेव्हिन्यू अम्मलदारांनीं करून दिलेल्या ठरावांना कायमपणा येण्यापूर्वीं, गव्हर्नर जनरल यांच्याकडे अपील करण्याची संधि मिळाली पाहिजे. अशी शर्थ जमीनदार व कुळें या उभयतांच्या हिताची आहे. मी कोणाविषयीं गैरविश्वास धरीत नाहीं. या कायद्याच्या या भागांतील कलमें सुराज्याप्रीत्यर्थ आवश्यक आहेत अशी गव्हर्नर जनरल यांस खात्री वाटत आहे. तिच्या योगानें बंगाल प्रांतांत असलेल्या ज्या परिस्थितीवर कांहीं प्रकाश पडत आहे, तिच्याकडे पाहूनच मा वरील सूचना करीत आहें. साधारण कायद्यांचे निर्बंध जेव्हां बंद होतात तेव्हां हिंदुस्थान सरकारानें उभयतांचे तंटे मिटविण्यास मध्यस्थ होण्यास तयार असलें पाहिजे. मी ही सूचना सार्वजनिक हिताच्या दृष्टीनेंच आणीत आहें. माझ्या मतें ही सूचना मान्य झाल्यास उभयपक्षांस धीर येणार आहे. आमच्या प्रांतांत हक्कांची नोंदणी नाहीं. तथापि हिंदुस्थानसरकारास जर हक्कांची नोंदणी असली पाहिजे असें वाटत असेल व ती तयार करावयाची असेल तर पुढें जिच्यापासून फायदा होईल अशीच नोंदणी तयार करावी. ”

( ही सूचना मान्य झाली. )

नंतर नामदार **गिबन** यांनीं १२० व्या कलमावर उपसूचना आणिली. तिला पुष्टि देतांना **रावसाहेब** ह्मणाले. “या पडित जमिनींच्या भागाचें मी नीट मनन केलें आहे. मोठ्या पडित जमिनींच्या मालकानें घरीं शेतकी करण्याकरतां कांहीं जमीन कां राखून ठेऊं नये तें मला मुळींच समजत नाहीं. या कलमाप्रमाणें त्यानें एक कूळ पडित जमिनींत घातलें रे घातलें, कीं ती जमीन गेलीच ह्मणून समजा. त्यामुळें या कलमाचा परिणाम असा होईल कीं तो आंत कुळें भरणारच नाहीं. रोज मजूरी घेऊन शेतांत काम करणाऱ्यांची संख्या वाढविण्याचा जर या कायद्याचा हेतु नसेल तर या कलमानें कायद्याच्या मूळच्या हेतूस धक्का बसेल. ( सूचना नामंजूर झाली. )

नंतर नामदार. मि. **गिबन** यांनीं कलम १७४ गाळावें अशी सूचना

आणली. कारण या कलमानें ज्या कर्जदार कुळाचा हक्क विकला जाणार आहे त्याला विक्रीनंतर ३० दिवसांची मुदत तो हक्क परत प्राप्त करून घेण्याला देण्यांत येत आहे. मात्र त्यानें खरेदीदारास लिलांवांतील रकमेवर शेंकडा पांच फायदा द्यावयाचा आहे. यानें कुळें खरेदीचा दिवस पुढें ढकलतील. प्रामाणिक जमीन कसणारीं कुळें लिलावांत भाग घेणार नाहींत. त्यांना कोडतांत खेपा घालण्यास, पुन्हां ३० दिवस वाट बघण्यास व पुन्हां पैसे परत घेण्यास वेळ नाहीं. सटोडे लोक मध्यें पडतील. ते जमीन आपल्याकडे ठेवण्यास विकत न घेतां पुन्हां कोणास फायद्यानें विकण्याकरितां घेतील. तेव्हां रावसाहेब ह्मणाले. "सर्व कोडतें ज्या सट्टेबाजीच्या विरुद्ध आहेत तिला उत्तेजन येणार आहे. वतनदार कुळें व वहिवाटदार कुळें यांना एका अर्थी मदत होणार आहे. कारण आपल्या हक्कांचे लिलांवदार असतील त्यांस व्याजासकट पैसे देऊन टाकून कृतकर्माचा पश्चात्ताप करण्याची सवड त्यांस मिळणार आहे. वारंवार आलेली संधि फुकट दवडणाऱ्यांचा कड घेणें रास्त नाहीं. सट्टेबाजांस वाव मिळतो ही खरी अडचण उपस्थित होणार आहे. त्यांत कोणाचा फायदा नाहीं."

( सूचना नामंजूर झाली. )

नामदार मुकरजी यांनीं कलम १७८ कारणें एक सूचना आणली. तिला पुष्टि देतांना रावसाहेब म्हणाले, "वहिवाटदार कुळें व उपरीं कुळें यांत फरक ठेविला पाहिजे व रयत आणि जमीनदार यांचा, कोडताच्या मदतीशिवाय तंट्टे आपसांत समजीनें मिटविण्याचा मार्ग शक्य तितका अप्रतिरुद्ध ठेवला पाहिजे." ( नामंजूर )

नंतर नामदार मि. स्टच्यूअर्ट बेली यांनीं हा कायदा पसार व्हावा अशी सूचना आणली तेव्हां रावसाहेब म्हणाले:—"आजच या मसुद्यावर मत देण्याचा प्रसंग आम्हांवर येईल अशी आमची कल्पना झाली नव्हती. निवडक कमीटींत या कायद्याच्या मसुद्याची घडण नक्की होत असतां नामदार सभासदांनीं जीं भाषणें केलीं त्यांत व एकदां सभेंतील वादविवादांत, नामदार रेनाल्ड्स जें म्हणाले कीं

निवडक कमीटीनें घालून दिलेलीं तत्त्वें सोडून द्यावयाचीं नाहींत त्याकडे लक्ष दिलें म्हणजे १८५९ व १८६९ सालीं केलेल्या कायद्यांतील मूलभूत तत्त्वांस सोडून जीं कलमें या मसुद्यांत घातलेलीं आहेत त्यांत कांहीं फरक होण्याची मला आतां पुढें आशा उरली नाहीं असें वाटतें. पुढील कठीण परिस्थितीचें वर्णन हायकोर्टातील विद्वान न्यायाधीश नामदार फील्ड यांनीं एका वाक्यांत केलें आहे, तें असें:—'देशाच्या स्वाभाविक प्रगतीला धरून जे हक्क आम्हीं राज्याचा कारभार करतांना उत्पन्न होऊं दिले त्यांत हात घालून जमीनीच्या स्वामित्वाचीं सिमाचिन्हें हलविण्यापुरतीं कारणें दाखविण्यांत आलीं नाहींत.' हें म्हणणें पोटरयतेला व बिगरवहिवाटदार रयतेसंबंधें पूर्णपणें लागू आहे. हिंदुस्थानांतील मामूल वहिवाटीप्रमाणें असल्या रयतेला कांहीं फायदेशीर हक्क प्राप्त होत नाहींत. मी नेहमीं चुकी कोणी दाखवून देईल तर मान्य करीन असें म्हणून जें बोलावयाचें तें बोलत असतों. पोटरयत व बिगर वहिवाट रयत या नव्यानेंच आतां उत्पन्न करण्यांत आल्या आहेत. आधींच अनेक तऱ्हेचे भिन्न हक्कदार अस्तित्वांत असतां त्यांतच आणखी भिन्नाविभिन्न तऱ्हेचे हक्कदार नव्यानें निर्माण करावयास नको होते."

"रयतेशीं केलेले करार रजिष्टर करावयास लावून रयतेला त्यांच्या द्वारें सुरक्षितपणाचा मार्ग खुला असता तर पुष्कळ रयतेचा फायदा झाला असता. शिवाय पूर्वीं जेथें हक्क अस्तित्वांतच नव्हते, तेथें त्यांच्या निर्मितीच्या शक्याशक्यतेसंबंधें कलमें घालण्यांत आलीं आहेत. उदाहरणार्थ पडित जमिनीसंबंधें. हीं घालण्यांत जर दिरंगाई झाली असती तर सरकारचा फायदा होऊन जमिनींत सुधारणा झाली असती. कोणत्याही वर्गाच्या रयतेचा मूळांत कांहीं हक्क संबंध नसतां नव्यानें केलेले करार सरकारी रीतीनें रजिष्टर केलेले अत:एव सुरक्षित असे करण्यांत लोकांस प्रतिबंध कां असावा तें समजत नाहीं. अशा करारांनीं उभयपक्षांचें कल्याण झालें असतें व देशाची प्रगति झाली असती."

" या मसुद्याविरुद्ध पुष्कळ चळवळ झाली. तिचाही फार गजाबजा करण्यांत आला आहे. तरी उभयपक्षांस सांगतों कीं, त्यांनीं आज कायदा करण्यांत येईल त्याचा अम्मल करण्यास प्रामाणिकपणें साहाय्य करावें मात्र माझ्या मतें दिवाणे दावे इतके वाढणार आहेत कीं किति तें मनांत आणल्यास भयच वाटेल. या मसुद्याच्या एवढ्या प्रचण्ड आवारांत आपसांत समजी करण्याला वाव ठेवणारें एकही कलम नाहीं. हा प्रकार असा कां तें मला अगदीं समजत नाहीं. मी सर्व कागद फार काळजी घेऊन वाचले आहेत. त्यांवरून मला वाटतें कीं, दिवाणी दाव्यांची वाढ या कायद्यानें होईल. म्हणून या मसुद्याच्या विरुद्ध मत दिलें नाहीं तरी मला तर्फे मत देतां येत नाहीं म्हणन वाईट वाटतें."

## प्राप्तीवरील कराचा कायदा.

१८८६ सालीं हिंदुस्थान सरकाराला आपलें उत्पन्न ७०,००,०००, सत्तर लक्ष रुपयांनीं वाढवावयाचें होतें. त्याकरतां प्राप्तीवर कर बसविण्याचा कायदा काउन्सिल पुढें आणण्याची परवानगी सर ए. कॉल्व्हिन यांनीं मागितली. तेव्हां आयात मालावरील जकातीचा प्रश्न उद्भवून त्यावर रावसाहेब फार झगडले.

" शेट वरजीवनदास व शेट शापुरजी यांस सांगा कीं आयात मालावरील जकातीसंबंधाच्या युद्धांत गुंतलों आहे." ( ११।१।८६ शेट हरकिसनदास यांस पत्र )

रावसाहेबांस या कार्यांत कुणाचें साहाय्य मिळालें नाहीं अशी त्यांची तक्रार होती."माझी स्थिति येथें चमत्कारिकच आहे.कौन्सिलांतील चार हिंदी सभासदांपैकीं दोन येथें नाहींत. एका मोठ्या सामर्थ्यवान संस्थेचा एक प्रतिनिधि आहे. पण त्यानें अजून एक ओळही लिहून धाडून दिली नाहीं.चेम्बरचा जो सभासद आहे त्याच्याकडून जेवढें काम होईल अशी आशा वाटत होती तेवढें त्यानें करून ठेवलें आहे. मी फक्त माझे मुद्दे पुढें आणीन व स्वस्थ बसेन. मी सर्वच बिलाविरुद्ध

मत नमूद करून ठेविलें आहे. तुम्हीं ह्मणतां तें मला एकंदर मान्य आहे. पण अद्यापि मुंबईतील सार्वजनिक संस्थांकडून एक अक्षर लिहिलेलें चिटोरेंही आलें नाहीं ! मद्रासकरांनीं मात्र धीटाईनें चाल केली आहे. कलकत्ता हळू हळू मागाहून येत आहे. पण मुंबई कोठेंच नाहीं! " २३।१।८६चें बेंगाली यांस पत्र.

ही अशी असह्य स्थिति रावसाहेबांस खेदकारक झाली असें दिसतें.

" तुम्हांला अजून माझी येथें स्थिति काय आहे तिची बरोबर कल्पना झाली नाहीं असें दिसतें. ती सुखाच्या स्थितीच्या उलट आहे. सिलेक्ट कमिटींतून कायदा बाहेर पडून आला आहे. आतां कांहीं चालणार नाहीं. वाटेल ती सूचना आणली तरी ती खात्रीनें नापसंत ठरेल. ( २३।१।८६ डॉ. भिकाजी यांस पत्र. )

" प्राप्तीवरील कराचा कायदा पुढील शुक्रवारीं निकालास येणार तेव्हां आम्हीं मात्र निराळे राहूं. कारण तो कायदा कायमचा करणार. " ( २३।१। ८६ वे ॥ वामनराव जोशीबुवा यांस मराठी पत्र. )

" या कराच्या आयुर्मर्यादेविषयीं तुमचें मत माझ्याशीं जुळत नाहीं ह्मणून मला वाईट वाटतें. मी स्वतां या कराच्या खात्यांत कलेक्टर होतों व त्या खात्याविषयीं अदमासानें बोलावयाचें व त्याच्या तर्फेनें होईल तेवढें बोलावयाचें ह्मणजे याच्यामुळें चहाडखोर बातमी देणाऱ्यांची सेना, किंवा लफंगे आणि मंडळी इत्यादींचा सुळसुळाट होतो. व त्यांच्यापुढें मोठे सत्ताधीशही हतबल होतात. " ( २६।१।८६ चें शिशिर बाबूंस पत्र )

या युद्धाची कांहीं कल्पना वाचकांस व्हावी ह्मणून हा कायदा काउन्सिलांत पास झाला त्यावेळीं रावसाहेबांनीं भाषण केलें त्याचा सारांश पुढें दिला आहे.

रस्त्यांच्या नाक्यांवरील जकात, म्युनिसिपॅलिट्यांचे कर, मिठावरील कर व तीस तीस वर्षांनीं फेरतपासणी होऊन वाढत जाणारे जमिनीवरील कर इत्यादि सरकारदेण्यानें आधींच ओडघस्तीस आलेल्या शेतीच्या उत्पन्नावर हा कर बसावयाचा नाहीं म्हणून रावसाहेबांनीं आनंद प्रदर्शित केला. त्याच

प्रमाणें खाऱ्या जमीनीवरील उन्हाच्या तापानें झालेल्या खरपुड्या मिठाकरतां ओरपतानां आढळणाऱ्या गरीब प्रजेच्या मिठावर आधींच बसविलेला कर सरकारचें उत्पन्न वाढवावयासही वाढवावयाचा नाहीं म्हणून सरकारच्या शहाणपणाची त्यांनीं तारीफ केली. धान्याप्रमाणेंच मीठ करापासून अगदीं मुक्त पाहिजे, तें शक्य नसेल तर निदान त्यावरचा कर शक्य तितका हलका पाहिजे असें मत नमूद करून ठेवलें*. सत्तर लाखांची तूट भरून काढण्याकरितां आयात मालावरील जकातीची बाब काउन्सिलापुढें नाहीं ही खेदाची गोष्ट आहे, असें सांगून रावसाहेब म्हणाले:—" हिंदुस्थानांत आयात मालावर जकात बसविलेली होती, ती सर्व जगांतील भिन्न देशांत आयात मालावर बसविलेल्या जकातीपेक्षां फारच कमी होती."

"शिवाय विलायतेहून येणारें तलम कापड श्रीमंत लोकांच्या चैनीकरतां असल्यामुळें त्यावरील जकात उठवण्याचें कारण नव्हतें." नंतर १८६७ सालापासून १८८५ सालापर्यंत आयात मालाची वाढ ×टेंकडीच्या आकारापासून पर्वताच्या आकारापर्यंत कशी वाढत गेली तें सालोसालचे आंकडे देऊन सिद्ध

*आपल्या मताला पुष्टि येण्याकरतां जी माहिती पाहिजे ती सशास्त्र असली तरच उपयोगी पडते, हें रहस्य रावसाहेबांस चांगलें कळत असे. म्हणून त्यांनीं तर्टेशास्त्री यांस एक पुढें दिल्याप्रमाणें पत्र लिहून माहिती मागविली होती:—विषूचिका हा रोग कोणत्या सर्वांत प्राचीन ग्रंथांत वर्णिलेला आढळतो? तो उत्पन्न कसा होतो? आणि त्याचा प्रतिकार कोणत्या उपायानें होतो तें कृपा करून लिहून कळवावें आणि अन्नामध्यें मीठ कमीजास्त झाल्यानें विकार वाढण्याचा अधिक संभव आहे किंवा नाहीं आणि या देशांत जसें जसें मीठ महाग होत चाललें आहे तसे तसे विषूचिका व त्यासारखे संसर्गजन्य रोग कमी किंवा अधिक झाल्याविषयींचा आपला अभिप्राय कळवावा. हें काम जितक्या लवकर होईल तितकें करून पाठवावें. असेंच पत्र बाळशास्त्रीबुवा माटे मुकाम पुणें यांस लिहून रावसाहेबांनीं उत्तर मागविलें होतें.

× १८६६–६७ सालीं आयात मालाची किंमत २९,०१,४७,४१३ व १८८४ सालीं तीं ५३,१४,९३,११० पर्यंत वाढली.

केलें. व या मालावरील जकात, जी हलक्यांत हलकी होती ती उठवून हिंदुस्थानचें कसें विनाकारण नुकसान होत गेले तें दाखविलें व आयात मालावर जकात बसविणें हा प्राप्ति वाढविण्याचा हिंदुस्थानाचा कायदेशीर हक्काचा मार्ग असतां तो बंद करण्यास नको होता असें स्पष्ट सांगितलें. शेंकडा सव्वा रुपया प्रमाणें या आयात मालावर जर त्यावेळीं जकात बसविण्यांत आली असती तर ६६ सासष्ट लाख रुपये जमले असते व हिंदुस्थानच्या २५ कोटी प्रजेवर माणशीं अर्धा आणाच कर बसला असता; परंतु गरीब लोक, हें तलम सुताचें कापड वापरीत नसल्यामुळें एवढ्या प्रमाणानेंही कर त्यांच्यावर बसला नसता. श्रीमंतांच्या चैनीला तो सहज झेंपला असता. शिवाय हा कर अप्रत्यक्ष रीतीनें बसत असल्यामुळ प्रत्यक्ष रीतीनें बसत असलेल्या प्राप्तीवरील कराप्रमाणें जाचक झाला नसता. इंग्लंदसुद्धां नेहमीं खुल्या व्यापार पद्धतीचा पाडा ज्याच्या त्याच्या जवळ वाचून प्रसंगोपात्त परकी देशांतून इंग्लंदांत येणाऱ्या मालावर जकात बसविण्यास कमी करीत नाहीं. असें असतां विशेषत: असा आयातीवरील कर गरीबांस मुळींच जाचक नसतां व तो नुसत्या श्रीमंतांवर पडत असतां व हिंदुस्थानच्या तिजोरीस त्यानें बळकटी येत असतां, हिंदी लोकांच्या फायद्याकरतांही नुसती नांवाची म्हणजे अल्प जकात बसविण्यास हिंदुस्थानालाच कां परवानगी नसावी अशी पृच्छा केली. आयात मालावरील जकात वसूल करण्यास खर्च थोडा लागतो व प्राप्तीवरील कराचा वसूल करण्यास खर्च फार लागतो. म्हणून या दुसऱ्या महाग कराचा अंगीकार होत असल्याबद्दल आश्चर्य प्रकट केलें. प्राप्तीवरील कर बसविण्याचा मार्ग निर्वाणीचा उपाय आहे; त्याचा अंगीकार उठल्या बसल्या करावयाचा नसतो असें सुचविलें. या कराचा वसूल करण्यांत मोठमोठाल्या अडचणी उत्पन्न होतात. त्या सर्व जरी सांगत बसावयास नको आहे, तरी हा कर प्रामाणिक मनुष्यास जांचक होतो. मनुष्याची नीति भ्रष्ट करणारा हा मार्ग आहे. असा अनुभव हा कर प्रथम बसविला त्यावेळीं रावसाहेब त्याच कामावर असल्यामुळें त्यांना चांगला आला आहे

असें त्यांनीं सांगितलें. या कराचें अवलंबन करूं नये असें जे लोक आजपर्यंत सविनय वाणीनें सरकारास सांगत आले त्यांच्या त्या वाणींत मी वरील कारणास्तव भर घालीत आहें, असें ह्मणाले. हिंदुस्थानच्या खर्चाची लक्षपूर्वक चवकशी करण्याचें गव्हर्नर जनरल यांनीं ठरविलें आहे. त्याप्रमाणें चवकशी होऊन हा प्राप्तीवरील कर बसवावयास लावणारीं कारणेंच उरणार नाहींत अशी सौख्यावह आशा दर्शविली व ते पुढें ह्मणाले:—" माझ्या इलाख्यांत जमीन मोजणीचें काम संपत आलें असतां त्या खात्याची आतां जरूर नाहीं. तें दहा वर्षांपूर्वीं जेवढें अवाढव्य खर्चाचें होतें तेवढ्याच खर्चाचें आतां आहे. १८२० सालीं या खात्याविषयीं माउंट स्टयूअर्ट एल्फिनस्टन काय ह्मणाले तें लक्षांत घेतां ज्या जिल्ह्यांत या खात्याचें काम सरलें आहे त्या जिल्ह्यांतही या खात्यास चिरंजीवित्व प्राप्त झालें आहे तें वृथा होय. "

"रानाच्या खात्याचें पिलूं आतां इनाम कमीशनाप्रमाणें वाढीस लागलें आहे."

"या सर्व्हे खात्याच्याच पायावर म्हणजे याच इमारतीच्या अवशिष्ट सामग्रींतून शेतीच्या खात्याची रचना होऊं घातलेली आहे. मी स्वतः जमिनीचा मालक आहें. शेती कशी करतात त्याची माहिती आहे व वेळोवेळीं जी माहिती मिळते तिचा मी उपयोग करीत असतों व तीवरून सांगतों कीं या खात्यावर होणाऱ्या खर्चाचें प्रमाण या खात्यापासून होणाऱ्या फायद्याच्या प्रमाणाहून फार मोठें आहे. म्हणून या खात्याकडे प्रेमदृष्टीनें मला पहातां येत नाहीं. परंतु या सर्व खात्याहून आणखीं एक खातें आहे व तें असें आहे कीं एकामागून एक येणारे फडणीस त्याची वाढ छाटण्याविषयीं उत्सुकताच दाखवीत आले आहेत व त्याप्रमाणें सरकारला एक दिवस उद्युक्त झालेंच पाहिजे. तें खातें कोठलें तर सैन्याचें खातें. यांतील स्टाफ कोरमधील बढत्या, सर चार्ल्स ट्रेव्हलियान १८७० सालीं लंदनमध्यें म्हणाले त्याप्रमाणें 'चाकरीच्या वर्षांबरोबर अधिकाधिक मिळत जावयाच्याच. कांहीं वर्षांनीं सर्वच मोठ्या पदवीस पावून मोठाले पगार व मोठ्यांतमोठीं पेनशनें खात बसावयाचे. आम्हीं बरोबरच वृद्ध होत

आहोंत व आमची सारखीच वृद्धि होत आहे हा त्यांच्या गाण्याचा सूर आहे. ही स्थिति समाधानकारक नाहीं व पुढें फार असमाधानकारक होईल.' हें माझें मत नाहीं. पण आतां रेल्वेचा प्रसार झाला आहे. देशांत सर्वत्र शांतता आहे. मग एवढ्या सैन्याची आवश्यकता नाहीं. * सैन्याची कर्तबगारी राखून हा खर्च जर कमी करण्यांत येईल तर प्राप्तीवर कर ठेवण्याचा प्रसंगच येणार नाहीं."

नंतर कर आकारतांना व्यापारी लोकांनीं दिलेले उत्पन्नाचे आंकडे बाहेर फुटतां कामां नये. ही मिळालेली माहिती गुप्त ठेवण्याची खबरदारी घेतली पाहिजे व ती खबरदारी सिलेक्ट कमिटीकडे बिल गेलें म्हणजे घेण्यांत येईल. अशी रावसाहेबांनीं आशा प्रकट केली.

नंतर सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावर चर्चा सुरू व्हावी असें काउन्सिलांत सूचना आणल्यावर रावसाहेबांनीं या कायद्यावर दुसरें मुद्देसूद भाषण केलें. हा कायदा पसार करावयाचाच असेल तर त्याला एक किंवा दोन वर्षांची मुदत घालावी असा त्यांनीं आग्रह धरिला व ह्मणाले "जर हा कर सालोसाल हयात ठेवावयाचा असेल तर या देशाच्या करांचा जो इतिहास आहे तो याच्या विरुद्ध साक्ष देईल. असला प्रत्यक्ष स्वरूपाचा कर या देशाच्या स्थितीस अनुचित आहे. ग्लॅड्स्टन साहेबांचें तर हा कर जास्तींत जास्ती सात वर्षें पर्यंतच राहावा असें म्हणणें आहे. १८३९ पासून १८४४ पर्यंत जांचक असलेले कर ज्या सरकारनें नाहींसें केले त्याच सरकारनें फिरून असला कर बसविण्यास उद्युक्त होता कामां नये. झालेंच तर याची मुदत अमुक असें निश्चयानें ठरविलें पाहिजे."

---

* १८६२ सालीं सैन्य किति होतें व त्याचा खर्च किति होता तेंच आतां १८८४।८५ सालीं किति आहे व त्याचा खर्च किति आहे व मागें सर एडन यांच्या अध्यक्षते खालीं सैन्यासंबंधें सिमल्यास एक कमीशन बसलें होतें, त्याची सर्व हकीकत रावसाहेबांनीं मिळवून ठवली होती.

नंतर नामदार मुकरजी यांनीं " सालोसाल " हे शब्द बिलांतून गाळले जावे अशी सूचना* आणली. हिला रावसाहेब दुजोरा देतांना ह्मणाले.

" आकारणींत विषमता असते या सबबीवर या कराच्या विरुद्ध सर्व जनता असते ही गोष्ट फार महत्वाची आहे. वसुलाच्या कामांत जी रिकामी चवकशी करावी लागते तिचे परिणाम चांगले होत नाहींत व सर्वांत वाईट परिणाम होतो तो हा कीं पुष्कळ फसवाफसवी सुरू होते. ह्या प्रकाराची निंदा करतांना कितीही कडक भाषा वापरली तरी ती मृदुच ठरेल. " या अर्थाचा उतारा ग्लॅड्स्टन साहेबांच्या भाषणांतून देऊन रावसाहेबांनीं आपल्या मताचें समर्थन केलें. सरकारचें काम सुरळीत चालण्यास द्रव्य पाहिजे तें जमविण्यास एक दोन वर्षांपुरतेंच जर अशा कराचें अवलंबन करावयाचें असतें तर मी तर्फेनें मत दिलें असतें. हा कर कायमचा बसवावयास आधार नाहीं म्हणून अशा कराशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं असें स्पष्ट सांगितलें.

नामदार प्यारीमोहन मुकरजी यांची सूचना नापास झाली. हें भाषण रावसाहेबांच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें मुद्देसूद साधार व स्पष्टोक्तिप्रचुर आहे. तें संक्षिप्त असल्यामुळें गौण मुद्यांचें वर्णन त्यांत आलें नाहीं. आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ दिलेलीं कोष्टकें, सर ट्रेव्हलियान सारखे जुने फडणीस व सर विल्यम मॅन्सफील्ड सारखे सैन्याधिकारी व मुंबईचे सोराबजी शापुरजी बेंगाली सारखे अनुभविक व्यापारी यांचीं मतें उचित स्थलीं रावसाहेबांनीं दिलेलीं आहेत. त्या योगानें हें भाषण चिरस्मरणीय झालें आहे.

एवढें सरस भाषण रावसाहेबांनीं केलें खरें पण त्यांतील कांहीं महत्वाचें मुख्यत: सैन्याच्या खर्चासंबंधाचें व दुसरें कांहीं भाषण वर्ज करून बाकी भाषण अँग्लोइंडियनांच्या दैनिकांतून आलें होतें. त्यामुळें मुंबई गॅझेटचे चालक मि. ग्रिअरी यांकडे

---

* या कायद्याच्या मसुद्यांत हा कर कांहीं मुदतीपुरताच आहे अशाबद्दल कांहीं उल्लेख नाहीं. हा कायमच्या स्वरूपाचा आहे. कांहीं मुदत ठरवावी अशी सूचना कोणी आणल्यास ती खात्रीनें नापास होईल. ( १३।१।८६ चें सोराबजींस पत्र. )

रावसाहेबांस आपलें सर्व भाषण तारेनें पाठवावें लागलें व मूळ भाषण विस्तृतपणें मुंबईच्या व कलकत्त्याच्या पत्रांतही येण्याची तजवीज करावी लागली.

लघुलेखनपद्धति त्यावेळेस पूर्णत्वास पोंचली नसावी. रावसाहेबांचें भाषण बिनचूक उतरून घेण्यांत येत नसे अशी त्यांची तक्रार असे. म्हणून सरकारी रीतीप्रमाणें भाषणें छापलीं जात तेव्हां आपल्या भाषणाचीं प्रुफें तपासण्यास रावसाहेब मागवीत असत.

## हिंदू व बाद्ध या धर्मांतील लोकांच्या मृत्युपत्र करण्याच्या अधिकाराविषयींचा कायदा.*

हिंदू व बौद्ध या दोन धर्मांतील लोकांस मृत्युपत्र करून आपल्या मालमत्तेची आपल्या पश्चात् व्यवस्था करण्याच्या अधिकाराविषयीं १८८१ सालीं एका कायद्याचा मसुदा हिंदुस्थान सरकारच्या कायदेकानू करणाऱ्या सभेंत यावयाचा होता. त्यावर मुंबई सरकारनें विचारल्यावरून रावसाहेबांनीं मत दिलें त्याचा सारांशः—

यांतील एक भाग फारफार तर निरर्थक ठरेल व दुसरा परिणामीं घातुक होईल. करूं घातलेल्या कायद्याची अवश्यकता नाहीं, व आहे असें सिद्ध केलेलें नाहीं. अशा तऱ्हेचा कायदा केल्यास आपल्या पवित्र धर्मशास्त्रावर तत्काल घाला आला असें सव हिंदूंस वाटेल. वारसाच्या बाबतींत व इतर करारांच्या बाबतींत हिंदुधर्मशास्त्रांत हात न घालण्याला सरकार मागेंच वचन देऊन चुकलें आहे त्याचा भंग होत आहे असें वाटेल. जुन्या स्मृतिग्रंथांत मृत्युपत्र करण्याच्या अधिकाराविषयीं बीजभूत वचनें आहेत कीं नाहींत हा आतांचा प्रश्न नाहीं, परंतु कांहीं एका तऱ्हेचीं मृत्युपत्रें करून ठेवण्यास स्मृतींचा आधार आहे व त्यावरूनच मृत्युपत्रें करण्याचा हल्लीं तर बराच प्रघात पडला आहे.

---

* या कायद्याच्या मसुद्यावर रावसाहेबांचें मत मुंबई सरकारनें, न्यायखात्यामार्फत मागविलें होतें. तें त्यांनीं व्हाईसरॉयसाहेबांकडे मुंबई सरकारामार्फत पाठवून दिलें.

म्हणून मृत्युपत्रें करण्याच्या वहिवाटीस आळा घालण्यानें इंग्रजी कायद्याच्या धर्तीवर केलेले सूक्ष्मभेदी नियम जे हिंदुसमाजास लागू नाहींत ते त्यास लागू करण्यानें मृत्युपत्र करून मालमत्तेची व्यवस्था करण्याच्या पद्धतीची वाढ होणार नाहीं.

या मसुद्याच्या हेतुपत्रकांत म्हटलें आहे कीं हिंदु–मृत्युपत्राचा १८७० चा एकविसावा कायदा, लोअर बेंगाल, आसाम व मद्रास शहर व मुंबई शहर येथें लागू केल्यानें खोटी शपथ घेणें, बनावट दस्तऐवज करणें इ. कपट-प्रयोगांस गेल्या ११ वर्षांत चांगलाच आळा बसला आहे; म्हणून तो कायदा ब्रिटिश हिंदुस्थानांतील अवशिष्ट राहिलेल्या भागांस लागू करणें इष्ट आहे. पण ज्या ठिकाणीं सक्सेशन ॲक्ट व हिंदु-मृत्युपत्राचा कायदा लागू केलेला नाहीं त्या ठिकाणीं हे गुन्हे सतत अवश्यमेव वाढल्याचीं उदाहरणें सोबतच्या कागदपत्रांत दिलेलीं नाहींत. बनावट लेखांस या कायद्यानें आळा कसा बसेल तें समजत नाहीं. खोट्या शपथेस लेखी मृत्युपत्र असल्यानें अंशतः आळा बसेल.

तुम्हीं मृत्युपत्रच लेखी असावें असें ठरवितां मग मनुष्याचे प्रत्येक करार मदार लेखी असावेत असें कां ठरवीत नाहीं? हिंदुस्थानांत कोणत्याही व्यवहाराला लेख अवश्य आहे असें नाहीं. हा पुरातन संप्रदाय आहे. असें असतां ही पद्धति मोडून टाकण्याकरतां आरंभीं इलाख्याच्या राजधानीच्या बाहेर केलेल्या मृत्युलेखांसच कां हाताशीं धरण्यांत येत आहे?

हा कायदा लागू करण्याचें दुसरें एक कारण सरकार पुढें आणतें तें हें कीं कायदा म्हटला म्हणजे तो सर्वांस समसमान असावा. असें आहे, तर हा कायदा मुसलमानांस कां लागू करीत नाहीं, तें कळण्यासारखें नाहीं. महंमदी धर्मांत तोंडी मृत्युपत्र विहित आहे, व तें तसेंच हिंदुधर्मशास्त्रांतही विहित आहे. खोट्या शपथांची जी सबब हिंदूंच्या पुरता कायदा बदलण्याकरतां पुढें आणण्यांत आली आहे, ती सबब मुसलमानांच्या संबंधेंही कायदा बदलण्याकरतां पुरेशी वाटली

पाहिजे. हल्लींचें बिल व १८७० चा कायदा हीं १८६५ च्या सक्सेशन ॲक्टाचीं विस्तृत रूपें आहेत; पण सक्सेशन ॲक्ट तर हिंदू, मुसलमान व बौद्ध या धर्मांतील लोकांस लागू नाहीं असें ठरलेलें आहे. ब्रह्मदेशांतील बौद्ध धर्मीयांस हा कायदा पाहिजे असेल व ते तसें सांगत असतील तर त्यांच्या गरजेपुरता करा. हिंदूंस, तसेंच महंमदीयांस त्यांच्या धर्मशास्त्रांत हात घालणारा कोणताही कायदा अरुचि उत्पन्न करणारा आहे. हा कायदा करण्यापूर्वीं सरकारनें जरा थांबून स्वस्थपणें विचार करावा अशी माझी विनंति आहे. दहाव्या कलमांत ठरविल्याप्रमाणें हा कायदा कांहीं जिल्ह्यांस लागू करावयाचा नाहीं. म्हणजे ज्यांना हा कायदा लागू करावयाचा आहे त्यांची हा कायदा आमच्याकरतां करा अशी मागणी होती असें सिद्ध होत नाहीं. याचा अर्थ असा होतो कीं हिंदुस्थान ह्मणजे एक नेहमींची कायद्याची प्रयोगभूमि आहे, असें समजलें जातें.

तिसरें कारण असें दाखविण्यांत आलें आहे कीं जेथें जेथें हिंदूंच्या मृत्युपत्राचा कायदा लागू आहे तेथें तेथें जमिनीचा भाव चढत गेला आहे. कारण काय? तर ह्मणे त्यानें जमिनीच्या मालकीचा पत्ता बरोबर लागतो व भराभर खरेदी विक्री होते. त्यावर मी ह्मणतों कीं मुंबई विषयीं विचाराल तर हें ह्मणणें खरें नाहीं. माझा मुंबईच्या जमिनीच्या किंमतीच्या इतिहासाशीं संबंध पुष्कळ येतो. मी स्वतां २० वर्षांच्या पूर्वीं पासून येथील कांहीं जमीनीचा मालक आहें. कारपोरेशनचा सभासद आहें. टाउन काउन्सिलचा सभासद आहें. परंतु या कायद्यानेंच जमीनीची किंमत वाढल्याचें मला ठाऊक नाहीं.

हिंदु अथवा बौद्ध मनुष्याला मृत्युपत्रावरून मालमत्तेची विल्हेवाट लावण्याचा अधिकार केवढा आहे तें निश्चित करण्याकरतां कलम ३ हें घातलेलें आहे, व तो अधिकार केवढा आहे असें पुसाल तर तें कलम सांगतें कीं हिंदु अथवा बौद्ध म्हणून अवशिष्ट रिक्थोपभोग घेण्याचा ज्यांचा हक्क आहे त्यांसंबंधें कांहीं निर्बंध ठेऊन मालमत्तेची विल्हेवाट करण्याचा त्याला जेवढा अधिकार

आहे तेवढा ! म्हणजे हिंदुधर्मशास्त्राकडे अथवा बौद्धधर्माकडे वळल्याशिवाय वरील मृत्युपत्रविषयक अधिकार निश्चित करितां येत नाहीं. मग या कलमाचा उपयोग काय ? हें कलम घालून एका विशिष्ट शब्दसमुच्चयाबद्दल दुसऱ्या विशिष्ट शब्दसमुच्चयाची योजना करणें हें घोटाळा उत्पन्न करण्यासारखें आहे.

यांत हिंदूंचा अविभक्तपणा (Joint Family) व इंग्लिशांचा संयुक्तोपभोगाधिकार (Joint Tenancy) यांत साम्य आहे पण ऐक्य नाहीं. म्हणून हिंदु कुटुंबाचें वर्णन इंग्रजी पारिभाषिक शब्दांत करणें अनर्थावह आहे.

स्वार्जित मालमत्ता कोणती ? जिची विल्हेवाट लावतां येते ती मालमत्ता कोणती ? व अविभक्त कुटुंबांतील मनुष्यें दोन्हीं तऱ्हेच्या मालमत्तेच्या विल्हेवाटीस किती आळा घालूं शकतील ? हे हिंदुधर्मशास्त्रांतील गहन प्रश्न आहेत. त्याविषयीं परस्परविरुद्ध निवाडे होत असतात. म्हणून त्यांविषयीं कायद्यास निश्चितपणा येईतों हें कलम करणें इष्ट नाहीं. मृत्युपत्र करून बापानें लावलेली विल्हेवाट गैर कायदा आहे असें ठरविण्यास मुलानें आणलेल्या फिर्यादीवरून १८८१ च्या दुसऱ्या अपीलांत मुंबई हायकोर्टांत दोन न्यायाधीशांनीं एकत्र बसून ती विल्हेवाट उलटी फिरवली याचा अर्थ असा होतो कीं टिकाऊ फारकत करणें अशक्य नसलें तरी अव्यवहार्य आहे. पश्चिमहिंदुस्थानांत या कायद्याचें तिसरें कलम निष्फल आहे.

यांवरून कोणी असें म्हणेल कीं अशी परिस्थिति असल्यावर असले कायदेच करतां यावयाचे नाहींत. जर लोकांत असलेल्या रूढीवरून ( जिच्याविषयींचा पुरावा नीट गोळा केला आहे तीवरून ) न्यायाधीश निर्णय करूं लागतील व इंग्रजी विचारांनीं रंगित झालेल्या अत एव अधिक विकृत झालेल्या हिंदुधर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या भाषांतरांतील उताऱ्यांवरून निर्णय करण्याचें बंद करतील तर हल्लीं ज्या चुक्या होत आहेत त्या कमी होतील. कांहीं तरी सार्वजनिक हिताचें काल्पनिक ध्येय ( जें आम्हीं हिंदू अंशतः सुद्धां मानीत नाहीं तें ) पुढें ठेऊन हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक रचनेंत ढवळाढवळ कर-

ण्याचें टाळण्याविषयीं जितका सावधपणा कायदे करतांना ठेवण्यांत येइल तितका अवश्य आहे.

मनुष्याच्या खऱ्या इच्छेप्रमाणें व्यवस्था करण्याला जर निर्बंध घातले तर इच्छापत्रावरून आपल्या मालमत्तेची विल्हेवाट लावण्याला उत्तेजन मिळणार नाहीं. कपटप्रयोगाची बंदी व मालमत्तेचें कायदेशीर स्वाभ्यंतर होण्याकरितां जे निर्बंध घालतां येतील ( मग ते किति कां महाग पडतना ? तरी ) ते घालावे असें मी कबूल करीन. इच्छापत्रावरून मालमत्तेची विल्हेवाट करण्याविषयींच्या कायद्याची हल्लींची अवस्था म्हणजे बाल्यावस्थाच आहे. तिला जर आमच्यांत असलेल्या दानधर्म करण्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीची जोड होऊं दिली व सुशिक्षित लोकांनीं चांगलें वळण लावलें तर पृथ्वीच्या भारंभार कल्याण होईल म्हणून या कायद्याच्या वाढीला निर्बन्ध घालूं नये व लोकांच्या इतर सामाजिक संस्थांबरोबर ती वाढ सारखी होऊं द्यावी. इंग्रजी गुंतागुंतीच्या कायद्याचें रोंप हिंदुस्थानांतील इच्छापत्रांच्या भूमींत लावलें तर इच्छापत्र करणाऱ्या पुष्कळ हिंदूंच्या धर्मादाय करण्याच्या प्रवृत्तीची परिणामीं हानि होईल.

आतांपर्यंत हिंदूंच्या मृत्युपत्राला कायद्याच्या सर्व पारिभाषिक बन्धनांपासून मुक्त ठेवण्याची प्रवृत्ति आहे ती आतां नष्ट होणार आहे. उदाहरणार्थ इलाख्यांतील राजधानीच्या शहराबाहेर मृत्युपत्र केलें असतां आतां मात्र त्यास साक्षीदार ( जे मागें लागत नव्हते ते ) लागणार आहेत.

मृत्युपत्राचा अर्थ कसा करावा, मृत्युपत्रांत निर्दिष्ट केलेल्या कोणत्या बाबी गैर कायदा समजाव्यात व एका व्यक्तीस कांहीं दोन चार वस्तू देऊं करून दुसऱ्यास त्यांतील कांहीं देऊं केल्यास त्या वस्तूंपैकीं पहिल्यानें कोठल्यांची हक्कानें मागणी करावी या विषयींचे नियम करावयास पाहिजेत हें खरें. पण इतक्या गोष्टी केल्यावर इलाख्याबाहेरील लोकांस कायद्याचें जें ज्ञान जितकें सूक्ष्म लागेल तें तितकें आहे असें आज २५ वर्षांचा त्यांच्या संपर्कानें मिळालेला अनुभव मला सांगत नाहीं. मृत्युपत्राचा नमुना—जो इलाख्याबाहेर पाळला जातो

तोच—अजन ठेवावा व मृत्युपत्र करण्याची साधारण वहिवाट पडेतों-पर्यंत फार निर्बंध उत्पन्न करूं नयेत. अद्यापि निर्बंध नसतांना बाहेर गांवीं मृत्युपत्र केल्याशिवाय मृत्यु पावणाऱ्यांची संख्या, मृत्युपत्र करून मृत्युपावणाऱ्यांच्या संख्येपेक्षां अधिक आहे. म्हणून मृत्युपत्रांच्या बाबतींत निर्बंध घालण्यानें मृत्युपत्र करून मालमत्तेची विल्हेवाट करण्याच्या वाढीस आळा बसेल.

इत्यादि कारणांवरून हा कायदा करण्याचें काम पुढें चालणार नाहीं अशी आशा, कर्तव्य ह्मणून करता.

( ६-१-१८८२ )

---

# प्रकरण ६६ वें.



## लार्ड रिपन.*



। पुराणमित्येव न साधु सर्वम् ।
॥ न चा पि काव्यं नवमित्यवद्यम् ॥
। सन्तः परीक्ष्यान्यतरद् भजन्ते ।
॥ मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥ १ ॥
( कालिदास . )

एक गव्हर्नर जनरल निजधामास जावयास निघाले व त्यांच्या ठिकाणीं दुसऱ्याची नेमणूक झाली कीं हा अमका, तमक्या राजपक्षीय इंग्लदच्या मंत्रि-

* लार्ड रिपन यांनीं मुंबईच्या किनाऱ्यावर पाय ठेविला तेव्हांच रावसाहेबांची व त्यांची ओळख करून देण्यांत आली व मुंबईम्युनिसिपॅलिटीनें लार्ड रिपन यांस जें मानपत्र दिलें तें त्यांस अर्पण करण्याचें काम रावसाहेबांनीं कारपोरेशनचे अध्यक्ष या नात्यानें केलें. त्याच्या पुढें रावसाहेबांची व त्यांची मैत्री जडून गेली.

वराचा पट्टशिष्य ! तो तमका, अमक्या मंत्रिश्रेष्ठाच्या पसंतीचा ! असा व्यक्तिविषयक वाद सुरू होतो. त्याला ब्रिटिश हिंदुस्थानच्या इतिहासांत स्थळ मिळतां कामा नये; कारण ब्रिटिश राजसंस्था ही पुष्कळ प्रगतिपर * आहे.

एक पुढें टाकलेलें पाऊल स्थिर झाल्यावर दुसरें पाऊल उचलून पुढें टाकीपर्यंत जो मध्यें काळ जातो त्यांतील सुधारणा दृश्य स्वरूपाची नसते. कित्येकवेळां कित्येकांस पिछेहाट होत आहे अशी शंका वाटते; परंतु पाऊल पुढें टाकण्याची वेळ आली म्हणजे जो अधिकारारूढ असतो, त्याच्याकडे प्रगतीचें श्रेय अधिक येतें. असा प्रकार लार्ड रिपन यांच्या कारकीर्दींत झाला.

अशा व्यापक दृष्टीनें हिंदुस्थानच्या या वेळच्या इतिहासाकडे लक्ष दिलें म्हणजे लार्ड रिपन यांच्या कारकीर्दीचें वर्म लक्ष्यांत येईल. तें वर्म न्यायमूर्ति वेस्ट यांच्या चांगलें ध्यानांत आलें होतें.

मुंबई युनिव्हर्सिटीनें लार्ड रिपन यांस स्वदेशीं जातांना एल्. एल्. डी. ही पदवी अर्पण करून त्यांचा सन्मान केला, नव्हे स्वतांचा सन्मान करून घेतला, त्यावेळेस, व्हाइस चॅन्सेलर नामदार वेस्ट, आपल्या भाषणांत ह्मणाले:—"लार्ड रिपन हे हिंदुस्थानांत आले तेव्हां काळ कोणचा होता तो पहा. इंग्रजी विद्येच्या प्रसारानें लोकांच्या मनांत राजकीय सुधारणेच्या नव्या कल्पना रुजल्या होत्या व राज्यकारभारास नवीन वळण राज्यकर्त्यांनीं द्यावें अशी सार्वत्रिक इच्छा उत्पन्न झाली होती. तेव्हां या त्यांच्या कल्पना व ही त्यांची इच्छा फलद्रूप होऊं द्यावीं, कीं त्यांच्याशीं वाद घालीत बसून वर्दळीस यावें असा आणीबाणीचा काळ आला होता. प्रत्येक राष्ट्रांत असा काळ येतोच व तेव्हां नव्या झालेल्या स्थित्यंतराशीं एक जुळतें घ्यावें लागतें अथवा उभय-

---

* ब्रिटिश राजसंस्थेच्या या गुणाची जाणीव रावसाहेबांस होती. "आमची प्रगति मंद आहे. म्हणून ती कमी मनासारखी आहे असें नाहीं."

(ज. जेकब यांस पत्र. १८७५)

पक्षीं मतभेदामुळें फारखत करून घ्यावी लागते. " तात्पर्य लार्ड रिपन हे एक त्या काळानें उत्पन्न केलेली व्यक्ति होते. अशी व्यापक दृष्टि ठेवली म्हणजे व्यक्तिविषयक वाद नाहींसा होतो.

लार्ड रिपन यांनीं अफगाणिस्थानाचें युद्ध थांबवून अमीराशीं दोस्ती केली. जमाबंदीविषयीं जी ओरड झाली होती तींत अतिशयोक्ति आहे असें ठरविलें. व जमाबंदीची स्थिति चांगली आहे असें कळतांच कांहीं कर कमी करण्याचें ठरविलें. व त्याप्रमाणें मीठावरचा कर कमी केला. इंग्रजी उदार शिक्षणानें ज्या आकांक्षा हिंदी लोकांत उत्पन्न झाल्या होत्या त्या पूर्ण करण्यास मोठाल्या जागा हिंदी लोकांस अधिक प्रमाणांत दिल्या. यांतीलच कलकत्त्याच्या चीफ जस्टीसची बदली जागा होती. वर्तमानपत्रकारांविषयींचा कायदा रद्द केला व समर्याद लेख लिहिण्याचा बोजा लेखकांवर टाकून लेखनस्वातंत्र्य लोकांस दिलें. स्वदेशी मालास उत्तेजन दिलें. लोकशिक्षणाच्या विस्ताराची तजवीज केली. दुष्काळांत सूट देण्याचे नियम केले. सेव्हिंग्स बँकांची सुरवात केली. अशा कृत्यांची एकानें ३१ बाबींची यादी केली आहे. त्यांतील मुख्य आणखी दोन राहिलीं आहेत. १ स्थानिक स्वराज्य व २ इलबर्ट बिल. हीं उत्तमोत्तम होत*.

## स्थानिक स्वराज्य.

स्थानिक स्वराज्याची प्राप्ति जी लोकांस लार्ड रिपन यांनीं करून दिली ती एक वरच देऊन टाकिला. त्याचा इतिहास खुद्द लार्ड रिपन यांनीं येथून मोठी कीर्ति व सन्मान मिळवून परत देशीं गेल्यावर तेथील लोकांनीं सभा भरवून त्यांचा सन्मान केला तेव्हां निवेदन केला.

---

* लार्ड रिपन यांची नीति, १८५८ च्या महाराणीसाहेबांच्या जाहीरनाम्याप्रमाणें वागणारी हिंदीलोकांस पसंत पडली. आमच्या कल्याणाकरितां इंग्रजांची आमच्यावर राज्य करण्याची इच्छा आहे असें तिनें पटवून दिलें. मुंबईकरांनीं सभा भरवून लार्ड रिपन यांच्या अधिकाराची मुदत वाढवावी असा महाराणीसाहेबांकडे अर्ज मुंबईच्या गव्हरनर साहेबांमार्फत पाठविला.

लार्ड रिपन म्हणाले:—“ १८६४ त लार्ड लारेन्स यांनींच प्रथम सांगितलें कीं स्थानिक स्वराज्याला हिंदीलोक पात्र आहेत. म्युनिसिपॅलिट्यांच्या संस्था त्यांस नवीन नाहींत. लार्ड मेयो त्याच मताचे होते. त्यांनीं पंचवार्षिकी ठराव इलाख्याच्या सरकारांशीं करतांना कांहीं रकम त्यांच्या खुद्द खर्चाला देण्याची पद्धत सुरू केली व आम्हीं स्थानिक सरकाराजवळून कांहीं रकम-म्युनिसिपॅलिट्यांस देवविण्याचें ठरविलें. ”

“ १८७३ मध्यें निवडणुकीचें तत्त्व अम्मलांत आणण्याला अधिकार इलाख्यांच्या सरकारांस दिला होता. पण त्यांच्यावर सक्ति नव्हती. म्हणून आम्हीं तें तत्त्व अम्मलांत आणण्याचा निश्चय केला. ”

असा त्यांनीं स्थानिक स्वराज्याचा पाया घातला. सरकारी अम्मल म्युनिसिपॅलिट्यांवर देखरेखी पुरता असावा असा त्यांचा हेतु आहे. योग्य सार्वजानिक हिताची कळकळ दाखवून त्यावर इमारत रचणें हें कर्तव्यदक्ष हिंदी जनांचें काम आहे.

## इलबर्ट बिल.

स्थानिक स्वराज्याप्रमाणेंच “इलबर्ट बिल” हें इंग्रजांच्या प्रगतिपर धोरणाचें फल आहे. याचा इतिहास लार्ड रिपन यांच्या वर निर्दिष्ट केलेल्या इंग्लंदमधील भाषणांतूनच घेतला पाहिजे. लार्ड रिपन ह्मणाले:— “ या बिलाची अवश्यकता काय होती हें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे युरोपियन गुन्हेगारांची चवकशी करण्याचा अधिकार विशिष्ट कोर्टातांसच होता. हिंदी सेशन्सजज्ज व हिंदी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांस नव्हता. परंतु सिव्हिल सर्व्हिसमध्यें हिंदी जनांस वाव मिळाल्यावर पुष्कळ हिंदी सिव्हिलियनांस डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व सेशन्सजज्ज यांचे हुद्दे मिळूं लागले. व म्हणूनच त्यांच्या पदवीस योग्य असे अधिकार त्यांस देणें इष्ट झालें. ”

सरकारी कारभारांत वर्णभेद नाहींसा करण्याच्या हेतूनें नामदार इलबर्ट यांनीं कलकत्त्याच्या सभेंत हें बिल आणलें. तें विरुद्ध बाजूच्या लोकांस पटेना. त्यांनीं

कलकत्त्यास एक डिफेन्स असोशिएशन स्थापिली. व आकाश पाताळ एक केलें. त्यांत व्यापारी व मळेवाले पुष्कळ होते. त्यांनीं पुष्कळ कोपपूरित लेख लिहिले व सभांतून निरर्गल भाषणें केलीं. " आम्हीं जेते आहोंत " हा मुख्य मुद्दा होता. एकजण ह्मणाले कीं आम्हीं इलबर्ट यांच्या पंक्तीस बसणार नाहीं. इ. इ. या प्रकारचा प्रतिध्वनि विलायतेसही उठला. या अधिकाराविषयीं हिंदी लोकांची विशेष मागणी नसतां हा उपद्व्याप कां केला अशी पृच्छा कांहीं विरुद्ध पक्षाच्या लोकानीं केली तेव्हां प्रोफेसर वर्ड्स्वर्थ यांनीं दैनिक पत्रांत एकपत्र छापिलें व म्हणाले कीं दूरकालावर दृष्टि ठेवून जें काम पुढें करावयाचें तें अगोदर करून लोकक्षोभ टाळावयाचा हें जें इंग्लंदच्या बर्कचें तत्त्व होतें व फ्रान्स मधील टुर्गोचें तत्त्व होतें, तेंच तत्त्व लार्ड रिपन यांनीं अंगीकारलें आहे.

अशावेळेस हिंदी लोकांनीं काय करावें हा प्रश्न उभा राहिला व मुंबई-करांनीं बिलाच्या तर्फें सभा भरून चळवळ करण्यास आरंभ केला. तेव्हां मि. दादाभाईनीं पुढील पत्र रावसाहेबांस लिहिलें. " या सभेकडे सर्व युरोपियन लोकांचें लक्ष लागलें आहे. कांहीं युरोपियन व्यापारी या सभेचें काम कसें काय चालविण्यांत येईल तें पाहण्याकरितां मुद्दाम या सभेंत हजर राहणार आहेत. हिंदुस्थानांतील इतर भागांतून सुद्धां कांहीं रिपोर्टर येणार आहेत. एका प्रतिष्ठित व हिंदी लोकांविषयीं कळकळ बाळगणाऱ्या युरोपियनानें मला असें बजावून सांगितलें आहे कीं या सभेंत बोलणाऱ्यांच्या तोंडांतून एकादा शब्द चिढून जाऊन कमी जास्ती निघाला व युरोपियन लोकांवर कोणी हल्ला करून त्यांच्या विरुद्ध कलुषित झालेलें मत दाखविलें, तर तें हानिकारक होईल; कारण तेवढ्यावरून युरोपियन असें म्हणतील कीं हिंदी लोक युरोपियनानें केलेल्या गुन्ह्याची चौकशी करण्यास नालायक आहेत. "

( दादाभाई नवरोजी यांचें २८–४–८३ चें पत्र )

काशिनाथपंत तेलंग हे रावसाहेबांजवळ एक दिवस ह्मणाले:— कलकत्त्याचे लोक सभा वगैरे भरवणार नाहीं आहेत, कारण एकादे प्रसंगीं कांहीं द्वेषव्यंजक

शब्द वक्त्याच्या तोंडून निघाले तर युरोपियन लोक ह्मणूं लागतील पहा हे आमचा द्वेष करणारे हिंदी लोक आमच्या गुन्हेगारांची चौकशी करण्यास लायक कसे होतील ! ”

असे जर कलकत्त्याचे लोक स्वस्थ बसत असतील तर तें चुकीचें आहे. सभा भरविल्या पाहिजेत असें कळविण्याकरितां रावसाहेबांनीं सुरेन्द्र बाबंस एक पत्र लिहिलें तें:—“आमची व कायद्याची बाजू एक आहे. आमचा व शान्ततेचा मार्ग एक आहे. समदर्शीन्यायाच्या पथानें चालणाऱ्या सरकारचा व आमचा पक्ष एक आहे. ह्मणून व्यवहारज्ञानाच्या दृष्टीनें विचारतों आह्मीं सरकारच्या बाजूचें समर्थन करण्यास सभा कां न भराव्या ? व त्या फक्त मुंबईतच नव्हेत, तर सर्व देशभर कां न भराव्या ? आह्मीं मि. बॅचें * उदाहरण गिरवणार नाहीं पण आह्मीं धमकीला भिणार नाहीं.” १६।४।८३

त्याप्रमाणें इलबर्ट बिलाच्या तर्फे टाऊन हालमध्यें लोकांची सभा भरली होती तींत रावसाहेबांनीं केलेल्या भाषणाचा सारांश:—

“ सरकारांत पाठवावयाच्या अर्जाचा मसुदा लोकांस वाचून दाखविण्याचें काम माझेकडे सोंपविलेलें आहे. तें करण्यापूर्वीं मला कांहीं बोलावयाचें आहे. खरें विचाराल तर मी सभेपुढें येणारा ठराव तुम्हांला कांहीं प्रास्ताविक भाषण केल्याशिवाय एकदम वाचून दाखविला असता, कारण माझ्या अगोदर जे माझे दोन विद्वान मित्र भाषण करून गेले त्यांनीं या कायद्याच्या मसुद्याचा स्वीकार करण्यापूर्वीं जें जें कांहीं बोलण्यासारखें होतें तें तें बोलून टाकलेंच आहे व मला त्या प्रश्नावर बोलण्यासारखें अगदीं थोडेंच वगळलें आहे. कधीं कधीं मौन सेविलें असतां त्याचा विपरीतार्थ करतात. आजचा प्रसंग तसलाच आहे म्हणून ज्यासंबंधें माझे विद्वान मित्र बोलले नाहींत किंवा ज्याचा व्हॉइसरायांच्या सभेंतील विस्तृत वादविवादांत कांहीं निर्देश केलेला नाहीं त्यासंबंधें थोडें बोलतों.

* हे एक कलकत्त्याकडील युरोपियन गृहस्थ होते. यांनीं या बिलाच्या विरुद्ध चळवळ करतांना धमकीवजा भाषण केलें होतें.

आजच्या कायद्याचा मसुदा म्हणजे मारक्विस ऑफ हेस्टिंग्सच्या वेळेपासून हिंदुस्थानविषयक सरकारचें उदार, थोर व सुसंबद्ध असें जें राजनीतीचें धोरण सतत दिसून येत आहे त्याचें ऐतिहासिक फळ आहे ( टाळ्या. ) मागें एका कायद्यानें विशिष्टराष्ट्रसंभव न्यायाधीशासच विशिष्ट प्रकारच्या दाव्यांचा निकाल करण्याचा अधिकार असे. तो अधिकार एका कायद्यानें सर्व जातीच्या न्याया-धीशांस देण्यांत आला. त्याप्रमाणें हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत सर्व न्याया-धीश तो अधिकार बजावीत आहेत. १८५२–५३ सालीं कंपनी सरकारच्या चार्टरची मुदत वाढविण्याच्या वेळीं लायक हिंदी लोकांस सरकारच्या निर-निराळ्या खात्यांत हुद्याच्या जागा देण्याची शिफारस करण्याची वेळ आली तेव्हां सर जॉर्ज क्लार्क व सर फ्रेडरिक हॅलिडे यांच्यासारख्या अनुभवी लोकांनीं कांहीं शंका घेतल्या त्या आतां कदाचित् तुम्हीं केवळ लहर लागली म्हणून घेतल्या असें म्हणाल. कायदेकानू करणाऱ्या सभेंत वरिष्ठ जागेवर हिंदी लोकांस नेम-ण्याच्या योजनेची उपयुक्तता त्यांस कां दिसली नाहीं त्याचीं कारणें १८५३ च्या कमीशनबुकांत आढळतील. बेंगालचे ले. गव्हर्नर सर हॅलिडे यांचें म्हणणें असें पडलें कीं अशा नेमणुकांनीं मत्सरादि संकटें उद्भवतील. उदाहरण म्हणून लार्ड दलहौसीनीं अशी एक नेमणूक केली होती तिची हकीकत सांगितली; परंतु अनुभवांतीं त्यांची भीति निराधार ठरली. कारण असें मत देऊन दहा वर्षें झालीं नाहींत तोंच सर जार्ज क्लार्क यांनीं याच सरकारवाड्याच्या, याच दरबार भरण्याच्या दिवाणखान्यांत कायदेकानू करणाऱ्या सभेंत सरकारास कायदे करण्याकरतां साहाय्य करण्यास हिंदी लोकांचा प्रवेश झाला म्हणून मनःपूर्वक अभिनंदन केलें. त्याप्रमाणें हिंदी लोकांनीं त्यांना सभेंत घेत्यावेळीं मनांत ठेवलेल्या आकांक्षा कशा पुऱ्या केल्या व ते कशा करतील तें प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध झालेंच आहे. याच्या पुढची पायरी म्हणजे राणीसरकारच्या हायकोर्टांतील न्यायाधीशाच्या जागेवर हिंदी गृहस्थाची नेमणूक करतां येते असें ठरविणें होय. गेल्या वीस वर्षांपासून हिंदी गृहस्थ न्यायाधीशाचें काम करीत आहेत.

फौजदारी सेशनांतील काम सुद्धां हिंदी न्यायाधीश करीत आहेत. त्याच्या योगानें कसलीही गैरसोय झाली नाहीं. कोणीही अपवादार्ह वर्तन केलें नाहीं. बुद्ध्या अन्याय केला नाहीं. न्यायाधीश न्याय करीत असतां व आरोपींची चौकशी चालली असतां दोघांनींही अनुचित वर्तन केलें नाहीं. सभ्य गृहस्थहो ! हें सरकारच्या राजनीतीचें धोरण १८३३ सालींच निश्चित झालें होतें. व सरकारचें शिक्षणविषयक धोरण मात्र ५७ सालापर्यंत निश्चित झालेलें नव्हतें. या धोरणांत वारंवार बरीच चलबिचल अगोदर झाली होती. या देशांतील व खुद्द इंग्लंदांतलि लोक सरकारच्या या धोरणावर हल्ला करतांना एक शस्त्र उचलीत तें हें कीं जें शिक्षण हिंदी लोकांस देण्यांत यत आहे तें ब्रिटिश साम्राज्याच्या राजकीय हिताच्या वृद्धीस सर्वथा उचित असें नाहीं. त्यावेळीं फ्रेंड ऑफ इंडिया म्हणून जें पत्र होतें तें, ज्या भव्य बंगाल प्रांतांत निघत होतें त्या प्रांताच्या लोकांच्या हिताच्या विरुद्ध जाणारें होतें असें मी त्याचा कांहीं अपराध केल्याशिवाय म्हणतों. बंगाली लोकांच्या तें पत्र विरुद्ध होतें असें मी म्हटलें म्हणजे इतर इलाख्यांतील लोकांच्या तर्फे होतें, असें नाहीं. परंतु बंगाली लोकांविषयीं त्यांतील लेखकाच्या मनांत जे पूर्वग्रह होते त्याचा रंग त्या पत्रांतील लेखांस विशेष चढत असे. या पत्राच्या १८५९ च्या एका अंकांत सरकारच्या शिक्षणविषयक धोरणाचें निरीक्षण करून त्याचा लेखक असें असंदिग्ध भाषेंत उच्चस्वरानें म्हणतो कीं शिकलेला बंगाली तरुण अथवा शिकलेला कोणताही तरुण हिंदी ध्याना, तो आम्हांस आवडत नाहीं हें जरी खरें आहे तरी आम्हीं असें सांगतो कीं आम्हांस जुन्या सुखी काळांतील जुन्या तऱ्हेच्या विनम्र लोकापेक्षां हा एकदम आवडतो. ( टाळ्या. ) १८५३ ते ५९, १८५९ ते ६३ व १८६३ ते ८३ पर्यंत जो काळ गेला त्याचें निरीक्षण केलें असतां तुम्हांला असें आढळेल कीं हिंदी कान्व्हनेंटेड सिव्हिलियन लोक आपलें काम समाधानकारक रीतीनें आज वीस वर्षें करीत आले आहेत. हायकोर्टामध्यें हिंदी जज्ज तीस वर्षें त्याप्रमाणें काम करीत आले आहेत. व वीस वर्षां-

वर शिकलेले वजनदार हिंदी गृहस्थ कायदेकानू करणाऱ्या प्रांतिक व वरिष्ठ सल्लागार सभेंत आपल्या सामर्थ्याप्रमाणें उत्तम काम मुंबई, बंगाल व मद्रास या ठिकाणीं करीत आले आहेत व त्यापासून राष्ट्रावर एकही संकट कोसळलें नाहीं. मि. क्विन्टन् व मि. गिब्स यांचीं अनेक भाषणें मी या दिवाणखान्यांत ऐकिलीं आहेत. ते जर या मसुद्याचें समर्थन करीत आहेत तर आम्हींही त्या मसुद्याचें समर्थन केलें असतां आम्हीं आपल्या संगतींत चांगले लोक घेऊन आहोंत असें ठरेल. याच चळवळीला मूळापासून एकामागून एक येणाऱ्या स्टेट सेक्रेटरींचा, मग ते राजपक्षीय असोत किंवा प्रजापक्षीय असोत, त्यांचा, कित्येक प्रसिद्ध गव्हर्नरजनरलांचा व त्यांच्याचपैकीं हल्लीं राणीसाहेबांच्या प्रतिनिधीची पदवी धारण करून ब्रिटिश साम्राज्याचें वैभव वाढविण्यास जे कारण झाले आहेत त्यांचा पाठिंबा आहे. या मसुद्यास ब्रिटिश लोकांची निःपक्षपाती प्रतिनिधि जी पार्लमेंट सभा तिचा पाठिंबा आहे. जर पंचवीस कोट प्रजेचें हित त्याच्या योगानें होणार आहे, तर तुम्हीं, आतां जो अर्जाचा मसुदा मी वाचून दाखविणार आहें त्यास मंजुरी द्या. (२८ एप्रिल १८८३ )

याशिवाय सर जमशेटजी जीजीभाई. मि. बद्रुद्दिन तय्यबजी, मि. फिरोजशहा मेथा; महमदल्ली रोगे व के. टी. तेलंग यांचीं भाषणें झालीं.

विरुद्ध बाजूच्या लोकांनीं पुष्कळ चळवळ केली पण या बिलाचा शेवट गोड झाला व इंग्रज लोकांच्या खऱ्या उदार स्वभावाचा विजयच झाला. हिंदी डिस्ट्रिक्ट मेजिस्ट्रेटांस व सेशन्स जज्जांस युरोपियन गुन्हेगारांची चवकशी करण्याचा अधिकार देण्यांत आला. व युरोपियन गुन्हेगारांस स्वजातीय जूरर मागण्याचा अधिकार प्राप्त झाला. म्हणजे तडजोड झाली.

इतकी कामगिरी केल्यावर लार्ड रिपन हे आपल्या मुदतीच्या आधींच ४।६ महिने इंग्लंड मध्यें जावयास निघाले तेव्हां मुंबईकरांनीं त्यांस मानपत्र अर्पण करून, स्मारक करून व इतर रीतीनें आपली कृतज्ञता दाखवून त्यांचा सन्मान करण्याचा निश्चय केला.

लॉर्ड **रिपन** यांस देण्याच्या मानपत्राच्या मसुद्यास लोकांची संमति मिळवते वेळीं टाऊन हालांत **रावसाहेबांनीं** केलेल्या भाषणाचा सारांश:-

" आजच्या सभेला **मुंबईतील** प्रसिद्ध गिरण्यांचे व बाहेरील प्रदेशांतून लोकांचे प्रतिनिधी हजर आहेत. **खानदेश** व **सोलापूर** यांसारख्या मोठ्या जिल्ह्यांचे प्रतिनिधी आले आहेत. त्यांना तेथील भिन्न समाजाचा पाठिंबा आहे व आमच्या सभेंत चाललेल्या गोष्टींनीं त्यांचें मन वेधलेलें आहे. हें मानपत्र आम्हीं लॉर्ड **रिपन** यांस अर्पण करणार आहों त्याप्रसंगीं ते पुन्हां हजर राहणार आहेत. " ( टाळ्या. )

" सोरटी **सोमनाथाचे** दरवाजे परत आणून प्रसिद्धीस येण्याचा एकाद्या * गव्हर्नरजनरलाचा काळ निघून गेला. ( हंशा ) केवळ रणांतील पराक्रमाच्या युगांतून आम्हीं पार पुढें गेलों आहोंत. आतां व्यापाराच्या युगास व विद्युत्साहाय्यानें संदेश निवेदन करण्याच्या युगास आरंभ झाला आहे. आजच्या सभेशीं व सर्व हिंदुस्थानाशीं लॉर्ड **रिपन** यांचा संबंध जोडणारी तशाच प्रकारची एक विद्युत्प्रवाहशक्ति आहे. या शक्तीच्यामुळें आज सर्वांचें चित्तैक्य होऊन आम्हीं या ठिकाणीं जमलों आहोंत. हल्लींच्या व्हॉइसरायांच्या कारकीर्दीनें नैतिक शक्ति उत्पन्न केली आहे. व त्याच शक्तीनें त्याच कारकीर्दीविषयीं आमच्यामध्यें आदर, प्रेम व कृतज्ञता हीं उत्पन्न झालीं आहेत. तीं कशीं तें या मानपत्राच्या मसुद्यांत दाखविलेलें आहे. मी बाहेरील इलाख्याचे प्रतिनिधी आले आहेत असें तुम्हांस सांगितल्यावर माझ्या हातांत दोन तारा येऊन पडल्या आहेत. राजे लोकांच्या दानशूरत्वाला शोभतील अशा देणग्या दोन संस्थानिकांनीं दिल्याचें वृत्त कथन करून त्या असें तारा दर्शवीत आहेत कीं या मोठ्या कारकीर्दीच्या ब्रिटिश प्रजेनें चालविलेल्या प्रशंसाकार्याशीं संस्थानिक आपणाला जोडून घेत आहेत. हे दुवे **काठेवाडचे** आहेत. त्यांत **लिम**-डीचे राजे एक आहेत. प्रत्येकीं आंकडा पांच हजारांचा पडला आहे एवढ्या-

* लार्ड **एलनबरो** यांनीं **अफगानिस्थानच्या** स्वारींत **गझनीच्या** मशिदीचे दरवाजे **सोमनाथाच्या** देवालयाचे समजून परत आणले.

वरून असें सिद्ध होत आहे कीं आम्हीं येथें आज ज्या कामाकरतां जमलों आहों त्या कामांत (ह्मणजे आह्मांस सोडून जाणारे गव्हर्नर जनरल यांस साभार मानपत्र अर्पण करण्याच्या गौरवाच्या कामांत ) आम्हांला आमच्या सर्व लोकांचा व संस्थानिकांचा पाठिंबा आहे असें तुम्हीं समजा. " ( टाळ्या. )

१३ आगष्ट ८४

लार्ड रिपन यांची देशीं परत जाण्याची तारीख ठरली नाहीं तोंच त्यांचा सन्मान करण्यास लोकांनीं आरंभ केला. एलाप्पा बाळाराम यांनीं हिंदु शेतकऱ्यांच्या मंडळामार्फत चार पांच हजार लोकांची सभा भरविली होती. त्यांत शेतकरी, कामकरी व बागवान अशा लोकांचा भरणा होता. सभा भायखळ्यावर भरली होती. तिचा उद्देश लॉर्ड रिपन साहेब यांच्या अंमदानींत लोककल्याणाचे जे चांगले उपाय योजण्यांत आले त्याबद्दल त्यांचे आभार मानण्याचा होता. अशी शेतकऱ्यांची सभा मुंबईत कधीं भरली नव्हती. त्यांचें मानपत्र गव्हर्नरसाहेबांस अर्पण करण्याचें काम रावसाहेब कलकत्त्यास असतां त्यांजकडे सोंपविलें होतें.त्याप्रमाणें त्यांनीं खुद्द लाटसाहेबांस मानपत्र अर्पण केलें व त्याच्या प्रती काउन्सिलदारांत वांटल्या कलकत्ता सोडून लार्ड रिपन मुंबईस यावयाच्या वेळीं रावसाहेब कलकत्त्यास होते. 'मी लार्ड रिपन यांस पोंचवून येतों' असा निरोप लार्ड डफरिन यांचा घेऊन रावसाहेब मुंबईस दाखल झाले.

मुंबईस आल्यावर लार्ड रिपन यांचा सन्मान झाला तो अभूतपूर्व होता, त्यांच्या दर्शनार्थ आबालवृद्धस्त्रीपुरुषांची गर्दी वाटोवाट उभी होती.

राणीच्या पुतळ्यापाशीं त्यांच्या गाडीचे घोडे सोडून ती गाडी अपालो बंदरापर्यंत ओढीत न्यावयाचा लोकांनीं केलेला संकल्प लार्ड रिपन यांस वर्तमानपत्रांतून माहित झाल्यावरून त्यांनीं रावसाहेबांस कळविलें कीं लोकांस तसें करूं देण्याची माझी इच्छा नाहीं.

लोकांनीं त्यांच्यावर जागोजाग पुष्पवृष्टि केली ती इतकी कीं त्यांची बसावयाची गाडी मधून मधून उपसून काढावी लागली. या सन्मानाचें वृत्त

ऐकून इग्लंदमधील लोकांनींही या राणीसाहेबांच्यां मंत्रिवराचा सन्मान केला. त्यावरून सुद्धां यांची कारकीर्द किति लोकप्रिय होती तें कळेल.

लार्ड रिपन यांचें यथोचित स्मारक करण्यामध्यें रावसाहेबांनीं व त्यांच्या स्नेह्यांनीं फार मेहनत घेतली होती. पैसे मिळण्याला फार अडचण मुळीं पडली नव्हती परंतु आतां पर्यंत जी स्मारकाची कल्पना लोकांत होती ती एकादी तसबीर रंगाविणें किंवा पुतळा उभारणें किंवा शिष्यवृत्ति ठेवणें याच्या पलिकडे गेलेली नव्हती. मतभेत झाला तर रंगांत पैसे घालावयाचे का दगडांत घालावयाचे एवढाच असे. आतां त्या सांप्रदायास रावसाहेब व त्यांचे स्नेही यांच्या मनांतून निराळेंच इष्ट वळण द्यावयाचें होतें. लार्ड रिपन यांनीं आपल्या उत्तम कामगिरीनें असंख्य लोकांचें कायमचें कल्याण करून जी अवाढव्य कीर्ति संपादन केली तिला साजेल असें भलें मोठें स्मारक करून ज्या लोकांकरतां त्यांनीं काम केलें त्यांचेंच कायमचें कल्याण होत जाईल अशी संस्था काढावयाची होती. मुंबईंत स्मारकाची जी सभा झाली तींत ठराव असा झाला कीं मार्क्विस आफ् रिपन यांनीं केलेल्या श्रेष्ठ कामगिरीबद्दल त्यांचें नांव धंदेशिक्षण देणाऱ्या संस्थेशीं कायमचें संबद्ध व्हावें. अशी संस्था काढावयाची म्हणजे तिला द्रव्यनिधिही प्रचन्डच लागेल हें रावसाहेब जाणून होते. म्हणून त्यांनीं प्रथम द्रव्य पुष्कळ जमवि-ण्याची खटपट चालू केली. फंडाच्या व्याजांतून खर्च चालेल इतकी मोठी रक्कम गोळा करावयाची होती. वरील सभेचे चिटणीस रावसाहेब, काशि-नाथपंत तेलंग, मि. फिरोजशहा मेथा, मि. बद्रुद्दिन तैय्यबजी, मि. एम्. सी. मर्झबान; हरकिसनदास, मि. पी. एफ्. गोम्स इ. हिंदू, पार्सी, मुसलमान व ख्रिश्चन अशा भिन्न धर्माच्या लोकांतील पुढारी गृहस्थ होते. मुंबईइलाखाधिपति लार्ड रे यांची सहानुभूति या कामाला होती. धंदे शिक्षणाला कसें उत्तेजन देतां येईल या संबंधें तज्ञ म्हणून प्रसिद्ध असे मि. नवरोजी वाडिया यांचें मत लार्ड रे यांनीं मागविलें होतें, व त्यांच्या खाजगी भेटी होत असत. सदरहू नवरोजी यांनीं युरोप व अमेरिका येथील प्रसिद्ध धंदे शिक्षणाच्या संस्थांची

हकीकत मिळविली होती. त्यांत मुख्य मुख्य माहिती खालीं दिल्याप्रमाणें होती. संस्था ज्या शहरांत असेल तेथील लोकसंख्या, संस्थेचें नांव, जमिनीची व इमारतीची किंमत, यंत्रसामग्री, विद्यार्थ्यांची संख्या, त्यांस एकंदर लागणारा खर्च व तो निभावण्याचे मार्ग इ. राक्षसी माहिती मिळविली होती व छापून प्रसिद्ध केली होती. ती वाचून कोणासही कौतुक वाटेल.

रावसाहेब १८८५ च्या आरंभीं कलकत्त्यास होते. तरी तेथून ते आपल्या स्नेह्यांस उत्तेजन देत होतेच. २१।१।८५ रोजीं त्यांनीं खालील पत्र हरकिसन दास यांस लिहिलें. “ लार्ड रिपन यांच्या स्मारकाकरितां पैसे गोळा करण्याचें काम चांगल्या लोकांच्या हातांत आहे. इतके पैसे गोळा करून तुम्हीं नांव मिळाविलें आहे. पण एव्हांशींच दमूं नका ! त्रासूं नका ! प्रवासाला नुकताच प्रारंभ केला आहे. तुम्हीं हातीं घेतलेल्या कार्याबद्दल तुमची स्तुति कोणी करणार नाहीं. पण तें कार्य मात्र उत्तम आहे. त्याचा मोबदला ( पुसाल तर जो उत्तम आहे तो ) कर्तव्य केल्याबद्दलचें समाधान होय. तुम्हीं आपल्या स्वभावाप्रमाणें सन्थपणें काम करा. म्हणजे लोकांच्या ध्यानींही आलें नसेल एवढें काम तुमच्या हातून होईल. ” ( ३०।१।८६ )

एक लक्षावर रक्कम उभी होतांच स्मारक करण्याचा रावसाहेबांनीं आपला बेत लार्ड रिपन यांस कळविला होता. “ आम्हीं एक लक्ष रुपयांवर रक्कम जमविली आहे. एक मध्यवर्ती यांत्रिक कलाकौशल्याची सर्व प्रकारचें धंदेशिक्षण देणारी शाळा तूर्त काढावी व नंतर हळू हळू पश्चिम हिंदुस्थानांत सर्वत्र तिच्या शाखा काढाव्या असें मनांत आहे* सरकारांतून वार्षिक मदत घ्यावी किंवा न घ्यावी अशाबद्दल आमच्यामध्यें मतभेद आहे. मी मदत घेण्याच्या विरुद्ध आहें कारण मला आम्हीं चालवि-

* “ स्मारकाच्या पैशानें आमच्या मुलांस धंदेशिक्षण आमच्या मनाप्रमाणें मिळावें ” म्हणून ही संस्था स्वतंत्र एकट्या लोकाश्रयावर चालविण्याचा त्यांचा प्रथम बेत होता, असें दुसऱ्या पत्रावरून दिसतें.

लेल्या संस्था पाहिजे आहेत. या करतां इंग्लंदमधील कांहीं मोठमोठ्या यांत्रिक कला शिकवणाऱ्या संस्थांच्या चालकांची व आमची ओळख झाली तर पाहिजे आहे. तिनें आमचें हित होईल."(१५।१२।१८८५चें लार्ड रिपन यांस पत्र.)

" शिल्पकलाविषयक एक शाळा काढावयाची आहे. ती कशी काढावी याची योजना मि. मर्झबान यांस तयार करण्यास तुम्हीं स्वतां अथवा हर-किसनदास यांच्या मार्फत सांगूं शकाल तर मेहरबानी करून सांगा. मुंबईच्या गिरण्यांच्या धंद्याला १०।१२ शें उपयोगी पडतील असेच बारीक सारीक धंदे शिकवावयाचे. जास्त मोठी कल्पना मनांत आणून वाहून जाऊं नको. मी खटपट करण्यास तयार आहें. पण पुढाकार तुह्मीं घेतला पाहिजे. तुमच्या कडे कोणतेंही सरकार दुर्लक्ष करणार नाहीं किंवा करूं शकणार नाहीं."

" ज्यांचा विचारून घेण्याचा हक्क आहे त्या तुमच्या सारख्या गृहस्थांस विचारल्याशिवाय तुह्मीं ह्मणतां तशा इतर योजना दुसरे लोक करीत आहेत ते चुकत नाहींत काय ?"

" जो सारखा धांवत सुटतो त्याच्यानें शर्यत जिंकण्याचें काम होत नाहीं. त्याप्रमाणें केवळ सशक्त मनुष्याला युद्धांत जय मिळविण्याचें काम होत नाहीं."

" एका गोष्टीचा तुम्हीं विचार करावा ही माझी इच्छा आहे. व ती कोणती म्हणाल तर आमची संस्था अगदीं स्वावलंबी झाली पाहिजे. तुमचा माझा या बाबतींत मतभेद आहे हें मी जाणून आहे परंतु तुम्हीं या बाबतींत अगदीं स्वतंत्र संस्था काढल्याशिवाय साऱ्या जगांत जेवढ्या शाळा आहेत तेवढ्या काढूनही आमचे कांहींबाहींही कल्याण व्हावयाचें नाहीं."

( सोराबजी शेट यांस २३।१२।८५ चें पत्र. )

आणखी चार पांच दिवसांनीं खुद्द मर्झबान यांस वरील प्रमाणें कांहीं योजना करण्यास पत्रीं विनंति रावसाहेबांनीं केली होती. त्याप्रमाणें मि. डि. कास्टा यांची याच विषयासंबंधें भेट घेण्यास 'दाजिवांस' ( दाजीसाहेब खरे यांस ) लिहिलें होतें.

धंदेशिक्षणाबद्दल जो इतका आग्रह रावसाहेबांनीं धरला त्याचें कारण हा विचार त्यांच्या मनांत बरेच दिवसांपासून घोळत होता. रावसाहेब शिक्षणखात्यांत असतांनाच धंदेशिक्षणाविषयीं त्यांचें व मि. अरस्किन पेरी यांचें संभाषण चाले परंतु कांहीं संस्था काढण्यापर्यंत मजल गेली नव्हती. ती घेण्याची संधि आतां आली.

या जमविलेल्या पैशावर मुंबईचें प्रसिद्ध रिपन टेक्स्टाइल स्कूल, ( व्हिक्टोरिया जुबिली टेक्निकल स्कूलाशीं संगत असलेलें ) चाललें आहे. व शेंकडों कलाभिज्ञ विद्यार्थी बाहेर पडत आहेत. या शाळेस सरकारची मदत आहे.

## स्थानिक स्वराज्याची लार्ड रिपन यांची योजना+ ही अंधेरांत घेतलेली उडी आहे काय ?

लार्ड रिपन यांनीं स्थानिक स्वराज्याचा विस्तार करून त्यास स्थैर्य व बल आणण्याकरतां कांहीं ठराव केले. ते उचित आहेत कीं अनुचित आहेत याविषयीं कांहीं अधिकारी चर्चा करूं लागले. तेव्हां रावसाहेबांनीं एक चर्चात्मक निबंध लिहिला त्याचा सारांश.

"मुंबई सरकारचा अजून विचारच चालला आहे असें दिसतें. तें आपल्या २५ मार्च १८८२ च्या ठरावांत म्हणतें:—

'स्थानिक स्वराज्याच्या पद्धतीचा अधिक विस्तार करावा कीं करूं नये हा प्रश्न सोडवणें फार कठीण आहे. या इलाख्यांत ज्या जिल्हा लोकलफंड कमिट्या, तालुका लोकलफंड कमिट्या, व म्युनिसिपॅलिट्या आहेत, त्यांच्या हातांत आधींच मोठाले फंड आहेत. व ते फंड खर्च करण्याचा स्वेच्छानुसार अधिकार त्यांना दिलेलाच आहे. तथापि हल्लींची जी त्या कमिट्यांची रचना आहे ती मनांत आणतां दुसऱ्या आणखी खर्चाच्या बाबींचा कारभार त्यांच्या स्वाधीन केल्यापासून फायदा होईल कीं नाहीं हें संशयित आहे.'

+लार्ड रिपन यांचें धोरण रावसाहेबांस पसंत होते. तेव्हां त्यांच्या मताच्या समर्थनार्थ रावसाहेब जे लेख लिहित असत त्यांपैकीं हा एक आहे.

" जर वरील कमिस्यांची व म्युनिसिपॅलिस्यांची रचना अयोग्य असेल, तर ती योग्य रीतीनें करून कामाला आरंभ करावा असें मला वाटतें. त्यांची रचना उपयुक्त तऱ्हेनें करतां येईल काय ? याला कोणतें उत्तर मागील इतिहास देत आहे ? सर्व आर्थिक, सामाजिक व राजकीय वावटळींतून या देशाच्या पश्चिम भागांतील ग्रामसंस्था जितक्या निभावून राहिल्या आहेत तितक्या दुसऱ्या कोठल्याही राहिल्या नाहींत. ( पहा एल्फिन्स्टन्‌कृत हिंदुस्थानाचा इतिहास, आवृत्ति चवथी पृ० २४६–७; ग्रॅन्ड डफ्‌कृत मराठ्यांचा इतिहास भाग १; दक्षिण महाराष्ट्रांतील जमीन वहिवाटण्याच्या पद्धतीवरील ले. क. साईक्स यांनीं रायल एशिॲटिक सोसायटीचें जर्नल भाग २ पृ. २०५ व भाग ३ पृ. ३५० मध्यें छापलेला निबंध. ) बारा अलुतेदार, बारा बलुतेदार, पाटील, चौघुले, चौधरी यांपासून तों वेशकरी वर्गापर्यंत ( रक्षकवर्गापर्यंत ) सर्वांनीं मिळून रचलेल्या आमच्या ग्रामसंस्था म्हणजे आमच्या स्वदेशसंभूत म्युनिसिपॅलिट्याच होत. त्या अगदीं आधुनिक स्वरूपाच्या नसतील. पण त्या येथें आहेत. कालांतरानें विचारक्रान्ति झाली आहे. कायदे बदलले आहेत. शिक्षणांत फरक झाला आहे. तरी त्या अजून आपलें ठाणें धरून आहेत. युरोपमधील भपकेदार गोष्टींची ज्या माझ्या मित्रांतून कांहींना आवड असेल त्यांना, एकादा पाटील माझे झूल घातलेले बैल मिरवणुकीच्या पुढें ठेवण्याचा व त्यांना प्रथम चालू करण्याचा माझा हक्क आहे असें सांगू लागला, अथवा एकाद्या समारंभांत लोक जमले असतां पहिल्यानें माझ्या कपाळावर गन्धाचा टिळा लावून घेण्याचा वंशपरंपरा हक्क एकादा महाजन सांगू लागला, किंवा एकादा मातादार १८७४ च्या वतन ॲक्टानें त्याची सर्व प्राप्ति वस्तुतः बंद झाली असूनही कांहीं गांवासंबंधें कागदपत्रांवर सही करण्यास सोत्कण्ठ तयार असतांना दिसला तर हंसूंच कोसळेल ! परंतु या सर्व हक्कांच्या मुळाशीं म्युनिसिपॅलिटीविषयक नागरिक भावना आहे. येथें इष्ट ती सामग्री आहे. तिला नीट शिक्षणाच्या योगानें राजकीय वळण देऊन तिच्या घटणेंत सुधा-

रणा केल्यास फार हित होणार आहे. माझ्या ह्मणण्याला आमच्या पुरातन इतिहासाचा आधार घेऊन सांगतों कीं लार्ड रिपन हे अंधेरांत उडी घेत नाहींत. त्यांनीं केलेले ठराव हे आजपर्यंत हिंदुस्थान सरकार जें संगत रूपाचें आस्ते आस्ते धोरण स्वीकारीत आलें आहे त्याचें व गेल्या पन्नास वर्षांत जे शिक्षणाचे परिणाम घडून आले आहेत त्यांचें दिग्दर्शन करीत आहेत. त्या परिणामांचीं हे ठराव प्रशस्त स्मारकेंच आहेत. आमच्या म्युनिसिपॉलिट्यांच्या कारभाराची १८५६ पर्यंतची माहिती, मुंबईसरकारच्या हुकुमावरून १८५६ सालीं मि. एडवर्ड प्रॅट यांनीं निवडक कागदपत्र छापिले आहेत त्यांत आहे. त्याविषयींची सर्व चर्चा सर जॉर्ज आर्थर यांनीं १८४४ तच प्रथम केली होती. नंतर पुन्हा लार्ड फॉकलन्ड यांनीं १८४९ सालीं सुरू केली होती. तीवरून १८५० सालीं २६ नंबरचा कायदा करण्यांत आला तो आमच्या म्युनिसिपॅलिट्यांचें अधिष्ठान होय."

नंतर थोडक्यांत मुंबई म्युनिसिपॅलिटीच्या सुधारणेचें वृत्त* देऊन रावसाहेब ह्मणतातः—

"मुंबई म्युनिसिपॅलिटींत लोकांच्या प्रतिनिधींचें प्रमाण होमिओपॅथिक पद्धतीच्या औषधांच्या प्रमाणांसारखें सूक्ष्म असून सरकारी अंगाचें प्रमाण वैद्यकीय औषधांच्या प्रमाणासारखें परिप्लुत आहे. असा जो मागेंच मुंबई म्युनिसिपॅलिटीच्या कायद्याविषयीं त्यावेळचे येथील एड्व्होकेट जनरल व नंतर कलकत्त्याचे न्यायाधीश नामदार व्हाईट यांनीं म्हणून ठेवलें आहे, तें अद्यापिही त्यास लागू आहे. अशी स्थिति जर मुंबईची, तर बाहेरची कशी असेल ! तेथें कांहीं अपवाद सोडून आमची पिच्छेहाट होत आहे. मी दोन ध्यानांत ठेवण्यासारखीं उदाहरण देतों. पुणें शहरांत कमीशनर होते. ते स्थानिक स्वराज्याच्या बाबतींत चांगली सुधारणा करीत होते. ते स्वतंत्र बाण्याचे व योग्य असे होते. त्यांना टाकून मौनाप्रिय मनुष्यांची निवड करण्याची प्रवृत्ति पुढें दिसून आली.

* पहा प्रकरण ४१ वें पृष्ठ ४६४.

दुसरें उदाहरण महाबळेश्वरचें ( मुंबई सरकारच्या उन्हाळ्यादिवसांतल्या निवासस्थानाचें ) घ्या. तेथील कमिटींतील मुंबईचे स्वतंत्र बाण्याचे लोक गुपचूपपणें निष्कासन पावले. सरकारानें पाहिजे तर यादी आणवून पहावें. किंचित् प्राप्ति नसतां कमिटींत बसून फुकट काम करा आणि त्याचें बक्षिस म्हणून निर्भर्त्सना करून घ्या ! एवढें कोणाचें अडतें आहे ? पण ज्या ठिकाणचे अधिकारी अनुभवशून्य अथवा हट्टी अथवा दोन्हीं असतात त्या ठिकाणीं अशीच परिस्थिति उत्पन्न होते. या देशांत स्वतांचें असें कांहीं मत बाळगणें हें पाप समजलें जातें. त्याचें प्रदर्शन करण्याचें धैर्य अंगीं असणें व त्याच्या समर्थनार्थ कारणें दाखविणें हें तर त्याहून मोठेंच पाप ! अशी समजूत होऊं देणें हा दोष आहे, मग तो युरोपियनांत असो अथवा हिंदी लोकांत असो, त्याचे परिणाम अनर्थावह आहेत. म्युनिसिपॅलिटीच्या कारभाराविषयींचे मी सर्व रिपोर्ट वाचले आहेत. त्यांवरून लोक आपलें कर्तव्य करीत नाहींत अशी तक्रार केलेली आढळत नाहीं. क्रमशः प्रगति होत असल्याचाच त्यांत उल्लेख आढळतो. प्रतिनिधि निवडण्याचा हक्क आम्हांस द्या अशी १८७७ सालीं पुणेकरांनीं केलेली मागणी मान्य झाल्याचें आजमितीसही मला कळलें नाहीं. ”

“ स्थानिक स्वराज्याचा विस्तार करणें इष्ट आहे व तसें केल्यानें सरकारचें व लोकांचें हित होईल अशी हिंदुस्थान सरकारची फार वर्षांपूर्वीं खात्री होऊन गेली आहे. ” असें सांगून, ६२१ पृष्ठांत दिलेल्या नामदार लेंग ( गव्हर्नर जनरल यांचे फडणीस ) यांच्या भाषणाचा सारांश रावसाहेबांनीं निवेदन केला व हिंदुस्थान सरकारच्या २२४५ नंबरच्या ३१ आगष्ट १८६४ तारखेच्या ठरावाचा उल्लेख केला व नंतर “ ही जी हिंदुस्थान सरकारची स्थानिक स्वराज्याचा विस्तार करण्याची नीति आहे ती प्रशस्त आहे. तिला व्यावहारिक स्वरूप देण्यास सरकारी अधिकारी व सरकारचे कायदे हे परस्पर साहाय्यकारी होत आहेत. यांच्या योगानें ज्या सुधारणा होणार आहेत, जें हित होणार आहे त्यांहून अधिक दुसऱ्या कशानें होणार नाहीं ” असें मत

प्रदर्शन करणारा आपल्या मतास पुष्टि आणणारा बाह्य पुरावा ह्मणून कलकत्ता रिव्ह्यू नं. ८३ पृ. २६ मधील पुढील उतारा दिला आहे.

" म्युनिसिपॅलिट्यांसंबंधाच्या सर्व चळवळी देशाची भरभराट होण्याची इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक मनुष्याचें तेव्हांच लक्ष वेधून घेतात त्याचीं कारणें भिन्न आहेत. त्यांचीं पाळेंमुळें खोल गेलेलीं आहेत. ब्रिटिश राजसत्ता एकीकरणानें संहत करण्याकरतां राजसत्तेची विभागणी करावी लागली. राज्ययंत्रांतील चक्रांतर्गत चक्रें नीट प्रस्थापित होऊन सुरळित गति त्यांस प्राप्त झाली. राज्याच्या विस्ताराबरोबर गव्हर्नरां मागून लेफ्टनन्ट गव्हर्नर आले; प्रोकॉन्सल आले; त्याप्रमाणेंच स्थानिक काउन्सिलें निर्माण झालीं. याच तत्त्वांवर लोकलफंड निघाले अशी श्रम विभागाची वांटणी झाली नसती तर राज्याचा गाडा चालला नसता. कोणतीही अल्पस्वल्प गोष्ट करावयाची झाली म्हणजे गव्हर्नर जनरल यांचा हुकूम अगोदर घेतला पाहिजे, ही जी लार्ड कॉर्नवालिस यांच्या वेळची पद्धति होती तिच्या आधारें आतां कोणत्याही गव्हर्नर जनरलास चालतां येणें अशक्य आहे यास्तव श्रमाची विभागणी म्हणजे राज्याची बळकटी आहे प्रगतीचें चिन्ह आहे. राज्यकर्ते आपली जबाबदारी ओळखून आहेत व जेव्हां इष्ट तेव्हां, अवश्य तेव्हां, सुधारणेच्या कण्टकमय पथानें जाण्याची त्यांची तयारी आहे; नव्हे, त्यांना सामर्थ्य आहे असें ती श्रमविभागणी दाखविते. "

पुढें रावसाहेब म्हणतात "या उताऱ्यांत बंगाल्यांत पसरलेलें पक्षाभिमानाचें वारें कोठें कोठें दिसून यत असल्यामुळें यांतील सर्वच म्हणणें ग्राह्य आहे असें म्हटल्याशिवाय हा उतारा दिला आहे, कारण आम्हीं क्वचित् गोष्टींतल्या सिंहाच्या जागीं असून आमचे ॲन्ग्लो इन्डियन टीकाकार त्या गोष्टींतील मानव चितारी आहेत. "

नंतर रावसाहेबांनीं त्याच मासिक पुस्तकांतील १८७० सालचा उतारा दिला आहे त्याचा सारांश:—

"आरोग्यरक्षक मंडळ्या या सदराखालीं येणारीं म्युनिसिपल कमीशनें स्थापन झाल्यानें सार्वजनिक आरोग्याचें रक्षण ( विशेषतः मोठाल्या शहरांत ) जितकें होऊं लागलें आहे तितकें कोणत्याही इतर कायद्यानें प्रस्थापित झालेल्या संस्थांनीं झालें नाहीं.

स्थानिक स्वराज्याचा लाभ करून देण्याच्या कामीं यांचा उपयोग झाला आहे तो निराळाच. असल्या संस्थांची प्रगति कांहीं सभासदांनीं केलेल्या विरोधावर, करून दिलेल्या गैरसमजावर, मांडलेल्या कलहावर व आरंभलेल्या मिथ्या निंदेवर अवलंबून असते. कदाचित् त्यांनीं असें केलें तरच बरें. सर्व सरकारी अथवा सार्वजनिक संस्थांचें संरक्षण कार्यविरोधाकडे असतें. म्युनिसिपल कमीशनांविषयीं वर्तमानपत्रांत येणारे लेख, घेतले जाणारे आक्षेप व केली जाणारी निंदा हीं विशेषतः नसलीं तरी साधारणतः प्रगतीचीं लक्षणेंच आहेत. गेल्या दहा वर्षांत इलाख्यांतील राजधानीच्या ठिकाणीं व ज्या शहरांत हिंदी व युरोपियन अशा लोकांची वसति आहे त्या शहरांत म्युनिसिपॅलिट्याची स्थापना झाली आहे. त्यांतील पुष्कळांचें मूळ आरोग्यरक्षक मंडळांतच होतें. अद्यापि या म्युनिसिपलिट्या स्वतंत्र आहेत, ज्ञानोद्दीपक आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. कालें करून तसें त्यांस म्हणतां येईल यांत संशय नाहीं. परंतु अद्यापि अध्यक्ष नेमणें व कांहीं जादा सभासद नेमणें हे अधिकार सरकारनें आपल्याकडे ठेविले आहेत हें अल्पकालिकच आहे कारण हिंदी लोक जसजसे म्युनिसिपॅलिटीचें काम अधिकाधिक मन लावून करतील तसतसें स्थानिक स्वराज्य त्यांच्या हातांत अधिकाधिक पडत जाईल. ”

नंतर लार्ड मेयोच्या सत्ताविभागणीच्या धोरणास पुष्टि आणणारी १८६१। ६२ सालीं मि. लेंग यांनीं जी नोंद केली आहे तिचा उल्लेख रावसाहेबांनीं केला आहे. ती नोंद अशी:—

“ स्थानिक जमाखर्चाचे खर्डे करावयास लावून म्युनिसिपल संस्थांची वृद्धिच होणार आहे. तिच्याहून अधिक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ही आहे कीं लोकांस स्वतांच्या पायांवर उभें राहण्याची व स्वतःच आपला मार्ग काढण्याची संवय स्थानिक संस्थांसंबंधें लागणार आहे. व या दोन गुणांतच राष्ट्राचा मोठेपणा आहे. ( इंडिया गॅझेट पृष्ठ ४७७ ता. १८ मार्च १८७१ ) ”

नंतर नार्थवेस्ट प्राव्हिन्सिसच्या लेफटनन्ट गव्हर्नरच्या गव्हर्नर जनरल यांस उद्देशून केलेल्या भाषणांतील उतारा रावसाहेबांनीं दिला आहे तो:—

“ स्थानिक कायदे करणारें काउन्सिल कां नसावें ? त्याला लागणारी सर्व सामग्री उपलब्ध आहे. सरकारी अधिकारी आहेत. त्यांस साहाय्य करण्यास समर्थ असे स्वतंत्र बाण्याचे हिंदी लोक आहेत. इलाख्यांच्या राजधानींचीं शहरें सोडली तर

युरोपियन लोक काम करावयास फार मिळणार नाहींत. पण कांहीं प्रतिनिधी होण्यास लायक असे मिळतील. असलीं काउन्सिलें थोरल्या साम्राज्याच्या काउन्सिलापेक्षां चौकीदारी बिलासारख्या स्थानिक प्रश्नांची चर्चा करण्यास फारच अधिक उपयोगाचीं आहेत. असें स्थानिक काउन्सिल असलें म्हणजे वरील प्रश्नांची चवकशी कमिटींत होत. त्यांवर काउन्सिलांत वादविवाद होतो करविण्यांत येणाऱ्या कायद्यांच्या हेतूंवर चर्चा होते. हिंदी वर्तमानपत्रें तशींच युरोपियन वर्तमानपत्रें ते प्रश्न हातांत घेतात व त्यांविषयीं सर्व लोकांस पूर्ण ज्ञान होतें म्हणजे त्या प्रश्नांस हल्लीं जें स्वरूप प्राप्त झालेलें नाहीं तें सार्वजनिक स्वरूप प्राप्त होतें."

" मी खाविंदास सांगतों कीं लोकांनीं आपला कारभार आपला आपणच करावा अशी माझी उत्कट इच्छा आहे. त्या दिशेनें माझे सतत प्रयत्न चालले आहेत. मी कोठेंही दौऱ्यावर निघालों तरी मी सर्व म्युनिसिपल कमिट्यांच्या मनावर जी एक गोष्ट बिंबवून देत असतों ती ही कीं स्थानिक स्वराज्याची प्राप्ति करून देणें हाच एक हेतु आमचा म्युनिसिपल संस्था स्थापण्यांत आहे. आम्हांस लोकांकडून सहकारोचित उत्तर मिळत आहे. आपल्या लोकाच्या हितानहितासंबंधाच्या प्रश्नांची जबाबदारीनें चर्चा करणाऱ्या प्रतिनिधींनीं संयुक्त अशा काउन्सिलच्या स्थापनेनें स्वतंत्रपणें कार्य करून दाखविण्यास लोकांस जसें व जेवढें वळण लागणार आहे, तसें व तेवढें दुसऱ्या कोणत्याही राजकीय उपायानें लागणार नाहीं अशी माझी खात्री आहे."

" उपयोगी असे स्थानिक कायदे करावयास लायक आणखी दुसरे कोण असणार ? विवक्षित प्रांतांतील लोकांच्या गरजा काय आहेत, त्यांच्या इच्छा काय आहेत, कदाचित् त्यांचे पूर्वग्रह काय आहेत, तें त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाला चांगलें ठाऊक असणार ? "

या प्रश्नांस लार्ड मेयो यांनीं जबाब दिला कीं:—

सुराज्याची वृद्धि करणाऱ्या ज्या ज्या बीजभूत संस्था आहेत त्यांची स्थापना करण्यात परिश्रम घेण्याहून दुसरें अधिक श्रेयस्कर कार्य नाहीं.

एवढे उतारे देऊन रावसाहेब म्हणतात. " याच्यापुढें मला लिहिण्यासारखें अगदीं थोडें उरलें आहे. गेल्या बारा वर्षांचे लेखी इतिहास म्हणजे आमच्या राज्यकारभाराचे रिपोर्ट, इंग्लंदच्या पार्लमेंट सभेला सादर केलेले आमच्या नैतिक व भौतिक प्रगतीचे वार्षिक रिपोर्ट, शिक्षणखात्यांच्या डायरेक्टरांच्या

रिपोर्टांत व विश्वविद्यालयांच्या पदवीदानसमयीं केलेल्या भाषणांत दृश्य होणारी सर्व इलाख्यांतील शिक्षणाची वृद्धि, हीं सर्व असें दाखवितात कीं ब्रिटिश सत्तेच्या सुदर्शनानें रक्षित होत्साते जे आम्हीं त्यांची मानसिक, नैतिक, व राजकीय अभिवृद्धि अपरिमित प्रमाणांत सतत व अविच्छिन्नपणें होत आहे. गेल्या जानेवारी महिन्यांत कलकत्त्याच्या काउन्सिलांत जेव्हां मध्यप्रांतांतील स्थानिक स्वराज्याचा प्रश्न निघाला होता तेव्हां नामदार गिब्स हे स्थानिक स्वराज्याचा लाभ मध्यप्रांतांतील लोकांस करून देण्याकरतां याच मुद्यावर चिकाटी धरून बसले होते. व हाच एक मुद्दा लॉर्ड रिपन यांच्या स्थानिक स्वराज्याच्या ठरावाविषयीं व तद्विषयक त्यांच्या धोरणां विषयीं अथवा शहाणपणाविषयीं जे शंका घेतात त्यांस योग्य उत्तर देत आहे व तें तुमच्या परवानगीनें सांगतों, असें आहे कीं लार्ड रिपन यांचे स्थानिक स्वराज्याचा लाभ करून देणारे ठराव हे अंधेरांत उडी घेणार नसून हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या अमलाची जी इमारत उभारलेली आहे, तिच्या पायाच्या कोनशिलाच आहेत !"

वि. ना. मंडलिक.

---

## प्रकरण ६७ वें.

# महाराणी व्हिक्टोरिया.

। सदानुरक्तप्रकृतिः प्रजापालनतत्परः ।
॥ विनीतात्माहि नृपतिर्भूयसीं श्रियमश्नुते ॥

( कामंदकीय नीतिसार. )

हल्लींच्या इंग्लंदच्या राजघराण्यांतील राजांची प्रजावत्सलतेबद्दल ख्याति आहे. त्यांतून महाराणी व्हिक्टोरिया यांचें नांव जगभर प्रसिद्ध असून हिंदु-

स्थानांत प्रत्येक घरांत सर्वांमुखीं बसून राहिलेलें जर एकादें नांव त्यावेळीं होतें तर तें महाराणी व्हिक्टोरिया यांचें होतें. त्यांच्या सच्छीलाचा व हृदयमार्दवाचा राज्यकारभारावर इष्ट परिणाम घडे ह्मणून " दयाळु " हें उपपद त्यांच्या नांवाला जोडलें जाई. तरीसुद्धां त्यांच्यावर एका माथेफिरूनें १८८२ सालीं गोळी घातली. परंतु ईश्वरीलीला अगाध आहे. राणीसाहेबांस कांहींही इजा त्यानें होऊं दिली नाहीं. या संकटांतून त्यांस मुक्त केल्याबद्दल देवळांतून प्रार्थना सर्व राष्ट्रभर झाल्या. मुंबईत ठाकूरद्वारीं एकदां प्रभु लोकांनीं केली. परंतु सर्व हिंदू लोकांची प्रार्थना अशी वाळुकेश्वरीं १९।३।१८८२ रोजीं झाली. तो समारंभ घडवून आणण्यांत जे लोक प्रमुख होते, त्यांत रावसाहेब होते. निमंत्रणपत्रिकेवर पुढें दिलेल्या हिंदु पुढाऱ्यांच्या सह्या होत्या. मंगळदास नथुभाई; नानाभाई हरिदास; विश्वनाथ नारायण मंडलिक; वरजीवनदास माधवदास; वि. ज. शंकरशेट; लखमीदास खिमजी; रघुनाथ ना. खोटे; शांताराम नारायण; खंडेराव बेदरकर; नाना मोरोजी; मुळजी जेठा; शिवलाल मोतिलाल; वृंदावनदास पुरुषोत्तमदास; विश्राम मावजी; डा. सखाराम अर्जुन; चतुर्भुज मुरारजी; वृजभुखन आत्माराम; छबीलदास ललुभाई; आनंदराव भास्कर; एलाप्पा बाळाराम; प्रेमचंद रायचंद; नानु. ना. कोठारे; ठाकरसी मूळजी; भाईशंकर नानाभाई; खिमजी जीवा; चंदारामजी; जनार्दन पुरुषोत्तम इ.

व्हिक्टोरिया राणीसाहेबांना १८८७ सालीं राज्यावर बसून ५० वर्षे पुरीं झालीं, म्हणून सर्वत्र ज्युबिली* महोत्सव करण्यांत आला. असे उत्सव सार्वजनिक रीतीनें बहुत ठिकाणीं झाले ते झालेच पण कित्येक ठिकाणीं खाजगी व्यक्तींनींही कोणी कोणी केले. " दीपवाळीप्रमाणें दोन दिवस घरीं ज्युबिली

* मुंबईच्या लोकांनीं मोठा फंड उभारून राणीसाहेबांच्या स्मारकार्थ त्यांच्या नांवाचें टेक्निकल इन्स्टिटयूट काढलें आहे. तेथून शेंकडों विद्यार्थी यंत्रकला शिकून दर वर्षास बाहेर पडत आहेत.

प्रीत्यर्थ दीपोत्सव करावा " अशी पत्रीं ताकीत कलकत्त्याहून रावसाहेबांनीं आपल्या मुंबईच्या बंगल्यांतील कारभाऱ्यास देऊन ठेवली होती.

मुंबईस कारपोरेशन काय काय तयारी करीत आहे तिकडे कलकत्त्याहून रावसाहेबांनीं लक्ष ठेविलें होतें. " शाळेंतील मुलांस विसरूं नका. त्यांस सुटी व मिठाई द्या. पण ओव्हलच्या मैदानांत नेण्यास त्यांची वरात काढूं नका. त्यांना घरींच मित्र असतील त्यांबरोबर खेळूं द्या. शाळेंतून निघून रात्रीच्या प्रहरीं कोठें लांब अंगावर दागिने घालून हारीनें जाण्याची सूचना आली तर मी विरोध करीन. " ( १२-२-१८८७ चें दाजिबा खरे यांस पत्र. ) " कार्पोरेशनचा पैसा हा लोकांचा पैसा आहे तेव्हां लोकांस काहीं तरी दारुकामासारखी मौज पाहिजे. " हरकिसनदास यांस पत्र २२-१-१८८७.

मुंबईंत त्याप्रमाणें दीपोत्सव वगैरे कार्यक्रम उत्तम झाला व लोकांत फार उत्साह व प्रेम दिसून येत होतें त उचितच होतें. कारण राणीसाहेबांचें चरित्र राजकर्त्री, पत्नी, माता व विधवा या कोणत्याही नात्यानें पाहिलें तरी वाखाणण्यासारखें होतें. इंग्लंदमध्यें ज्या स्त्रिया राज्यपदारूढ झाल्या त्यांत व्हिक्टोरिया महाराणीसाहेब श्रेष्ठ होत्या. त्यांच्या अमलांत ब्रिटिश राष्ट्राची पूर्ण भरभराटच होत गेली. मि. ग्लॅड्स्टन सारखे मंत्रिवर झाले तरी त्यांच्यावर यांची छाप बसे.

प्रिन्स आलबर्ट व राणीसाहेब या उभयतांचें प्रेम वाखाणण्यासारखें होतें. स्वतां राज्यपदारूढ असून पतीशीं त्यांचें वर्तन शीलवती सतीस शोभण्यासारखें होतें. माता या दृष्टीनें पाहतां त्यांनीं पुष्कळ मुलांस जन्म दिला आणि त्यांच्याविषयींचें त्यांनीं कर्तव्य उत्तम रीतीनें केलें एवढेंच नाहीं पण आपल्या सर्व प्रजेचें मातृपदही त्यांनीं धारण केलें होतें व त्यांच्या प्रेमास त्या पात्र झाल्या होत्या.

विधवा या नात्यानें त्यांच्या वर्तनाचें वर्णन करावयाचें म्हणजे तें आर्य विधवांप्रमाणें संन्यस्त स्वरूपाचें होतें एवढें म्हटलें म्हणजे पुरे आहे.

खुद्द हिंदुस्थानाला त्यांनीं १८५८ चा जाहीरनामा म्हणजे एक वरच देऊन ठेविला आहे. त्याची व्यावहारिक प्राप्ति हप्त्या हप्त्यांनीं यांच्या मागें यांच्या पुत्राच्या हातून झाली व नंतर नातवाच्या हातून होतच आहे व पूर्ण प्राप्ति याच सद्वंशज कुलांतील राजांपासून होईल अशी खात्री आहे म्हणून या वंशांतील पुरुषांस आयुरारोग्यप्राप्ति व यशःप्राप्ति होवो असें कृतज्ञपणें शुभ चिंतन करणें हिंदी-जनांचें कर्तव्य आहे.

## शास्त्रिजनांस पदवीदान.

॥ युष्माकं पदवीदानमस्माकं पदवर्धनम् ॥

( हरिहरशास्त्री द्रवीड )

महाराणी व्हिक्टोरिया यांच्या ज्युबिलिमहोत्सवप्रसंगीं नित्य वहिवाटीच्या पदव्यांचें दान व्हावयाचें तसें झालें. परंतु या वर्षीं एक विशेष प्रकार असा झाला कीं शास्त्रीपंडितांकरतां म्हणून एक पदवी कायमची निर्माण करण्यांत आली. ती महामहोपाध्याय ही होय. ही पदवी धारण करणाऱ्याला चिन्ह म्हणून अंगरक्षण काय द्यावें, उष्णीष कसें असावें हें देशाचार पाहून ठरविण्यांत आलें. मद्रासेकडील पंडिताच्या चिन्हांचा काय प्रकार असावा त्याविषयीं आर. रघुनाथराव यांनीं मत दिलें होतें.

रावसाहेबांनीं मुंबईकडील, रघुनाथरावांनीं मद्रासेकडील, व महेश्चंद्र न्यायरत्न यानीं बंगाल्याकडील विद्वान मंडळींची शिफारस केली होती. रावसाहेबांनीं ७ विद्वान पंडितांची शिफारस केली होती असें म्हणतात. पैकीं चौघांस ही पदवी अर्पण झाल्याचें वृत्त मिळतें. त्यांत रावसाहेब ज्यांस गुरू म्हणून मानीत ते गोपाळ पाध्ये गुर्जर हे होते व दुसरे राजारामशास्त्री बोडस हे होते. सर्वांनीं रावसाहबांचें अभिष्ट चिंतन केलें त्यांत तिसरे हरिहरशास्त्री द्रविड यांनीं " अस्माकं पदवीदानं युष्माकं पदवर्धनं " इत्यादि संस्कृत श्लोक करून पत्रीं पाठवले होते.*

---

* शास्त्रीमंडळ रावसाहेबांस केवढा मान देई तें रावसाहेबांस बनारस ग्रे कॉलेज मधील भूपदेवशास्त्री व राजाराम शास्त्री बोडस हे गोब्राह्मण प्रतिपालक असें एक विशेषण मायन्याच्या अनेक विशेषणांत पत्रीं लिहीत असत, त्यावरून दिसत आहे.

रावसाहेबांचा सहवास शास्त्री लोकांशीं जन्मापासून शेवटपर्यंत होता.

१८८८ सालीं वे. शा. सं. भीमाचार्य झळकीकर यांस महामहोपाध्याय ही पदवी सरकारनें दिली. त्यांचा गौरव एल्फिस्टन कालेजच्या जुन्या नव्या विद्यार्थ्यांनीं केला. तेव्हां रावसाहेबांस व राजारामशास्त्री बोडस यांस उच्चस्थानीं विद्यार्थ्यांनीं बसविलें होतें, व जुने एल्फिस्टोनियन म्हणून विद्यार्थ्यांतर्फे शास्त्रीबुवांचा गौरव करण्यास रावसाहेबांस विनविलें. तेव्हां समयोचित भाषण करतांना रावसाहेब म्हणाले "मागल्या वर्षी मी कलकत्त्यास असतां लार्ड डफरिन यांनीं मला पदव्या देण्यास योग्य शास्त्र्यांचीं नांवें विचारल्यावरून मी सुचविलीं होतीं. शास्त्रीमंडळीस पदव्या वगैरे देऊन संस्कत विद्येला उत्तेजन देण्यास सरकारनें प्रारंभ केला. परंतु ह्या संबंधें खटपट आपणासच केली पाहिजे. सध्यां उत्तम शास्त्री दोनचारांवर सांपडण्याची मुष्कील झाली आहे. भीमाचार्यांसारखे अजून जों कांहीं जुने शास्त्री आहत तों नवीन निर्माण करण्याची तजवीज झाली पाहिजे. तुमच्यापैकीं मी एक आहें असें समजून या दोन गोष्टी विसरूं नये, अशी विनंति करीत आहें. मी कॉलेज सोडून ३६ वर्षें झालीं त्यामुळें आचार्यांचा व माझा साक्षात् संबंध घडला नाहीं तरी मला ते गुरूस्थानींच आहेत. म्हणून त्याना मान मिळाल्यानें मला आनंद होत आहे. मला या कालेजमधील जुना विद्यार्थी म्हणून जें तुम्हीं मुद्दाम आज पुढारीपण दिलेंत त्याबद्दल तुमचे आभार मानतों." नंतर काशीनाथपंत तलंग, प्रो. जिनसीवाले, महामहोपाध्याय राजाराम शास्त्री बोडस यांचीं भाषणें झालीं. महामहोपाध्याय भीमाचार्यांनीं संस्कृत विद्येचा अभ्यास करण्यास उपदेश केला व म्हणाले "असें न कराल तर उद्यां रामोहरि:पर्यंतच शिकलेल्या शास्त्रीबुवास महामहोपाध्याय करण्याची पाळी येईल."

---

## प्रकरण ६८ वें.

# अन्तिम ग्रंथलेखन.

**विद्वान्सर्वत्र पूज्यते**

अनेक तऱ्हेचीं कार्यें रावसाहेबांच्या हातांत असत त्यांपैकीं ग्रंथलेखन हें एक त्यांचें आवडतें कार्य असे. त्यांच्या ग्रंथलेखनाचे आद्य, मध्यम व अन्तिम असे तीन विभाग त्यांच्या आयुष्याच्या तीन विभागांस अनुरूप असे करून पहिल्या दोन विभागांतील ग्रंथलेखनाचा वृत्तांत १७ व ३१ प्रकरणांत पृष्ठें १२५ व ३३३ येथें दिला आहे. कांहीं विषयानुसार ३५ प्रकरणांत दिला आहे. त्यांतील कांहीं ग्रंथ सारांशरूप आहेत व कांहीं भाषांतररूप* आहेत तरी त्यांची तारीफ झालेली आहे. 'रायल एशिॲटिक सोसायटीचें दफ्तर' हा ग्रंथ जुने निबंध एकत्र करून छापलेला आहे. तो संशोधन-स्वरूपाचा आहे तरी त्याची डॉ. बर्डवुडसारख्या विद्वानांनीं फार तारीफ केली आहे.×

* रावसाहेबांनीं एल्फिन्स्टनकृत इतिहासाचें भाषांतर केलें त्याची प्रशंसा मि. कॅन्डी यांनीं अशी केली आहेः—"सर्व कामधंदा टाकून फक्त भाषांतरच करावयाचें या हेतूनें जर हा ग्रंथ भाषांतरकारानें तयार केला असता तरी सुद्धां हा ग्रंथ त्याचा गौरव करण्यास हेतु झाला असता. परंतु हा ग्रंथ नोकरींत असतां फावल्या वेळांत केलेला आहे हें पाहिलें म्हणजे तर हा ग्रंथ त्याच्या कर्त्यास फारच भूषणावह आहे."

( कॅन्डी, डायरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शन )

× " मी अधाशाप्रमाणें चांगल्या पुस्तकांच्या शोधांत आहे. मुंबईहून घरीं आल्यावर माझ्या संग्रहांत ३००० पुस्तकें जमलीं आहेत. कांहीं विकत घेतलीं आहेत; कांहीं परिक्षणार्थ आलीं आहेत व कांहीं सरकारनें आश्रय दिलेल्यापैकीं बक्षिस

त्यांच्या एकंदर लघ्वाकार ग्रंथांत म्हैसूर प्रकरणावरचा ग्रंथ प्रमुख आहे. त्याची झालेली प्रशंसा ३२ व्या प्रकरणांत ३५५ पृष्ठावर दिलीच आहे. तशीच प्रशंसा त्यांच्या इतर तसल्या प्रकारच्या ग्रंथांची झालेली आहे. त्यांचा व्यवहार मयूख तर प्रमाणभूत होऊन बसला आहे. त्यानंतर आयुष्याच्या अन्तिम भागांत रावसाहेबांनीं पूर्णपणें अथवा अपूर्णपणें केलेल्या लहान मोठ्या ग्रंथांचा वृत्तान्त या प्रकरणांत दिला आहे.

## मानव धर्मशास्त्र.

**॥ स्वयंभुवे नमस्कृत्य ब्रह्मणेऽमिततेजसे ॥**

**॥ मनुप्रणीतान् विविधान् धर्मान् वक्ष्यामि शाश्वतान् ॥ १ ॥**

नंतर १८८६ सालीं रावसाहेबांनीं आपला सर्वात महत्वाचा ग्रंथ जो मानव-धर्मशास्त्र तो मेधातिथि, सर्वज्ञनारायण, कुल्लुक, राघवानंद, नंदन आणि रामचंद्र यांच्या आजपर्यंत छापून प्रसिद्ध न झालेल्या टीकांसह छापवून प्रसिद्ध केला. त्याच्या अगोदर चालू न्यायाच्या कोर्टांत दिवाणी कायद्याचा १८६७ सालीं धर्मशास्त्र-प्रतिपादक बहुत ग्रंथांचें सार काढून हिंदुधर्मशास्त्र नांवाचा एक अल्प प्रबंध रावसाहेबांनीं लोकोपयोगार्थ छापिला होता त्यानंतर १४ वर्षांनीं तसाच दुसरा प्रबंध व्यवहारमयुख व याज्ञवल्क्य स्मृति हीं इंग्रजी भाषांतरासह प्रसिद्ध केलीं. तथापि सर्व स्मृतींत जी आद्य मूलभूत स्मृति म्हणजे मनुस्मृति तिचें उज्जीवन अवश्य करावें असें बहुकाल त्यांच्या मनांत होतें. *त्याच्या अनुरोधानें रावसाहेबांनीं हा मोठा प्रयत्न केला.

---

म्हणून आलीं आहेत. पण त्यांत तुम्हीं पाठवलेल्या लिटररी सोसायटीच्या संग्रहांतील निबंधांच्या पुस्तकाच्या तोडीचें पुस्तक एकसुद्धां नाहीं. खरोखर मला असलें पुस्तक विकत घेऊन किंवा भीक मागून किंवा चोरूनही येथें मिळालें नसतें. ”

( ११-५-७७ चें डॉ. बर्डवुड यांचें पत्र. )

*आर्य संस्कृतीचे जे वेदांसारखे, भगवद्गीते सारखे, शांकरभाष्यासारखे जुने जगन्मान्य ग्रंथ आहेत, त्यांचीं भाषांतरें, त्या ग्रंथांचें अवलोकन करणाऱ्या आंग्ल-भाषाप्रवीण जिज्ञासूंच्या उपयोगाकरतां अनेक विद्वानांकडून करवून त्यांची एक

हा ग्रंथ छापतांना मूळ ग्रंथांतील पाठ खरे कोणते तें निश्चित करण्याकरतां प्रसिद्ध ठिकाणांहून कोणत्या विद्वान लोकांच्या अथवा संस्थांच्या संग्रहांतून त्यांनीं

माला प्रोफेसर **मोक्ष मुल्लर** भट्ट यांनीं गुंफली आहे. त्या मालेंत हें एक पुष्प **राव**साहेबांच्या हातचें गुंफलें जाण्याचा योग येत होता. असें उभयतांमध्यें झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. स्मृतींची भाषांतरें **राव**साहेबांनीं करावीं अशी **मोक्ष मुल्लर** भट्ट यांची इच्छा होती. " माझी **याज्ञवल्क्यस्मृति** तयार आहे. परंतु पहिल्या प्रतीचीं सर्व पुस्तकें संपल्याशिवाय दुसरी हातात केव्हां घेतां येईल तें सांगतां येत नाहीं. व दुसरी प्रत छापण्याविषयीं सूचनाही करतां येणार नाहीं. मी याज्ञवल्क्यविषयक पुष्कळ माहिती गोळा केली आहे. तिचा उपयोग दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं होईल. माझा हिंदुधर्मशास्त्रांवरील ग्रंथ चालूच आहे. वर्षाअखेर जर ५।६ स्मृतींचें भाषांतर करूं शकेन तर तुम्हांस लिहीन. माझ्या धंद्याचीं कामें फारच जड जड येत आहेत. व इतर कामेंही पुष्कळ पडत आहेत. म्हणून माझ्या मूळ संस्कृताच्या भाषांतराची लेखी प्रत तयार होई तों कांहीं वचन देतां येणार नाहीं. नहि सत्यात्परोधर्मः नानृतात् पातकं परम्. शौनक हातीं आहे. "

**मोक्ष मुल्लर** भट्ट यांनीं ज्या शर्तीवर **राव**साहेबांनीं भाषांतरें करावीं असा त्यांचा मानस होता त्यांविषयीं ठराव पत्रें पाठविलीं होतीं. " तुमचीं ठराव पत्रें पावलीं. दुसरें पत्र सोबत नसल्यामुळें आपण केलेली मागणी नाकारतां अथवा स्वीकारतां येत नाहीं "

पुढें प्रोफेसर साहेबांनीं पुढील पत्र **राव**साहेबांस लिहिलेंः—टीकाविषयक हस्तलिखित प्रती मिळविण्याच्या कामांत अडचणी फारच येतील व पुस्तक प्रकाशनाची मुदत थोडी आहे म्हणून तुम्हीं माझे श्रमविभागी व्हाल अशी आशा दुःखानें सोडून देतों. ९।१२।१८८०

झालें हें ठीकच झालें. **राव**साहेबांस वाटेल तसे पैसे ग्रंथप्रकाशनार्थ खर्च करण्याचें सामर्थ्य होतें व त्याहून मोठी इच्छा व अधिक हौस होती. शिवाय दुसऱ्याच्या नादीं लागल्यावर पृष्ठसंख्या अमुक एक विविक्षित संख्येहून अधिक असूं नये इत्यादि स्वातंत्र्य हरण करणाऱ्या अटी रावसाहेबांस केव्हांही पसंत होणाऱ्या नव्हत्या. नुसती विद्वत्ता अंगीं आहे पण तिच्या प्रकाशनार्थ लागणारीं जीं साधनें असतात त्यांचा पूर्ण अभाव ज्या विद्वज्जनांच्या ठायीं असतो त्यांस प्रोफेसर **मोक्ष मुल्लर** यांनीं चालविलली माला फार उपयोगी पडली.

ग्रंथ आणाविले त्यांची नांवनिशीः—बंगाल एशियाटिक सोसायटीचें पुस्तकालय, उज्जनी येथील सोरटीबुवा, उज्जनी येथील नानासाहेब आठल्ये, प्रयाग येथील मुनशी हनुमान प्रसाद, खांडवा येथील वासुदेव बल्लाळ खेरे, मिरज येथील वामन भट्ट महाबल, यौतेश्वर येथील रामचंद्र शंकर द्रवीड, पुणें येथील बळवंतराव जोशी, व दाजीसाहेब नगरकर, अहमदाबाद येथील नगरशेटजी बेचरदास, श्रीशंभूमहादेव क्षेत्रांतील बळवंतराव जावडेकर इंदापूरकर, अष्टें येथील गोविंदराव लिमये, लंदन इंडिया ऑफिस डॉ. रोस्ट, कलकत्ता येथील छापील भृगुसंहिता कुल्लकभट्ट कृत टिकेसह, बडोदें येथील वासुदेवराव बापट, जोधपूर येथील लक्ष्मीनाथ शास्त्री द्रवीड, मद्रास येथील दिवाणबहादूर आर, रघुनाथराव*, पुणें येथील देडगांवकर भट्ट नारायण गोखले, कलकत्ता येथील न्यायरत्न पंडित महेशचंद्र, त्रावणकोर महाराजाधिराज रामवर्ग, एल्फिन्स्टन कॉलेजांतील डाक्टर पिटरसन.

यांतील कांहीं ग्रंथाच्या प्रती २०० पासून ३०० वर्षांच्या जुन्या होत्या. शेवटीं मनुसंहितेचें अखिल भारतवर्षांत हिंदुधर्मविषयक अज्ञान दिवसानुदिवस वाढत जात आहे हें पाहून अंतःकरणास फार पीडा होत होती. तिचा प्रतिकार करण्याकरितां हा अल्प समारंभ जो रावसाहेबांनीं केला तो परमात्म्याला अर्पण केला. या ग्रंथाला शेवटीं मोठी विषयानुसार विस्तृत श्लोकवार अनुक्रमाणिका जोडली आहे. याशिवाय एक परिशिष्ट जोडलें आहे तें फार महत्वाचें आहे. त्यांत हेमाद्रि, स्मृतिरत्नाकर, पराशर माधव, संस्कारकौस्तुभ इत्यादि अनेक धर्मग्रंथांत जीं मनूचीं वचनें उपलब्ध म्हणून दिलेलीं असून या छापलेल्या मनुस्मृतींत उपलब्ध नाहींत तीं सविस्तर दिलीं आहेत, असें सांगून वाचकांस त्यांनीं विनंति केली आहे " मी मनुस्मृतिविभववर्णन सरळ

---

* रावसाहेबांच्या मार्फत जी प्रत जर्मनीस जावयाची होती ती दिवाण बहादुरांच्या परवानगीनें तिची हस्तलिखित नकल करून घेण्यास कांहीं दिवस त्यांनीं ठेवली होती.

भावानें कलें आहे. त्याचा धर्मशास्त्रवेत्त्यांनीं परीक्षा करून दोष मला दाखवून द्यावे म्हणजे मला त्याचें निरसन करण्यास बरें पडेल. ”

शवटीं त्यांनीं असें म्हणून ठेवलें आहे कीं आणखी मानवधर्मशास्त्रव्याख्या आहेत असें धर्मशास्त्र निबंधांवरून समजतें. त्या व्याख्या श्रीमाधवाचार्य; धरणीधर; गोविंदराज; श्रीधरस्वामी; रुचिदत्त; विश्वरूप; भोजदेव व भारुचि यांनीं लिहिलेल्या आहेत. त्यांचा शोध त्यांनीं शृंगेरीकडे चालविला होता.

ही मनुसंहितेच्या छापण्याची संक्षिप्त हकीकत झाली. परंतु रावसाहेबांनीं या ग्रंथाची तयारी करण्यांत किती वेळ, पैसा व श्रम भक्तिपूर्वक केले त्याचा सुमार नाहीं.

जुने ग्रंथ ज्यांच्या जवळ होते त्यांस त्यांची किंमत कळत नव्हती म्हणून अथवा ते निष्काळजी होते म्हणून ते ग्रंथ बहुशः नष्ट झाल्यामुळें व अविशिष्ट ग्रंथ द्वीपांतराला गेल्यामुळें जुन्या हस्तलिखित प्रती मिळविण्याकरतां रावसाहेबांना भगीरथ प्रयत्न करावे लागले ते त्यांनीं आनंदानें केले कारण उद्योग करणाऱ्याला कोणतीही गोष्ट असाध्य नसते अशी त्यांची पूर्ण श्रद्धा होती. जेथें जेथें जुने ग्रंथ होते तेथून तेथून त्यांची प्राप्ति विद्वान लोकांच्या साहाय्यानें करून घेऊन रावसाहेबांनीं हा ग्रंथ छापावयाची प्रचंड तयारी केली.

प्रथम त्यांनीं लांबलांबच्या विद्वान शास्त्री लोकांच्या घराण्यांचा शोध लावून त्यांतील स्मृतींचा संग्रह त्यांच्या ज्या वारसांकडे गेला त्यांचा शोध करून तो मिळविला व मालकांच्या परवानगीनें हस्तलिखित प्रती करून घेतल्या. कारण ते ग्रंथ पूर्वीं कोणी छापले नव्हते. बनारस येथें पोथ्या मिळण्यासारख्या होत्या त्या उतरून घेण्यास लेखकांच्या अक्षरांचे नमुने मागविले होते. पांच चार तरी ग्रंथ होतील असें गोविंद विनायक थत्ते यांस लिहिलें होतें. ( २।९।७३ चें पत्र. ) पुराणें, उपपुराणें स्मृती, प्रातिशाख्यें, कारिका शतशः मिळविल्या होत्या. कलकत्त्याहून विश्वरूप, भारुचि, शूलपाणि व अपरार्क यांच्या मानवधर्मशास्त्रावरील व्याख्या मिळविण्याची खटपट चालविली होती. मुंबईतील प्रसिद्ध पंडित विश्वेश्वरनाथ गोस्वामी व त्रावणको-

रचे महाराज राजा रामवर्मा यांच्याकडे पुष्कळ ग्रंथांची माहिती मिळाली. विष्णुपुराणाची एक प्रत त्यांनीं पाठविली होती. विष्णुस्मृति आबासाहेब शास्त्री यांकडून आणविली होती. नरगुंद येथील, नाना दिक्षित यांकडेही पुष्कळ ग्रंथ होते; म्हणून त्यांकडे वीर मित्रोदय, प्रायश्चित्ताध्याय; द्वैतनिर्णय, स्मृतिविवेक, हरिहर भाष्य, परिशिष्टप्रकाश, राज्यधर्मकाण्ड, स्मृतिचिंतामणि, स्मृतिसार, स्मृतिग्रंथराज, तत्त्वरहस्य, दत्तकपरिच्छेद, दायरहस्य हे ग्रंथ मिळतील तर पहावे. ( त्रिंबकराव दातार यांस २९।१।७१ चें पत्र. ) मिळते तर दोन तीन लेखक नेमावयाची व्यवस्था केली होती. परशुरामप्रताप हा ग्रंथ जर लिहून घेण्यास हातीं येईल अथवा विकत मिळेल तर त्या मालकाच्या इनामतीचें काम ( जें त्या वेळस उपस्थित झालें होतें तें ) हातीं घेऊन वर्षभर मेहनत लागेल ती फुकट करण्यास रावसाहेब तयार झाले होते. हस्तलिखित प्रत विकत द्या, फुकट द्या, उतरून घ्यावयास उसनी द्या पण पदरीं असलेला ग्रंथ द्या अशी रावसाहेब आर्जवाची मागणी करीत असत. कलकत्त्यास कौन्सिलच्या कामावर गेले असतां तीन लेखक ग्रंथांच्या प्रती उतरविण्यास ठेवले होते. हे ग्रंथ गोळा करीत असतां रावसाहेबांनीं खालील उद्गार काढले. “ या हतभाग्यदेशांत विद्येची नावड किति झाली आहे ती वर्णन करण्यास लेखणी पुढें सरसावत नाहीं. ” ( माधवरावजी लघाटे यांस पत्र ६।१।७३ )

शास्त्रीघराणीं श्रीमंत नव्हतीं पण त्यांचा कुलक्रमागत ग्रंथसंग्रह फार अमोलिक होता. त्यांच्या वारसांच्या अज्ञानानें, किंवा मूर्खपणानें किंवा कोणाच्या भूलथापीनें ते या ग्रंथसंग्रहास केव्हांच मुकले होते. पुणें, सातारा, बेळगांव, अष्टें, कोल्हापूर, सांगली, मिरज, निपाणी, संकेश्वर, यंकन्मार्डी, धारवाड, नरगुंद, नवलगुंद, हुबळी इत्यादि दक्षिण महाराष्ट्रांतील ठिकाणीं हे ग्रंथ पुष्कळ होते. साताऱ्याचे भाऊशास्त्री दिक्षित व अष्ट्यांचे लिमये यांचा संग्रह फार मातबर होता. शिवाय सरकारानें कांहीं म्हैसूर व कूर्ग प्रांतांतील हस्तलिखित ग्रंथांच्या यादी करविल्या होत्या. त्यांच्या प्रती शोधार्थ मागविल्या होत्या.

जैनसंग्रहांत सुद्धां पोथ्यांचा तपास माधवराव शिरगांवकर यां मार्फत चालविला होता. " हा ग्रंथ माझ्या त्या ग्रंथावरील भक्तीमुळेंच लिहिला. त्याच्या नादीं मी आज पंचवीस वर्षें होतों. त्या अवधींत कीतीतरी हस्तलिखित प्रती व टीका जमविल्या. अजून आणखी मिळविण्याच्या शोधांत आहे. "

( १४।६।८७ जेकब यांस पत्र. )

कांहीं प्रती मिळाल्या होत्या त्या ताडपत्रावर लिहिलेल्या होत्या. एक टीका गोविंद्राजकृत आहे ती कोठें मिळेना म्हणून निरुपाय होऊन ज्योतिष्यास प्रश्न विचारावयाचें रावसाहेबांनीं सोडिलें नाहीं.

" गोविंद्राजी टीका हातीं येत नाहीं म्हणजे कोठें थांग लागत नाहीं. कोणत्या दिशेस शोध करावा तें पत्र लिहिल्यावेळेवरून पहावें. "

( वे॥ वामनराव जोशी यांस पत्र १७।१२।१८८५. )

कांहींतरी करून त्यांनीं ती टीका शेवटीं मिळाविली व शुद्धाशुद्ध पाहून मनुस्मृतीच्या मागाहून सहा महिन्यांनीं प्रसिद्ध केली.

मनुस्मृतीच्या प्रती सर्व देशभर विद्वानांकडे पाठविल्या. व राजे रजवाड्यांनीं विकत घेतल्या. त्यांत निजाम साहेब होते. कांहीं प्रती इंग्लंदांतील युनिव्हर्सिटचांच्या ग्रंथसंग्रहालयांकडे पाठविण्यांत आल्या. प्रोफेसर व्हिटने; प्रो. वेबर, बर्लिन; मॅक्स मुल्लर भट्ट; डॉ. जॉली; प्रो. किलहार्न; डा. बुल्लर ( व्हिएन्ना ); प्रो. मॉनिअर वुईल्यम्स; डॉ. रोस्ट, ( इंडिया ऑफिस ); रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ् ग्रेट ब्रिटन ॲन्ड आयर्लन्ड; युनिव्हर्सिटी आफ लेडन ( लार्ड रे माजी लोकप्रिय गव्हर्नर यांच्या मार्फत ). प्रो. मॅक्स मुल्लर भट्ट व प्रो. मॉनिअर वुइल्यम्स यांचीं उत्तेजनपर पत्रें आलीं होतीं.

जंगबहादूर यांची मुलगी व त्या वेळचे नेपाळचे राजे यांची आते ही एक फार विद्वान स्त्री नेपाळांत होऊन गेली तिला एक प्रत दिली तिनें असें मत दिलें कीं हा ग्रंथ प्रत्येक न्यायाच्या कोर्टांत असला पाहिजे. कांहीं प्रती अमेरिकेंतील विद्वानांस पाठविल्या होत्या. शिशिर बाबूंच्या मार्फत बंगाल्यांतील

विद्वान गृहस्थांकडे पाठविल्या होत्या. ग्वाल्हेर संस्थानांतील कांहीं पेन्शनर काशीवास करीत होते त्यांस पाठविल्या होत्या.

नंतर कांहीं दिवसांनीं बुंदीच्या महाराजांनीं या ग्रंथाचा कसा सत्कार केला त्याचें वर्णन २०–७–१८८८ च्या अमृतबझार पत्रिकेंत आलें तें " रावसाहेब मंडलिक यांच्या ग्रंथाचा आदर बुंदीच्या वयोवृद्ध महाराजांनीं मोठा दरबार भरवन केला. महाराजांनीं ग्रंथकर्त्यास महावस्त्र अर्पण केलें. ज्या कालीं ऋषिवर्य आपलें सर्व आयुष्य मनन करण्यांत व ईश्वराचा शोध करण्यांत खर्चीत असत व त्यांचें योगक्षेम आमचे राजे करीत असत त्या काळच्या पुरातन व ऐश्वर्यवान अशा भरतखंडाची आठवण असले समारंभ करून देतात. परंतु ते दिवस आतां गेले ! आतां मंडलिकांच्या नमुन्याचे लोक भराभर नाहींसे होत आहेत हें भरतखंडाचें दुर्दैव होय. "

त्याचप्रमाणें खालील प्रशंसा १६-७-८८ च्या हिंदू पेट्रियटमध्यें आली होती. " बुंदीच्या रजपूत कुलोत्पन्न महाराजांनीं मंडालिककृत सत्तटीका-समवेत मनुस्मृतीचा सत्कार केल्याचें व ग्रंथकारास महावस्त्र अर्पण केल्याचें वृत्त ऐकन आम्हांला फार आनंद होत आहे. आमच्या वाचकांस ठाऊकच आहे कीं बुंदीचे महाराज चांगले संस्कृतज्ञ आहेत. व त्यांच्या सारख्यांनीं केलेल्या सत्काराची योग्यता निराळी आहे. या समारंभावरून एवढें दिसून येत आहे कीं अद्यापि संस्कृतविद्येच्या अंगीं मोठें सामर्थ्य आहे व तें तसेंच राहील अशी आम्हीं आशा करितों. "

## पद्मपुराण.

मनुस्मृतिविषयक प्रचण्ड ग्रंथ छापून झाल्यावर रावसाहेब पद्मपुराणाकडे वळले. " मी पहिल्या आर्य लोकांच्या जुन्या काळाचा इतिहास शोधूं पहात आहें. त्या संबंधें असें कळतें कीं पुरुषश्रेष्ठ आपय्या दिक्षित यांचा एक वंशज त्रावणकोर संस्थानांत आपल्या पदरीं आहे तें खरें असेल तर अठरा पुराणांच्या जुनेपणावर तो कांहीं प्रकाश पाडूं शकेल कीं नाहीं यासंबंधीं कांहीं माहिती

लागली तर परवानगीनें विचारीत आहें. पद्मपुराणावर एक टीकात्मक लेख त्यांच्या प्रसिद्ध पूर्वजानें लिहिलेला आहे व तसा माझा समज करून दिलेला आहे. या भागांतील संस्कृत ग्रंथांची याद मिळेल तर आभारी होईन. ”

( त्रावणकोरचे महाराजे रामवर्म यांस पत्र. १५।१।७४ )

मी माझ्या पुराणांचा संच पुरा करणार आहें. जर व्हान् डर बर्ग यांची इच्छा असेल तर बळी हस्तलेखांचें समग्र भाषांतर करावयास मी त्यांस थोडीशी आगाऊ रक्कम देईन. मला कावी लिपी येत नाहीं व ज्ञानार्जनाच्या मागें लागून एवढा जलप्रवास करण्यास कोणी आपण होऊन पुढें येईल एवढा धाडशी मनुष्य मला माहित नाहीं. [ ज. जेकब यांस पत्र ]

कांहीं पुराणें वेदांपेक्षां जुनीं आहेत. तैत्तरीय ब्राह्मणांत त्यांचा उल्लेख इतिहास पुराणें असाच आहे. सायण्णाचार्य म्हणतात ‘इतिहासः भारतादिः, पुराणं ब्रह्मादि. ’ हल्लींचे पुष्कळ आचार व संस्कार पुराणोक्त आहेत. व स्मृतींचा व पुराणांचा विरोध झाल्यास नेहमींच स्मृतींस प्रमाण न धरतां पुराणांसच कित्येकवेळां प्रमाण धरतात. म्हणून सर्व पुराणांचें संशोधन केलें असतां कोठलीं स्मृतींहून जुनीं तें समजेल व शिवाय हल्लींचे पुष्कळ आचार, विशेषतः पूजाविषयक, पुराणोक्त आहेत. धर्मशास्त्र समजण्याकरतां पुराणांचा अभ्यास करणें इष्ट आहे. त्यांच्या हस्तलिखित प्रती मिळविण्याला आरंभ रावसाहेबांनीं आधींच करून ठेविला होता. “ आपण लिहिलेलें पद्मपुराणाचें पुस्तक मला पहाण्यास पाठवून द्यावें. १० रुपयांची मनीआर्डर पाठविली आहे. दुसरें आपण तिकडे राहणार कीं इकडे यावयाचें आहे त्याबद्दल सर्व विचार लिहावा म्हणजे त्याप्रमाणें सहा महिने पावेतों माझ्या मनांतून आपणांस कांहीं उद्योग द्यावयाचा आहे. ( हरिकृष्ण व्यंकटराम यांस ८।६।८३ चें पत्र. ) नंतर या कामावर रावसाहेबांनीं श्रीकृष्णशास्त्री आठल्ये यांस ठेविलें होतें. त्यांच्या मदतीस कांहीं लेखक ठेविले होते. व वेळ सांपडेल तेव्हां स्वतां एक प्रत आपण हातांत घेऊन दुसऱ्या तीन चार माणसांच्या हातीं दुसऱ्या प्रती देऊन

पाठभेद एकदम नोंदून ठेवीत व मग सावकाश चर्चा करून त्यांतील कोठला ग्राह्य तें ठरवीत. अशारीतीनें त्यांनीं एक निश्चित पाठांची प्रत छापण्याकरतां तयार करून ठेवली होती. परंतु त्यांच्या हातून ती छापून निघावी अशी परमेश्वराची इच्छा नव्हती. नंतर तें काम त्यांचे व्यवसायबन्धु महादेव चिमणाजी आपटे यांनीं आपल्या आनंदाश्रम संस्थेंत छापून टाकिलें व १८ पुराणें म्हणजे आपल्या पूर्वजांच्या ज्ञानकोशाचे जे १८ भाग आहेत त्यांतील एक भाग छापण्याचें श्रेय घेतलें.

## जोतिःशास्त्र.

ज्योतिःशास्त्राचा नाद रावसाहेबांस फार होता. ज्योतिषावर * यांच्या मनांतून एक निबंध लिहावयाचा होता. त्या करतां आर्य सिद्धांत, रमणिक सिद्धांत, ब्रह्मसिद्धांत इत्यादि ग्रंथ मिळविले होते. आणखी कांहीं ग्रन्थ उपलब्ध झाले तर पहात होते. वेदांग ज्योतिषाचें भाषांतरही करून ठेविलें होतें. "वेदांग ज्योतिषाचें भाषांतर तडीस नेण्याचें यश नुकतेंच प्राप्त झालें आहे. परंतु भाषांतर प्रसिद्ध करण्यापूर्वीं गर्गाचे ग्रंथ ताडून पहावे अशी फार इच्छा आहे. कलकत्त्यास असतां तुमच्या सोसायटीच्या लोकांनीं सांगितलें कीं त्याची हस्तलिखित प्रत वाचावयास दिलेली आहे. कांहीं आठवडेपर्यंत ती मिळेल तर मेहरबानी होईल." ( डाक्तर राजेन्द्रलाल मित्र यांस २।६।८२ चें पत्र. ) " मेघमाला किंवा मेघमालिनी असा गुजराथ देशीं येक ज्योतिषाचा ग्रंथ असून त्यांत निरनिराळे ग्रह कोठें आहेत, कशाचे बनले आहेत, त्यांपासून गुणदोष कसे होतात, यांजवर विचार आहे, असें मला समजलें आहे. चोकशी अंतीं तो जर पहावयास मिळेल तर उपयोग आहे." ( १९।७।८० चे बाबासाहेब बक्षी यांस पत्र. ) " तुमच्या कालेजांतील गर्ग संहिता व सिद्धांत यांच्या हस्तलिखित प्रती पाहिजे

---

*मी एक ज्योतिषशास्त्रविषयक निबंध लिहिण्याकरतां माहिती गोळा करीत आहें. हा निबंध मी जर रायल जिऑग्रॅफिकल सोसायटीचा सभासद असतों तर इंग्लंदांत प्रसिद्ध केला असता. तेथें त्याचा विचार होण्याचा जेवढा संभव आहे तितका येथें होण्याचा संभव नाहीं, ( जनरल जेकब यांस पत्र. )

आहेत. तुमची अथर्व ज्योतिषाची प्रत कांहीं दिवस पाहिजे आहे. बनारसहून ती परत आली असेल. ” ( २०।७।८० चें डॉ. किलॅहॉर्न यांस पत्र. ) बृहदारोग्य संहिता वरील डाक्तर साहेबांकडून आणाविली होती. वेदांग ज्योतिषभाष्याचा व रोहिणीशकटभेदाचा शोध रावसाहेबांनीं चालविला होता.

## रोहिणीशकटभेद.

“ आपले शिष्य रामेश्वर दत्त शास्त्रीबुवा यात्रे करितां येऊन गेले. ते नागपुरापर्यंत पोंचल्याचें परभारें तिकडील स्नेही यांनीं वर्तमान कळविलें. पुढें क्षेत्रीं पोचल्याचें अद्यापि समजलें नाहीं. दुसरें रोहिणीशकटभेदाबद्दल:– ( रोहिणीचा ) शोध लागल्यासारखा आहे. तरी तें शनिस्तोत्र पुराण आहे असें सिद्ध झाल्यास त्याविषयीं उपयोग होऊन आमचे ग्रंथ फार जुनाट आहेत असें सिद्ध होईल, असें आपलें आश्वासन. त्याविषयीं एक गणित मला समजण्याजोगें त्याच्या बरोबर जोडून प्रसिद्ध करण्यापूर्वी सर्व प्रुफें तिकडे जाऊन मग बाहेर पडतील असें मनांत आहे. अभिमान कशाचाच नाहीं. ईशसत्ता असत्ये तसें होतच आहे. परंतु आम्हीं तूर्त अजगरवृत्ति नाहीं. तें जें वास्तविक जुनें तें काल झालें, असा प्रमाद जर दृग्गोचर होत आहे तर तो नीट करण्याचा प्रयोग करावा, हा हेतु; तो सफल होणें आपले साहाय्यानेंच आहे. कृपा सायंकाळच्या वृक्षछायेवत् असावी ” ( बापदेव शास्त्री बुवा परांजपे वाराणसी यांस ८।९।८३ चें पत्र ज्येष्ठ शु. १८०५ ) या पत्रांत विद्वान लोकांविषयीं पुष्कळ पूज्य बुद्धि व्यक्त केलेली आहे; इषत् ज्ञान जें कांहीं बुधजनसकाशात् लब्ध झालें त्या विषयीं पूर्ण निरभिमान स्पष्ट निर्दिष्ट केला आहे, जुन्या ग्रंथांविषयीं आदर दाखविला आहे, व त्यां विषयीं उदासिनता टाकून कांहीं सेवा करण्याची खरी आस्था व्यक्त केली आहे तें सर्व वाचकांच्या ध्यानांत येईलच.

वरील विद्वान शास्त्रीबुवांजवळ भारतीय युद्धाच्या काळासंबंधें व यादवांच्या नाशासंबंधें रावसाहेबांचा पत्रव्यवहार चालू होता. मोसल पर्वांतील अ. १४७ व भीष्मपर्वांतील अध्याय ६ यांतील श्लोकांवर भर होती.

## प्रकरण ६८ वें.

# समाजसुधारणा विरुद्ध कायद्याची मध्यस्थी.

॥ श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
॥ एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ १ ॥ ( मनु )

मागें २६ व्या प्रकरणामध्यें सामाजिक सुधारणेचा विषय इंग्रजी शिकलेल्या लोकांनीं हातीं कसा घेतला व समाज सुधारण्याचे काय उपाय योजण्यांत आले व त्यांस कितपत यश अथवा अपयश आलें तें सांगितलें आहे. त्या कालानंतर बरींच वर्षें सांगण्यासारखें असें कार्य झालें नाहीं.

प्रथम प्रथम जे इंग्रजी शिकले ते सरकारी नोकरींत शिरले. त्यांच्या डोक्यांत नवे राजकीय व सामाजिक सुधारणेचे विचार शिरले परंतु पहिल्या विषयांत त्यांस पडतां येत नसे. तथापि नवे विचार डोक्यांत शिरल्यानें स्वस्थही बसवत नसे. एवढ्याकरतांच त्यांस सामाजिक सुधारणा हा विषय बोलतांना व लिहितांना घ्यावा लागला. याच्या योगानें बराचसा बोलक्या सुधारकांचा वर्ग निर्माण झाला. कांहींचा सुधारक म्हणवून घेण्यांत स्वार्थ साधण्याचा मतलब असे कारण अशा लोकांस ज्ञानोद्दीपित समजलें जाई. अशांची संख्या थोडी खरी पण सुधारकांच्या संख्येंत भर पडण्यास कारण झाली. कांहींस सुधारणा कवटाळावी लागली. मिळून समाजांत जरूरीच्या बाहेर बोलक्या सुधारकांची संख्या वाढली.

तो काळच मुळीं बडबड करण्याचा होता व प्रत्यक्ष क्रिया हातून होण्यापूर्वीं अशी बडबड करावीच लागते हें खरें आहे. परंतु या नुसत्या बडबडीचा परिणाम इंग्रजी न शिकलेल्या बहुजन समाजावर कांहींच झाला नाहीं असें नाहीं.झाला पण तो उलट झाला.बहुजन समाजांतील लोक नुसते बोलक्या सुधारकांचा विसंगतपणा दाखवून स्वस्थ बसत. कांहीं सुधारक मात्र इतरांशीं तेढीनें वागूं लागले व

समाजापासून दूर राहूं लागले. याचें कारण एवढेंच कीं सुधारणा हें एकच ध्येय ठेवून वाटेल ती अडचण काढून, पडेल तो त्रास सोसून आपलें आयुष्य सुधारणेच्या कार्यास वाहणारा सुधारक निर्माण झाला नाहीं. झाला असल्यास अगदीं अपवादात्मकच होता.

केवळ तत्त्वाकरतां भांडणारा सुधारक निघाला असता तर ज्या अज्ञ समाजाचें कल्याण करावयाचें आहे, त्याच्याशीं युक्तिवाद करून त्याच्या शंकांची समूळ निवृत्ति करून बन्धुप्रेमानें त्याच्याशीं वागून सुधारणेपासून काय फायदे आहेत तें दाखवून देऊन, हिंदुधर्माधिकाऱ्यांस भेटून, त्यांचा मान ठेऊन आपलें काय म्हणणें असेल तें त्यांस स्पष्ट समजून सांगून,आपल्या प्रयत्नांस साहाय्य करण्याकरतां त्यांचें मन वळवून, सुधारणेचें कार्य त्यांच्या मार्फत करून घ्यावयास तो सिद्ध झाला असता;किंवा एवढेंही करून यश मिळत नाहीं असें समजतांच खरें नीतिधैर्य दाखवून ऐहिक सुखावर तिलांजलि देऊन छळ सोसण्यास सिद्ध झाला असता. या दोहोंतून एकही कोणी पतकरिलें नाहीं.

समाजांत नवे व जुने असे पक्ष पडले व दुही माजली. दोघेही आपआपल्या जागीं कधीं स्वस्थ बसून पण बहुशः कांहीं विचारी लोक सोडून एकमेकांस नांवें देत राहिले. परंतु याच्या पलिकडे कोणी कांहीं नवी शक्कल बरेच दिवस काढली नाहीं. पण १८८४ सालीं मि. मलबारी हे लोकहितकर्ते पार्शी गृहस्थ पुढें आले व विधवाविवाहनिषेध व बालविवाह या विषयांवर त्यांनीं लेख लिहिले. वास्तविक विधवा कोणाच्या व बाळें कोणाचीं ? व त्या विषयींची कळकळ कोणाला ? परंतु मि. मलबारी हे एकंदर मनुष्य जातीच्या दुःखानें दुःखित होणाऱ्यांपैकीं एक असल्यामळें त्यांनीं हे विषय हातीं घेतले. हे चांगले कवि होते तेव्हां यांच्या भावना लवकर प्रदीप्त झाल्या व हे उत्तम लेखक* असल्यामुळें यांनीं परधर्मी असून हिंदुसमाजांत फार क्षोभ उत्पन्न केला.

---

* इंडियन स्पेक्टेटर व व्हॉइस आफ इंडिया पत्राचें चालकत्व यांच्याकडे होतें. यांची परोपकाराची इच्छा प्रबळ असे. धरमपूर येथें यांनीं क्षयरोग्यांकरतां स्थापलेलें रुग्णालय यांचें स्मारकच आहे.

त्यांनीं आपल्या लेखांत बालविवाह व विधवाविवाहनिषेध या दोन हिंदू समाजांतील चालींच्या दुष्परिणामांचें चित्र चांगलें रंगविलें व तें सरकारकडे पाठवून ते दुष्परिणाम नाहींसे अथवा कमी करण्यास कांहीं उपाय योजावे अशी हिंदुस्थान सरकारास विनंति केली. मि. मलबारीनीं आपल्या मतें कोणते उपाय इष्ट आहेत त्यांचीही दिशा दाखवून दिली. उदाहरणार्थ, शाळाखात्यांतलि अधिकाऱ्यांनीं कोणत्याही बालविवाहितास युनिव्हर्सिटीच्या परिक्षेस बसूं देऊं नये. अविवाहितास सरकारी नोकरी विवाहितांच्या अगोदर द्यावी. हे उपाय बालविवाहाच्या बाबतींत सुचविले.

१ जिचा पति अथवा ज्याच्याशीं विवाह ठरला आहे तो मृत झाला असतां ती गतभर्तृका हिंदु स्त्री अज्ञान असेल तर तिची इच्छा नसतां जन्मभर वैधव्यदशेंत राहण्यास तिला कोणी भाग पाडतां कामा नये.

२ विधवेनें समाजसंसर्गाचा त्याग केला आहे असा संशय आला तर तो जुलमानें केला आहे कीं स्वेच्छेनें केला आहे तें शोधून काढण्याची व्यवस्था करावी.

३ जातिबहिष्काराशिवाय सामाजिक जांच झाला असल्यास सरकारी अधिकाऱ्यांकडे दाद मागण्याचा कोणत्याही वयाच्या विधवेला हक्क असलाच पाहिजे व हें हक्क बजावण्याचें काम सुलभ होण्याकरतां तिला योग्य तें साहाय्य म्हणजे वकिलाची नेमणूक, कोर्टांत हजिरी, स्टांपाची माफी, इ. मिळालें पाहिजे.

४ पुनर्विवाहाच्या कामांत अग्रेसर असलेल्या लोकांस अथवा पुनर्विवाहितांच्या आप्तसंबंधि जनांस धर्माधिकाऱ्यानें बहिष्कार घातल्यास तो कायदेशीर होऊं नये.

विधवाविवाहनिषेध हा सबंध हिंदुसमाजास लागू नव्हता व नाहीं. बालविवाहही पहिल्या इतका प्रचारांत नव्हता इतकी अयथार्थता हे परकी असल्यामुळें त्यांच्या लेखांत शिरली होती. तथापि हिंदुसमाज तत्त्वज्ञानी असल्यामुळें पुष्कळ सहनशील आहे; म्हणून कांहीं बोलल्याशिवाय गप्प बसला.

तसे आमचे सुधारक स्वस्थ बसले नाहींत. बुडत्यास काडीची तशी यांस मि. मलबारी यांच्या भक्कम लेखांची आशा सहजच वाटली व त्यांस त्यांनीं मोठ्या धोरणानें हाताशीं धरिलें. मि. मलबारी यांचीं पत्रें हिंदुस्थान सरकारनें स्थानिक सरकारांकडे पाठविलीं व त्यांनीं सरकारी, बिनसरकारी अशा विचारी लोकांकडे पाठवून मतें मागविलीं त्याबरोबर या पत्रांस राजकीय महत्व प्राप्त झालें.

आतां यापुढें सुधारणा समाजानें अंतःप्रेरणेनें करावी किंवा कायद्याच्या मध्यस्थीनें करावी हा प्रश्न जोरानें उद्‌भवला व सर्व हिंदुसमाज जागृत झाला. सरकारांतून रावसाहेबांकडे अभिप्रायार्थ हीं पत्रें आलीं होतीं त्यांवर त्यांनीं अभिप्राय दिला त्याचा सारांशः—

" सकृद्दर्शनीं एवढें सांगून ठेवतों कीं हिंदुलोकांत असंमत वैधव्य सांप्रत कालीं कोठेंही चालू नाहीं. तसेंच सरकारी कायद्यानें बंद करतां येईल अशी बालविवाहाची चाल हिंदूंमध्यें प्रचारांत नाहीं; म्हणून सरकार यांत हात न घालील तर बरें होईल. प्रगतिपर युरोपियनांच्या दृष्टीनें पाहिलें तरी या हिंदुधर्मविषयक बाबतींत हात घालणें सरकारच्या कर्तव्याबाहेर आहे. ज्यांची व्यवस्था हिंदु धार्मिक संस्थांकडे आहे, त्यांत सरकारनें हात घातल्यास, विशेषतः दिलेल्या अभिवचनांचा भंग करून हात घातल्यास, समग्र हिंदू समाजास आपल्यावर मोठें संकटच आलें आहे असें वाटेल. "

" या पत्राचे लेखक मि. मलबारी हे हिंदु नाहींत. हिंदुधर्म सर्वसंग्रह स्वरूपाचा असल्यामुळें त्या धर्माच्या कांहीं पुरातन ग्रंथांमध्यें शबरांसारख्या वन्य लोकांचाही समावेश हिंदुधर्मांत केलेला आढळतो. त्याच्या अंगीं सहिष्णुतेचा प्रकार इतका आहे कीं आपआपल्या समजुतीप्रमाणें हव्या त्या देवतांची पूजा निरनिराळ्या जातींस करण्याची मोकळीक ठेवलेली आहे. म्हणून सरकारापुढें आणलेल्या या विषयांवर चर्चा करण्यापुरतें हिंदुशास्त्राचें व तदुक्त आचाराचें यथार्थ ज्ञान प्रत्यक्ष हिंदूशिवाय दुसऱ्या कोणास असणें शक्य नाहीं. हिंदूंच्या

चालीरीतींचें ज्ञान ज्याला नाहीं व होणें शक्य नाहीं, असें ज्याच्या निबंधावरून दिसतें, त्या गृहस्थास एकंदर हिंदुसमाजाच्या चालिरीतींविरुद्ध इनसाफ देण्याचा अधिकार खचित नाहीं. शब्दांचें अवडंबर व हिंदुलोकांवर सर्व प्रकारच्या पापांचा व मूर्खपणाचा आरोप करणें या शिवाय त्याच्या विधानास दुसरे आधार नाहींत. सरकारचें लक्ष वेधून थारा मिळण्यासारखी त्याच्या निबंधाची योग्यता नाहीं. त्यांत परस्पर विरोधी वाक्छल आहे. ”

“ मि. मलबारी यांच्या दुसऱ्या म्हणजे असंमत वैधव्यविषयक लेखावर आपलें मत प्रथम देतों. विधवा होणें हें दुर्दैव आहे. विधवेच्या आत्म्यास पडलेली जखम भरून काढण्यास समर्थ असें दुःखोपशमक औषध एकच आहे. तें कोणतें ? तर इंद्रियदमन करून, कर्तव्यनिष्ठा वाढवून, विरक्त वृत्ति धारण करून परलोक साधनार्थ इहलोकीं शरीर व मन यांची तयारी करणें हें होय. या मार्गास समाजाची संमति आहे, शास्त्राची अनुज्ञा आहे. श्रेष्ठांनीं आचरलेला हाच धर्म आहे. वटपौर्णिमेचा दिवस हा सर्व हिंदुस्त्रिया परम पवित्र असा मानतात व सावित्रीची पूजा घरोघर करतात. हा सर्व प्रकार असें निदर्शनास आणतो कीं हिंदुमनाची मूल प्रवृत्ति पुनर्विवाहाकडे नाहीं. ”

“ आतां दुसऱ्या दृष्टीनें पहातां सरकारनें विधवाविवाहाचा कायदा १८५६ सालीं केला आहे. व सरकारला जेवढें करतां येण्यासारखें आहे तेवढें त्यानें मार्गेच करून ठेवलें आहे. तेव्हांपासून कोणत्याही हिंदु विधवेला तिला वाटेल तर पुनर्विवाह करण्याची कायद्यानें मोकळीक आहे; व तिची संतति इतर हिंदूंच्या संततीप्रमाणें कायदेशीर वारस होते. व्यक्तिविषयक स्वातंत्र्याला जो अडथळा होता तो काढून घेतल्यावर आतां असंमत वैधव्य अस्तित्वांत आहे, असें म्हणणें पोंकळ आहे. जो कागदपत्र सरकारी दफ्तरांत राहावयाचा आहे त्यांत वरील शब्दसमुच्चयाला जागा मिळतां कामा नये. ”

“ कित्येक वर्षांपूर्वीं एका हिंदु गृहस्थानें आपल्या ज्ञातींतील प्रतिष्ठित, धैर्यगुणसंपन्न व असल्या अनेक गुणांनीं मंडित अशा १०० गृहस्थांस

एक पत्र लिहिलें व मीं आपल्या ज्ञातींतील विधवेशीं पुनर्विवाह करणार आहें तेव्हां माझ्याशीं तुम्हीं अन्नोदक व्यवहार करावा अशी विनंति केली. या विनंतिपत्राची व्यवस्था त्याच्या योग्यतेप्रमाणें झाली. कारण या जपा-कुसुमसंघातांनीं व शेवंतीच्या राशीनीं आकीर्ण अशा सुधारणापथानें जाणाऱ्या ल्यूथरास कोणी साथिदार मिळाल्याचें प्रसिद्ध झालें नाहीं. या चळवळीचा उगमाशींच नाश झाला. ”

“ हिंदूंना जरा चढवून जरा चिढवून त्यांच्या ज्या धर्मसमजुती आहेत, त्यांस गुंडाळून ठेवावयास लावून त्यांच्या उलट वर्तन करावयास लावणारी अपुरी माहिती असलेल्या काल्पनिक सृष्टींत संचरणाऱ्या लोकांनीं पुढें आण-लेली हल्लींची योजना, तर अधिक खोडसाळ व अधिक धाष्टर्याची आहे. कारण सरकारी अधिकाऱ्यांचा या योजनेला पाठिंबा मिळावयाचा आहे. वास्तविक अथवा अवास्तविक अशा प्रत्येक सामाजिक दोषाचा प्रतिकार करण्याकरतां सरकाराकडे धांव मारीत जाणाऱ्यांच्या नैतिक दुर्बलतेविषयीं वाटणारा तिरस्कार लपविणें कोणाला साधावयाचें नाहीं. हिंदूंच्या माथीं इतकें क्रियाशून्यत्व मारून पुरातन व हल्लींच्या इतिहासाच्या ज्ञानाभावें जी या लेखकानें त्यांची तारीफ केली आहे ती निमूटपणें मला सहन करवत नाहीं. म्हणून वाईट वाटतें. कित्येक संवत्सरमाला पुन्हां पुन्हां उलगडल्या, असंख्य उत्क्रांत्या झाल्या तरी हिंदूंचें मूळ हिंदुत्व नष्ट झालेलें नाहीं. इंग्रजी विद्येच्या अभ्यासानें शेक्स-पियर, मिल्टन, वर्ड्स्वर्थ, टेनिसन, गोल्डस्टक्कर व मुल्लर व त्यांचे मानार्ह समकालीन ग्रंथकार यांचे ग्रंथ वाचून आमच्या भीष्म, वालि, वसिष्ठ व जनक इत्यादि कीर्तिमान पूर्वजांची स्मृति नष्ट झाली नाहीं व तीबरोबर स्वाभिमा-ही नष्ट झाला नाहीं. विधवाविवाहाचा कायदा १८५६ सालीं झाल्यापासून विधवाविवाहांचा धडाका सुरू झाला नाहीं. कारण हिंदूंचें बहुमत या काय-द्याच्या विरुद्ध होतें. चारी इलाख्यांची सदर अदालत कोडतें विरुद्ध होतीं. ज्या जातींत पुनर्विवाह रूढ आहे, तींत सुद्धां पुनर्विवाह प्रत्येक विधवेचा

नियमानें होतो असें नाहीं. जातिबहिष्कृतांससुद्धां याची आवड नाहीं. या वरून तो कायदा लोकांच्या मनाची तयारी झाल्या पूर्वीच करण्यांत आला आहे हें उघड आहे. पुढें असें ध्वनित केलेलें आहे कीं, पुनर्विवाह करण्याची प्रवृत्ति सर्व हिंदूंत आहे परंतु सामाजिक छळ व जातिबहिष्कार या दोघांच्या भीतीनें ती दबून राहिली आहे."

"असें म्हणण्यानें कांहीं लोकांस इतरांच्या धर्मसमजुतीमुळें छळ सोसावा लागून ते त्या समजुतीस बळी पडत आहेत असें ठरवून सरकारास आपल्या पक्षाकडे ओढून घेण्याचा बेत लेखकाचा दिसतो. ही स्थिति तिचा अवलंब करणाऱ्यांस अवनतीच्या मार्गास लावणारी आहे व समाजास विघातक आहे. मी म्हणतों कीं जो प्राणी बोलून चालून जातीचे नियम मोडील त्यास जातीनें बहिष्कृत केल्यास त्यास कुरकूर करण्याचा अधिकार नाहीं. आमच्या सामाजिक व धार्मिक नियमांत व आचारांत कोणी त्रयस्थानें हात घालूं नये, एवढेंच आमचें हिंदूंचें मागणें आहे. सुधारकास जर स्वतंत्र रीतीनें वागावयास पाहिजे आहे तर ज्ञातिसमाजासही त्याच न्यायानें स्वतंत्र रीतीनें वागूं दिलें पाहिजे. सुधारकास एक विकावयास व एक विकत घेण्यास अशीं निरनिराळीं दोन मापें ठेवतां येणार नाहींत. अशी परिस्थिति असतां सरकारला मध्यें हात घालतां येणार नाहीं."

नंतर मलबारी यांनीं कांहीं सूचना केल्या होत्या तिकडे रावसाहेब वळले.

"मि. मलबारी यांच्या दुसऱ्या सूचनेचा नामनिर्देश केला म्हणजे आपोआप तिचा भ्रामकपणा दिसून येईल."

"एखाद्या विधवेनें जुलमानें एकांतवास पतकरिला आहे कीं नाहीं हें सरकारास कसें ओळखेल ? सरकार काय मॅजिस्ट्रेटास हिंदूंच्या पवित्र देवघरांत दवडून असा प्रकार होत आहे कीं नाहीं हें शोधून काढविणार ? हिंदू लोक आपल्या घरगुती गोष्टींची जाहिरात देऊन चवाठ्यावर चर्चा करीत बसणार नाहींत. त्यांना तशी संवय नाहीं. काय चर्चा करणें ती ते आपसांतच करतात. याचा सरकारनें विचार करावा"

" एका ठिकाणीं मि. मलबारी म्हणतात कांहीं विधवांची तर इतकी प्रगति झाली आहे कीं त्या आपल्या दुःखावर गद्यात्मक व पद्यात्मक लेख लिहितात व कलेक्टरकडे नव्हे महाराणी साहेबांकडे अर्ज करतात. वाः ! एवढी जर एखाद्या स्त्रीची प्रगति झाली असेल तर तिला आपला देह वाटेल त्यास अर्पण करतांना कोणता कायदा तिचा हात धरील तें मला माहीत नाहीं. कोणी प्रतिकार करील तर तो हल्लींच्या कायद्याप्रमाणें दंडार्ह आहे. पुनर्विवाह हा आपल्या व आपल्या पतीच्या पारमार्थिक सुखाच्या आड येईल, ही समजूत कायद्यानें कशी नष्ट होईल ? "

" समाजाचे अंगीं कांहीं दोष असतील परंतु यांचे दोष उघडकीस पुढें येण्याची भीति बाळगावयास नको. गतकालाची स्मृति आम्हीं रोजच्या आचरणांवरून ठेवितों असें दिसून येत आहे. तें सोडून द्या, पण हल्लींच्या काळीं जर इंदूरची अहिल्याबाई पडद्यांत राहून धर्मराजाप्रमाणें न्यायाचें कार्य करूं शकते, नुसतीं साधीं पत्रें पाठवून शेजारच्या राजांच्या उरांत धडकी भरविते व लोक आपली देवळें बांधून पूजा करीत राहतील इतकें पवित्र आचरण राखूं शकते तर हिंदू विधवांस चांगली संगति लागलेली असते. त्यांस मि. मलबारी सारख्यांच्या उपदेशाची जरूर नाहीं असें सिद्ध होत आहे. "

या पुढें रावसाहेब मि. मलबारी यांच्या बालविवाहविषयक दुसऱ्या पत्राकडे वळले.

" हा विषय सुद्धां तितकाच नाजूक आहे. येथें सुद्धां मि. मलबारी यांनीं आपल्या कल्पनाशक्तीवरच भिस्त ठेवली आहे. त्यामुळें व ते स्वतां हिंदु नसल्यामुळें ते जे एकदां काल्पनिक व्यूहांत जाऊन पडले आहेत त्यांतून मुक्त होण्याची त्यांस आशा थोडी दिसत आहे. "

" मि. मलबारी म्हणतात जातिनिर्बंधामुळें नवरा शोधण्याचें क्षेत्र संकोच पावतें म्हणन हिंदू आईबापांस हाब्सन जशी निवड करी तशी करावी लागते. म्हणजे ज्या मुलाचें अथवा मुलीचें पहिल्यानें दर्शन होईल त्याची

किंवा तिची अथवा स्वस्त पडेल तशी, निवड करून टाकावी लागते. हें हिंदू स्थितीचें खरें वर्णन नव्हे. मुलीचे पैसे घेणें हें पाप समजतात. येणें प्रमाणें त्यांच्या लेखांतील पहिल्या वाक्यखंडांतील मजकुराशीं माझा मतभेद आहे. योग्य मुलीची निवड करतां येईल एवढा प्रत्येक समाज मोठा आहे. बरें नाहीं असें समजा; तर लग्न करण्याचें पुढें ढकलल्यानें ही गैरसोय कशी नाहींशी होते ? जातिभेदाची मलबारीनीं केलेली निंदा राग येण्यासारखी आहे. परंतु अपायकारक नाहीं. ज्यांना जात मोडावयाची असेल त्यांना तसें करण्याची मुभा आहे. परंतु प्रत्येकाला वाटेल तेव्हां जातींत येणें व वाटेल तेव्हां जातीच्या बाहेर जाणें हें शक्य नाहीं. ”

“ बालपणीं विवाह करून ज्यांचीं शरीरें सदृढ राहिलीं आहेत, मनाची शक्ति नीट राहिली आहे अशांचीं उदाहरणें जर चांगला पुरावा ठरत असेल तर मी ज्यांत पन्नासाव्या, साठाव्या अगर त्याहूनही अधिक वयाच्या अवस्थेंत शरीरानें बळकट असून काम करण्यास लायक माणसें ज्यांत आहेत तशीं कुटुंबें मागील तीन पिढ्यांत कोड्यांवारी दाखवून देतों. ”

“ अमेरिकेंतील युनायटेड स्टेटस् सारख्या सुधारलेल्या देशामध्यें संमतीचें वय मुलांस चवदा व मुलींस बारा आहे. न्यूयॉर्कमध्यें तें अनुक्रमें १७ व १४ करण्याचा प्रयत्न झाला;परंतु पुनः १८३० मध्यें त्यांचा त्यांसच किळस येऊन लोकांनीं तें मान पूर्ववत् १४ व १२ केलें. ”

“हिंदूंच्या जुन्या चालीप्रमाणें मुलीच्या लग्नाचें वय १२ असे परंतु विद्यार्थी-दशेचा संकोच झाल्यानें व चालींत फरक होत गेल्यानें मुलांचें वय हळू हळू कमी होत गेलें. शिवाय हिंदूंचा लग्नसंबंध म्हणजे एक घाऊक कंत्राट नव्हे. तो एक धर्माचा पवित्र निर्बंध आहे. हिंदुसमाज रचनेची ती एक अमोलिक कोनशिला आहे. एखाद दुसऱ्या उदाहरणांवरून सबंध लग्नव्यवस्थाच वाईट असें होत नाहीं. ”

“ बालविवाहापासून फाजील प्रजोत्पत्ति होते असा एक बालविवाहाचा दोष दाखविला जातो. परंतु हें विधान बालविवाहानें शारीरिक अवनति होते असें

जें दुसरें विधान आहे त्याच्याशीं विसंगत आहे. कारण फाजील प्रजोत्पत्ति हा शारीरिक अवनतीचा परिणाम असूं शकणार नाहीं."

"मि. मलबारी यांचा शिक्षणावर भरंवसा नसेल पण माझा आहे. तथापि भारलेल्या तायतांत अगर यक्षिणीच्या कांडींत क्षणांत चमत्कार करून दाखविण्याची जी शक्ति आहे ती शक्ति अल्प कालिक शिक्षणांत नाहीं. संस्थांची वाढ दीर्घकालिक असते. तशी संवयींची असते. त्यांची वाढ कोणाच्या हुकमानें होणार नाहीं, व आपला कार्यनिर्वाह करण्याचें हिंदूंना साधणार नाहीं. हिंदूंना मिळालेल्या शिक्षणास व त्यांच्या नीति धैर्यास असें होणें प्रतिकूल आहे."

"मि. मलबारी यांच्या या शेवटल्या भागांतील विधानास मी हरकत घेतों. मला हिंदुस्थानांतील सर्व इलाख्यांचा अनुभव आहे व तो तीस वर्षांचा आहे. तेवढ्यामध्यें मि. मलबारी म्हणतात तसलीं उदाहरणें शास्त्रानें संमति दिलेलीं, पश्चिम हिंदुस्थानांत अथवा इतरत्र आढळलीं नाहींत."

"वयानें आजी नाहीं पण आई शोभेल अशा स्त्रीशीं पुरुषांनीं विवाह केल्याचीं उदाहरणें सुधारलेल्या देशांतून काढून मला सांगतां येतील. पण तसें करावयास मला कोणी आव्हान केलें नाहीं. परंतु हिंदुधर्माची अशी आज्ञा आहे व रूढि आहे कीं पत्नी पतीपेक्षां वयानें लहान असली पाहिजे. हा नियम मोडल्यास त्यास शिक्षा करण्याची शक्ति समाजाच्या अंगांत आहे. असले संक्षोभकारक लेख लिहिण्यापासून फायदा कोणाचाच नाहीं. साध्या, धर्मभोळ्या हिंदूंना भिवविण्याचा प्रयत्न असेल तर तो काळ आतां गेला. मॅजिस्ट्रेटाच्या धाकानें बालविवाहास प्रतिबंध होणार नाहीं व विधवाविवाहास उत्तेजन मिळणार नाहीं."

वर निर्दिष्ट केलेल्या तत्त्वावर मि. मलबारी यांच्या सुचनांना उत्तर देऊन रावसाहेबांनीं समारोप केला तो:—

"विषयाचें विवेचन वाढलें म्हणून मी नामदार गव्हर्नर साहेबांची क्षमा मागतों. या लेखास संक्षेप देतां आला असता तर तसें आनंदानें केलें

असतें. पुष्कळांनीं प्रश्नाचें उत्तर लिहिण्याचा मला आग्रह केला पण मी तसें केलें नाहीं. अगदीं ब्र काढल्याशिवाय गेल्या जुलई महिन्यापासून मी स्वस्थ बसून होतों. कारण त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं असें मला वाटलें. सरकारापुढें मि. मलबारी यांनीं आणलेल्या विषयाचा संबंध हिंदूंच्या धार्मिक आचारांशीं येतो. त्यांत दुसऱ्यानें हात घातल्यापासून नैतिक अवनति होऊन असंतोष वाढेल. मि. मलबारी यांशीं पत्रव्यवहार करण्यांतही मला कांहीं फायदा होईल असें दिसलें नाहीं. हिंदुसमाजांत कांहीं दोष असल्यास ते काढून टाकण्याइतकी सजीवता त्या समाजांत आहे. हिंदु समाजाला अगदीं स्तिमितता प्राप्त झाली नाहीं."

"एक लहानसें पुस्तक माझ्या हातांत पडलें आहे त्यावरून असें दिसतें कीं कांहीं थोडे हिंदू लोक, ज्या बाबतींत सरकारनें त्रयस्थ राहावें त्या बाबतींत सरकारनें हात घालावा अशी विनंति सरकारास करणार आहेत."

" आतां घटाकाभर असें समजा कीं कांहींच्या हातून अनिष्ट प्रकार घडत आहेत तर त्याविरूद्ध तक्रार करणारे हे लोक असले दुष्ट प्रकार करणाऱ्या राक्षसांसच कां शिक्षा करण्यास उद्युक्त होत नाहींत ? "

" पश्चिम हिंदुस्थानांतील आमचे सामाजिक व नैतिक हितकर्ते ज्ञानदेव, तुकाराम, मुक्ताबाई, एकनाथ, रामदास, व दुसरे साधुसंत यांच्या मागें दुसरीं मानवी यंत्रें म्हणजे सेना, मन्त्रिमंडळें व सरकारें उभीं नव्हतीं ! आम्हीं वरील सन्तांची पूजा करतों, देवळें बांधतों, कारण त्यांची स्मृति व लेख यांच्या अंगीं मोठी शक्ति आहे. ही प्राप्त करून घेण्यास मी नम्रपणें म्हणतों राजपथसुलभ मार्ग नाहीं. लोकांनीं बोलावें तसें चालण्यास सिद्ध झालें पाहिजे. प्रगति हळूहळू होईल. कष्टानें होईल. शिक्षण प्राप्त झालेले लोक जर अशा स्वार्थत्यागास सज्ज होणार नाहींत तर त्यांच्या शिक्षणाचा उपयोग काय ? "

"केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनें पाहिलें तर या बाबी सरकारनें अवश्य अथवा खुशी वाटल्यास हात घालण्यासारख्या नाहींत. अथवा सरकार जर हात घालील

तर लोकांच्या मागें एक कृत्रिम नैतिक पोलिसच निर्माण होईल. राष्ट्रांतील लोकांच्या बुद्धीची वाढ खुंटेल. हित करण्याच्या मिषानें हिंदूंच्या गृहस्थितींत, अत्यन्त प्रिय धार्मिक आचारांत हात घालण्याची पद्धति चालू होईल. लोकांत स्वातंत्र्याचा नाश होईल. शेवटीं आयुष्यांतील उच्चतम कर्तव्यें करण्यास ते नालायक होतील. हा परिणाम हिंदुस्थान सरकार केव्हांही घडवून आणणार नाहीं अशी आशा आहे व तिनेंच लोक संतुष्ट रहात आहेत व तींतच राज्याची सुरक्षितता आहे. ”

या लेखांत रावसाहेबांचें लेखनकौशल्य, बुद्धिसामर्थ्य, अस्सल कोटिक्रम व ओजस्विता दिसून येत आहे. हा लेख सुधारकांस आवडला नसेल व हा प्रतिकारस्वरूपाचा आहे असेंही त्यांस वाटलें असेल. व इतके दिवस सुधारकांनीं संख्येच्या मानानें पुष्कळ चांगली ओरड सतत चालू ठेवली होती, तिनें रावसाहेबांचें लक्ष फारसें आपलेकडे वेधून घेतलें नव्हतें. घेतलें असल्यास त्यांनीं त्यांची ओरड मनावर घेतली नव्हती. पण आतांच यांनीं पुढें सरसावून एवढा कडक लेख कां लिहिला त्याचें कारण त्यांच्या २८।२।२५ च्या मि. फिट्झ पॅट्रिक यांस लिहिलेल्या पुढील पत्रावरून दिसून येतें:—“ तुम्हांस सोबतचा लेख वाचावयास पाठविला आहे × × × आंत लिहिलेल्या गोष्टीच्या खरेपणाविषयीं मी जबाबदार आहें. या लेखांतील माझी भाषा मला अवश्य तेथें कडक असावयाला पाहिजे व ती मी बुद्ध्या घातली आहे. ज्या लोकांच्या चालीरीतींवर मि. मलबारी यांनीं मत दिलें आहे, त्यांच्या अंतः चालीरीतींचें त्यांस मुळींच ज्ञान नाहीं. दुसऱ्यानें जसें मला वागवावें असें वाटतें तसें मी त्यास वागविण्यास तयार आहें. पण धार्मिक, नैतिक व सामाजिक बाबतींत आमच्या समाजावर कोणी प्रयोग करून पहावयास निघेल तर त्याला मी हरकत घेईन.”

याशिवाय दुसरें एक कारण, वरील लेख, आपले मित्र बॅरो ( म्युनिसिपल सेक्रेटरी ) यांस वाचावयास पाठविला होता, तेव्हां लिहिलेल्या पुढील पत्रांत दिलेलें आढळतें तें:—“ माझ्या मताप्रमाणें आमच्या समाजाची मि. मलबारी यांनीं फार ओंगळ रीतीनें बेअब्रू केली आहे. ” ( ३।२।८५ )

रावसाहेबांचा लेख वाचून **प्यारी मोहन मुकरजी** यांनीं त्यांस २०।४।८५ चें पत्र लिहिलें:—" मि. मलबारी यांनीं केलेल्या असंभवनीय व शशशृंग शोधण्याच्या योजनेवर जो तुम्हीं वाक्प्रहार केला आहे त्याहून अधिक जोरानें व यथायोग्य रीतीनें प्रहार करणें शक्य नाहीं. याचप्रमाणें चोहोंकडून मलबारींच्या योजनेविरुद्ध लोकमताचें दिग्दर्शन झालें असतां मला वाटतें सरकार आतां त्या विषयाचा नाद सोडून देईल. तथापि मलबारींच्या चळवळीनें एक हित असें झालें आहे कीं कांहीं बाबतींत जरी वैधर्मिक प्रवृत्ति दिसून येत आहे तरी आपल्या राष्ट्रीय संस्थांवरील ज्ञानी हिंदूंचें प्रेम गाढ होत आहे."

याच प्रमाणें हा लेख वाचून हिंदू पेट्रियट पत्रानें अगाध विद्वत्ता, देशाभिमान, श्रेष्ठ आचरण व जे जे गूण शिवाजी महाराजांच्या वेळेस महाराष्ट्रीयांत गाजत होते त्या त्या गुणांचें वास्तव्य रावसाहेबांच्या अंगीं आहे असें सांगून संस्कृत व इंग्रजी विद्यांचें ज्ञान व न्यायीपणा या गुणांबद्दल रावसाहेबांची तारीफ केली व हे ब्रिटीश सरकारच्या मंत्रिमंडळांत महाराष्ट्राचे प्रतिनिधि म्हणून बसण्यास लायक आहेत असें सांगितलें. रावसाहेबांस दांभिकपणा व वाचाळता हे गूण आवडत नसल्यामुळें त्यांच्या सामाजिक सुधारणेविषयींच्या मतास मान दिला पाहिजे असा उपदेश केला व हे लेख जरी कडक दिसले तरी कळकळीनें लिहिले असल्यामुळें आदरणीय आहेत असें म्हटलें.

याप्रमाणें रावसाहेबांच्या पक्षास बहुतेक सुशिक्षित लोक येऊन मिळाले.

**पांडुरंग बळिभद्र** यांनीं कायद्याच्या विरुद्ध मत दिलें. हिंदूंचा लग्न हा संस्कार म्हणजे युरोपियन संस्कारासारखा नाहीं. गर्भाधान हा संस्कार बाळपणीं होत नाहीं, असें स्पष्ट केलें. युनिव्हर्सिटीचें काम परीक्षा घेऊन डिग्री देण्याचें आहे. हिंदू विधवेला, लग्नसंबंध अवियोज्य आहे असें समजून विदेही बनणारीला, सीता सावित्रीच्या पूजकेला, तुकाराम रामदास यांच्या भक्तिरहस्याला हृदयीं धारण करणारीला, पुनर्विवाह करावयास लावण्याला कायदा समर्थ होणार नाहीं, असें सांगून सुधारणेची भिस्त शिक्षणावर टाकली.

काशीनाथपंत तेलंगानीं असाच फरक करून दाखविला व खरे बाल-विवाह थोडे आहेत असें दाखविलें. बालपणीं विवाह झालेल्यास परीक्षेला न बसूं देणें म्हणजे आईबापांच्या पापाचें प्रायश्चित्त मुलांस देण्यासारखें आहे असें ते म्हणाले परंतु अशांस बाक्षिसें न देण्याची त्यांनीं तयारी दाखविली.

* राजेंद्रलाल मित्रांनीं मत दिलें कीं:—बालविवाहाचे वाईट परिणाम होतात हें सर्वांस माहित आहे पण प्रौढपणीं विवाह झाल्यापासून सर्वथैव नफा नाहीं. जसे बालविवाहांत तोटे तसे प्रौढ विवाहांतही आहेत. बालविवाह असल्यामुळें व पुनर्विवाह नसल्यामुळें आमच्या बायकांत जितका व्याभिचार आहे त्याहून कमी व्यभिचार ज्या देशांत बालविवाह नाहींत व पुनर्विवाहास प्रत्यवाय नाहीं त्या देशांत नाहीं. बाबू प्रतापचंद्र राय यांनीं फ्रामजी कावसजी हॉलमध्यें एका व्याख्यानांत सांगितलें कीं जो आमच्या हिंदू विधवांच्या नैतिक आचरणावर शिंतोडे उडवील तो सुधारक नसून कुधारक समजावा.

अशीं मतें कायद्याच्या विरूद्ध पडत गेलीं तरी मि. मलबारी डगमगले नाहींत, त्यांनीं लेखांचा उद्योग चालू ठेवला. तितक्यांत "हिंदू लेडी" या नांवाखालीं इंग्रजी दैनिकांत पत्रें येऊं लागलीं. बाळपणीं लग्न झाल्यामुळें मी अभ्यासाला अंतरलें, माझें आयुष्य फुकट गेलें, मीं दुःखी झालें असें सांगून सरकारला मध्यें पडण्याविषयीं विनंति करूं लागली. फक्त कांहीं जातींत पुनर्विवाहाला निषेध आहे हें परकी मलबारीशेटजींस माहीत नसेल पण हिंदू लेडीला कां माहीत नसावें हें लोकांस गूढ वाटलें. मि. मलबारी व हिंदु लेडी यांचा सूर एकच होता; मात्र हिंदू लेडीला स्त्रीजातिसहज थोड्या वातोन्मादाचीं लक्षणें झालीं होतीं असें तिच्या लेखांवरून दिसून आलें. पुढें पुढें या बाईच्या किंकाळीचा प्रतिध्वनि इंग्लदमध्यें टाइम्सच्या लेखांत उत्पन्न झाला. परंतु उपायांच्या योजनेंत तूं पुनर्विवाह कां करूं नयेस असें हिंदु विधवेला नोटीस काढलेली त्या वृत्त पत्रांत दिसली.

---

* यांनीं आपल्या मताची एक प्रत रावसाहेबांकडे पाठविली होती.

कांहीं असो पण आतां एकजण चळवळ करीत होता तेथें दोघेजण करीत आहेत असें या हिंदू लेडीच्या पत्रानें झालें व हा दुसरा चळवळ्या स्त्रीत्वावगुंठित असल्यामुळें युरोपियनांच्या दाक्षिण्यास भरती आली. डाक्तर कीर्तिकर यांनीं विरुद्ध पत्र लिहितांच अरे काय तुमच्यांत अगदीं स्त्रीदाक्षिण्य नाहीं असें म्हणून गप्प बसवावयाचा प्रयत्न झाला व आम्हीं कायदा करून घेणार असें सुधारक फुशारकी मारूं लागले.

नंतर १८८५ च्या दिसेंबरांत शास्त्र व रूढि यांतून बलवत्तर कोण यावर नामदार तेलंग यांचें व्याख्यान झालें. त्यांत त्यांनीं अभिप्राय दिला कीं कालदेश वर्तमानानुसार शास्त्रामध्यें व रुढीमध्यें फरक करणें झाल्यास शास्त्राचा मूळपाया कायम ठेऊन व श्रुति, स्मृति, सदाचार, स्वस्यच प्रियमात्मनः या धार्मिक मूलतत्त्वाच्या वाक्यास अनुसरून ते करावेत म्हणजे शास्त्र मोड-ल्याचा आरोप आमचेवर येणार नाहीं.

प्रोफेसर वर्डस्वर्थ यानीं मि. मलबारी यांस पत्र लिहिलें व आपलें विरुद्ध मत प्रदर्शित केलें. तेव्हां आजपर्यंत कांहीं लोक जे सुधारणेविषयीं साशंक होते, जे समूल सामाजिक सुधारणावाद व पुरातन मताभिमान यांच्यामध्यें लोंबत होते, ज्यांनीं सुधारकांची तर्काचे पायावर रचलेली परंतु क्रियासिद्ध नसलेली सुधारणा अयशस्वी झालेली पाहिली होती, ते मात्र आतां सुधारणेच्या तर्फेचीं मतें बाजूला सारून पुरातन मतवाल्यांच्या महौघांत सामील झाले.

अशा रीतीनें सामाजिक सुधारणेच्या चळवळीस फार उत्त आला. वर्तमानपत्रांस दुसरा विषय उरला नव्हता. सभांस दुसरें कार्य सुचत नव्हतें. व वक्त्यांना दुसरा धंदा नाहींसा झाला होता. मि. मलबारीनीं विश्रान्ति घेतली नाहीं. शेवटीं सरकारासही विचार पडला व जर लोक कायदा मागून घेण्यास राजी असतील तर कायदा करण्याची त्यांची तयारी आहे असें लोकांस वाटलें व कायद्याचे मसुदेही तयार झाले अशी बातमी बाहेर पसरली, तरी सुद्धां हिंदू लोक कायद्याच्या विरुद्ध नाहींत असें भासविण्याचा प्रयत्न झाला. तेव्हां आतां स्वस्थ बसून उपयोग होणार नाहीं. इतका वेळ धरलेलें मौन म्हणजे कबुलीच समजली जाईल. आपली शांत, स्थिर व गंभीर वृत्ति

हिंदुसमाजास सोडून द्यावी लागली. यास्तव प्रथम माधवबागेंत हिंदूच्या पुढाऱ्यांची प्रास्ताविक सभा भरली होती. तिचें आमंत्रण काशिनाथपंत तेलंग यांस होतें पण कार्यबाहुल्यामुळें ते आले नाहींत. तींत मोठी सभा भरविण्याची व्यवस्था झाली. व रावसाहेबांस अध्यक्षस्थान देण्याचें ठरविण्यांत आलें. हिंदुस्थान सरकारकडे पाठविण्याच्या अर्जाच्या मसुद्याचें काम रावसाहेब, मानकर, आठल्ये, नगीनदास व खिमजी जीवा यांकडे सोंपवून सर्व हिंदू लोकांस सभेस आमंत्रण देण्याचें ठरलें. त्याप्रमाणें तारीख ५ सपटंबर १८८६ रोजीं सभा भरली.

## प्रकरण ६९ वें.

# माधव बागेंतील सभा.

। मातंगाः किमु वल्गितैः किमफलैराडंबरैर्जम्बुकाः ।
॥ सारंगा महिषा मदं व्रजत किं शून्येषु शूरा न के ॥
। कोपाटोपसमुद्भटोत्कटसटाकोटेरिभारेः पुरः ।
॥ सिंधुध्वानिनि हुंकृते स्फुरति यत्तद् गर्जितं गर्जितं ॥ १ ॥

माधवबागेंत हिंदूलोकांची सभा भरली होती. तिचा विस्तार फार मोठा होता. आठपासून दहाहजार लोक जमले होते. हिंदू लोकांचा समाज केवढा मोठा आहे त्यांतील चाली किती शतकें चालत आल्या आहेत व त्या सुधारणें झाल्यास कशा बेताबातानें सुधारल्या पाहिजेत वगैरे गोष्टींचा बिलकूल विचार आमच्या सुधारकांनीं केला नाहीं. ज्या विस्तीर्ण समाजाबद्दल आपण बोलतों त्याचें ह्मणणें काय आहे हें यांपैकीं कोणीच पाहिलें नाहीं. हिंदुसमाजास फायदा होणें इष्ट नाहीं हें पक्कें ठाऊक असतां कायद्यास आव्हान दिल्यानें सुधारकांनीं हिंदुसमाजाच्या नाकांत काड्या घालून त्यास जागृत करण्याचें साहस केलें.

अध्यक्षस्थान रावसाहेबांनीं पतकरलें होतें. त्याच दिवशीं सकाळच्या एका गुजराथी पत्रांत एक कुत्सितलेख प्रसिद्ध झाला होता. त्यामुळें मंडळींत फार क्षोभ झाला होता. माधवबाग ३ वाजण्यापूर्वींच भरून गेली व सर्व जातींच्या हिंदूंच्या झुंडीच्या झुंडी सर्वत्र पसरल्या. गर्दीमुळें लोक गुदमरूं लागले. वेळ होतांच रावसाहेब सभास्थानीं दाखल झाले. लोकांचें मत घेतां रावसाहेबांनीं गुजराथींत किंवा मराठींत बोलावें असें ठरलें. गुजराथी समाज जास्त असल्यामुळें रावसाहेबांनीं गुजराथींतच बोलण्यास सुरवात केली.* प्रास्ताविक भाषण झाल्यावर पुण्यांतील लोकांचें या सभेस पुष्टि देणारें सहीसूद पत्र वाचून दाखविण्यांत आलें, त्याच्यावर पुष्कळ विद्वान शास्त्री, सरदार, व गृहस्थ यांच्या सह्या होत्या. त्यापैकीं कांहीं दिल्या आहेत:—

सरदार सदाशिवराव माधव पुरंदरे;
रघुनाथराव विठ्ठल विंचूरकर;
नारायण चिंतामण फडतरे;
महादेव मोरेश्वर कुंटे;
माधवराव यशवंतराव रास्ते;
सिताराम हरि चिपळूणकर;
बळवंतराव विनायक शास्त्री पटवर्धन;
सरदार:-फडणीस, मेंदळे, चंद्रचूड;
विठ्ठलराव नातू व दुसरे नातू;
बाळ गंगाधर टिळक;
नारायणराव मुजुमदार;
आनंदराव खंडेराव रास्ते;
रावजी श्रीधर गोंधळेकर;
शिवराम हरि साठे;
गणपतराव विनायक सांगलीकर;
शंकर विश्वनाथ केळकर;
महादेव बल्लाळ नामजोशी;
प्रो. केळकर, गोळे, धारप, पाटणकर; व आपटे,
राम दिक्षित आपटे;
कृष्णाजी रघुनाथ केळकर;
कृष्णशास्त्री राजवाडे;
नारायणशास्त्री गडबोले;
महादेवशास्त्री भोपर्डीकर;
वासुदेवशास्त्री कानिटकर;
कृष्णशास्त्री भाटवडेकर;
रामचंद्र सखाराम गुप्ते; सरदार ढमढेरे.

इत्यादि.

---

* प्रारंभापासून शेवट पर्यंत कोणत्याही वक्त्यांच्या तोंडून इंग्रजीचा शब्द निघाला नाहीं.

नंतर संमति सूचक तार वेदोत्तेजक सभेनें पुण्याहून पाठविली ती वाचून दाखविण्यांत आली. जव्हेरी लाल याज्ञिक यांच्या सहानुभूतीचें पत्र वाचून दाखविण्यांत आलें. नंतर रावसाहेब कृष्ण मुखराम मेहता ( डेप्युटी रजिस्ट्रार हायकोर्ट ) यांनीं अर्जाचा मसुदा वाचून दाखविला त्यास दाजीसाहेब खरे यांनीं अनुमोदन दिलें. लोकांमध्यें इतके दिवस चाललेली चर्चा व तेणेंकरून पुष्कळांचा झालेला चित्तक्षोभ लक्षांत घेतां हीं प्रचण्ड सभा निर्विघ्नपणें कशी पार पडते अशी पुष्कळांस काळजी वाटत होती.

परंतु अशा सभा कशा चालवाव्या हें रावसाहेबांस शिकवावयास नको होतें. त्यांनीं प्रथमच सांगितलें कीं ही सभा सुधारणा नको असें ह्मणण्याकरितां भरली नाहीं. काय सुधारणा करावयाच्या हें सुचविण्यासाठीं पाहिजे तर दुसरी सभा मुद्दाम भरवतां येईल; म्हणून आजच्या सभेंत वाद विवाद करावयाचा तो सुधारणा करण्यांत कायद्याची अवश्यकता आहे कीं नाहीं एवढ्याच मुद्यावर करावा अशी जमलेल्या लोकांस त्यांनीं विनंति केली. वादविवादाचें क्षेत्र अगदीं नियमित झालें व पाल्हाळास स्थळ उरलें नाहीं.

नंतर ईश्वरलाल दवे यांनीं उलट बोलावयास आरंभ केला. मागून नामदार तेलंग बोलावयास उठले. त्यांनीं प्रथम आपल्या गोड वाणींत कायद्याची जरूरी नाहीं असें स्पष्ट मत दिलें. व ह्मणाले “ अर्जांत शेवटीं लिहिलेलें आहे कीं, लग्नसंबंधाच्या चालींत फेरफार होणें तो सामाजिक इच्छेनें व सामाजिक यत्नानेंच झाला पाहिजे. यांत एक शोध पाहिजे. बालविवाह व असंमत वैधव्य यापासून होणारे दुष्परिणाम आह्मीं जाणतों ते आमचे आह्मींच सुधारले पाहिजेत. सरकारनें त्यांत हात घातल्यानें नुकसान होईल असा अर्जांत उल्लेख करावा.” या सुचनेस मि. पारख यांनीं अनुमोदन दिलें. डा. कीर्तिकर यांनीं तेलंगांच्या सुचनेविरुद्ध भाषण केलें. नंतर मि. पारख यांनीं तेलंगांच्या सुचनेला पुष्टि दिली. पण भाषण केलें नाहीं; परंतु आपण भाषण केलें असतें तर बरें झालें असतें असें वाटून अध्यक्षांची मुद्दाम परवानगी घेऊन तेलंगांच्या सुचनेच्या तर्फे भाषण केलें. नंतर ही सूचना बरी

आहे, वाईट आहे अशी चर्चा श्रोत्यांत सुरू होते न होते तों राहिलेल्या वेळा कडे दृष्टी देऊन तशीच कुजबुज रावसाहेबांनीं पुढें चालूं दिली नाहीं.

ज्यांस ही सूचना पसंत असेल त्यांनीं पुढें यावें असें सांगितलें तेव्हां तेलंग, गोकुळदास, चंदावरकर, गोपाळराव हरि देशमुख, शांताराम नारायण, घनश्यामपंत नाडकर्णी, शामराव विठ्ठल, वामनराव मोडक, खोटे, दवे, व नगरकर इत्यादि गृहस्थ पुढें आले. ते रावसाहेबांनीं मोजतांच ४७ भरले. तेलंगांची सूचना अर्थात नापास झाली. व अर्जाचा मसुदा हजारों लोकांच्या अनुमतानें पास झाला.

सुधारक मूठभर असून एवढ्या मोठ्या विरुद्ध बाजूच्या प्रचण्ड समूहांत हजर राहिले याचें कारण एकच होतें तें हें कीं, रावसाहेबांची शिस्त कडक होती. त्यांच्या नेतृत्वाखालच्या सभेंत कांहीं घोटाळा होणार नाहीं अशी सुधारकांची खातरी होती.

माधवबागेंतील सभा झाल्याबरोबर दरभंग्याचे महाराज यांनीं सभेनें पाठविलेल्या अर्जाची नक्कल रावसोहबांच्याकडून तारेनें मागविली. दोहोंकडे काय चळवळ चालली आहे, त्याची चवकशी दोहोंकडील पुढारी करीत असत. “सोबतची प्रत आज प्रविष्ट झालेल्या तुमच्या निरोपाचें जें उत्तर तारेनें तुम्हांस पाठविलें त्याची आहे. गेल्या रविवारीं भरलेल्या आमच्या सभेनें जो अर्ज सरकाराकडे पाठविला त्याचीही एक प्रत सोबत पाठविली आहे. या प्रकारचा एक अथवा अधिक अर्ज जर काशीक्षेत्रांतून पाठविण्यांत येतील तर मोठीच मदत होईल. माझे मित्र बापूदेव शास्त्री व कदाचित् त्यांचे सहकारी मित्र एकजुटीनें तुम्हांस साहाय्य करतील अशी माझी खात्री आहे. तुमच्या इकडे काय करण्यांत येत आहे तें तारेनें कळवा. मी इकडील वृत्त कळवीत जाईन.”

(११।९।८६ चे दरभंग्याचे महाराजांस पत्र.)

एवढें जोरदार बहुजन समाजाचें मत कायद्याच्या विरुद्ध आहे व त्याला रावसाहेबासारख्यांचा पाठिंबा आहे असें सरकारास कळतांच सरकारानें फार दिवस लोकांस संशयांत ठेविलें नाहीं. लवकरच लार्ड रे मुंबईचे गव्हर्नर, यांनीं

पुण्यास मुलींच्या शाळेंतील बक्षिस समारंभांत सरकार कायदा करण्यास तयार नाहीं असें आपल्या भाषणांत सुचविलें. व पुढें हिंदुस्थान सरकारनें उघडपणें सरकारी ठराव काढून कायदा करण्याचा आपला विचार नाहीं असें जाहीर केलें. तेव्हां बापूसाहेब आठल्ये, यांनीं ' केवढा माधवबागच्या सभेचा हा विजय ! ' असे उद्गार रावसाहेबांना लिहिलेल्या एका पत्रांत काढले.

रावसाहेबांच्या माधवबागेंतील सभेचा विजय म्हणजे हिंदूंच्या सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत एक महत्वाची बाब नमूद करून ठेवण्यासारखी झाली. ती एक सुधारणापथाची सीमाचिन्हच होऊन बसली आहे. तें कसें तें पहा. कायदे, राजा व प्रजा ( समाज ) या भेदानें दोन प्रकारचे आहेत. १ राजकृत् व २ समाजकृत्. राजकृत् कायदे राजाच्या आज्ञेनें अस्तित्वांत येतात. त्यांचा भंग करणाऱ्याची चवकशी राजानें नेमलेले न्यायपुरुष करतात व अपराध्यास शासन करतात. त्यांची अम्मलबजावणी राजदूत करतात. राजकृत् कायद्यांचा भंग न करण्याची खबरदारी मनुष्य घेतो ती या राजशासनाच्या भीतीनें घेतो. जीविताची व मालमत्तेची सुरक्षितता प्राप्त व्हावी व राज्याची व्यवस्था सुरळित चालावी असे या कायद्यांचे हेतू आहेत.

समाजकृत् कायदे समाजाच्या बहुमताच्या मंजुरीनें अस्तित्वांत येतात. त्यांचा भंग करणाऱ्याची चवकशी गांवकी अथवा समाजानें नेमलेले पंच करतात. व झालेल्या शासनाची अम्मलबजावणी समाजच करतो. या कायद्यांचा भंग न होऊं देण्याची खबरदारी मनुष्य घेतो ती जनापवादाच्या भीतीनें घेतो. याच जनापवादाच्या भीतीनें श्रीरामचंद्रानें जानकीचा त्याग केला. इतका मान सामाजिक कायद्यांस या देशांत पूर्वापार आहे.

समाजकृत् कायदे समाजाच्या अन्तर्व्यवस्थेकरतां केलेले असतात. त्यांच्यावर समाजाचें अस्तित्व अवलंबून असतें. निरनिराळया समाजांतील व्यक्तींचा परस्परसंबंध कसा असावा त्यासंबंधींचे कायदे समाज हा स्वतंत्र सत्तेनें करतो.

सुव्यवस्था हें दोन्हीं कायद्यांचें कार्य आहे. पण दोन्ही कायद्यांचीं कार्यक्षेत्रें निराळीं आहेत.

पानस्वातंत्र्य व्यक्तीस पाहिजे; म्हणून मदिरापान करणारा दुसऱ्यास इजा करीपर्यंत त्याचें शासन राजकृत् कायदा करूं शकत नाहीं. पण ज्या समाजांत अपेयपान करणें निषिद्ध आहे तो समाज अपेय पान करणाऱ्यांस बहिष्काराचें शासन करूं शकतो. कारण शुक्राचार्यांचा श्राप अद्याप जागृत आहे. अशीं दोहोंचीं कार्यक्षेत्रें भिन्न असूनही कधीं कधीं शेजारीं शेजारीं असलेल्या जमिनीच्या मालकांचे सांधीविषयीं ज्याप्रमाणें तंटे उपस्थित होतात त्याप्रमाणें सामाजिक कायदे व राजकृत् कायदे यांचे हद्दीवरून तंटे उपस्थित होतात. मागें अशाच एका तंट्याच्या प्रसंगीं समाजकृत् कायद्याला संमत असलेली सतीची चाल, राजकृत् कायद्यानें आपल्या सत्तेनें बंद केली व समाजकृत् कायद्यावर जय मिळविला.

त्याप्रमाणें आतां राजकृत् व समाजकृत् कायदे यांच्यामध्यें संधीचा प्रश्न उद्भवला. हिंदु समाजाची जी सुधारणा मि. मलबारी व त्यांच्या कच्छपीं लागलेल्या सुधारकांनीं सुचविली ती घडवून आणण्याचा अधिकार राजकृत् कायद्यांचा आहे कीं समाजकृत् कायद्यांचा आहे, हा प्रश्न उद्भवला. पण त्याचा निकाल समाजकृत् कायद्यांच्या तर्फे झाला. त्यालाच बापूसाहेब आठल्ये यांनीं माधवबागेच्या सभेचा मोठा विजय झाला असें मानिलें.

असें मत मुंबई इलाख्याच्या बाहेरच्या लोकांचेंही झालें, असें दर्भंग्याचे महाराज लक्ष्मेश्वरसिंग यांच्या खालीं टिपणींत दिलेल्या पत्रावरून* दिसेल.

---

* "रिपोर्ट लिहिण्याशिवाय पब्लिक सर्व्हिस कमीशनचें काम आणखी शिल्लक राहिलें नाहीं. प्रत्येक भावि सिव्हिलियनानें इंग्लंदास हें जाऊन आलेंच पाहिजे अशा तात्पर्याचें बहुतेक हिंदू साक्षीदारांनीं आपलें मत कसें दिलें आहे हें तुम्हांस विदित आहेच. त्याचप्रमाणें हे द्राक्षार्क मधु पिणारे, गोमांस भक्षण करणारे गांवठी साहेब, हातीं सत्ता आल्यावर सामाजिक सुधारणेचा आव घालून मोठ्या दांभिकपणानें ओरड करून आमच्या धर्माची केवढी हानि करतील हेंही तुम्हांस पक्कें माहीत आहेच. बालविवाह व विधवापुनर्विवाह या दोन प्रश्नांसंबंधीं

## प्रकरण ७० वें.

# दादाजी विरुद्ध रखमाबाई.

॥ भर्तुर्विप्रकृताऽपि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ॥
( कण्व महामुनींचा शकुन्तलेस सासरीं जातांना उपदेश.
कालिदास. )

पतिकोपीं नम्र असावें॥
( किर्लोस्कर. )

माधवबागेंतील सभा होऊन तिच्या तर्फे सरकारचा ठराव सुद्धां निघाला.

चळवळ करून या लोकांनीं आमची कडेलोट करण्याची वेळ कशी आणली होती हेंही तुम्हांस ठाऊक आहेच. वरील प्रश्न हातीं घेऊन जसा त्या लोकांशीं विरोध केलात तसा केला नसतात तर सरकारनें कांहीं तरी कायदा करण्याचें मनांत आणलें असतें अशी माझी खात्री आहे "

" सर्व धर्माभिमानी हिंदूनीं तुमच्या एकंदर कामगिरीबद्दल तुमचे आभारी असलें पाहिजे, व तुम्हीं पुन्हा हिंदुधर्माप्रीत्यर्थ उठून तसा उद्योग करावा अशी तुम्हांस माझी विनंति आहे. कमीशननें आपले विचार पांढऱ्यावर काळे केले नाहींत तोंच आपलें मत काय आहे तें प्रकट करणें हें आम्हां धर्माभिमानी हिंदूंचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. सभा भरवाव्या हे बरें कीं सह्या मिळवून नुसतीं मतपत्रें पाठवावीं हें बरें ? सभा भरवून अखिल धर्माभिमानी हिंदुस्थान मतपत्रें पाठवील तर फार बरें. तुम्हांस कसें काय वाटतें ? तुमचें मत माझ्याशीं जुळत असेल तर होईल तितक्या लवकर कळवा. मी सोत्साह काम करावयास लागतों. प्रयाग काशी व त्यांच्या आसमन्तात् सभा भरवतों." ( १२–३–१८८७. )

हें पत्र लिहिण्यास कारण असें झालें कीं १८८६ सालीं पब्लिक सर्व्हिस कमीशन बसलें होतें त्यापुढें ज्यांच्या साक्षी झाल्या त्या सर्वांनीं सांगितलें कीं हिंदुस्थानांत जरी सिव्हिल सर्विसची परीक्षा घेतली तरी तींत उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांनीं आपलें शिक्षण पुरें करून घेण्यास खुद्द इंग्लंदला गेलेंच पाहिजे. तें महाराजांस आवडलें नाहीं.

त्यानंतर कांहीं वेळ हिंदुसमाजास स्वस्थता मिळेल असें वाटलें होतें. पण लवकरच मुंबई हायकोर्टांत चालू असलेला वरील कज्जा रंगास आला.

वादी दादाजी भिकाजी यांचें लग्न २० व्या वर्षी प्रतिवादी रखमाबाई * इच्याशीं, ती १२ । १३ वर्षांची असतांना पालकांच्या संमतीनें हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें झालें. लग्नानंतर सुमारें १० वर्षे पर्यंत आपल्या आईजवळ प्रतिवादी राहत असे. वादी तेथें जात येत असे. पण गर्भाधानविधि झाला नव्हता. नंतर वादीनें तिला योग्य काळीं घरीं नांदण्याकरतां बोलाविलें. आप्त इष्टांची मध्यस्थी विफल झाली, म्हणून वैवाहिक हक्काची बजावणी करण्याकरतां वादीनें फिर्याद ( १८८४ची १३९ वी ) मुंबई हायकोर्टांत आणिली. प्रतिवादीनें तक्रार केली कीं ( १ ) वादी हा रहावयास नीट जागा घेऊन स्वताचें व आपल्या पत्नीचें पोषण करावयास अगदीं असमर्थ आहे, ( २ ) वादी यास दम्याची व्यथा असून क्षयाचीं लक्षणें झालीं आहेत म्हणून प्रकृतीनें ठीक नाहीं, ( ३ ) वादी ज्या घरीं राहात आहे व ज्याच्या आश्रयास आहे त्या घरीं व त्याच्या सहवासांत राहणें अनिष्ट आहे. न्यायमूर्ति पिन्हे यांचें मत झालें कीं वादीची गरीबी त्याजवळ राहावयास न जाण्याला योग्य कारण नाहीं; तरी प्रतिवादी ही अल्पवयी असतां पालकानें जो करार केला तो आतां ती वयांत आल्यावर पुरा करून देण्यास हरकत घेत आहे. अशा परिस्थितींत एकाद्या तरुणीस जो पुरुष तिला आवडत नाहीं त्यानें तिचा स्त्रीत्वानें उपभोग घ्यावा म्हणून त्या पुरुषाकडे जावयास भाग पाडणें हें अगदीं रानटी, क्रूर व किळसवाणें कृत्य आहे. म्हणून अशी फिर्याद आणतां येत नाहीं अशा सबबीवर त्यांनीं वादीची फिर्याद काढून टाकली व प्रतिवादीचा खर्चही

* रखमाबाईचे जनक वडील तिच्या लहानपणीं मृत्युवश झाले. त्यांनीं सुमारें पंचवीस हजारांची मिळकत आपल्या स्त्रीकरतां ठेवली होती. रखमाबाईच्या आईनें जातिरूढीप्रमाणें डा. सखाराम अर्जुन यांशीं पुनः लग्न लावलें म्हणून इस्टेटीची वारस रखमाबाई झाली होती.

त्याकडून देवाविला. वादीचे तर्फे प्रसिद्ध बॅरिस्टर मॅक्फर्सन, विकाजी व मानकर होते. प्रतिवादीचे तर्फे मि. लॅथम व तेलंग होते.

नामदार पिन्हे यांनीं फिर्याद काढून टाकतांच सुधारक आनंद पावले. स्त्रीजातीच्या उन्नतीस आरंभ झाला, स्त्रीदास्यविमोचनाचा ध्वज चहूंकडे फडकं लागला व बालविवाहाची रानटी चाल बंद झाली असें त्यांस वाटूं लागलें.

असले कज्जे या देशांत भिन्न ठिकाणीं कितिएक होऊन गेले असतील. परंतु हा कज्जा मुंबईत चालला व डा. सखाराम अर्जुन फार प्रसिद्ध असल्यामुळें या कज्जास प्रथम प्रासिद्धि येण्यास कारण झालें. सुधारणेचा तवा अगोदरच तापला होता त्याचा फायदा घेऊन त्यावर पोळी भाजून घेण्याचा सुधारकांचा निश्चय झाला. त्यांनीं रखमाबाईस विद्वत्तेचें आगर ठरवून दादाजींस अज्ञानपणाचें मूळघर ठरविलें. वास्तविक हा खटला हिंदुधर्म शास्त्रविषयक असून या खटल्याच्या कैफयतींत इंग्रजी कायद्याप्रमाणें मुद्दे काढण्यांत आले. त्यामुळें दादाजी विरुद्ध रखमाबाई असें जें त्या कज्जाचें मूळ स्वरूप होतें तें जाऊन त्यास हिंदुधर्मशास्त्र वि० इंग्रजी कायदा, अथवा हिंदूंचा धर्मसंस्कार वि० ठरावाचा कायदा, असें स्वरूप प्राप्त झालें. फिर्याद पडली मुंबईच्या हायकोर्टांत मूळशाखेकडे ! तेथें सालिसिटर व बॅरिस्टर यांशिवाय काम उठतच नाहीं व त्यांची खर्चाची यादी क्रौंच पक्ष्याच्या चोंचीप्रमाणें दीर्घ असावयाची. आधींच फिर्यादीच्या खर्चानें मेस्यास आलेले दादाजी पुढें अपील कसचें करतात! जुन्या मताचे लोक स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं * दादाजींस अपील चालवावयास वर्गणी करून

* दादाजीच्या विरुद्ध सुधारकांनीं पुष्कळ कंड्या उठवल्या होत्या त्या खोट्या होत्या हें रावसाहेबांस कळलें होतें. " वैवाहिक हक्काच्या बजावणीच्या कज्ज्यांत प्रसिद्धीस आलेले दादाजी मी प्रत्यक्ष पाहिले. कांहीं कामानिमित्त माझेकडे आले होते. हे गृहस्थ विनयसंपन्न असून वयानें तरुण आहेत. कामकाज नीट जाणतात असें दिसतें. तो दमेकरीच आहे, कुरूप आहे, रस्त्यांतील हेलकरी दिसतो ! इत्यादि विशेषणांनीं त्यांची निंदा कांहीं लोक कां करतात तें समजत नाहीं. ( डा. राजेंद्रलाल यांस पत्र. )

चांगलीच मदत केली. त्यांत रावसाहेब प्रमुख होते. त्यांनीं दादाजींजवळून एक कांहीं ओळींचें विनंतिपत्र घेऊन आपल्या स्नेही मंडळींत फिरविलें. व पैसे जमवून ते अपील चालविण्यास दादाजी यांस दिले.

वादीनें अपील केलें तें न्यायमूर्ति नामदार सार्जंट मुख्य न्यायाधीश व नामदार बेली यांपुढें निघालें. न्यायमूर्तिद्वयांचें मत उलट पडलें. त्यांनीं ठरविलें कीं अशी फिर्याद आणतां येते. व त्या फिर्यादींत केलेल्या हुकुमाची बजावणी दिवाणी कायद्याच्या ३४२ कलमाप्रमाणें ६ महिन्याची कैद भोगावयास लावून करतां येते. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें अल्पवयी मुलींचीं लग्नें करणें हें पालकांचें कर्तव्य मानलें जातें.

प्रतिवादी अल्पवयी तिला मतच नव्हतें व वयांत आल्यावर पालकानें दिलेल्या संमतिला तिनें मान्यता दिली नाहीं. म्हणून तिच्या तर्फे न्याय मिळावा अशी विनंति करण्यांत आली आहे म्हणजे नित्य व्यवहारांतल्या व्यापारी सौद्यांत ज्याप्रमाणें उभयतां बाजूचे लोकांची संमति लागते त्याप्रमाणेंच लग्नें आहेत म्हणून उभयतां नवरा बायकोची संमति पाहिजे या इंग्रजी दृष्टीनें हिंदुधर्मशास्त्राच्या वचनांकडे पहावयास कोडतास सांगण्यांत येत आहे. न्यायमूर्तींनीं पाहिल्या कोर्टाचा हुकूमनामा फिरवून कज्जा परत सुनावणीस पाठविला. तेव्हां न्यायमूर्ति फॅरन यांनीं १८८७ च्या मार्च महिन्यांत भर्त्याच्या घरीं जावयाचा रखमाबाईस हुकूम केला, व न गेल्यास कैदेची शिक्षा होईल असें बजाविलें. येथें हिंदुधर्मशास्त्र व संस्कार यांचा विजय झाला. हा असा निकाल झाल्यावर सुधारकांस पाहिल्यानें जेवढें सुख झालें तेवढें आतां दुःख झालें. सुधारणेचा मार्ग खुला झाला होता त्यावर अपील कोर्टानें कांटे पसरविले असें वाटलें. पण हताश होऊन सुधारक स्वस्थ बसले नाहींत. या कज्जाची ओरड विलायतपर्यंत गेली होती. कांहीं इंग्रज गृहस्थ व बरेच हिंदी गृहस्थ व्याख्यानें देत होते, लेख लिहीत होते त्यामुळें अगोदरच हलकल्लोळ उडाला होता.

रखमाबाईचें हिताहित पाहण्यास एक संरक्षक मंडळी स्थापन झाली होती. ती, रखमाबाईला ( ह्मणजे रखमाबाईची स्थिति जिला दुर्दैवानें प्राप्त झाली आहे अथवा होईल तिला ) कोर्टानें दिलेल्या निकालाची अम्मल बजावणी करण्याकरतां तुरुंगांत जाणें भाग पडूं नये एवढ्याकरतां अपील-मार्गानें पायरी पायरीनें विलायतेपर्यंत जावें कीं नाहीं, गेल्यास अपील कोणत्या मुद्यावर करावें व कायदा कसा बदलून घ्यावा या विचारास लागली, व असें झालें असतां त्यांस शक्य तेवढा विरोध करण्याकरतां पुरातन मत-वाल्यांनीं वरजीवनदास माधवदास ( माधवबागवाले ) यांच्या पुढारी-पणानें एक मंडळ स्थापावयाचें ठरलें. व एक प्रास्ताविक सभा झाली. त्या सुमारास ( १८८७ त ) काशिनाथपंत तेलंग यांनी स्वमतप्रदर्शक एक पत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत त्यांनीं संरक्षक कमिटीबद्दल सहानुभूति प्रदर्शित केली. परंतु आमच्या लग्नाच्या चालीरीतींत कायद्यानें हात घालावा ही कल्पना शोच्य आहे असें ह्मटलें. आणि अपीलांत मुद्दे कोणत्या स्वरूपाचे येऊं नयेत ते दाखवितांना ह्मणाले:—

" हें लग्न झालें तेव्हां वर व वधू अल्पवयी अगदीं अर्भकें होतीं अथवा जरा वाढलेलीं मुलें होतीं असें सुधारकाच्या मंडळानें म्हणतां कामा नये. लग्न झालें तेव्हां वर किंवा वधू यांनीं स्वतां संमति दिली नव्हती असें मंडळानें म्हणतां कामा नये व लग्न झाल्यावर दोघेंही कांहीं दिवस एकत्र रहात नव्हतीं असेंही म्हणतां कामा नये. या मुद्यांतील एकाही मुद्याचें मण्डळानें अवलंबन केलें तर त्याच्याशीं सहकार करण्याचें मला अशक्य होईल एवढेंच नाहीं, तर त्याच्या-शीं विरोध करणें हें माझें कर्तव्य आहे असें मी समजेन. मग वरील मंडळानें काय म्हणावें तें मी सांगतों." व पुढें म्हणाले " आमच्या विवाहपद्धतींत दोष आहेत असें मी मानतों व ते दोष सर्व लोकांच्या पुढें उभा राहून उच्च घोष करून स्पष्टपणें सांगावयास माझी मुळींच अनिच्छा नाहीं. तरी सुद्धां आमच्या हिंदूंची गृहस्थिति खिस्ती लोकांच्या व त्यांच्या सारखे जे इतर लोक आहेत

म्हणजे ज्यांमध्यें ते दोष नाहींत त्यांच्या गृहस्थिती इतकी सौख्यावह आहे. पहाना, आमच्या मध्यें मुलगा आपणच बायको शोधून आणीत नाहीं किंवा मुलगीही आपणच नवरा शोधून आणीत नाहीं व एकमेकांच्या संमतिनेंच लग्नें करीत नाहींत. तरी सुद्धां ज्या इतर समाजांत वर व वधू स्वतां वधू व वर अनुक्रमें पसंत करतात व उभयतांच्या सम्मतीनेंच लग्नें होतात त्या समाजांतील नवरा व बायकोचा संसार जितका सुरळीत चालतो, जितकें नवरा व बायको यांचें परस्परांवर प्रेम असतें तितका सुरळीत हिंदू नवरा व बायको यांचा संसार चालत नाहीं व तितकें हिंदू नवरा व बायको यांचें परस्पर प्रेम नसतें असें मानावयास यत्किंचित् कारण नाहीं. ”

“वैवाहिक हक्कांच्या बजावणींत कायद्यानें मुळींच कैदेची शिक्षा देतांच येऊं नये असें नाहीं. कायद्याप्रमाणें कैदेची शिक्षा देतां यावी; पण क्व्हां ? एकंदर परिस्थितीचा विचार करतांना कोर्टाला जर आढळेल कीं कैदेच्या शिक्षेशिवाय आतां दुसरा इलाज नाहीं, तर ! या धर्तीवर कायदा झाल्यास सर्व पक्षाला व्यवहारोचित वाटून मान्य होईल असें वाटतें. ”

“ आमचा मूळ हेतु ( बालविवाहाची चाल नष्ट करण्याचा ) साध्य होण्याकरतां व अखिल हिंदू समाजाचें मत आपल्या पक्ष्याकडे समजूत करून वळवून आणण्याकरतां मी कांहीं बहुजन समाजाच्या म्हणण्याप्रमाणें आणखी वागण्याला ( जरी तसें करणें फार सयुक्तिक होणार नाहीं तरी ) तयार होईन. परंतु ज्या उपायानें आम्हांला परदेशीं विलायतेंतील लोकांच्या मताची पुष्टि मिळेल पण येथें स्वदेशीं आमच्या विषयीं लोकांत फार वितुष्ट माजेल तो उपाय करण्याचें सोडून देण्यास मी तयार होईन. ” असें सांगून रखमाबाई संरक्षक मंडळीला अनुत्साह भरणारें मत दिलें.

## सर टी. माधवराव व रावसाहेब.

सर टी. माधवराव या राजकारण निष्णात नेमस्त व समाजसुधारकाचा व रावसाहेबांचा थोडा बालविवाहाविषयीं पत्रव्यवहार झाला त्याचा

सारांश. तुमच्या विषयीं माझ्या हृदयांत सदैव पूज्य बुद्धि वसत आहे असें सांगून **टी. माधवराव** म्हणाले:-आमच्या स्मृतिवचनांचा साधा अर्थ करतांना तुमचा व माझा मतभेत व्हावा हें आमच्या आनुवंशिक आर्यांच्या बुद्धीला विसंगत आहे. बालविवाहाच्या दुष्परिणामापासून ज्यांच्या जीवाला खेद होत आहे त्यांपैकीं मी एक असून ह्या अहितकर चालीला आळा बसण्याकरतां कांहीं तरी केल्याशिवाय आमची पिढी स्मृतिगत होऊं नये म्हणून हिंदुसमाजातील सुशिक्षित पुढाऱ्यांनीं त्वरित एखाद्या उपायाची योजना केली पाहिजे.

१ अति उंच उडी मारावयाचा यत्न सोडिला पाहिजे.

२ आमच्या समाजाच्या प्रस्तुत अवस्थेला अल्पांत अल्प धका देऊन जेवढी सुधारणा करतां येईल तेवढी पुरे.

३ मुलींचीं लग्नें अगदीं बाळपणीं म्हणजे ( २, ३ ) अथवा चार वर्षें वयाला लोटल्यावर होतात !

४ हिंदुसमाजांतील फार विचारी व सुज्ञ पुढारी असतील त्यांनीं बसून आपापल्या जातींतील मुलींच्या लग्नाची यत्ता ठरवावी व त्या वयापर्यंत मुलींची वाढ करण्यास आईबापांचीं मनें पुढाऱ्यांनीं स्वोदाहरणानें वळवावीं किंवा त्यांस भाग पाडावें.

५ असें केलें असतां मुलींच्या लग्नाच्या वयाची सरासरी वाढेल व बाळपणीं वैधव्य येण्याचा संभवही दूर जाईल.

६ अल्पसा दण्ड नियमभग्न करणाऱ्यास ज्ञातीच्या पंचानीं करावा.

७ येथें सरकारनें पुढें येऊन ज्ञातीच्या पंचांस हा दण्ड वसूल करण्याचा अधिकार देणारा एक कायदा करावा म्हणजे झालें.

अशी कांहीं योजना केल्यास ती तुम्हांस व तुमच्या मित्रांस पसंत पडेल.

**टी. माधवराव** यांस **रावसाहेबांनीं** उत्तर दिलें आहे त्याचा सारांश:—

“ पहिल्या प्रथमच ज्यामुळें या वादांत थोडा घोटाळा उत्पन्न झाला आहे त्या कांहीं मुद्यासंबंधें मतभेद होत आहे म्हणून वाईट वाटतें. उदाहरणार्थ

बालविवाह म्हणजे काय याचीच व्याख्या ठरविली पाहिजे. तुम्हीं ज्याला बालविवाह म्हणतां म्हणजे २ अथवा ३, अथवा ४ वर्षांच्या मुलींचा विवाह असें समजतां ती गोष्ट येथें ऐकिवांत नाहीं. बालविवाह म्हणजे आमच्या या मुंबईच्या बाजूच्या मुलींच्या लग्नाच्या वयाची यत्ता ८ ते १२ वर येऊन बसली आहे. कित्येक जातींत ती फारच वर जाऊन बसली आहे."

"कायद्याचा, समाजाच्या अंतर्व्यवस्थेशीं संबंध काय? कांहीं नाहीं हें सरकारही नीट जाणून आहे. लग्नाची मर्यादा भिन्न प्रांतांत भिन्न दिसत आहे, म्हणून ती मर्यादा हें मतभेदाचें मोठेंसें कारण नाहीं. माझ्या मराठी धर्मशास्त्राची मी एक प्रत तुम्हांस पाठविली आहे. त्यांत स्मृतिवचनांच्या केलेल्या अर्थावरून या इलाख्यांत प्रगतीची दिशा कळून येईल. शिवाय रा. रा. यशवंतराव आठल्ये यांस त्यांच्या* वाग्दानावरील निबंधाची नक्कल तुम्हांकडे पाठविण्यास सांगितली आहे. ज्यांस हिंदू म्हणवून घेण्यांत लाज वाटते व जे हिंदूधर्माची उघडपणें विडंबना करतात व जे आमचे वेद व शास्त्रें समुद्राच्या अगदीं बुडापर्यंत खोल बुडवूं पहात आहेत त्यांच्याशीं तुम्हीं सहकार कसा करतां याचें मला फार आश्चर्य वाटतें व असें म्हटल्याबद्दल मला तुम्हीं क्षमा कराल अशी आशा आहे."

फार उंच उडी सुधारणापथानें घेऊं नये असें प्रतिपादन केल्याबद्दल तारीफ करून रावसाहेबांनीं पुढें लिहिलें:—"आमच्या हिताचें काय तें आम्हींच ठरविलें पाहिजे. तेथें परक्या लोकांच्या मतांचें प्रस्थ माजवावयाला नको. कारण त्यांचा आमचा पुरावृत्तविषयक संबंध नाहीं. त्यांच्या हातांत आमच्या समाजनौकेचें सुकाणूं दिल्यास आम्हांस अनिष्ट अशा प्रदेशांत जाऊन उतरण्याचा प्रसंग येईल. प्रयोजन पडेल त्याप्रमाणें आपल्या

* यांत बापूसाहेब आठल्ये यांनीं असें प्रतिपादन केलें होतें कीं वाग्दान व विवाह हे दोन्हीं संस्कार चारपांच वर्षांच्या अंतरानें करावे. ज्यांस मुलाच्या लग्नांतील सोहळ्यांची हौस करून घेणें असेल त्यानें ती वाग्दानाच्या वेळीं करून घेतली तर हरकत नसावी. मात्र वधूवरांचा परस्पर लग्नसंबंध पूर्ण करणारें कन्यादान होमादि-सप्तपदी क्रमणान्त कर्म रजोदर्शनाच्या पूर्वीं कांहीं दिवस करावें.

सोयीप्रमाणें समाज आपलीं कार्यें करीत असतो. तेथें दुसऱ्याच्या आवडी नावडीवर अवलंबून नसतें. एका समाजांतील चालरीत दुसऱ्या समाजास आवडली नाहीं किंवा समजली नाहीं म्हणजे तो दुसरा समाज त्या पहिल्या समाजाच्या चालीरीतीस रानटी म्हणतो व ती चाल याच्यापुढें अस्तित्वांत ठेवतांच येत नाहीं. ती उच्छेद्य आहे असा ठसा तीवर मारतो. असा नित्य सगळया दुनियेचा स्वभाव आहे म्हणून परका समाज मान हालवून अथवा बोट उचलून जी आज्ञा करील ती आम्हीं मानतां कामा नये."

"शिक्षणानें व पुढाऱ्यांच्या स्वोदाहरणानें आमच्या समाजांत असलेल्या सदोषचाली नाहींशा होतील. या बाबतींत तुमचीं माझीं मतें फार विभिन्न नाहींत. पत्रोपत्रीं लांब चर्चा करीत बसण्यापेक्षां समक्ष भेटून एकमेकांचें म्हणणें कळविल्यास ऐकमत्य होण्याचा संभव आहे."

अशा रीतीनें हिंदु समाजांत खळबळ उडाली होती. तेव्हां विद्वत् शिरोमणि रा. ब. महादेव गोविंद रानडे यांनीं वक्तृत्त्वोत्तेजक समारंभाचा समारोप करतांना स्त्रीपुरुषांचा वैवाहिक संबंध या त्या समारंभांतील विषयावर मोठें संभाषण केलें. त्यांत नाना स्मृतिवचनांचे आधार घेऊन असें प्रथम प्रतिपादन केलें कीं पूर्वींच्या स्मृतिकारांत स्त्रीजातीच्या संबंधें फार सदयता दिसते. म्हणून निर्दोष पतीजवळ स्त्री नांदत नसेल व तिजकडे अन्य कांहीं दोष नसेल तर पतीवरील तिच्या पोषणाची जबाबदारी दूर करावी हेंच तिला शासन. व निर्दोष स्त्रीस पति नांदवीत नसेल तर पतीकडून अन्नवस्त्र जास्ती कमी देववावें हेंच त्याला शासन. अशा रीतीनें हल्लींच्या कायद्यांत बदल व्हावा, असा अभिप्राय दिला. यांत व्यभिचाराद् ऋतौशुद्धिः या स्मृतिवचनाचा आधार रावबहादुरानीं घेतला होता* (मे. १८८७.) रावसाहेबांचें मत

* अनार्य लोकांस लागू पडणाऱ्या या स्मृतिवचनाचा आधार रावबहादुरांनीं घेतला तें रावसाहेबांस आवडलें नाहीं, असें एका पत्रावरून दिसतें. रावबहादुरांस प्रोफेसर वामन शिवराम आपटे यांनीं परत उत्तर म्हणून व्याख्यान दिलें तें ही जरा रागानें दिलेलें दिसतें.

असें होतें कीं वैवाहिक हक्काच्या बजावणींतील कैदेची शिक्षा काढून टाकल्यास एकंदर रियासतीचें नुकसान होईल.

( भार्गवराव गाडगीळ यांस पत्र ३।९।८७ )

मग अशी सूचना सुधारकांनीं सरकारापुढें आणली कीं कोडतांनीं विवाहित जोडप्यास एकत्र राहण्याचा हुकुमनामा केला ह्मणजे त्याची बजावणी करतांना जी कैदेची शिक्षा कायद्यांत सांगितली आहे ती रद्द करावी. या सूचनेवर रावसाहेबांनीं मत * दिलें तें:—

मी असलेल्या कायद्यांत फरक करण्याच्या विरुद्ध आहें त्याचीं कारणें:—

( १ ) असा फरक करणें अवश्य आहे असें सिद्ध केलेलें नाहीं.

( २ ) सुचविलेला फरक केल्यानें फार अपाय होणार आहे. व लग्न संबंधीं कायद्यामध्यें क्रान्तिच घडून येणार आहे.

( ३ ) हिंदू स्त्रियांच्या स्थितींतच अपायकारक अंतर पडणार आहे.

नंतर रावसाहेबांनीं ज्या बद्दल हा प्रश्न उपस्थित झाला आहे त्या दादाजी वि. रखमाबाई या खटल्याची हकीकत देऊन असें सांगितलें कीं हायकोर्टानें अव्वल दाव्यांत रखामाबाईनें नवऱ्याकडे नांदावयास जाऊन रहावें असा जो हुकूम केला आहे त्यावर तिनें अपील केलें आहे. त्याचा निकाल होण्यापूर्वींच कायद्यांत फरक करण्याचा प्रयत्न होत आहे.ह्मणजे रखमाबाईनें अजून हुकमाची अवज्ञा केली असा सरकारापुढें पुरावा नाहीं व तिला केवळ छळण्याकरतां तुरुंगांत घालावयाचा प्रयत्न झाला असाही नाहीं. मग पुढें अमूक होईल या काल्पनिक कारणांवर कायद्यांत फरक करावा असें मला वाटत नाहीं. नांदवणुकीच्या फिर्यादी चालविण्याचा हक्क कोडतास हवा आहे. परंतु पत्नीनें पतीकडे नांदावयास जावें असा कोडताचा नुसता हुकूम काय करील ? ह्मणून त्याची अम्मल बजावणी करण्यांत पत्नीला नांदावयास लावण्यास भाग

* यांतील कांहीं शब्दांवरून हें मत सरकारानें मागितल्यावरून दिलें असावें असें अनुमान करण्यास जागा आहे.

पाडण्याकरतां तुरुंगाची शिक्षा देण्याचा अथवा जिनगी जप्त करण्याचा अथवा दोन्हीं उपाय योजण्याचा कोडतास हक्क दिलेला आहे त्यांतील तुरुंगाची शिक्षा देण्याचा जो कोडताचा अधिकार आहे तो रद्द करावयाची सूचना पुढें आली आहे व तशीच एक सूचना पुढें आली आहे ती अशी कीं नांदावयास जाण्याचें नाकारल्यास घटस्फोट मिळविण्यास तें एक कारण व्हावें. या दुसऱ्या सूचनेनें घटस्फोट हा एका पक्षाच्या लहरीवर अवलंबून राहील व हिंदुधर्मशास्त्रांत क्रान्तिच घडून येईल. अशी सूचना ब्रिटिश साम्राज्याच्या आरंभापासून अद्यापि आलेली नाहीं. हिंदूच्या आयुष्यक्रमांत लग्न हा संस्कार फार महत्वाचा मानलेला आहे. त्याच्या वाटोळें पावित्र्याचें अस्तरण घालून व्यक्तिस्वातंत्र्यास समाजसौख्याकरतां आळा घालणें शास्त्रकारांस योग्य वाटलें आहे. रूढीनें ज्या जातींत घटस्फोट करतां येतो त्या जातींत सुद्धां उगाच योग्य कारणाशिवाय तसें करण्यास जोडप्यांतील एकाची लहर लागली म्हणून परवानगी मिळत नाहीं. समाज हा अनेक व्यक्तींचा बनलेला असतो म्हणून त्या समाजाच्या कल्याणाकरतां व्यक्तींवर कांहीं तऱ्हेचा दाब ठेवावाच लागतो. एकाद्या विपथगामी तरुण मनुष्यावर अथवा स्त्रीवर थोडासा दाब ठेवणें अत्यंत बरें परंतु लग्नबंधनें हवीं तशीं तोडूं व टाकूं देऊन समाज विस्कळित होऊं देणें अगदीं बरें नाहीं.

हें मत " नव्या कल्पनांस " रुचत नाहीं असें पत्रांत म्हटलेलें आहे. परंतु माझें मत हें समग्र हिंदूसमाजाचें मत आहे असें मी जाणत असतां माझें पवित्र कर्तव्य करीत असतां या नव्या कल्पनांच्या विरुद्ध मत देणें मला भाग वाटत आहे. माझ्यापुढें आधाराला ४७।४८ इंग्रजी स्टॅटच्यूट ठेवण्यांत येत आहे. पण हा स्टॅटच्यूट सुद्धां १८८४ मध्यें कडाक्याचा वाद झाल्याशिवाय करण्यांत आला नाहीं. तो सुद्धां इंग्लंदालाच लागू करण्यांत आला आहे. स्काटलंडास व आयर्लन्डास लागू करण्यास अयोग्य ठरला आहे. मग ज्या " नव्या कल्पना " स्काटलंडला व आयर्लंडला १८८४ सालीं लागू करूं नयेत अशा ठरल्या त्या हिंदुस्थानाला तरी लागू करण्यांत कां घाई करावी ? अकालीं केलेले

कायदे जाचक होतात. व तसे कायदे एकाद्या देशांत नसले म्हणजे त्याला सुधारलेला देश म्हणवून घेण्याचा अधिकार नाहीं असें होत नाहीं.

लार्ड स्टव्हेल यांचे विचार हिंदूंच्या विचारसरणीशीं जुळतात म्हणून पुढें दिले आहेत:—" एकत्र नांदावयाच्या विरुद्ध एकाची अथवा दोघांची नुसती मनःप्रवृत्ति झाली म्हणून विवाहित स्त्रीपुरुषांस घटस्फोट मिळतां कामा नये. मनुष्यजातीच्या वास्तविक सुखाकडे न्यायाधीशानें दृष्टि टाकली पाहिजे. एकाद्या वेळेस घटस्फोट करण्यास परवानगी न देण्यानें कांहीं व्यक्तींस त्रास होण्याचा संभव आहे. तरी घटस्फोटाची परवानगी न देण्यांतच एकंदर समाजाचें वैवाहिक सौख्य अवलंबून आहे. अपवादा दाखल कांहीं कारणांस्तव घटस्फोटाची परवानगी मिळेल; एरव्हीं साधारण नियम म्हटला म्हणजे विवाहित स्त्री पुरुषांनीं एकत्र राहिलेंच पाहिजे, अशी लोकांची समजूत झाली म्हणजे कांहीं समजुतीच्या मार्गानें लग्नबंधन संभाळण्याची त्यांची प्रवृत्ति होते. मग उभयतांस भलेपणानें वागल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असें होतांच तीं दोघें चांगलें नांव मिळण्यासारखें वर्तन करतात. असले अवश्यक प्रसंगच कर्तव्य करावयास शिकवतात. पण जर कां तुम्हीं एक वेळ लोकांची अशी समजूत करून द्याल कीं परस्परांस नावड प्राप्त झाली कीं आपला घटस्फोट मिळतोच; ह्मणजे आतां जीं विवाहित जोडपीं परस्परांच्या संगतीनें सौख्य पावत आहेत, संततिची चांगली जोपासना प्रेमानें करीत आहेत, व समाजांत नीतिची वाढ करीत आहेत, तीं आतां सर्व परस्पराशीं प्रेमरहित आचरण करतील, मुलांवर प्रेम करणार नाहींत व समाजांत अनीतिपूर्ण वर्तन ठेवतील; म्हणून बहुतांच्या सुखाकरतां कांहींच्या मनांस आळा घातलाच पाहिजे. "

असें असतां कैदेच्या शिक्षेबद्दल एकदम वरील घटस्फोटाची परवानगी देणें हें जरा चमत्कारिक आहे. कर्जाच्या फेडीकरतां पोटगीचे हुकूम मोडण्याबद्दल वगैरे कैदेची शिक्षा चालते पण वैवाहिक हक्कांच्या बजावणीस चालूं नये. पतीला एक कायदा पत्नीला एक कायदा ही परिस्थिति कायद्याच्या

उच्च समतेला बाधक आहे. कैदेची शिक्षा तिच्याबद्दल दुसऱ्या योग्य उपायाची योजना केल्याशिवाय काढून घेतल्यास हिंदू समाजाला मोठें विघातक होईल.

लहानपणीं लग्न झाल्यामुळें घटस्फोट जर पत्नीला द्यावा हें मत ग्राह्य झालें तर तशी परवानगी मग पतीलाही द्यावी लागेल. घटस्फोट दिल्यास घटस्फोट मागणाऱ्यानें घटस्फोट दिलेल्यास पोटगी द्यावी ही अट पुरी करण्यास पुरुषास कठीण पडणार नाहीं, पण स्त्रियांस जड जाईल कारण पुष्कळ वेळां त्यांच्याजवळ मिळकत नसते.

हिंदूंचा लग्नसंस्कार त्यांच्या धर्माशीं इतका निगडित आहे कीं त्यांत कितिही अल्पप्रमाणांत हात घातला तरी लोकांत भय उत्पन्न होईल. रखमाबाईचीं मतें तिच्या संभावित देशभगिनींस मान्य होऊं लागण्यास अजून पुष्कळ अवकाश आहे. म्हणून एकाद्या मध्येंच उत्पन्न होणाऱ्या उदाहरणावरून कोणास रुचणार नाहीं असा कायदा हिंदू लोकांसारख्या पुरातनमताभिमानी लोकांवर लादणें अनिष्ट आहे. २०–११–८७

असा सारखा वाद माजून राहिला होता. त्यांत डॉ. कीर्तिकर यांचेंही सुधारकांच्या विरुद्ध व्याख्यान झालें. त्यांत त्यांनीं सांगितलें कीं सुधारकांच्या उक्तींचा त्यांच्या कृतीशीं मेळ नाहीं. दादाजीनें शान्त डोकें ठेऊन आपलें हीं म्हणणें पुढें ठेविलें. त्यास रखमाबाईनीं ही प्रत्युत्तर दिलें व या कज्जासंबंधें जरा सुधारकांत शिथिलता उत्पन्न झाली. दादाजीनीं आपलें वर्तन शेवट पर्यंत शिष्टसंप्रदायाला सजेल असें ठेवलें. त्यांच्या विरुद्ध परस्पर तिराईत लोक हवें तें बोलले पण त्यांच्याविरुद्ध किंवा आपल्या स्त्रीविरुद्ध बाष्कळ प्रलाप त्यांनीं केले नाहींत.व हुकूमनामा बजावण्याचें सोडून दिलें हें दाक्षिण्य लहान सहान नव्हे. याच अटीवर ना. फॅरन यांच्या निवाड्यावर रखमाबाईनीं अपील केलें होतें तें खर्चाबद्दल कांहीं रक्कम दादाजींस देण्याचें ठरवून अपील काढून घेतलें. हट्टास पेटून तुरुंगवास रखमाबाईनीं पतकरिला नाहीं हें त्यांनीं भूषणावह कृत्य केलें यांत संशय नाहीं.

दादाजीनीं दुसरें कुटुंब केलें त्यावेळेस इंग्रजी पत्रें त्यावर टीका करूं लागले ती वाचून रावसाहेबांनीं मि. मेथा ( एक कलकत्तेकर मित्र ) यांस पुढें दिल्याप्रमाणें एक पत्र लिहिलें:—

" जानेवारी १८८९ च्या पॉलमाल बजेटचा अंक मिळेल तर त्याचें ११० वें पान मेहरबानी करून वाचा. त्यांत सुलभ केलेल्या घटस्फोटाची गोष्ट दिलेली आहे. युरोप व अमेरिका येथील लोकांचीं मनें कोणत्या दिशेनें धांव घेत आहेत तें ती गोष्ट दाखविते. याच गोष्टीला इकडे प्रगति म्हणतात. "

" सत्य, विश्वासूपणा, भक्ति व पूज्य बुद्धि यां सारख्या शब्दांत अर्थ राहिला नाहीं. कलकत्त्याकडील प्रागतिक म्हटल्या जाणाऱ्या पक्षाची दिशा कोणती तें मला कळावयास पाहिजे आहे. दादाजीनें दुसरें लग्न केलें म्हणून कांहीं इंग्रजी पत्रांनीं त्यांची थट्टा मांडली आहे. " पुढें दादाजी व रखामाबाई यांस परस्परांचा व समाजास दोघांचा, विसर पडून सर्वांस स्वस्थता आली.

या प्रकरणाचें थोडें लांब वर्णन करण्याचें कारण एवढेंच कीं, माधवबागेच्या सभेप्रमाणेंच सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत हा कज्जा दुसरें सीमाचिन्हच होऊन बसला आहे. यांत हिंदुधर्मसंस्काराचा इंग्रजी ठरावाच्या कायद्यावर विजय झाला आहे.

---

## प्रकरण ७१ वें.

# समुद्रयान.

**द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापिसंग्रहः**
**इति तस्यकलौ संसर्गनिषेधात् !**

( व्यवहार मयूख )

**रावसाहेबांचा** एक स्नेही बंडाच्यावेळीं इंग्रजी फौजेबरोबर होता. काल्पीचा वेढा त्यानें पाहिला होता. शिवाय इंदूर, ग्वालेर येथेंही सैन्याबरोबर

जाऊन आला. त्यावेळेस त्याला धर्मबाह्य वर्तन केल्याशिवाय फिरतां आलें. पुढें १८६० मध्यें त्यास सैन्याबरोबर चीन मध्यें जाण्याचा प्रसंग आला. तेव्हां त्यानें रावसाहेबांस असें पत्र पाठविलें. " बहुधा चीन देशास जाण्याचा हुकूम सुटला आहे. हें ऐकतांच माझी पांचावर धारण बसली आहे. पण ती लढाईवर जाण्यांत धोका आहे ह्मणून नव्हे. मला पुष्कळ त्याची संवय झाली आहे. परत आल्यावर बहुत अडचणींत सांपडेन यामुळें भ्यालों आहे. पण कायहो ! ब्राह्मणाला अशा रीतीनें पतित झाल्याशिवाय जातां येईल काय ?" ( ४–१–१८६० इ. प. )

ही ज्ञातीची भीति दूर झाली पाहिजे असें रावसाहेबांचें मत होतें व ती दूर करण्याविषयीं त्यांनीं प्रथमपासून यत्न केले होते.

करसनदास मूळजी विलायतेहून परत आल्यावर त्यांस पंक्तिपावन करून घेण्याकरतां रावसाहेबांनीं पुष्कळ खटपट केली. वीरचंद दीपचंद; कहानदास मंच्छाराम; हरिवल्लवदास बाळगोविंददास; त्रिभुवनदास द्वारकादास; गंगादास किशोरदास इ. फार वजनदार वाणी लोकांची खासगी सभा भरवून त्यांच्याशीं रावसाहेबांनीं पुष्कळ खल केला. या सर्वांचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें नाहीं. मंगळदास नथूभाई म्हणाले " करसनदास यांस २ वर्षें वाट पहाण्यास सांगितलें तसें त्यानें केलें नाहीं. मी त्यांच्या पंक्तीला बसणारा नाहीं परंतु त्यांस वाळींत टाकण्याचा प्रयत्न करणार नाहीं. "

करसनदास मूळजींवर फार कडक बहिष्कार होता. त्यांस नोकर मिळतना. गोकुळदास तेजपाळ यांचे नोकर त्यांस वाढावयास जातना. बडतर्फ करण्याचें भय घातल्यावर ते वाढूं लागले.

करसनदास माधवदास हे करसनदास मूळजी यांच्या पंक्तीला बसले होते. त्यांच्या विरुद्ध ज्ञातीनें कांहीं प्रकरण करूं नये म्हणून रावसाहेबांनीं पुष्कळ मेहनत घेतली. तीविषयीं करसनदास माधवदास म्हणाले ' रावसाहेब तुम्हीं जी मला मदत केली आहे ती मी जीवांत जीव आहे तों विसरणार नाहीं. "

रावसाहेब मात्र त्यावर इतकेंच म्हणाले " माझें कर्तव्य केलें. माझ्याविषयीं चांगलें मत बाळगण्याबद्दल तुमचे आभार मानतों. "

( २२।११।१८६३ रो. )

परंतु या समुद्रयानाचे बाबतींत रावसाहेबांना पुढें चांगलें यश आलें. कारण प्रायश्चित्त देऊन समुद्रयान करणाऱ्यास पंक्तिपावन करून घेतां येतें असें खुद्द शंकराचार्यांकडून शास्त्राधारयुक्त आज्ञापत्र त्यांनीं आणविलें. त्यास कारण पुढें दिल्याप्रमाणें झालें.

रावजी भवानराव पावगी हे विद्वान मराठी लेखक एका संस्थानिकाबरोबर कांहीं कार्यानिमित्त विलायतेस गेले होते, ते योग्य प्रकारें स्वधर्म संरक्षून परत आले. तेव्हां त्यांस प्रायश्चित्त देऊन पंक्तिपावन करून घेण्याचा प्रश्न निघाला.

रावसाहेब पावगी यांनीं " आपणास प्रायश्चित देऊन शुद्ध करून घ्यावें " अशी विनंति केल्यावरून कांहीं ब्राह्मण मंडळीनें त्यांस सक्षौर प्रायश्चित्त दिलें. त्यावेळीं रावसाहेब व त्यांचे अनुयायी यांनीं त्यांच्या घरीं पानसुपारी घेतली व हें प्रायश्चित्त आम्हांस मान्य आहे असें दर्शविलें.

( २५।५।१८८८ चें गोपाळ पाध्ये यांस पत्र. )

हिंदुधर्मसभा म्हणून पूर्वीं मुंबईत एक सभा होती तिनें ठराव केला कीं पावगी यांस फक्त कर्मार्ह प्रायश्चित्त देतां येईल. म्हणजे प्रायश्चित्त घेतल्यानें पावगी हे कर्मार्ह होतील. स्वतांची जी स्नानसंध्यादि नित्यकर्में करावयाचीं आहेत तीं करण्याचा अधिकार त्यांस प्राप्त होईल. परंतु तेणेंकरून ते व्यवहार्य म्हणजे दुसऱ्याशीं पंक्तिव्यवहार वगैरे करण्यास अनाधिकृतच राहतील. हा ठराव रावसाहेबांस पसंत पडला नाहीं. स्नानसंध्यादि कर्में करण्यास जो योग्य झाला तो व्यवहार्य झाला पाहिजे असें त्यांचें मत पडलें. म्हणून या ठरावावर श्रीशंकराचार्यांकडे अपील करण्याची तयारी रावसाहेबांनीं चालू केली.

श्रीपत बाबाजी ठाकूर विलायतेहून आल्यावर लोकांनीं त्यांस प्रायश्चित्त दिल्याचें बासुकाका आठल्ये यांकडून कळलें परंतु कोणत्या आधारावरून प्राय-

श्चित्त दिलें ते कळलें नाहीं. ही माहिती रावसाहेबांनीं रत्नागिरीचे वे॥ विनायक शास्त्री आगाशे यांजकडून मागविली होती. पण निश्चितपणें कांहीं कळलें नाहीं. मागें अशा गृहस्थांस श्री शंकराचार्यांच्या आज्ञेवरून पंक्तिपावन करून घेतल्याच्या उदाहरणांचा आणखी शोध रावसाहेबांनीं चालविला. तेव्हां त्यांस असें कळलें कीं शके १७९४ सालीं गणेश शिताराम शास्त्री गोळवलकर हे, श्रीमंत होळकर सरकार यांच्या कामाला विलायतेस गेले होते. तिकडून आल्यानंतर त्यांनीं ठिकठिकाणीं सभा भरवून, विद्वान लोकांचे अभिप्राय घेऊन शेवटीं श्रीजगद्‌ गुरु मठ संकेश्वर यांजकडे जाऊन आपली हकीकत श्रींस निवेदन केली. नंतर श्रींच्या सन्निध असलेल्या नामांकित शास्त्री मंडळीच्या अनुमतीनें संकेश्वर मुक्कामीं शके १७९४ सालीं श्रीनीं प्रायश्चित्त देऊन त्यांस पंक्तिपावन करून घेतलें. हें उदाहरण देऊन रावसाहेबांनीं श्रींस संस्कृतांत एक विज्ञप्ति पत्र लिहून आपले सहीनें पाठविलें त्यांत अशी विनंति केली होती कीं रा. रा. रावजी भवानराव पावगी हे विलायतेहून स्वधर्म संरक्षून परत आले आहेत. त्यांना प्रायश्चित्त देऊन पंक्तिपावन करण्याची आज्ञा व्हावी.

श्रीकडून आज्ञोत्तर द्यावयास जरा विलंब लागला. इतक्या वेळांत श्रीनीं अनुकूल निकाल द्यावा किंवा दिल्याचें मनांत आणलें असूनही विरुद्ध बाजूच्या पक्षानें चालविलेल्या ओरडीचें भय उत्पन्न होऊं नये म्हणून इतरत्र शास्त्रीमंडळीचें मत अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न रावसाहेबांनीं चालविला. त्यांचे मित्र बापूसाहेब आठल्ये हे बडोद्यांस होते त्यांस १५।३।८८ रोजीं त्यांनीं असें पत्र लिहिलें. " प्रायश्चित्ताच्या प्रश्नाचें तुम्हीं काय करणार आहांत ? —मी माघार न घेण्याचा निश्चय केला आहे. "

बडोद्यास कांहीं दिवसांनीं मोठी सभा झाली. तीस पुष्कळ शास्त्री मंडळी व सरदार मंडळी हजर होती. तिनें एक मतानें असा ठराव केला कीं विलायतेस जाऊन येणाऱ्या गृहस्थास प्रायश्चित्त देऊन पंक्तीस घ्यावा. या ठरावाची नक्कल श्रींकडे रावसाहेबांनीं पाठवून दिली. श्रीनीं शास्त्रार्थ पाहून अश्विन

वद्य८ शके १८१० रोजीं तशी आज्ञा केली तिनें आतां प्रायश्चित्त घेतलेला मनुष्य कर्मार्ह व व्यवहार्य ह्मणजे पंक्तिपावन होतो असा निर्णय पक्का झाला आहे.

आज्ञापत्रांत या प्रकरणाच्या मथळ्यावरील दिलेल्या 'द्विजस्याब्धौ तु नौ यातुः शोधितस्यापि संग्रहः' या वाक्यांत 'यातुः, या ठिकाणीं ताच्छील्यार्थक तृन् प्रत्यय आहे तेव्हां धंदा करणारे नावाडी यांचाच संग्रह होतो. केवळ नौकागमन करणाऱ्याचा होत नाहीं. तो प्रायश्चित्त घेतल्यावर व्यवहार्य आहे असा अर्थ सदरील वाक्याप्रमाणें निर्बाध आहे करतां त्याशीं सर्वांनीं व्यवहार करण्यास हरकत नाहीं असें श्रींनीं स्पष्ट केलें आहे.

श्रीशंकराचार्यांमार्फत ही जी **रावसाहेबांनीं** सुधारणा घडवून आणली ती हिंदुसमाजसुधारणेच्या पथावर आणखी एक चिन्ह होऊन बसली आहे. शास्त्राप्रमाणें शुद्ध वर्तन करून समाजांत आपलें वजन वाढवून त्याचा उपयोग समाजसुधारणा करून घेण्याकडे करावा या मताचे जे समाज सुधारक आहते त्यांत **रावसाहेब** येतात.



## प्रकरण ७२ वें.

# ब्रह्मपरिषद्.



**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।**
**समानमस्तु वो मनो यथा वः सु सहासति ॥**

( ऋग्वेद )

हिंदुसमाजांतील ज्ञातिसंस्था ही एक विलक्षण संस्था आहे. कोणत्याही जातीचा सभासद होणें म्हणजे तींत जन्मच घ्यावा लागतो. कांहीं वर्गणी देऊन सभासदांच्या यादींत नांवाची नोंद करून घेतां येत नाहीं. जातींतील

सर्व व्यक्ती एक धर्म व आचारांनीं एकत्र बद्ध झालेल्या असतात. जातीनें केलेले नियम तींतील व्यक्तींस लागू असतात. हे नियम व त्यांची अम्मल बजावणी करण्याची सत्ता जातीकडे आहे. जातींची स्वयंसत्ता इंग्रजी कायद्यांसही मान्य झालेली आहे व जातीसंबंधाचा प्रश्न निघाला असतां त्यांत हात घातल्यानें जर या जातीच्या सत्तेला धक्का पोंचत असेल तर इंग्रजी कोडतें त्या विषयींचा निर्णय करण्याकरतां फिर्याद घेत नाहींत.

या स्वयंसत्तेच्या जोरावर जाती व्यक्तींच्या आचरणावर फार दाब ठेवीत आल्या. 'मला मीं मागतों तेवढें मोठें एक उत्तोलन यंत्र द्या म्हणजे मीं पृथ्वी उचलून दाखवितों' असें आर्किमेडीज ( एक तत्त्ववेत्ता ) म्हणे. त्याप्रमाणें ह्या हिंदुसमाजांतील जाती या उत्तोलन यंत्रें आहेत. त्यांच्या मार्फत हवें तें सामाजिक कार्य घडवितां येईल. पण कल्पक नेता पाहिजे. इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यावर ब्राह्मण ज्ञातींत हीं जातींची बंधनें शिथिल झालीं. पूर्वीं धर्मविषयक प्रश्न शास्त्री पंडित इ. सोडवीत असत व शेवटला निर्णय शंकराचार्य करीत असत. तें आतां बंद झालें. काल मानाप्रमाणें रूढीमध्यें फरक करण्याचें शास्त्री पंडितांकडून होईना. इंग्रजी शिकलेले लोक आपणांसच पंडित मानूं लागले व ते शास्त्री पंडितांचें व शंकराचार्यांचेंही ऐकेनासे झाले. दोघे आपलाच हट्ट धरून बसूं लागले. तेव्हां इंग्रजी शिकलेले व शास्त्रही शिकलेले असे लोक मध्यें पडून इतर जातींमध्यें जसें जातिनियमाप्रमाणें आचरण करण्यास जातींतील व्यक्तींस भाग पाडतां येतें तसें ब्राह्मण ज्ञातीच्या अंगांत सामर्थ्य आणण्याकरतां ब्राह्मण ज्ञातीचें संघटण करण्याचें रावसाहेबांनीं मनांत आणिलें. व एक ब्रह्मपरिषद् जींत शास्त्री पंडित वैदिक व इंग्रजीं शिकलेले लोक यांचा समावेश होईल अशी स्थापून, जातिविषयक प्रश्न निघाले असतां तिच्या मार्फत अथवा श्रीशंकराचार्यांच्या मार्फत ते सोडवून घ्यावे असें ठरविलें. त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या एक दोन मित्रांस पत्रें लिहिलीं.

"आम्ही ब्रह्मपरिषद् स्थापण्याचा प्रयत्न करीत आहोंत. आम्हांला यश येईल कीं नाहीं हें परमेश्वरास माहीत. कांहीं हित होण्याच्या आशेनें मी या

भानगडींत पडलों आहे. अनारंभो मनुष्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम् इत्यादि म्हणून मला अशी भीति वाटत आहे कीं माझी अगोदरच पूर्ण ढांसळलेली शरीर-प्रकृति अगदीं बिघडून जाईल. मोठे प्रयत्न करतांना आलेलें अपयश कीर्तिक-रच आहे. ही डॉ. हार्कनेस यांच्या उक्तींपैकीं एक आहे व तिचा आधार घेऊन हें काम अंगावर घेतलें आहे."

" या परिषदेचे सभासद तहायात असावे. आयत्या वेळचे नसावे. वर्गणी शंभर रुपये असावी. सभासदांचें काम मत दिल्याबरोबर थांबणारें नसावें. त्यांनीं समाजाला घेऊन सुधारणागिरीचें आरोहण करण्याचें जड कार्य—उत्तर व दक्षिण दिशांचा संयोग करण्याचें जड कार्य—करावयाचें आहे. या कामांत सर्व मित्र अंतःकरणपूर्वक सहकार करतील अशी आशा आहे."

* ( २।११।८७ चें इंदूरचे कृष्णाव मुळ्ये यांस पत्र )

श्रीजगद्गुरूंच्या आशीर्वचनाची प्राप्ति करून घेण्याकरतां श्रींस एक पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें ५।१२।८७ रोजीं रावसाहेबांनीं लिहिलें होतें."

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्यवर्य श्री विद्याशंकर भारती स्वामी मठ संकेश्वर यांचे चरण शेवेसीं. खालीं सही करणार मुंबई शहरवासी यांची श्रीचरणीं विज्ञप्ति अशी आहे कीं अलिकडे धर्मबंधन अनेक कारणांनीं शिथिल झालें आहे. त्या योगानें हिंदुसमाजाचें बहुत प्रकारें नुकसान होत आहे. त्याच्या प्रतिकारार्थ प्रयत्न करणें अवश्य जाणून येथें एक ब्रह्म—परि-षद्द स्थापन करावी असें येथील मंडळीच्या मनांत आहे. त्या परिषदेचा उद्देश व जे नियम करावयाचे आहेत त्यांत प्रथम आहे तो अलाहिदा श्रींच्या अवलोकनासाठीं पाठविला आहे तरी याविषयीं परिषदेच्या स्थापनेसाठीं श्रींच्या

---

*कृष्णराव मुळये यांनीं या विषयासंबंधें एका पत्रीं फार निराशेचे उद्गार काढले होतेः—भारतीयांतून कल्पना नष्टप्राय झाली आहे. जो सुधारक उठला तो परकीयांचें अनुकरण करीत सुटला आहे. त्यास गतकालीन गोष्टींची लाज वाटूं लागली आहे. भविष्यकालीं त्याच्या हातून कांहीं सत्कार्यनिष्पत्तीची आशा करावयास नको ! पुढें दृष्टि टाकली असतां मन निरानंद होतें.

विचारास कसें येतें तें समजल्यानें येथील मंडळीस बहुत उत्तेजन येणार आहे. तरी उत्तराची आज्ञा व्हावी अशी विज्ञप्ति आहे. मार्गप्रतिक्षा करीत आहों. विशेष काय लिहिणें शेवेसीं श्रुत होय. हे विज्ञापना. मि॥ मार्गशीर्ष वद्य ५ इंदुवार, शके. १८०९

श्रीं कडून अनुकूल पत्र आलें होतें. आंग्लभाषाधर्माद्यनुकरण लोलुपे ऽस्मिन् जनपदे विरला एव युष्मादृशा सनातनधर्मेप्सवः प्रियाशिष्याः या शब्दांनीं रावसाहेबांचा त्यांत गौरव केला होता.

रावसाहेब ब्रह्मपरिषद् काढीत आहेत असें समजल्यावर आर. रघुनाथराव यांचें पत्र रावसाहेबांस आलें त्याचा सारांशः—दोन वर्षांपूर्वी आमचे परस्परांचे मित्र आठल्ये यांच्या मार्फत किंवा प्रत्यक्ष तुमच्या जवळ अशी सभा काढावी अशी सूचना केल्याचें मला स्मरतें. तिचा उद्देश आमच्या पुरातन धर्माचें संज्जीवन होऊन रक्षण व्हावें असा असावा. अशा सभांची स्थापना सर्व हिंदुस्थानभर करण्याची आवश्यकता मला दिवसानुदिवस अधिकाधिकच भासूं लागली आहे.हिंदुस्थानांतील कांहीं भागांत अशा कांहीं सभा नुसत्या स्थापिल्या गेल्या असाव्या व त्या अगदींच निरुपयोगी नाहींत असा माझा अनुभव आहे. अशी एक संस्था वर्षद्वयापूर्वी इंदुरास स्थापण्यांत आली आहे. ती अजून चांगलें काम करीत आहे. इंदूरच्या सनातन—धर्मरक्षिणी सभेच्या स्वरूपाच्या दुसऱ्या सभा स्थापल्या शिवाय हल्लीं लोकांमध्यें लज्जाकर प्रमाणांत पसरत असलेल्या धर्मभ्रष्टपणाला आळा बसणार नाहीं. हें माझें मत जर तुमच्याशीं जुळत असेल तर ज्यांना आमच्या पुरातन आर्य धर्माचा समूळ नाश व्हावा असें वाटत नाहीं व त्यांतील कांहींच्या किंवा पुष्कळांच्या मतानें जेवढें ग्राह्य असेल तेवढें घ्यावें असें वाटत असेल त्या तुमच्या मित्रांशीं व तुमच्याशीं या सभेच्या स्थापनेविषयीं चर्चा करण्यास माझी फार इच्छा आहे. मी इंदुरास जाण्यापूर्वी तुम्ही मला कळवाल तर बरें होईल. ४ एप्रिल, १८८७

आर. रघुनाथराव दिवाणबहादूर.

त्याप्रमाणें ही सभा शके १८०९ (सन१८८७)सालीं स्थापन झाली. तिच्या सभासदांच्या यादींत खालील नांवें दिसतात. **रावसाहेब विश्वनाथ** नारायण **मंडलिक**; वे॥ गोविंद जोशी चिपळूणकर; जनार्दन दामोदर उर्फ आबासाहेब कोलटकर; गोपाळ मोरेश्वर साठे; दाजी आबाजी खेर; वे ॥ बाळयज्ञेश्वर शास्त्री गुर्जर; डा. मोरेश्वर गोपाळ देशमूख; रामचंद्र गणेश मुंडले (वकील ); नारायण त्रिंबक वैद्य; डा. गोविंद बाळाजी खेर; गोविंद गंगाधर फडके; सखाराम धोंडदेव थोरात; माधवराव वासुदेव पेंडसे ( वाडीवाले ); नारायण रामचंद्र सोहनी ( जगदीश्वर छापखान्याचे मालक ); धोंडोशामराव गरूड ( सालिसिटर ); दामोदर कृष्ण करंदीकर; काशिनाथ त्रिंबक खरे; गोविंद कृष्ण रानडे ( सेक्रेटरीअॅट ); गोविंद शंकर शास्त्री बापट; शास्त्री एल्फिन्स्टन ) हायस्कूल; नरहर विष्णु काथवटे ( इंजिनियर ); पांडुरंग हरि वैद्य ( पेन्शनर ) महादेव गोपाळ शास्त्री अमरापूरकर; यशवंतराव नेने; यशवंत मोरेश्वर केळकर ( ओरिएन्टल ट्रान्सलेटर ); राजाराम शास्त्री बोडस; विनायक कोंडदेव ओक; शिवराम वामन साधले; प्रोफेसर जिनसीवाले; हरिबुवा रामदासी इ. इ.

पहिली सभा श्रीमन्त **कि**बे यांच्या वाड्यांत कार्तिक शुद्ध शनवारीं रात्रौ आठ वाजतां भरली होती. अध्यक्षस्थानीं **रावसाहेब** होते. **रावसाहेबांनीं** धर्माविषयीं भाषण केलें. तें सुरस होतें व सर्वांस मान्य झालें.* पुढील सभा आणखी आठदिवसांनीं चतुर्दशीस व्हावयाची होती पण भरली नाहीं. कारण त्यादिवशीं **रावजी भवानराव पावगी** यांस प्रायश्चित्त द्यावयाचें होतें. त्या समारंभास **रावसाहेब** व कांहीं ब्रह्मपरिषदेच्या पंचांपैकीं गेले होते. प्रायश्चित्त देऊन **पावगी** यांस सपंक्त केल्याबद्दल कांहीं मंडळी साशंक झाली. परंतु **रावसाहेबांनीं** नेट धरण्याचा निश्चय केला होता. लोकांत थोडी वाटाघाट होते न होते तों श्रीकडून पावगी यांस दिलेल्या प्रायश्चित्तास शास्त्री मंडळीच्या अनुमतानें मान्यता आणविली व ते कर्मार्ह व व्यवहार्य होतात असा निर्णय शके १७९४ त मिळाला.

---

* वे ॥ **बाळे** पाध्ये गुर्जर यांस हिंदुसभेचे कारभारी काशिनाथ रामचंद्र जोशी यांचें पत्र.

श्रीनीं दिलेला निर्णय रावसाहेबांनीं कार्तिक वद्य चतुर्दशीस शके १८१० ( सन १८८८ ) रोजीं ब्रह्मपरिषदेच्या चिटणीसांस कळविला व पुढें अशी सूचना करून ठेविली कीं " या पत्रांत लिहिल्याप्रमाणें यापुढें असें किंवा दुसरें कोणत्याही प्रकारचें प्रकरण उत्पन्न झालें तर त्यासंबंधीं सर्व हकिकत विनंति पत्रानें श्रीपुढें ठेऊन तिकडून व्यवस्था लागेल त्याप्रमाणें ती अमलांत आणण्याची शिस्त ठेवावी. " या प्रमाणें ब्राह्मणांमध्यें मथळ्यावर दिलेल्या श्रुतिवचनांत सांगितल्याप्रमाणें समान विचार, समान उद्देश, समान सौहार्द,समान मतें करवून घेण्याचा रावसाहेबांनीं घाट घातला.

या परिषदेच्या सभा कांहीं दिवस भरत असत. एका सभेला एका अपंक्त मनुष्यानें शुद्धकरून घेण्याबद्दल अर्ज केला होता. त्याचा विचार करण्याकरतां दोन शास्त्री व एक गृहस्थ यांची कमिटी नेमून त्यास काय प्रायश्चित्त द्यावें हें ठरविण्याचें काम लेखी विज्ञप्तीवरून सोंपविलें होतें. परंत या परिषदेचें काम पुढें चालल्याचें दिसून येत नाहीं. पुढें रावसाहेबांची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें सर्वच कामें ते सोडून देऊं लागले त्यांत हेंही सुटलें; पण दिशा दाखवून दिलेली आहे. ब्राह्मण ज्ञाति त्यांचे गूण अंगीं असलेल्या दिव्य पुरुषाची वाट पहात बसली आहे ! आणखी किती दिवस वाट पहावी लागणार कोणास ठाऊक !

---

## प्रकरण ७३ वें.

# हिंदुस्थानविषयक इंग्लंदांत व येथें चळवळ.

There is no shame in kneeling on the threshhold where the mother of Parliament sits.

( चार्लस ब्रॅड्लॉ यांचा हिंदी लोकांस मुंबईच्या कॉंग्रेसमध्यें १८८९ सालीं केलेला उपदेश )

**। यां मातरं लोकसभागणस्य ।**
**॥ जानन्ति तस्याग्रृहदेहलीषु ॥**
**। निधाय जानून्यवनौ कृतो यः ।**
**॥ लज्जास्पदं स्यात्सकथं प्रणामः ॥**

( वरील इंग्रजी ओळींचें भाषांतर स्वकृत. )

हिंदुस्थानाचीं–किंबहुना सर्व ब्रिटिश साम्राज्याचीं–खरीं राज्यसूत्रें ब्रिटिश पार्लमेंत सभेच्या हातांत आहेत. तिचे घटकावयव इंग्लंदचे लोक असल्यामुळें तीं राज्यसूत्रें त्या लोकांच्या हातांत आहेत. हिंदुस्थान सरकारनें कोणतीही कल्याणाची गोष्ट केली तरी तिला मंजुरी देण्याचें इंग्लंदच्या लोकांपाशीं आहे. म्हणून हिंदुस्थानच्या परिस्थितीविषयीं जर कांहीं चुकीच्या कल्पना इंग्लंदच्या लोकांच्या मनांत प्ररूढ झाल्या असतील तर त्यांचें निर्मूलन करून खऱ्या स्थितीचें ज्ञान त्यांस करून दिलें पाहिजे. व तें काम हिंदी लोकांचें आहे. परंतु त्यांच्याशीं आह्मीं सन्निकृष्ट संबंध ठेवल्याशिवाय तें साधणार नाहीं, असें **रावसाहेब** म्हणत असत “ ग्रेट ब्रिटनमधील जनतेशीं आम्हीं सन्निकृष्ट संबंध ठेवला पाहिजे. ( मि. वेडरबर्न यांस १४।८।८३ चें पत्र ) परंतु असा संबंध ठेवण्यास साधनें कमी आहेत म्हणून कांहीं हिंदी मुत्सद्दी खेद करीत असत पण निराश नसत. “ आमच्या विषयीं गैर समज होईल असा मजकूर इंग्रजी पत्रें प्रासिद्ध करतात. आमच्या पत्रांच्या द्वारें तो दूर करण्यास आमचें म्हणणें त्यांच्या ( इंग्लंदांतील लोकांच्या ) कानीं पाडण्याचीं साधनें नाहींत. तथापि आम्हीं जगूं व आमचे शत्रू जीवन्त असतां जगूं अशी आशा आहे. ( ३।४।१८८५ चें डा. राजेन्द्रलाल मित्र यांचें पत्र. )

इंग्लदच्या लोकांचें मन वेधून घेणें व हिंदुस्थानविषयक प्रश्नांची चर्चा त्यांस करावयास लावणें जरा कठीण काम खरें. हें किति कठीण त्याचें वर्णन पाटणाचे बॅरिस्टर मि. टेलर यांनीं पुढील पत्रांत केलें आहे.

“ हिंदुस्थानांतील प्रश्नांविषयीं इंग्लंदांत साधारणतः उदासीनता दिसून येते. हिंदुस्थानविषयक महत्त्वाच्या प्रश्नांची चर्चा योग्य रीतीनें करणें अगदीं अशक्य

नसलें तरी फार खर्चाचें आहे. श्रमाचें व वेळाचें आहे. वर्तमानपत्रें व मासिकें यांची प्रथम सहानुभूति उत्पन्न केली पाहिजे. त्याकामीं कांहीं लेखक-ज्यांच्या म्हणण्याकडे वर्तमानपत्रांचे मालक लक्ष देतात ते—हातीं धरले पाहिजेत. कारण अशा तऱ्हेनें लोकमत जागृत झाल्याशिवाय पार्लमेंटचे सभासद् कोणचाही प्रश्न हातांत घेत नाहींत. ”

इंग्लंदमधील लोक उदासीन असतील पण त्यांच्या उदासीनतेंत हिंदी लोकांनीं आपल्या उदासीनतेची भर घातली आहे, असें कोणी म्हणेल तर रावसाहेब त्याला अपवाद होते. अगदीं पहिल्यापासून ते इंग्लंदमधील लोकांशीं सन्निकृष्ट असण्याकरतां तेथील कांहीं लोकांशीं पत्रव्यवहार करीत असें पुढील मि. डिकिन्सन यांनीं लिहिलेल्या पत्रावरून दिसतें.

“ प्रियकर महाराज,

तुमचें पत्र हातीं पडतांच मीं तें ब्राइट यांकडे नेलें. त्यांनीं आंतील लिहि-लेल्या मजकुराकडे विशेष लक्ष देऊन तें वाचलें. मि. ब्राइट हे इतके कामांत गढून गेले आहेत कीं त्यांस आतांच तुमच्या पत्राचा जबाब पाठवावयास वेळ होणार नाहीं. आपलीं जीं काहीं मतें असतील तीं प्रकट करण्यास आलेल्या संधीचा फायदा हिंदी लोक घेत नाहींत हें तुमचें मत माझ्या मताशीं जुळतें. मधून मधून लंडन येथील वर्तमान पत्रांत विशेषतः ‘ मार्निंग स्टार ’ पत्रांत एकादें पत्र छापावयास दिल्यास हित होईल. हिंदुस्थानच्या राजकीय भवित-व्यतेला नीट नेटकें स्वरूप देण्याच्या कामांत कांहीं तरी वजन पडेल अशी व्यवस्था करण्याकरतां हिंदी लोकांनीं आपलीं मतें संधि येतांच स्पष्टपणें विला-यतच्या लोकांस कळवावीं म्हणून मीं पुष्कळ श्रम केले ते निष्फळ झाले. आम्हांशीं बुद्धिमान् हिंदी लोकांनीं सहकार केल्याशिवाय येथील इंग्रज-लोकांच्या मनावर कांहीं वजन पडण्याची मला आशा उरली नाहीं. ”
( १६।५।१८६० )

आपला विश्वास्य
**जॉन डिकिन्सन्**

रावसाहेबांनीं लिहिलेल्या ज्या पत्राचें हें उत्तर आहे तें पत्र उपलब्ध नाहीं.

वरील उपदेशा प्रमाणें रावसाहेब उचित प्रसंग पाहून इंग्लंदमधील पत्रांत लेख लिहीत असत.* लार्ड रिपन यांच्या वेळीं त्यांच्या धोरणाविरुद्ध इंग्लंदांत जी चळवळ तेथील कांहीं लोकांनीं वर्तमानपत्रांत लेख लिहून चालविली होती तिला आळा बसण्या करितां पॉलमॉल गॅझेट मध्यें वेळेस रावसाहेबांनीं तारेनें मजकूर पाठविल्याचा व पत्रीं लेख लिहिल्याचा उल्लेख सांपडतो.

" ९ व्या तारखेची माझी तार प्रसिद्ध केल्याबद्दल मी आभारी आहें. त्या तारेंतील मजकूर काय आहे तें हिंदुस्थानांत परत तिकडून कळून येतांच येथील टाइम्स पत्रांत एक अग्रलेख फडकला. अर्थात तो त्या पत्राशीं संबंध असलेल्या वंग देशांतील मळेवाल्यांची चिंता बाळगणाऱ्या तत्पक्षीय लेखकाच्या हातचा आहे. मी त्यास उत्तर म्हणून संध्याकाळीं मुंबई गॅझेटकडे पत्र लिहिलें आहे,त्याची नक्कल प्रसिद्ध करण्याकरितां सोबत पाठविली आहे. जें काय चाललें आहे त्यावरून असें वाटतें कीं लार्ड रिपन यांच्यावर विरुद्ध पक्षाचे लोक तुटून पडले आहेत. कारण त्यांनीं जीं कामें हातांत घेतलीं आहेत तीं त्यांस पसंत नाहींत. व पसंत नाहींत याचें कारण केवळ पक्षभेद. पण पक्षभेदाला हिंदुस्थानविषयक राजकारणांत थारा मिळतांच कामा नये. इंग्लंद व हिंदुस्थान या दोन देशांत जें अंतर आहे तें फार नडत आहे हें खरें आहे. नाहीं तर असल्या लेखांचा खोडसाळपणा उघडकीस आणून चांगला समाचार लागलाच घेतां आला असता. आठवड्याच्या आठवड्यास लंडन टाइम्सला येथून ज्या तारा पाठविण्यांत येतात त्यांत आम्हां हिंदी लोकांचें जसें चित्र रेखाटलें जातें तसेंच आम्हीं आहोंत असें इंग्लंदांतील जनतेचें मत होतें. प्रत्येक लेखक स्वतांच्या कल्पनाचक्राच्या गतीस धरून भराभर सिद्धांत ठोकून देत आहे. त्यांच्याशीं मला तूर्त कांहीं कर्तव्य नाहीं. मी जो लेख पाठविला

*१८८२ सालीं सर हारकोर्ट जॉन्स्टन यांनीं इंग्लंदांत स्पर्शजन्य रोगाच्या कायद्याच्या उच्चाटनाविषयीं चळवळ चालविली होती. त्यावेळेस मुंबईच्या कारपोरेशन पुढें १८८० सालीं रावसाहेबांनीं जीं भाषणें केलीं त्यांच्या छापीलप्रती इंग्लंदमध्यें एका मित्रा मार्फत वांटविल्या.

आहे त्यांतील प्रत्येक शब्दाच्या सत्यतेची साक्ष पटविण्यास माझ्या नम्र बुद्धि-सामर्थ्याप्रमाणें प्रमाणांकित पुराव्यासह माझी तयारी आहे.” ९।३।८२ चें पत्र.

इंग्लंदांतील वाचकवर्गानें वाचावे म्हणून तेथील वर्तमान पत्रांकडे हिंदुस्थानांतील लोकांनीं जर लेख पाठविले तर ते कसे असावे या विषयीं रावसाहेबांच्या एका इंग्रज मित्रानें रावसाहेबांस पुढील प्रमाणें पत्र लिहिलें तें मनन करण्यासारखें आहे.

“ हिंदुस्थानाविषयक लेख इंग्लदांतील जनतेनें वाचावे अशी इच्छा असल्यास त्यांना समजणार नाहीं असे सर्व शब्द वर्जून तो लिहिला पाहिजे. त्याचप्रमाणें त्यांस माहीत नाहींत अशा अधिकाऱ्यांचा किंवा स्थलांचा उल्लेख त्यांत येतां कामा नये. साधारण वाचकांचें मनोरंजन होईल असा तो असावा. कारण हिंदुस्थानवासी जनतेस जितकें चीनदेशाचें ज्ञान आहे तितकेंच त्यांना हिंदुस्थानाविषयीं आहे* ” ( २–८–८३ )

तथापि इंग्लंदांत लोकमत जागृत करण्याचा उद्योग करणारे इंग्रज लोक होते. हिंदुस्थानच्या हिताचे प्रश्न पार्लमेंत सभेपुढें साधार मांडण्याकरतां इन्डियन रिफार्म असोसिएशन नांवाची एक संस्था अगदीं पहिल्या पहिल्यानें अस्तित्वांत होती. तिचे चालक मि. जॉन डिकिन्सन होते. त्यांच्या कामगिरीचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें करून रावसाहेबांस एका इंग्रज मित्रानें पत्र पाठविलें तें:—

“ मी इंग्लंदमध्यें असतांना तिच्या विषयीं चौकशी केली तेव्हां असें समजलें कीं पूर्वीं या मंडळीनें फार महत्वाची कामगिरी बजावली आहे. ‘ हिंदुस्थानविषयक प्रश्नासंबंधें मी जें कांहीं काम पार्लमेंट सभेंत केलें तें सारें मि. डिकिन्सनच्या जोरावर ! त्यांचा उपदेश व माहिती हीं फारच उपयोगीं पडलीं ’ असें खुद्द जॉन ब्राइट यांनीं मला सांगितलें. खरोखर त्यांच्या तोंडचे

*मॅनचेस्टरचे व्यापारी आपल्या गिरण्यांच्या नलिकायंत्राप्रमाणें लांब चिमण्यांतून इकडे दृष्टि फेंकीत असतात व इकडील परिस्थितीचें ज्ञान करून घेतात तें खरें असेल काय ?

शब्द सांगतों. ‘ पार्लमेंटमध्यें मी केलेलीं भाषणें म्हणजे **डिकिन्सन** यांचीं भाषणें होत. फरक एवढाच कीं तीं माझ्या मुखांतून बाहेर आलीं. ’ व त्या मित्रानें पुढें सूचना केली ती अशी “ हल्लींचा काळ कांहीं अशी संस्था स्थापण्यास अनुकूल आहे असें वाटतें. पार्लमेंटसभेंतील अनेक प्रमुख सभासद हिंदुस्थानविषयक प्रश्नांकडे पार्लमेंटचें लक्ष्य वेधून घेण्याकरतां एकजुटीनें खटपट करण्यास राजी आहेत. त्यांचे पुढारी होण्याचें मि. **जॉन ब्राइट** हे कबूल करतील. मि **बॅक्स्टर**; मि. **जेकब**; मि. **नाइट**; मि. **स्लॅग**; मि. **पिटर**; मि. **रायलॅन्ड्स** असे दुसरे कांहीं ह्या कमिटीचे सभासद होतील. इंडियन रिफार्म असोसिएशनचे कागदपत्र मि. **इव्हॅन्स बेल** यांजवळ आहेत. ”

“कर्नल **ऑस्बोर्न** हे चिटणीस होतील. हे उत्साही आहेत. यांचीं मतें पक्कीं आहेत व इष्टकामाचीं माहिती यांस विशेष आहे.”

पार्लमेंट सभेंत कमिटी कां नेमिली पाहिजे तें स्पष्ट करून सांगणारीं कारणें त्या पत्रांतच लिहिलेलीं होतीं तीं येणेंप्रमाणें:—

“ पार्लमेंट सभेपुढें हिंदुस्थानविषयक येणारे प्रश्न दोन प्रकारचे असतात. १ देशाची भरभराट होऊन त्याचें हित घडवून आणणारे व २ दुरुस्तीकस्तिां आलेलीं व्यक्तिशः अन्याय झाल्याचीं उदाहरणें. पहिल्या प्रकारचे प्रश्न स्वतंत्रपणें आणून साधक बाधक प्रमाणें देऊन पल्ल्याला पोंचविण्याचें काम सभासदांतील एका व्यक्तीस झेंपत नाहीं. यांत भिन्न भिन्न विषयांचें विशेष प्रकारचें ज्ञान लागतें तें त्यास नेहमींच कोठें असतें ? तें मिळविण्यास एकट्यास किती बरें श्रम पडतात ! व एकट्यावरच जबाबदारी केवढी येऊन पडते ! प्रचलित असलेल्या राजधोरणाच्या विरुद्ध त्याचें मत असलें म्हणजे पहावयासच नको ! अधिकारापन्न लोकांच्या मतांच्या अगडबंब वजनाखालीं चुरडूनच जातो बिचारा ! हिंदुस्थानाची सांपत्तिक स्थिति ऋणक्षमता येण्यासारखी चांगली होण्याकरितां व त्याची सुरक्षितता वाढविण्याकरितां मोठमोठ्या प्रश्नांवर जी चर्चा करावी लागली ती करण्याचें काम फक्त **जॉन ब्राइट** व **फासेट** हेच करूं जाणोत ! परंतु जें व्यक्तिशः साध्य नसतें तें संघशक्तीनें साध्य होतें. जबाबदारी अने-

कांनीं अंगावर घेतल्यानें अफाट श्रम करतां येतात. ज्या प्रश्नांची चर्चा हिंदी पत्रें सतत करतात व जे प्रश्न हिंदी संस्था अर्जद्वारा पार्लमेंट सभेकडे लावून देतात त्यांची दाद लावून घेण्याकरितां हल्लीं होणाऱ्या किरकोळ व्यक्तिशः प्रयत्नांस जोर आणावयाचा हा या संस्थेचा ( नवीन स्थापन करूं घातलेल्या ब्रिटिश इन्डिया कमिटीचा ) हेतु आहे. दुसऱ्या प्रकारच्या प्रश्नां संबंधें म्हणजे व्यक्तिशः झालेल्या अन्यायाचीं उदाहरणें कोणी एकाद्यानें हातांत घेतलीं असें जर घडून आलें तर तें चुकूनच घडून आलें असें समजावें. म्हणून असल्या फिर्यादींची दाद मागून घेण्याची कांहीं व्यवस्था झाली पाहिजे. म्हणजे उगाच कांहींतरी गाऱ्हाणें गाऊन पार्लमेंट सभेचा वेळ फुकट जाणार नाहीं व खरोखर अन्याय झाला असला तर पक्षकाराला न्याय मिळेल. निदान त्याचें म्हणणें पार्लमेंटनें नीट ऐकून तरी घेतलें एवढें तरी समाधान त्यास प्राप्त होईल. म्हणून पांच-सहा पार्लमेंटच्या सभासदांची एकजुटीनें कामकरण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत यावी. तिचा एक पगारी चिटणीस असावा. चिटणीसांनीं अर्ज घ्यावे व काम तयार करून ठेवावें. कचेरीची जागा स्वतंत्र असावी. एकंदर खर्च २०० पाउंड करावा. यांतील निम्मे हिंदुस्थानांतील लोकांनीं सोसावा व निम्मे इंग्लंदांतील त्यांच्या मित्रांनीं सोसावा. ” २६–१–८४

याचवेळेला दोन पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानांत आले होते. एक एडिन्-बरोचे मि. बकूनन् व दुसरे फाइफूचे मि. ब्रूस. त्यांची भेट घ्यावी म्हणून त्याचवेळीं वरील पत्र पाठविणाऱ्या इंग्रज मित्रानें रावसाहेबांस विनंति केली होती. कमिटीची स्थापना झाल्याबरोबर हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत सुधारणा करण्याची चळवळ करावयाची होती. व त्यांत मि. ऑसबोर्न हे प्रमुख वक्त्याचें काम करणार होते. त्यांना पूर्ण माहिती देण्याकरितां येथून साक्षीदार जावयाचे होते. त्यांचें काम म्हणजे सुधारणा काय काय इष्ट आहेत तें पाहून त्या पार्लमेंट सभेस कबूल होतील असें स्वरूप त्यांस कसें द्यावें याविषयीं सूचना करणें हें होतें. पार्लमेंटमध्यें सूचना येतां क्षणींच तिच्या

समर्थनार्थ येथून निरनिराळया संस्थांकडून अर्जाचे ढीगच्या ढीग पाठया-वयाचे होते.

१८५४ ते १८५८ सालापर्यंत जे वादविवाद पार्लमेंत सभेंत झाले व ज्यांचें पर्यवसान इन्डिया काउन्सिलाची स्थापना करण्यांत झालें त्याचा संक्षिप्त इतिहास लिहून काढण्याकरितां रावसाहेबांच्या वरील इंग्रजमित्रानें रावसाहेबांकडून पार्लमेंटचे हॅन्सर्डकृत रिपोर्ट मागविले होते.

ही योजना रावसाहेबांस पसंत झाली होती. त्यांनीं विलायतेस स्वत: साक्ष देण्यास जावें अशी विनंति रावसाहेबांस करण्यांत आली होती. त्याचें उत्तर रावसाहेबांनी ५–२–८४ रोजीं लिहिलें "मला इंग्लंदांत जावयास सवड नाहीं. मी वर्गणी लागेल ती देईन. व माहिती गोळा करण्याकरतां एका मनुष्याची नेमणूक केली आहे."

इतकें सांगून रावसाहेबांनीं जागोजाग आपल्या मित्रांस पत्रें लिहिलीं. त्यांत वरील योजना स्पष्ट केलेली होती. त्यांत एक पत्र कर्नल ऑस्बोर्न यांस १–२–८४ चें रावसाहेबांनीं लिहिलें तें असें "मी मद्रास, अलाहाबाद इ. ठिकाणच्या मित्रांस*छापील याद्या पाठवून माहिती गोळा करविण्याकरितां व विलायतेस साक्षीदार पाठविण्याकरतां खटपट करा म्हणून विनंति केली आहे."

या कमिटीच्या स्थापनेची आवश्यकता वाटण्यास प्रत्यक्ष कारण असें झालें कीं लार्ड रिपन आपल्या नव्या धोरणानें प्रजानुरंजन करीत असतां विलायतेस असलेल्या अंग्ला इंडियन लोकांनीं त्यांच्या धोरणाविरुद्ध १८८३ सालीं जोराची चळवळ चालविली. तिचा प्रतिकार करण्याकरतां व लार्ड रिपन यांच्या धोरणास पुष्टि देण्याकरितां ब्रिटिश इंडिया कमिटीची स्थापना झाली. तींत पुष्कळ पार्लमेंटचे निर्भीड व कोणाला न भिणारे सभासद होते. त्यांनीं जागोजाग विलायतेंत सभा भरविल्या,असंख्य हस्तपत्रकें वांटलीं व लघ्वाकार पुस्तकें पुरविलीं. त्यांत "हिंदुस्थानांतील लोकांच्या गरजा काय आहेत तिकडे लक्ष द्या. त्यांच्या-

*त्यांत दिवाणबहादुर रघुनाथराव व मुनसी हनुमानप्रसाद हे होते.

वर अंमल करणाऱ्यांचें काय म्हणणें आहे तें पार्लमेंटपुढें मांडण्यास इंग्लंदांतील वर्तमानपत्रें आहेत, इंडिया काउन्सिलचे इंग्रज सभासद् आहेत; पण ज्यांच्यावर अम्मल करावयाचा त्या २५ कोट मुक्या हिंदुस्थानांतील रयतेचें म्हणणें काय आहे तें पार्लमेंटास कळविणारा कोणी नाहीं. म्हणून इंग्लंदांतील लोकांस व पार्लमेंटास हिंदी रयतेची खरी स्थिति कळण्यास मार्ग नाहीं हें ध्यानांत आणा " अशी विनंति केली होती.

ह्या ब्रिटिश कमिटीनें जी कामगिरी हातांत घेतली ती अशी होती.

१ लार्ड रिपन यांच्या सुज्ञपणाच्या धोरणास बळकटी आणण्याकरितां झटणें.

२ हिंदुस्थानच्या लोकांची राजकीय व आर्थिक प्रगति होण्याकरितां त्यांच्याशीं सहकार करणें.

३ हिंदुस्थानांतील लोकांची खरी स्थिति ब्रिटिश जनतेस कळाविणें.

४ वर्तमान पत्रांत लेख लिहून, सार्वजनिक सभा भरवून, खासगी लोकाशीं चर्चा करून व हस्तपत्रकें वांटून इंग्लंदांतील बहुजन समाज हिंदी प्रश्नांवर मत देण्यास लायक होईल असें करणें.

५ 'अंतीं हिंदी लोकांचेच हातांत राज्याचा कारभार जाईल अशा रीतीनें आम्हीं पहिल्यापासून राज्यव्यवस्थेचें धोरण ठेवणें हीच आमची हिंदुस्थानांतील कामगिरी आहे ' असें जे लार्ड सॅलिसबरी यांनीं २४।५।६७ रोजीं मत प्रकाशित करून ठेविलें आहे, तें वाजवी आहे असें सिद्ध करणें.

६ 'राज्याच्या सुरक्षिततेस बळकटी येईल अशा वाजवी रीतीनें निवडणुकीचें तत्त्व अमलांत आणून स्थानिक स्वराज्याचे हक्क लोकांस द्यावे व तेणें करून शेवटीं कर कसे वसूल करावे व त्या वसुलाचा पैसा कसा खर्च करावा हे सर्व अधिकार हिंदी लोकांच्याच हातांत जातील अशी व्यवस्था करावी ' असें जें सर ट्रेव्हलियन यांचें मत आहे त्याप्रमाणें प्रातिनिधिक संस्था निर्माण होतील असें करणें, कमिटीच्या केलेल्या कामाची हकीकत पुस्तक रूपानें छापणें, मासिक पुस्तक काढणें, माहिती मिळविण्या-

करितां जागोजाग शाखा स्थापणें इ. इ. या कमिटींत २६ सभासद दाखल झाले होते. त्यांत मेसर्स भावनगरी, इव्हॅन्स बेल, डिग्बी, मार्टिन वुड वगैरे लोकांची नांवें होतीं.

मि. सेमूर के यांचा व रावसाहेबांचा याविषयीं मोठा पत्रव्यवहार होऊन रावसाहेबांनीं त्यांस पैसा व हिंदुस्थानासंबंधीं प्रचालित विषयांवर माहिती देण्याचें कबूल केलें. त्यावर मि. सेमूर के. यांनीं रावसाहेबांस उत्तरादाखल पत्र लिहिलें. "तुमचें म्हणणें बरोबर आहे. पैसा व भरपूर माहिती हीं दोन आवश्यक आहेत. पण यांशिवाय आणखी एक गोष्ट आवश्यक आहे. इंग्लंदांतील तुमच्या इंग्रज मित्रांच्या वचनाला हिंदी जनतेकडून प्रतिवचन मिळालें पाहिजे. व त्यांत पुष्कळ आर्द्रता दिसून आली पाहिजे. म्हणजेच तेथील बहुजन समाजाची अशी खात्री होईल कीं आम्हीं जें जें हिंदी लोकांच्या कल्याणाकरितां इंग्लंदांत करीत आहोंत त्याची अवश्यकता आहे. एकाद्या देशाला कांहीं गोष्टींची उणीव भासत आहे. पण भीतीनें अथवा क्लेशसहिष्णुतेनें त्यांविषयीं आरडाओरड करावयाचें जो देश नाकारतो त्या देशाविषयीं आम्हां इंग्रजांची सहानुभूति केव्हांही मिळावयाची नाहीं."

रावसाहेबांनीं एक प्रथम खासगी सभा भरविली. सभेला मि. सेमूर के. स्वतां, तेलंग, खरे, राणिना, वाच्छा, मूस, मलबारी, आठल्ये, वगैरे हजर होते. सभेचे अध्यक्ष रावसाहेब होते. या सभेपुढें आजपर्यंत काय कामगिरी केली त्याची हकीगत सांगण्यास मि. के. यांस विनंति करण्यांत आली. अशा-रीतीनें विलायतेंतील ब्रिटिश कमिटीला पाठिंबा देण्याचें काम रावसाहेबांनीं चालविलें होतें.

इंग्लडमध्यें योजण्यासारखा या बरोबरच एक दुसरा उपाय होता तो हा कीं पार्लमेंत मध्यें हिंदुस्थानाकडे लक्ष पोंचविणाऱ्या इंग्रजमित्रांचा प्रवेश पार्लमेंत सभेंत होण्यास त्यांस निवडणुकीच्या वेळेस साहाय्य करणें. हा उपाय रावसाहे-बांस पसंत होता.

१८७४ सालीं पार्लमेंटच्या सभासदांची निवडणूक व्हावयाची होती. तेव्हां एका इंग्रज मित्रास निवडून आणण्याकरितां दादाभाई पैशाची मदत करीत होते. त्यांनीं रावसाहेबांच्या नांवानें वर्गणी भरून बिल त्यांकडे पाठविलें तें देतांना रावसाहेबांनीं पत्र लिहिलें कीं मला हे पैसे देतांना फार आनंद होत आहे. माझे वतीनें तुम्हीं अगोदर आमच्या मित्राच्या निवडणुकीस साहाय्य करून माझा सन्मानच केलात असें समजतों. ( दादाभाईस २९।५।८४ चें पत्र )

याच्या पुढची पायरी म्हणजे येथून हिंदी प्रतिनिधी पाठविणें व निवडणुकीच्या वेळीं पार्लमेंटमध्यें प्रवेश करून घेणें.

१८८३ सालीं रावसाहेब कलकत्त्यास शेतकऱ्यांच्या पेढ्यांच्या कामानिमित्त गेले होते त्या वेळेस मनमोहन घोस; खिस्तोदास पॉल; राजेन्द्रलाल मित्र यांच्या प्रत्यक्ष भेटीचा लाभ झाला. तेव्हां लालमोहन घोस यांची योग्यता त्यांस कळून आली व घोसबन्धूंचा स्नेह जडला. त्याचा पुढें चांगलाच उपयोग झाला.

१८८४ सालीं पार्लमेंत सभा मोडून पुन्हां निवडणूक होण्याची स्पष्ट चिन्हें दिसत होतीं म्हणून पार्लमेंत सभेंत निवडून येण्याकरतां उमेदवार म्हणून उभें राहण्याचा निश्चय बंगालचे उत्तम वक्ते लालमोहन घोस यांनीं केला. यांचे बंधु मन मोहन यांचा रावसाहेबांशीं पत्रव्यवहार सप्रेम चालू होता. कांहीं पत्रांत रावसाहेब त्यांस मोहनजी या नांवानें संबोधीत असत. रावसाहेबांची त्यांनीं पैशाकरतां मदत मागितली. ६००० पासून १०००० मुंबई करांनीं द्यावे अशी त्यांची विनंति होती. रावसाहेबांनीं तेवढी रक्कम जमविली व ती जमविण्यास यक्षिणीला कांडी फिरवावयास वेळ लागतो त्याहूनही कमी वेळ लागला. कांहीं ठिकाणाहून तर वेळ वांचविण्याकरतां तारेनें पैसे गोळा केले. एवढें केलें खरें पण तें केवळ लालमोहन मागतात म्हणून नव्हे. अगोदर लालमोहन घोस यांची प्रचलित विषयांवर मतें काय आहेत व विलायतेस गेल्यावर हे वागवीर काय बोलणार व पार्लमेंट सभेंत सुदैवानें

यांचा प्रवेश झाल्यावर काय करणार यांचा अंदाज रावसाहेबांनीं प्रथम काढला असें पुढील पत्रांवरून दिसतें.

मत्प्रिय घोस*

येथील लोकांस **लालमोहन घोस** यांचा कार्यक्रम काय आहे तें कळण्याची इच्छा आहे. आम्हीं जमिनीच्या व धर्माच्या बाबतींत पुरातन मताभिमानी आहोंत. म्हणून **लालमोहन** यांस आमच्या वतीनें बोलण्याचा अधिकार त्यांची मतें काय आहेत हें कळल्याशिवाय दिला तर आमची फंसगत होईल. " आम्हीं " हें पद मी येथील सर्व लोकांस उद्देशून योजिलें आहे. म्हणजे कोणाचीही नांवें घ्यावयास नकोत.

बेंगाल कुळवारी पद्धतीचा कायदा येथील लोकांस प्रिय वाटत नाहीं. येथें माझें स्वतांचें मत मी देत नाहीं. परंतु एवढें सांगून ठेवतों कीं युरोपियन कामगारांना सुद्धां ते काय करणार आहेत हें निश्चितपणें ठाऊक नाहीं. म्हणून आम्हांला असें वाटत आहे कीं, तुमच्या ( बंगाल्यांतील ) पक्षभेदानें आमचा प्रतिनिधि म्हणून पाठविलेल्याच्याच हातून आमचा नाश होईल. या गोष्टीचा मेहेरबानी करून विचार करा. ( ३।८।८४ )

यांच्या पत्रास उत्तर म्हणून प्रथम **मनमोहन** यांनीं लिहिलें कीं एकंदर हिंदुस्थानचें जेणें करून हित होईल व ज्या संबंधानें तीन्हीं इलाख्यांतील पुढाऱ्यांचें एक मत असेल तोच प्रश्न **लाल मोहन** हातीं घेईल.

वरील म्हणणें बरोबर आहे. विचारी मनुष्य विलायतेंतलि कान्सर्व्हे-टिव्ह किंवा रॅडिकल म्हणजे राजपक्ष किंवा प्रजापक्ष इत्यादि जे पक्ष आहेत त्यांतील कोणत्या तरी एका पक्षास मिळण्याच्या भानगडींत न पडतां हिंदुस्थानचें हित कोणत्या का पक्षाकडून होईना तें आपलें करून घ्यावयाचें असें धोरण ठेवील. तथापि असें म्हणून दोन्हीं पक्षांपासून अलिप्त राहून कोणाही उमेदवाराला पार्लमेंट सभेंत निवडून येणें शक्य नाहीं. निवडणुकीस उभा राहणाऱ्या उमेदवारानें मी अमूक पक्षाचा आहें असें जाहीर करून आपलीं

* **मनमोहन** घोस.

मतें प्रचलित विषयांवर प्रदर्शित केल्याशिवाय यशस्वी होण्याची आशा बाळगूं नये. रॅडिकल म्हणजे प्रजापक्षीय लोकांकडूनच हिंदी उमेदवाराला निवडून येण्याचा संभव जास्त असणार, कारण हा पक्ष उदार मतवादी आहे. या वेळेला उपरिनिर्दिष्ट अडचण उद्भवली होती. कलकत्त्याच्या कौन्सिलांत बंगालच्या जमीनदारीसंबंधें कायदा होऊं घातला होता. कुळांच्या तर्फे मत प्रदर्शित करावें तर बंगालचे श्रीमंत जमीनदार **लालमोहन घोस** यांस मदत करतील ही आशा बाळगण्यास नकोच होती, कारण आपल्या हिताविरुद्ध उद्गार काढणाऱ्यांस पार्लमेंट सभेस निवडून येण्यास मदत करणें म्हणजे विषारी तुषार मुखावाटे फुत्कारण्याकरतांच सर्पाला पयःपान करूं देण्यासारखें आहे. हें कळण्या इतके जमीनदार शहाणे होते. बरें उलट पक्षीं कुळांविरुद्ध बोलावें तर इंग्लंदांतील लोक विशेषतः रॅडिकल ह्मणजे प्रजापक्षीय लोक कुळांचे वाली असल्यामुळें ते नाखूष होणार व तसें करणें इष्ट नाहीं. वास्तविक **लालमोहन** हे जमीनदारांचें व कुळांचें, दोघांचें हित पाहणारे त्रयस्थ गृहस्थ होते म्हणजे ते स्वतां जमीनदार नव्हते व कूळही नव्हते. **रावसाहेबांचें** समाधान करण्याकरतां वेळोवेळीं प्रचलित विषयांवर आपलीं मतें **लालमोहन घोस** यांनीं प्रसिद्ध केलीं होतीं, त्यांच्या छापील प्रती त्यांनीं **रावसाहेबांकडे** पाठवून दिल्या व त्यांच्या मतांचा खुलासा केला. त्यानें **रावसाहेबांचें** समाधान झालें. कलकत्त्यास **घोस** यांनीं १०,००० रुपये जमविले होते. पंजाबांतून दोन हजार येतील अशी अटकळ होती. **लालमोहन घोस** यांच्या तारा **रावसाहेबांस** येऊं लागल्या कीं पैसे पाठविण्याची त्वरा करा. पार्लमेंट केव्हां मोडेल व केव्हां नवीन निवडणूक होईल याविषयीं क्षणाचाही भरवंसा नाहीं. त्यासरसे **रावसाहेबांनीं** मागें सांगितल्याप्रमाणें पैसे गोळा केले आणि जितक्या त्वरेनें हे पैसे गोळा केले तितक्याच त्वरेनें **लालमोहन घोस** यांच्या फंडाच्या चिटणीसांकडून पैसे पोंचल्याच्या पावत्या आणवून ज्यांच्या त्यांच्याकडे रवाना करून **रावसाहेब** मोकळे झाले.

" मात्प्रिय घोस

संशय भूमीची सीमा वलांडून गेलों आहे. लालमोहन यांस साहाय्य करणारी माझी नौका एडनच्या बागांशीं जाऊन सुरक्षितपणें आतां थडकली आहे. मद्रासेकडून ३००० रुपये पाठवूं अशीं विश्वासार्ह वचनें मिळालीं आहेत व तुमचें लिहून येतांच तुमचेकडे परस्पर पैसे पाठविण्यास कळवितों. व माझ्या इकडील वांट्याचे रोख पाठवितों. माझ्या हातून स्वतंत्र-पणें जेवढें होऊं शकलें तेवढें पुरें आहे. आणखी चळवळ करून मुंबईच्या आसपासच्या छावणींत कलह उत्पन्न करूं इच्छित नाहीं. माझ्यामतें जमीनदार व कुळें या दोघांस न्याय मिळाला पाहिजे " ( ६।९।८४ )

मद्रासेस पैसे जमविण्याला वीरराघवाचार्य व दिवाण बहादुर व आप्पा आठल्ये यांची मदत झाली. व मुंबईस तेलंग यांची झाली.

विलायतेस गेल्यावर मि. घोस हे ईस्ट इंडिया असोसिएशनचे उमेदवार म्हणून निवडणूकीला उभे राहिले होते. एवढी खटपट करून घोस यांस यश आलें नाहीं. तथापि त्यांनीं तेथें जाऊन तेथील लोकांपुढें भाषणें करणें इत्यादि हिंदु-स्थानविषयक कामगिरी चांगली केली. कारण मि. घोस हे परत आल्यावर त्यांस मानपत्र देण्यांत आलें होतें. त्यांत बैरामजी जीजीभाई, आत्माराम पांडुरंग, मि. मेथा, त्रिभुवनदास मंगळदास, तेलंग व रावसाहेब हे प्रमुख होते.

पुन्हां १८८५ सालीं लालमोहन घोस यांनीं पुन्हां प्रयत्न करावा असें राव-साहेबांच्या मनांत होतें परंतु मुंबईकरांस निराळीच बुद्धि सुचली होती. इंग्लं-दांतील एका निवडणूकीमध्यें प्रत्यक्ष उमेदवार म्हणून उभे राहून अनुभव घेतलेल्या मनुष्यास त्यांनीं अजीबात सोडलें.* मात्र त्यांच्याबद्दल उभा केलेला मनुष्य ह्मणजे दादाभाई पेक्षां दुसरा तिसरा कोणी नव्हता. "लालमोहन घोस यांचे व माझे मुख्य पाठिराखे यांनीं त्यांस सोडलें. एकमेकांचीं पोटें फाडीत आहोंत व वरून मिठ्या मारीत आहोंत." आर. डी. मेथा यांस २२।६।८६ चें पत्र.

## राष्ट्रीय सभा.

सामाजिक सुधारणेचा जन्म जसा इंग्रजी शिक्षणापासून झाला, तसा राष्ट्रीय सभेचा जन्मही इंग्रजी शिक्षणापासूनच झाला आहे. व तिचें भविष्य जेव्हां इंग्रजी शिक्षण देण्याचें उदार मतानें सरकारनें ठरविलें तेव्हांच करून ठेवलेलें आहे. त्या वेळेस मेकॉले साहेबांनीं विरोध करणाऱ्यांस विचारिलें. " हिंदुस्थानच्या लोकांनीं सदा सर्वकाळ आमचें आज्ञाकरत्व पतकरून असावें या हेतूनें त्यांस आम्हीं अज्ञानांतच राहूं द्यावें काय ? त्यांच्या हृदयांत महत्त्वाकांक्षा उत्पन्न केल्याशिवाय त्यांस ज्ञानदान करूं शकूं असें आम्हांस वाटत आहे काय ? अथवा महत्त्वाकांक्षा त्यांच्या हृदयांत जागृत करून त्यांचा लाभ करून देण्यास कायदेशीर तजवीज करण्याचा आमचा विचार नसावा काय ? × × × × आमच्यापुढें कर्तव्याचा मार्ग आंखलेला आहे व तोच शहाणपणाचा मार्ग आहे. त्यानेंच आमच्या देशाची भरभराट होणार आहे व देशाचा मान वाढणार आहे " म्हणून प्रथम इंग्रज सरकारनें ज्ञानामृताच्या पानशाला स्थापन केल्या. त्यांतून विद्वान युरोपियन प्रोफेसरांच्या हातून ज्ञानामृत लोकांस प्यावयास मिळालें. नैतिक, बौद्धिक, धार्मिक, सामाजिक, व राजकीय जीविताला चैतन्य प्राप्त झालें. हिंदी जनांच्या मनांत आकांक्षा उत्पन्न झाल्या. लेखनस्वातंत्र्याचा उपभोग मिळाला. कांहीं बुद्धिमान् हिंदी लोकांनीं इंग्लंदचा प्रवास केल्यानें त्यांस तेथील सामाजिक व राजकीय व औद्योगिक संस्थांचा परिचय झाला व त्यांच्या धर्तीवर आपल्या देशांत सुधारणा करावी अशी इच्छा त्यांस उत्पन्न झाली. म्हणून सर्व सुधारणांच्या आद्य कारणाचा मान इंग्रजी शिक्षणास देऊन राष्ट्रीय सभेच्या ( राष्ट्रीय राजकीय चळवळीच्या साधनाच्या ) उगमाच्या आनुषंगिक कारणांचा शोध लागला तर पाहूं. हा शोध लावणें नदीच्या मुळाचा शोध लावण्यासारखेंच आहे.

पहिल्या प्रथम औंध येथें तालुकदारांची सभा, लंडन मध्यें ईस्ट इंडियन असोसिएशन होती तिची मुंबईस शाखा, व मुंबई असोसिएशन, पुण्याची सार्व-

जानिक सभा इत्यादि राजकीय सभा कोठें कोठें स्थापन झाल्या. तेव्हां अध्यक्ष उपाध्यक्ष, चिटणीस, खजिनदार,—मानाचे व पगाराचे—,सभासद, द्रव्यनिधि, इमारत, मासिक इत्यादि जी सामग्री लागते ती पुढारी मिळवीत होते. सभा कशा स्थापाव्या तें त्यांस कळूं लागलें होतें.

याप्रमाणें इलाखा सभा अथवा क्वचित् प्रसंगीं जिल्हा सभाही स्थापन झाल्या होत्या. परंतु त्यांचें काम कांहीं अपवाद सोडून चालकांच्या लहरीप्रमाणें होत असे. उद्योगसातत्य त्यांत वाखाणण्यासारखें नव्हतें. स्थानिक महत्व ज्या विषयास प्राप्त होई त्याविषयीं चळवळ करीत. ती चळवळ दीर्घायू नसे. कारण दुसरी शिकार सांपडली म्हणजे जुनी टाकून नवीच्या पाठीस लागत. म्हणून पक्कें काम एकाही विषयासंबंधें होत नसे. शिवाय प्रत्येक सभेचें काम निरनिराळ्या दिशेनें चाले. एकीचा आवाज दुसरीच्या आवाजाशीं न जुळल्यामुळें मोठा आवाज होऊनही बदसूर निघे. इंग्रजी भाषेच्या द्वारें सर्व देशांतील भिन्न भिन्न इलाख्यांत विचारविनिमय सुरू झाला होता त्याला व्यवस्थित स्वरूप मिळालें नव्हतें. यांत सुधारणा करण्याची जरूरी बरेच दिवस पडली नव्हती. परंतु लार्ड रिपन यांच्या कारकीर्दींत कांहीं कायदे करण्यांत आले; त्यांच्या विरुद्ध विशेषतः इलबर्ट बिलाच्या विरुद्ध युरोपियन लोकांनीं ओरड केली. तिच्या प्रतिकारार्थ सर्व हिंदी लोकांचें एकमत झालें. म्हणजे ऐक्य झालें एका तंत्रानें वागण्याचा धडा लोक शिकले म्हणजे थोडीशी राष्ट्रीय भावना उत्पन्न झाली. हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षांना एकस्वरूप प्राप्त झालें. म्हणून सर्व सभांनीं एका ठरींव दिशेनें काम केलें पाहिजे. तसें केल्यानें एखाद्या असोसिएशनच्या म्हणण्यापेक्षां सर्व असोसिएशन्सच्या प्रतिनिधींच्या म्हणण्यास मान जास्ती मिळेलच असें समजून काम कोणत्या दिशेनें करावयाचें व तें कसें तें ठरविण्याकरतां वर्षांतून एकदां केव्हांतरी देशांतील सर्व पुढाऱ्यांची सभा कोठेंतरी देशाच्या मध्यभागीं भरावी व तेथें भिन्न भिन्न व प्रचलित विषयांवर चर्चा व्हावी व तीवरून ठराविक स्वरूपाच्या रीतीनें देशभर राजकीय चळवळ सुरू ठेवावी अशी भावना लोकांत उत्पन्न

झाली. * लोहमयी वारू सर्वांस वाटेल तेथें नेण्यास तयार होताच. फक्त इच्छा पाहिजे होती व सर्वत्र शांतता नादूं लागल्यामुळें या गोष्टींकडे पूर्ण लक्ष्य द्यावयास पुढाऱ्यांना फार सोपें गेलें. इंग्रज सरकारानें आजपर्यंत जें कल्याण केलें त्याबद्दल कृतज्ञ राहून पुढें काय पाहिजे तें मागून भविष्य काळीं आशा बाळगून असावयास सांपडलें. त्याप्रमाणें एक नॅशनल कान्फरन्स पुण्यास भरवावयाचें ठरलें होतें. तेथें कांहीं मंडळी जमली होती. परंतु तेथें कालऱ्याचा तडाखा उडाल्यामुळें तिला मुंबईस यावें लागलें. सभा गोकुळदास तेजपाल यांच्या शाळेच्या इमारतींत भरली होती. सभा जरा खासगी तऱ्हेची होती. वर्तमानपत्राच्या रिपोर्टरांस आंत जाण्याची मनाई होती. आदल्या दिवशीं युरोपियन मित्र मंडळीची व प्रतिनिधींची मुलाखत होऊन सभेस प्रारंभ दुसऱ्या दिवशीं झाला. मि. ह्यूम यांच्या सूचनवेरून उमेशचंद्र बॅनर्जी यांस अध्यक्ष पद दिलें होतें. मुंबईचे पुढारी मि. तेलंग, मि. मेथा, मि. दादाभाई, मि. याज्ञिक वगैरे हजर होते. प्रतिनिधी ७१ होते. सभेचे हेतू अध्यक्षांनीं सांगितल्याप्रमाणें—गुप्तपणें काम चाललें असून बाहेर पडले ते—४ होते. १ हिंदुस्थानच्या हितचिंतकांत परस्परांत स्नेहभाव वाढविणें; २ ज्ञाति व धर्म यांविषयीं वेड्या समजुतींचा नाश करून लार्ड रिपन यांच्या कारकीर्दींत एकीची उत्पन्न झालेली कल्पना वृद्धिंगत करणें; ३ हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांचे राजकीय व सामाजिक विषयांवर अभिप्राय काय आहेत, त्याबद्दल वादविवाद करून ते ठरवून ठेवणें व ४ हिंदुस्थानाच्या कल्याणाचे उपाय ठरविणें.

हिंदुस्थानाच्या स्थितीची चौकशी करण्याकरतां रायल कमीशन मागणें, इंडिया कौन्सिल मोडून निराळ्या प्रकारें रचना करणें, सैन्याचा खर्च कमी करणें, सिव्हिल सार्व्हिसच्या वयाची इयत्ता वाढविणें व ब्रम्हदेश खालसा न करणें यांविषयीं विनंतिमूलक ठराव झाले. स्थानिक व सुप्रीम काउन्सिलांची सुधारणा आंत

* राष्ट्रसभेच्या अगोदर एक दोन वर्षें कलकत्त्यास एक राजकीय कान्फरन्स भरत असे तें बंगाल पुरतें होतें.

लोकांचे पुष्कळ प्रतिनिधी घेऊन करावी. जमा खर्चाचा खर्डा काउन्सिलला सादर करावा व राज्यकारभाराविषयीं प्रश्न विचारण्याचा अधिकार व विधायक अधिकाऱ्यांनीं केलेल्या निकालांवर पार्लमेन्टनें नेमलेल्या कमिटीकडे अपील करण्याचा अधिकार असे लोकांस द्यावे इत्यादि मागण्या केल्या.

येथें एवढें नमूद करून ठेवलें पाहिजे कीं संघटित घटना कशी करावी याचें वळण दाखविण्यास आदल्या दिवशींच्या सभेंत कांहीं युरोपियन मित्र हजर होते, तसे दुसऱ्या दिवशीं सभेचें काम प्रत्यक्ष चालू झालें तेव्हांही होते. दुसरें असें कीं या गोष्टी स्वस्थपणें करावयास सांपडल्या याचें कारण इंग्रजी राज्यानें सर्वत्र शांतता करून ठेवली. व या गोष्टी पुढेंही सुरळीतपणें चालावयास त्या शान्ततेची जरूर आहे. म्हणजे राष्ट्रीय सभेचें जीवितच इंग्रजी राज्याच्या चिरस्थायित्वावर अवलंबून आहे.

राष्ट्रीय सभेचा जन्म जरी मुंबईच्या कोंपऱ्यांत १८८५ सालीं गुप्तपणें झाला. तरी दुसरें वर्ष लागतांच तिच्या जन्माचें वृत्त लोकांस उघडपणें जाहीर करण्यास " पूर्वेकडील तारा " ( या नांवाचें पुस्तक ) राजकीय क्षितिजावर प्रकाशित झालें. तें वाचून प्रो. वर्डस्वर्थ यांनीं आंतील हरकत घेण्यासारखा मजकूर दाखवून दिला व हिंदी जनांच्या कल्याणार्थ राष्ट्रीय सभेच्या रचनेविषयीं व मागण्यांविषयीं कांहीं सूचना केल्या. येथें थोडें विस्मयकारक अप्रस्तुत अनुसंधान करण्याची जरूर आहे. मोठमोठ्या भविष्य काळीं घडून येणाऱ्या गोष्टींविषयीं कांहीं लोकांच्या डोक्यांत कांहीं कल्पना अगोदर घोळत असतात व त्या त्यांच्या मुखाबाहेर पडून कानीं येतांच संभाव्य वाटल्यास त्यांस सूक्ष्मदर्शी किंवा दूरदर्शी असें म्हणतात. असंभाव्य वाटल्यास त्या व्यक्तींस स्वप्नदर्शी म्हणतात. अशा कांहीं गृहस्थांच्या डोक्यांत राष्ट्रीय सभेची कल्पना १८७६ सालीं आली होती. व एवढें मोठें स्वप्न ज्या गृहस्थांनीं पाहिलें त्यांचें डोकेंही मोठेंच असलें पाहिजे. १८७६ सालीं सार्वजनिक सभेंतील सदाशिव बल्लाळ गोंवडचे व गणेश वासुदेव जोशी यांजकडून एक छापील पत्र रावसाहेबांकडे आलें होतें. तसलीं पत्रें वरील चिटणीसद्वयानें दरबारास

ज्यांस निमंत्रण आलें होतें त्यांकडे महाराणी साहेबांस या आनन्दोत्सव प्रसंगीं सादर करण्याकरतां तयार केलेल्या मानपत्राच्या नक्कलेसह पाठविलीं होतीं. त्या पत्रांचा सारांश असा होता कीं:—इंग्रज सरकारानें, उंच पदवीचे, थोर घराण्याचे, श्रीमान, विद्वान, औदार्यसंपन्न, लोकहिताविषयीं उत्सुक, धर्मसंबंधें महत्व पावलेले, फार दिवस उत्तम कामगिऱ्या बजाविलेले अशा हिंदुस्थानांतील सर्व भागांतील योग्य गृहस्थांस दरबारास आमंत्रणें करून मान दिला आहे म्हणजे सर्व राष्ट्रास मान दिला आहे. तेव्हां हल्लीं सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांच्या वतीच्या मुक्त्यारांचा जमाव होण्याचा जो प्रसंग आला आहे तो एकंदर राष्ट्रसंबंधाचा महत्वाचा आहे. आणि तो पुढें इतिहासांत त्या सर्वांचें ऐक्य होण्यासच काय पण हिंदुस्थानच्या राष्ट्रीय पुनरुज्जीवनास आरंभ झाल्याचा सूचक म्हणून मानला जाईल. असा प्रसंग यावा म्हणून आम्हीं मनापासून परमेश्वराजवळ मागणें मागत होतों तो हेतु विलक्षण प्रकारानीं आंतां घडून येत आहे. आपल्या देशांत परकी लोकांचा अधिकार चालू झाल्यापासून असा एकत्र जमण्याचा प्रसंग कधींही आला नव्हता तो आज इंग्रजसरकारच्या मेहरबानीच्या योगानें प्राप्त झाला आहे. या इंग्रजी राष्ट्राच्या छायेखालीं असण्यानें आपण आपले लहान सहान विरोध व मतभेद विसरून सर्व राष्ट्र एक व्हावें व पूर्वीं आपण मोठे होतों व पुढें त्याहीपेक्षां मोठे व्हावें अशी आशा वाटूं लागली आहे. या गोष्टीचें सर्व श्रेय इंग्रज सरकारास आहे. हें सर्व मनांत आणून त्या समारंभाच्या वेळेस मौजेस लुब्ध न होतां त्या समारंभापासून लोकोपयोगी लोकहिताचीं व राजकीय संबंधाचीं कामें स्वतां आंगावर घेऊन सर्वांनीं मिळून एक राष्ट्र मानून करावीं अशी जी समजूत होण्यासारखी आहे ती मनांत चांगली बिंबून राहील असें झालें पाहिजे. आपण या देशांतील थोर व प्रसिद्ध पुरुष आहांत. तसेंच हिंदुस्थानच्या एकत्र राष्ट्राचें पार्लमेंत आहांत. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील सर्व संस्थानांची व राष्ट्राच्या राजकीय संबंधाची सभाच आहांत. तेव्हां आतां हा जो जमाव जमला आहे तो पुढें हिंदुस्थानचा व इंग्लंदचा कधींही न सुटण्या सारखा संबंध झाल्याच्या

योगानें हिंदुस्थानाकडून जगामध्यें मोठ्या गोष्टी होणार आहेत त्यांचा केवळ आरंभ आहे. इ. आमचा हेतु सिद्धीस जाण्यास अशी सूचना करतों कीं:—

१ आजपर्यंतचे मतभेद, गैर समज जे नाशास कारण झाले ते सर्व विसरून जाऊन परस्परांस भेटून सर्वांनीं मित्रभावानें व मन मोकळें करून वागावें.

२ प्रस्तुतच्या स्थितीचा व पुढल्या गोष्टीचा विचार करावा.

३ महाराणी साहेब यांचे पदवी स्वीकारण्याबद्दल आभार मानून त्यांचे प्रतिनिधि ना. गव्हर्नर जनरल जो जाहीरनामा वाचतील त्यास उत्तर म्हणून सोबतचें मानपत्र अर्पण करावें.

या लेखांतील विचार गहन आहेत. त्याचा यथार्थ सन्मान झाला नसेल अथवा त्तिकडे कोणी लक्ष दिलें नसेल. परंतु त्यावेळचे हे स्वप्नदर्शी आज सूक्ष्मदर्शी ठरले आहेत. असाच बूट बंगाल्यांत निघाला होता "आम्हीं स्थानिक पार्लमेंत मागत आहोंत त्याविषयीं सहानुभूति असलेल्या लोकांचीं पत्रें आमच्याकडे पाठवा. ( १८।५।७६ चें बाबू शिशिर कुमार घोसचें पत्र. ) यानंतर राष्ट्रीय सभा जन्मास आली. मान्टेग चेम्सफर्ड रिफॉर्म पास झाले. व इंग्रज सरकाराच्या राजभक्त प्रजेस पार्लमेंटच्या धर्तीवर लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीचा लाभ झाला व स्वामिभक्त राजे रजवाड्यास नरेंद्र मंडळाचा झाला ! त्याला पन्नास वर्षेंसुद्धां लागलीं नाहींत.

असाच एक गृहस्थ जो स्वप्नदर्शीही नव्हता, सूक्ष्मदर्शीही नव्हता, पण आज प्रत्यक्ष कार्य करून दाखविणारा होता तो १८७६ च्या पूर्वींच होऊन गेला. त्यानें ठाणे जिल्हा सभा स्थापन केली. त्यावेळीं तिची योजना त्यानें रावसाहेबांकडे पाठवून दिली होती. तींत तो म्हणतो "आतां या जिल्ह्यासंबंधीं शाखा प्रत्येक तालुक्यांत स्थापण्याचा माझा विचार आहे. त्या सभांस तालुका सभा असें नांव द्यावयाचें. तालुका सभेंत आपल्या हद्दींतला प्रत्येक गांवचा निदान एक तरी सभासद पाठवावा. मग तो लंगोट्या पाटील असेना ! निदान वर्षाचे चार आणे कां देईना ! $\frac{2}{3}$ तालुका सभेनें खर्चास ठऊन $\frac{1}{3}$ जिल्हा सभेच्या खर्चास पाठवावे. याप्रमाणें वसई, माहीम, तारापूर व चिंचणी येथें तीन शाखा

त्यानें स्थापिल्या. प्रथम जिल्हा सभेच्या स्थापनेच्या दिवशीं जिल्हा जज्ज वगैरे युरोपियन हजर होते.या गृहस्थाच्या डोक्यांत प्रातिनिधिक पद्धति होती. पण राष्ट्रीय सभेची व्यापक कल्पना नव्हती.या दोन अप्रस्तुत वाटणाऱ्या चळवळींचा उल्लेख ऐतिहासिक महत्वाचा आहे; म्हणून केला आहे. याचे प्रवर्तक **गोविंद बाबाजी जोशी** म्हणून होते.इतकें सांगून राष्ट्रीय सभेच्या हकीगतीकडे वळूं.

ज्या शहरांत **रावसाहेबांना** खरें इंग्रजी शिक्षण मिळालें, ज्या शहरांत त्यांच्या सामाजिक, राजकीय चळवळी सुरू झाल्या व शेवटपर्यंत चालू राहिल्या त्या **मुंबई** शहरांत एवढ्या महत्वाची सभा भरून तिशीं **रावसाहे-बांचा** संबंध कसा जडला नाहीं हें आश्चर्य वाटण्यासारखें दिसेल. या वेळेस **रावसाहेब** कलकत्त्यास होते. तेव्हां त्यांनीं **बापुसाहेब आठल्ये** यांस पत्र लिहिलें " कान्फरन्स पासून फायदा होईल अशी आशा करतों. सर्व देशभर बलवान् पायाशुद्ध आधार नाहीं. ( १।१।८६ )

" मला दिखाऊ काम आवडत नाहीं. तें फक्त रुग्णाईत मनुष्यालाच उचित असतें. " पुढल्या वर्षीं कान्फरन्स हें नांव जाऊन या सभेला राष्ट्रीय सभा ( नॅशनल कॉंग्रेस ) हें नांव देण्यांत आलें.

कलकत्त्यास राष्ट्रीय सभेचें अधिवेशन १८८६ सालीं भरावयाचें ठरलें होतें. नाताळ जवळ आला. तेव्हां प्रेसिडेन्सी असोसिएशननें **रावसाहेबांस** राष्ट्रीय सभेस हजर राहण्यास लेखी आमंत्रण दिलें. त्याला **रावसाहेबांनीं** उत्तर दिलें. त्यावरून सभेच्या विरुद्ध त्यांचें मत नव्हतें एवढेंच दिसून येतें.

" १५ व्या तारखेचें छापील पत्र पावलें. आतांपर्यंतच्या माझ्या कामा-काजाची व्यवस्था ठरविली आहे तीवरून पहातां राष्ट्रसभेच्या बैठकीच्या ज्या तारखा ठरलेल्या आहेत त्याच तारखांस **कलकत्त्यास** मला जातां येईल कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. परंतु जर मला **कलकत्त्यास** जाणें शक्य झालें तर त्याचा खर्च प्रेसिडेन्सी असोसिएशनवर पडणार नाहीं. तसेंच उतरण्यासंवरण्याची किंवा दुसरी सोयही तिला करावी लागणार नाहीं.

( प्रे. अ. सेक्रेटरी यांस पत्र २२।११।८६. )

कलकत्त्यास राष्ट्रसभा भरली तेव्हां दादाभाई नवरोजी अध्यक्षपदारूढ होते. रावसाहेब एकदिवस सभेला जाऊन तास दोन तास बसून आले व राष्ट्रीय सभेविषयीं झालेलें मत त्यांनीं एका पत्रीं बापूसाहेब आठल्ये यांस कळविलें तें:— " बरेच बल्लवाचार्य एकत्र झाले म्हणजे पाकनिष्पत्ति बिघडवून टाकतात तशी राष्ट्रीय सभेच्या कामाची गत होण्याचा संभव आहे. कलकत्त्याच्या मुसलमानांनीं राष्ट्रसभेच्या विरुद्ध ओरड चालविली आहे; व मुसलमानांच्या सर्व संस्था ज्या त्यांच्या मतावरून आपलें मत बनवीत असतात ( व ज्यांची संख्या पन्नासांवर असावी ) त्या सर्व त्यांच्या मागूनच सूर काढतील, अशी मला भीति वाटते.

सभेंत जीं भाषणें व्हावयाचीं तीं चांगलीं मुद्देसूद अशीं लिहून आणलेलीं असावींत. त्यांत बाष्कळपणाला उत्तेजन मिळतां कामा नये असें मला वाटतें."

( २३।१२।८६ चें बापुसाहेब आठल्ये यांस पत्र )

कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेस रावसाहेब हजर होते हें ऐकून बापूसाहेब आठल्ये यांनीं त्यांस लिहिलें कीं तुम्हीं सभेला गेलां हें फार चांगलें केलेंत. हल्लीं तिचें चालकत्व यथायोग्य चालकांच्या हातांत नसेल; तरी तिच्या पासून हित होण्याचा संभव आहे. तुमची सहानुभूति राष्ट्रीय चळवळीला नाहीं असा दोष तुम्हांला तुमच्या आजपर्यंतच्या आयुष्यक्रमावरून पाहतां कोणी देतां कामा नये ( ८।१।८७. )

स. १८८७ साली तिसरी राष्ट्रीय सभा मद्रासेस भरली होती तरी तिशीं रावसाहेबांचा संबंध जुळून आला नाहीं. पुढें १८८८ साल उजाडलें.

अशा रीतीनें राष्ट्रीय सभेला चवथें वर्ष लागलें. तिच्या संवर्धनाचें काम अधिकाधिक खर्चाचें होऊं लागलें. हें काम वाग्देवी प्रसन्न असलेल्या पण कुबेराच्या रोषास पात्र झालेल्याचें नव्हतें. हें काम कुबेरास प्रिय झालेल्या पण दृढमुष्टीचें नव्हतें. हें काम उदार धनिकांचें अथवा ज्यांचें वजन उदार धनिकांवर आहे अशा लोकांचें होतें. त्यांचें प्रेम या सभेवर बसल्याशिवाय सभेचा खर्च झेंपण्यासारखा नव्हता.

त्यावेळेस जनतेचेंही लक्ष या सभेकडे फार लागलें नव्हतें. म्हणून थेंबें थेंबें तळें सांचे या न्यायानें मोठा द्रव्यनिधि हवा तसा उडवावयास जमण्याचा संभव नव्हता. मुंबईचे धनिक लोक रावसाहेबांच्या फार कह्यांत होते. रावसाहेब ज्यांत आहेत त्यांत आपण पडावयाचें व ते सांगतील त्या कामांत मागतील तो पैसा द्यावयाचा अशी बऱ्याच धनिकांची मनः प्रवृत्ति होती. अशी स्थिति असतां रावसाहेबांस राष्ट्रीय सभेच्या गोटांत आणणें केव्हांही फायदेशीर होतें. शिवाय रावसाहेब पडले ज्ञानवृद्ध, वयोवृद्ध, व तपोवृद्ध ते या सभेंत असल्याशिवाय तिला पूर्ण महत्व नाहीं. ह्या गोष्टी खुद्द मि. ह्यूम ( ज्यांस राष्ट्रीय सभेचे जनक म्हणतात ते ) जाणत होते. म्हणून ते रावसाहेबांस कॉंग्रेसच्या पक्षांत ओढून आणावयास पहात होते. रावसाहेब कलकत्त्यास असतां मि. ह्यूम त्यांस भेटावयास प्रथम गेले तेव्हां ते घरीं नसल्यामुळें प्रथम भेट झाली नाहीं म्हणून वेळ ठरवून घेऊन १८८८ च्या मार्चमध्यें जाऊन भेटले. अर्धातासपर्यंत भाषण-प्रसंग वाढवूनही राष्ट्रसभेच्या अङ्गीकाराविषयीं एक अक्षरही काढूं शकले नाहींत. रावसाहेबांचा चेहरा फार गंभीर होता. त्यांच्या डोळ्यांत इतकें तेज होतें कीं त्यांची दृष्टि त्यांच्याकडे पाहणाऱ्याच्या दृष्टीवर पडली कीं पाहणाऱ्याचे डोळे दिपावून जात व तो सटकन आपली दृष्टि अन्यत्र फिरवी. कैकवेळा असें होत असे कीं कांहीं कामानिमित्त त्यांस भेटावयास आलेले गृहस्थ वर सांगितल्या प्रमाणें त्यांच्या पुढें दिपावून जाऊन मुख्य कामाविषयीं एक अक्षर काढल्या शिवाय आले तसे परत जात. तसलाच प्रसंग आज मि. ह्यूम यांवर आला. ते तसेच निघून गेले. रावसाहेबांस भीड घालण्याचें काम त्यांचे मित्र बापूसाहेब आठल्ये यांकडे मुंबईस आल्यावर त्यांस भेटून सोंपविलें. व त्यांनीं ५।४।८८ रोजीं रावसाहेबांस पुढें दिल्याप्रमाणें पत्र लिहिलें. " मि. ह्यूम हल्लीं येथें आले आहेत त्यांनीं माझी मुद्दाम भेट घेऊन विनंति केली ' मुंबईच्या राष्ट्रसभेच्या स्थायिक कमीटीचें अध्यक्षपद तुम्हीं स्वीकारा ' अशी विनंति रावसाहेबांस करा. कलकत्त्यास जसा उमेशचंद्र बानर्जी यांस व मद्रा-सेस दि. बा. माधवराव यांस हा मान मिळाला तसा तुम्हांस हा मुंबईचा

द्यावयास पाहिजे. तुमच्यावर सभांची कामगिरी वर्षांतून एक दोन वेळांच पडेल. तुमच्याशीं कांहीं मुंबईकरांनीं वैषम्य बाळगलें आहे तें मि. ह्यूम यांस पसंत नाहीं. मि. ह्यूमसाहेबांचे देखत मि. बद्रुद्दीन यांनीं अशा मंडळीस दोष दिला आहे. व खुद्द वैषम्य बाळगणाऱ्यांनींही कबूल केलें आहे कीं रावसाहेब अध्यक्षपदाच्या मानाला योग्य असून ते अध्यक्ष झाल्यानें राष्ट्रसभेचें महत्व वाढणारच आहे. खुद्द राष्ट्रसभेचे अध्यक्ष तुम्हांस नेमावें अशी सूचना मि. ह्यूम स्वतां करणार आहेत. हें येत्या वर्षींच शक्य नाहीं कारण चार वर्षांत मुंबईकरांस हा मान दोन वेळां मिळाला आहे. रविवारच्या आंत तुमची विनंति मान्य करण्याची खुषी असेल तर उत्तराची अपेक्षा आहे. ”

“ तुम्हांस असें गळ घालण्याचें काम मित्राचे मार्फत करावें असें मि. ह्यूम यांस उचित वाटलें व पुष्कळांनीं माझेकडे बोट दाखविल्यामुळें त्यांनीं हें काम मला सांगितलें. माझ्या मतानें राष्ट्रसभा ही भुशाची बाहुली ठरणार नाहीं. ” ह्यूम साहेबांची विनंति रावसाहेबांनीं मान्य केली नाहीं.

“ मत्प्रिय मि. ह्यूमः—

मुंबईतील स्थायिक मंडळीचें अध्यक्षपद स्वीकारण्याविषयीं माझे मित्र वटादरस्थ य. वा. आठल्ये यांनीं तुमच्या वतीनें मला विनंति केली आहे, परंतु विनंतीचा स्वीकार करतां येत नाहीं म्हणून वाईट वाटतें. तुम्हीं हा मान देऊं केल्याबद्दल मी तुमचे उत्तम प्रकारें आभार मानतों. माझीं कामें फार जड असतात. व माझ्या प्रकृतीच्या करतां त्यांतील पुष्कळ मला सोडून द्यावीं लागलीं आहेत व आणखीही सोडून द्यावीं, निदान कोणत्याही सबबीवर तूर्त अधिक वाढवूं नये, असा डाक्तरांचा सल्ला मिळाला आहे. हें बहुधा तुह्मांस माहीतच आहे.

आठल्ये म्हणतात काम फार हलकें आहे. परंतु जीं छापील पुस्तकें माझेकडे आलीं आहेत त्यावरून त्यांचा अंदाज चुकीचा आहे अशी माझी

खात्री झाली आहे. पुन्हा एकवार तुम्हीं मान देऊं केलात त्याबद्दल आभार मानून पत्र पुरें करतों. " ७।४।८८ चें पत्र.

हा मान न स्वीकारण्याचें कारण प्रकृतीचें अस्वास्थ्यच असावें असें त्यांचे मित्र आर. डी. मेथा यांस लिहिलेल्या पुढील पत्रावरून दिसतें.

" राष्ट्रसभेच्या मुंबईच्या स्थायिक मंडळाच्या अध्यक्षपदाचा स्वीकार करा अशी विनंति मि. ह्यूम यांनीं एका मित्राच्या मार्फत मला नुकतीच केली होती; परंतु ती प्रकृतीच्या व इतर कारणामुळें मी नाकारली हें सांगावयास खेद होतो. " ( १३।५।१८८८. )

दरम्यान बद्रुद्दीन तय्यबजी वगैरे राष्ट्रसभेच्या भक्तांनीं यांकडे एक छापील पत्रिका पाठवून राष्ट्रसभेच्या मुंबईच्या स्थानिक मंडळींचे सभासद होण्यास विनंति केली होती.

प्रकृतीच्या सबबीवर देऊं केलेल्या मानाचा स्वीकार करतां येत नाहीं असें ९।४।१८८८ च्या पत्रानें रावसाहेबांनीं कळविलें.

प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें कांग्रेसच्या कामांत पडत नाहीं ही आपली कांहीं तरी सबब नव्हती. ती खरी होती. व राष्ट्रसभेच्या विरुद्ध मी नाहीं असें आपल्या मित्रांजवळ म्हणत असत. राष्ट्रसभेचें चवथें अधिवेशन मद्रासच्या सभेनंतर अलाहाबादला झालें.

" राष्ट्रीय सभेला मी यावयाचा नाहीं. मी त्या कामास केवळ प्रतिकूळ नाहीं. तें काम मार्गानें चालावें असा माझा हेतु आहे. पण तें सर्वकाल तसें चालतें असें माझ्यानें म्हणवत नाहीं. ( २।१२।८८ चें रामचंद्र भाऊ आपटे मु. प्रयाग यांस पत्र. )

राष्ट्रसभे संबंधानें मि. डिग्बी हे रावसाहेबांस आधीं वेळ ठरवून ७।१२। १८८८ रोजीं सकाळीं भेटून गेले. परंतु त्यांच्या भेटीपासून कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

१८८९ सालीं मुंबईस सभा भरवावयाचें ठरलें. तेव्हांही मुंबईकर त्यांच्या पाठीस पहिल्यापासून लागले होते.

" राष्ट्रसभा कोणत्या जागेंत भरवावी इ. प्रश्न सोडविण्याकरतां जी सभा भरणार होती तिला जाण्याचें मी नाकारलें. मुख्य कारण मला आतां दगदग होत नाहीं." (१३।२।८९ चें यशवंतराव ऊर्फ बापूसाहेब आठल्ये यांस पत्र.)

" राष्ट्रसभेविषयीं माझें मत अजून पक्कें झालें नाहीं. मिरर पत्रामध्यें प्रसिद्ध केल्याप्रमाणें पंडित अयोध्यानाथ यांनीं आंखून दिलेल्या कार्यक्रमास चिकटून जर राष्ट्रसभा चालेल तर जनहित करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं आहे " असें एकदां कलकत्याचे मि. मेथा आर. डी. यांस रावसाहेबांनीं लिहिलें होतें. पुढें याच सालीं राष्ट्रसभा मुंबईस भरावयाची होती. ती भरण्यापूर्वींच रावसाहेबांचा अन्त झाला.

## प्रकरण ७४ वें.

# रावसाहेबांच्या पदव्या.

॥ यद्यपिबहुगुणगम्यं जीवनमेतस्य कूपमुख्यस्य ॥
॥ जयतितथाऽपि विवेको दानं पात्रानुमानेन ॥ १ ॥

लोककल्याणकारी मनुष्याची संभावना नेहमीं राजाकडून होत असते. तिचा प्रकार देशकाल वर्तमानप्रमाणें बदलतो. या देशांतील जुन्या पद्धतीप्रमाणें एखादी जहागीर अथवा जमीन इनाम करून देण्याची चाल असे. हल्लीं व्यक्तिविषयक सन्मानदर्शक पदवी देतात. कांहीं पदव्या हुद्यावर अवलंबून असतात व कांहीं लोककल्याण केल्याबद्दल असतात रावसाहेबांस या दोन्ही तऱ्हेच्या पदव्यांचा लाभ झाला होता. रावसाहेब जेव्हां व्हिजिटर झाले तेव्हां रावसाहेब ही पदवी त्यांस जी मिळाली ती नोकरी सोडल्यावर तशीच चिकटून राहिली. पुढें १८६५ सालीं एक सरकारी ठराव २३ मार्च रोजीं निघाला. त्यांत असें फर्माविण्यांत आलें कीं शाळा खात्यांतील व्हिजिटरांस मिळत असलेली पदवी

हुद्याची आहे म्हणून त्यावर नेमलेला इसम त्या जागेवरून हलल्यावर सेवा करतांना दाखविलेल्या गुणांची संभावना करण्याच्या हेतूनें पुढें त्याच्या बरोबर ती नेऊं देणें हें सरकारच्या मर्जीवर राहील. रावसाहेब हा शब्दसमुच्चय मूळचा पदवीवाचक असून फार दिवसांच्या उपयोगानें विश्वनाथ नारायण मंडलिक या व्यक्तीचा वाचक झाला होता. म्हणून वरील सरकारी ठरावानें आपल्या पदवीची वाट काय झाली तें समजण्याकरतां २९।५।६५ ची एक यादी सरकारांत लिहिली. त्याचा जबाब असा आला कीं तुम्हांस तो सरकारी ठराव लागू नाहीं.

१८६३ सालीं रावसाहेबांस जे. पी. नेमण्यांत आलें. व १४।११।१८६३ रोजीं क्लार्क ऑफ़ दि क्राऊन पुढें त्यांनीं शपथ घेतली. एकदां रावबहादूर ही पदवी रावसाहेबांस मिळावयाचा रंग आला. तेव्हां ती स्वीकारण्याचें साभार नाकारतांना ते म्हणाले "देऊं केलेल्या पदवीचा विचार केला. मी आहे तसाच राहिलों तर बरा, मला हल्लीं जी लोकांत मान्यता आहे ती या पदवीनें वाढेल असें मला वाटत नाहीं."

दिल्ली दरबारला रावसाहेबांस खास आमंत्रण आलें होतें. तेथें गेल्यावर एक रौप्य पदक त्या समारंभाची त्यांस आठवण राहण्याकरतां अर्पण करण्यांत आलें व सी. एस्. आयू. म्हणजे कम्पॅनियन आफ़ धी स्टार* ऑफ़ इन्डिया ही फार बहुमानाची पदवी मिळाली.

तीसंबंधें एक पदक अर्पण करण्याचा समारंभ मुद्दाम सेक्रेटरिएटमध्यें दरबार भरवून १८७८ च्या जानेवारी महिन्यांत नामदार गिब्स यांच्या हस्तें झाला. तेव्हां त्यांनीं केलेल्या भाषणाचा सारांश:—सिंधमध्यें सर फ्रियर यांचे हाताखालीं विश्वासार्ह काम करावें लागणाऱ्या जागेवर रावसाहेबांची नेमणूक झाली. तेव्हां त्यांची माझी ओळख झाली. ती आज पाव शतक चालू आहे. यामुळें हें पदक त्यांस अर्पण करण्यांत मला आनंद होत आहे. मी म्हणतों फारच

---

* हिंदुस्थानाचा तारा ' ही बहुमानवाचक ' संज्ञा समाजांतील ज्या उत्तमोत्तम विवक्षित वर्गास लावतात त्याचा सहकारी असा या पदवीचा अर्थ आहे.

आनंद होत आहे. सिंधहून निघाल्यावर शिक्षणखात्यांत व न्यायखात्यांत सरकारची उत्तम कामगिरी त्यांनीं केली. मी या मोठ्या शहरांतील इनकमटॅक्सचा कमीशनर असतां रावसाहेब माझे खासगत मदतगार होते. त्याची आठवण मला झाली म्हणजे अद्याप आनंद होतो. त्यावेळेस त्यांनीं जें आपलें महत्वाचें काम केलें तें करण्याची त्यांची रीतच सर्वांत स्तुत्य होती. तेवढ्यावरूनच मी त्यांची कामगिरी सरकारच्या नजरेस प्रशंसापूर्वक आणून दिली. नंतर रावसाहेबांनीं नोकरीचा राजिनामा दिला व हायकोर्टांत अपील शाखेंत वकिली करीत असतांच नागरिक या दृष्टीनें सार्वजनिक हिताकरतां सतत उद्योग करून ते अगोदरच प्रसिद्धीस आले आहेत इ०

( १८७९ सालांत तुळशी तलाव उघडण्याचा समारंभ रावसाहेब म्युनिसिपॅलिटीचे अध्यक्ष असतांना मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल यांच्या हस्तें झाला. तेव्हां त्यांस एक रुप्याचा हातोडा अर्पण करण्यांत आला. )

---

## प्रकरण ७५ वें.

# अन्तकाल.

। सृजति तावदशेषगुणाकरम् ।
॥ पुरुषरत्नमलंकरणं भुवः ॥
। तदपि तत्क्षणभङ्गि करोति चेत् ।
॥ अहह कष्टमपण्डितता विधेः ॥

( भर्तृहरि )

रावसाहेबांनीं १८५७ सालींच भविष्य करून ठेवलें होतें " माझें स्वतांचें चरित्र म्हणजे एक कादम्बरीचा विषय होईल." पृष्ठ ७८ पहा. त्याची सत्यता वाचकांस पटलीच असेल. मुरूड सारख्या अप्रसिद्ध गांवीं झालेल्या त्यांच्या

जन्माचा वृत्तान्त, त्यांची अलौकिक बुद्धि, अचाट परिश्रम, अनेक विषयांत बक्षिसें मिळवून प्रतिस्पर्ध्यावर मिळविलेला विजय, द्रव्याभावें कौटुंबिक अडचणींत सांपडल्यामुळें सेवापाशांत अटक, तींतून अचानक रीतीनें करवून घेतलेली मुक्तता. व नंतर इंग्लंदमधील नाइट्सप्रमाणें अथवा येथील अर्जुनाप्रमाणें लोकांच्या ( सरदारांच्या, वतनदारांच्या, संस्थानिकांच्या व जनतेच्या ) हक्कांचें संरक्षण करण्यांत दाखविलेलें शरसंधान, स्पेशल ट्रेन अथवा आगबोट यांनीं प्रवास करून अकल्पित रीतीनें छापा घातल्यासारखें करून वेळेवर कार्यक्षेत्रीं हजर राहणें, लोकमत उत्पन्न करण्याचे सतत प्रयत्न, येथें उत्पन्न केलेल्या लोकमताच्या ध्वनीचा प्रतिध्वनि पार्लमेंट सभेमध्यें उठविण्याचें सामर्थ्य, सामाजिक सुधारणेचा गाडा चालू करण्याची खटपट, परंतु उतरणीवरून घसरूं लागतांच अथवा विपथगामी होतांच त्यास आंवरून धरण्याची व योग्यमार्गाला लावण्याची हातोटी, कायदेकौन्सिलांतील जनपद व नृपति या दोघांचें हित करण्याचें कौशल्य, ग्रंथकर्तृत्व, प्रचण्ड पत्रलेखन, स्थानिक स्वराज्य यशस्वी करून दाखविण्याचा उद्योग इ. अनेक मार्गांनें कादम्बरीचा विषय होण्यास लायक असें रावसाहेबांचें चारित्र तुम्हांस निवेदित झालेंच आहे. आतां त्याचा शेवट निवेदन करावयाचा आहे. तो अकालीं आहे कारण विधीला अशेष गुणांचे आकर असें पुरुषरत्न निर्माण करतां येतें. पण त्याला दीर्घायू करतां येत नाहीं. छपन्नवर्षांहून अधिक आयुष्य रावसाहेबांस देणें विधीच्यानें झालें नाहीं. ही विधिची अपण्डितता भर्तृहरीच्या कालापासून अद्यापपर्यंत शोच्यच राहिली आहे.

रावसाहेबांचें द्रव्यबल, बुद्धिबल व शारीरिकबल हीं वडिलार्जित होतीं. पहिल्या दोन बलांची वृद्धि त्यांनीं सतत उद्योगानें जितकी केली तितकी तिसऱ्या बलाची वृद्धि केलेली दिसत नाहीं. अभ्यासानें बुद्धि वाढत असतां विद्यार्थ्यास शारीरिक कृषता येते या नियमाला रावसाहेब अपवाद झाले नाहींत. ८ व्या ९ व्या वर्षीं त्यांस आडगांवीं दोन वर्षें स्वच्छ हवेवर स्वस्थ बसून रहावें लागलें. रत्नागिरीस त्यांनीं फार अभ्यास केला नाहीं म्हणून प्रकृतीकडून

तक्रार नव्हती. पुढें मुंबईस आल्यावर एका तऱ्हेच्या दोषिक तापानें त्यांची प्रकृति हैराण झाली होती. त्यावर कराची व ठाणें येथें नोकरीवर असतां फिरण्याचे श्रम पडल्यामुळें व कचेरींचें काम संभाळून एकनिष्ठ विद्यार्थ्या- प्रमाणें विद्यार्जनाचा उद्योग चालू ठेवल्यामुळें प्रकृतीला विसावा मिळाला नाहीं, म्हणून ती दुरुस्त राहिली नाहीं. " तुमची प्रकृति नाजुक आहे. " असें नूलकर १८५४ पर्यंत म्हणत. रावसाहेब व्यायामाचा अनादर करीत नसत, " मी आजपासून तालीम करावयास आरंभ केला आहे. "

२८-६-५५ ची रो.

ही तालीम म्हणजे जोडी फिरवीत असत. त्यांस नोकरीवर फिरावें लागे. तेव्हां ते घोड्यावर बसून फिरत असत. व एरव्हींही घोड्यावर किंवा पायीं फिरावयास जात. हा व्यायाम पुढें सोडून दिलेला दिसतो. एकदां तरुणपणीं शरीर व्यायामानें दृढावयव झाल्यावर पुढें व्यायामाची आवश्यकता उरत नाहीं हें खरें आहे असें त्यांस वाटलें असेल.

मुंबईस कायमचे राहूं लागल्यावर फिरण्याचे श्रम वांचले व त्यांचा मूळचा पिंड चांगला, आचार उत्तम व वर्तन निर्व्यसनी असल्यामुळें त्यांची प्रकृति निरामय झाली; तशी ती झाली नसती तर रुग्णाइत स्त्रीची काळजी बाळगून ३०—३५ वर्षें सतत लोकसेवा करण्याचें काम साधलें नसतें. कधीं कधीं त्यांस अर्षाचा विकार होत असे एवढेंच काय तें. अतिश्रमाच्या कुपथ्याशिवाय त्यांनीं प्रकृतीची हेळसांड केव्हांही केली नाहीं. या कुपथ्याबद्दल त्यांस क. जेकब यांनीं पहिल्यानेंच इषारा देऊन ठेवला होता. " मनुष्याचा मेंदू हा त्याच्या इतर कमी योग्यतेच्या अवयवांप्रमाणें अति श्रमामुळें क्षीण झालाच पाहिजे हें तुम्हीं विसरतां कामा नये. " तिकडे त्यांनीं बहुतेक दुर्लक्ष केलेलें दिसतें. आपला सर्व काल त्यांनीं उद्योगाला वाहिला होता. त्यांत कांहीं अल्पकाळ सोडावा लागेल; कारण १८५६ च्या १७ सप्टेम्बरच्या रोजनिशींत गाण्याकडे सकाळीं अर्धा तास लावलेला आढ-

ळतो. त्यांनीं एकदां पुण्यास केरो लक्ष्मण छत्रे यांच्या घरीं पेटी वाजविली. वसईस कांहीं तास गंजीफांचा व रामबाळकृष्णांकडे बॅगॅटेलचा खेळ ते खेळले.

सतत श्रमाचा परिणाम त्यांच्यावर १८७३ सालाच्या सुमारास त्यांस नकळतां झाला होता. जेकबसाहेबांस त्यासालीं आपला फोटो काढून रावसाहेबांनीं पाठविला होता. तो पाहून रावसाहेबांस त्यांनीं लिहिलें कीं हा फोटो कोणाचा आहे हें लिहिलें नसतेंत तर मला तो कुणाचा तें ओळखलें नसतें. तुम्हीं आतां पहिल्यासारखे चांगले दिसत नाहीं. काळजीनें शिणल्यासारखे दिसतां असा झालेला फरक नेहमीं पाहत असणाऱ्या माणसास ओळखूं येत नाहीं. परंतु फार दिवसांनीं पहाणाऱ्यास तेव्हांच ओळखतो.

प्रियतम स्त्रीच्या रुग्णावस्थेच्या काळजीचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर झाला होता पण पत्नीच्या हयातींत त्यांस भासला नाहीं. तो त्यांच्या मागून भासूं लागला. "माझें ठीक चाललें आहे. जरी मी भिन्न भिन्न स्वरूपाचीं कामें हातांत घेतलीं आहेत तरी मी जीवरूपी घोड्याला शक्तीच्या बाहेर दामटवीत नाहीं. असें खात्रीनें सांगतों. अनेक वर्षें रुग्णाचे अंथरुणाशीं तिष्ठत बसल्यामुळें माझी निद्रा कमी झाली आहे; व निद्राभंग हेंच माझें मुख्य दुखणें आहे." ( १२ ६–८० ) तरी त्यांची उमेद मुळींच खचली नाहीं असें पुढील १६।७।८२ च्या माधवराव शिरगांवकर यांस लिहिलेल्या पत्रावरून दिसतें.

"तुमच्या शेवटल्या पत्राबद्दल आभारी आहे. तें खुद्द तुमच्या सारखें आहे—मर्दानी व खुल्यादिलाचें—जुना मित्र म्हणून तुम्हीं जें केलेंत तें करण्याचा तुमचा हक्कच आहे. धंद्याला धरून व व्यतिरिक्त काम इतकें करावयाचें आहे कीं दुसरे कांहीं मित्र आंगावर घेऊन काहीं चळवळ करतील तर मला आनंद होईल. माझा भाग मी उचलावयास तयार आहें. या ×खलित्याचा प्रत्यक्ष रीतीनें शहरास धक्का बसत नाहीं.पण त्याचा परिणाम कारपोरेशनवर चांगला होईल. कांहीं झालें तरी आम्हीं चळवळ केली पाहिजे व आमची *असोसिएशन

× हा एक सरकारी खलिता असावा.

* मुंबई असोसिएशन.

काम करण्याच्या स्थितींत आज मितीस असती—( कायदेशीर रीतीनें ती जीवंत आहे )—तर तसें करणें माझ्यानें तासांत झालें असतें. व्यर्थ खेद करण्यांत अर्थ नाहीं. होण्यासारखें असेल तें मी करीन. मी मोठाल्या प्रश्नांसंबंधें काम करीत आहें. व ते प्रश्न राष्ट्रीय महत्वाचे आहेत. रानाचे कायदे; कायम धाऱ्याची पद्धत; शिक्षण; स्थानिक स्वराज्य; ड्रेनेज; स्पर्शजन्यप्रतिबंधक कायद्याचें उच्चाटन; शिवाय माझें ग्रंथलेखन. ”

“ एकंदरीत माझी प्रकृति फार चांगली आहे. व तुमचें पत्र आलें म्हणजे उत्साह उत्पन्न होतो. वृद्ध मित्र बडबड करतो त्याची माफी असावी. मी आळसांत जन्म घालवितों असें तुम्हीं म्हटलें नाहींत व म्हणणार नाहींत. पण वर दिलेली यादी दीर्घायूला पुरेल अशी नाहीं का? तुमच्या सदिच्छेबद्दल आभारी आहें. मला वृद्धपणा येत आहे म्हणून भीत नाहीं. कीर्तिमंदिरांत प्रवेश करून घेण्यास जेवढी लायकी लागते तीहून अधिक लायकीचीं कामें जे माझे समकालीन लोक करतील असा भरंसा वाटत आहे, त्यांच्या पुढें मी असूं शकेन. ”

१८८५ च्या आरंभीं सुद्धां त्यांची प्रकृति उत्तम होती असें पुढील **बापूसाहेब आठल्ये** यांस लिहिलेल्या पत्रावरून दिसतें. कॉलेज “सोडल्यावर मी ३४ वर्षे काम करीत आहें व आतां मला आणखी ३० वर्षें काम करीत राहण्याइतकी तरुण मनुष्याची शक्ति आली आहे. ” हातांतील कामें त्वरित संपविण्यास **राव**साहेब सांगत व त्याला कारण आयुष्य आतां अल्प उरलें आहे असें म्हणत. त्यावर कंटाळा आला कीं काय असें **बा**पूसाहेबांनीं एकदां विचारलें. “ आयुष्य अल्प असें म्हणतों म्हणजे मला कंटाळा आला आहे असें समजूं नको. अद्यापि मी १५ तास काम करूं शकतो ” २०।१८५. मी थंडपाण्याचें सुख रोज अनुभवीत असतों. (१२।५।८५ **आठल्ये** यांस पत्र ) प्रकृति बिघडल्याचा पहिला उल्लेख तर्टेशास्त्री यांच्या पत्रांत आढळतो.

“ मला वातानें अग्निमांद्य होतें. जर लोह घ्यावा तर ज्वरांश येतो. स्वस्थ बसून रहावें ही मात्रा येका स्निग्ध विद्वानानें सांगितली; तसाच वेळ आहे. परंतु

मुख्य व्यापार मानसिक श्रम. चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवत् दृढम्, तसेंच नहि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्. यास काय इलाज ! संचिन्तयेत् भगवतश्चरणारविन्दम् हा सदुपाय सांगण्यास सुलभ असा तूर्त प्रसंग आहे." २६-२-२५ चें पत्र. कित्येकांस चिंता उत्पन्न झाली असावी. "मला जरा गळाल्या सारखें वाटलें परंतु लागलीच झोंप आली. मुंबईस व पुण्यास स्वतांचे कल्पनेनें कांहीं बातमी उठवणारे लोक आहेत." ( २७।३।१८८५ )

प्रकृतींत फरक झाल्याचा दुसरा उल्लेख ८।८।८५ च्या रोजनिशींत आढळतो. "आज सहज बापु ( रावसाहेबांचा पुतण्या ) टेबलाजवळ उभा होता म्हणून बोललों.—मीं शब्द ध्यानांत ठेवला नाहीं—मला फार त्रास आला आहे. हें वाढतच चाललें.

बापू—सोडावें ! नाहीं कोण म्हणतो ?

पुढें भाषण संपलें. हाच गुरु—जो रोज माझ्या मदतीचा उपयोग करतो तोच हें बोलतो. व ही खरी विचाराची गोष्ट आहे. मी इतकेंच उत्तर दिलें—प्रारब्ध."

प्रकृतींत फरक झाल्याचा तिसरा उल्लेख रावसाहेबांच्या मि. आठल्ये यांस कलकत्त्याहून लिहिलेल्या २४—१२—८५ च्या इंग्रजी पत्रांत आढळतो. " डॉ. डी कुना व डॉ. देशमुख यांना मी विचारलें आहे म्हणून सांगा. त्याचप्रमाणें डॉ. खेरांनाही विचारलें आहे म्हणून सांगण्यास विसरूं नका. पाहिल्या जोडींतील दुसऱ्यास सांगा कीं हॉयफोफॉस्फेट-चें सरबत घेण्याचा क्रम तुम्हीं सांगितल्याप्रमाणें सुरू आहे. आतां मलाही वाटूं लागलें आहे कीं सृष्टिकृत कायद्यांचें उल्लंघन अगदीं अज्ञानतः माझे हातून झालें आहे त्याची क्षमा मला व्हावयाची नाहीं. नुसत्या जादूनें प्रकृति सुधारावयाची नाहीं. तथापि गेल्या तीन आठवड्याच्या अनुभवावरून वाटतें कीं प्रकृतींत अद्यापि बराच राम उरलेला आहे. मी आतां कांहीं धार्मिक पद्धतीला, कांहीं शास्त्रीय पद्धतीला अनुसरून प्रकृति स्वास्थ्याच्या लाभाकरितां यात्रेस निघणार आहें. याच लाभाला चिरंजीव बाळा वित्तलाभ म्हणत आहे.हा यात्रेचा बेत

जरा खर्चाचा होणार आहे व तसा तो झालाच पाहिजे. कारण योग्याप्रमाणें एका वस्त्रानिशीं सटकन पर्यटणार्थ निघण्याला मीं आपणास नालायक करून ठेविलें आहे. भेटी अंतीं आणखी कळेल." यानंतर पंचक्रोशीची यात्रा रावसाहेबांनीं गाडीनें केली. लोकांच्या भेटीचा त्यांना त्रास होऊं लागला होताच. " मी येतों असें तुम्हांस कळविल्यावर सुद्धां लोकांस कळवूं नये. त्यानें उपाधी वाढतात. " ( ९।५।१८८५ ) असा कंटाळा येण्याचें कारण प्रकृतींत चलबिचल होय.

"माझी प्रकृति पुन्हां सुधारत आहे हें लिहिण्यास आनंद होत आहे. थंडी पडूं लागतांच मी पायीं सहल करीत जाण्याची लांबी वाढविली आहे. त्यानें मला बरें वाटत आहे. हायपोचें सरबत चालू आहे. त्यानें क्षुधा प्रदीप्त करण्याची हमी घेतल्यासारखी दिसते. तथापि जो मी शारीरशास्त्राचे नियम इतके दिवस मोडीत आलों, त्या माझ्या प्रकृतीविषयीं निश्चित भविष्य करणें कठीण आहे." ( २६-१२-८५ चें डा. डि. कूना यांस पत्र. ) "अतिरिक्त श्रम करूं नये ते केल्याचा दण्ड मी आनंदानें भरीत आहें. पण यापुढें मात्र मी आणखी भर घालणार नाहीं. प्रकृतीकडे मुळींच लक्ष न देण्यापेक्षां उशिरां दिलेलें बरें."

इत्यादि पत्रांवरून असें दिसतें कीं प्रकृति बिघडण्याचें कारण त्यांस कळून आलें होतें.

त्यांच्या प्रकृतीचें बरोबर निदान त्यांच्या नेहमींच्या डॉक्टरांस कळलें होतें. डॉ. भिकाजी यांनीं त्यांस विश्रांति घ्यावयास सांगितलें होतें.

" तुम्हीं समजतां त्या रीतीची विश्रांति मी घेत नाहीं. मनास त्रास करून घेत नाहीं. यापुढें अधिक श्रम केले असतां, थकवा येईल असें कळतांच मी स्वस्थ बसतों. डोक्याला काम पुष्कळ आहे. शरीरालाही सोसेल तवढें आहे. मन फार व्यग्र झालें ह्मणजे निद्रा स्वस्थ लागत नाहीं, त्याचप्रमाणें शारीरिक श्रम फार केले तरीही त्याचा मनावर परिणाम होतो. असा माझा दुहेरी अनुभव आहे" १८।१।८६

इतकें माहित आलें असून त्यांची काम करण्याची बुद्धि किंवा हौस कमी झाली नाहीं. काम नसलें तरच त्यांस चैन पडत नसे.

" येथील ( कलकत्त्याच्या ) हवेंत आकस्मिक फेरबदल होतात. त्यांचा माझ्या प्रकृतीवर परिणाम होतो तो समजतो. त्याहून ज्यास्त, भरपूर काम नसल्यानें जो होणार तो समजतो. " मग आपल्या प्रकृतीला रावसाहेब जपं लागले म्हणजे काम कमी करूं लागले असें नाहीं. मात्र रात्रीं होणाऱ्या मेजवानीच्या वगैरे समारंभांस जाण्याचें त्यांनीं सोडून दिलें. कलकत्त्यास असतां त्यांचे मित्र आर. डी. मेथा यांच्या बरोबर त्यांच्या धाकट्या बोटींत बसून हुगली नदींत तासभर कधीं कधीं सहल करून येत. तरी डॉ. डि. कूना यांनीं रावसाहेबांची विश्रांतीविषयीं पाठ घेतली म्हणून त्यांनीं त्यांस पुन्हां पत्र लिहिलें तें:—

" मीं कधीं धाकट्या बोटींत बसून फिरतों. कधीं हवेंतील उष्णता मोडून तींत थंडपणा आला तर पायीं फिरावयास जातों. येथील माझ्या सहवासी मित्रांची संख्या नियमित आहे. फिरण्याचा व्यायाम चालू ठेवला आहे. विश्रांति-काल मी वाचण्याकडे अथवा लघुप्रमाणांत मनन करण्याकडे लावितों. पण मुळींच आपलें ' बटाट्या ' प्रमाणें स्वस्थ बसण्यानेंच मला आजार येईल. लघ्वर्थ म्हणजे ज्याला सोपें वाङ्मय म्हणतात त्यानें माझा धीर नाहींसा होतो. याचा अनुभव मी कांहीं वर्षांपूर्वीं घेतला आहे. मीं मुंबईस परत आल्यावर गाडींत बसून मुंबईच्या बाहेर खुल्या प्रदेशांत १०—२० मैल फिरावें व कांहीं मैल पायींही चालावें असें मनांत आहे. पण हे बेत अद्यापि स्वप्नवत् आहेत. तुम्हीं ते हातून खरोखर घडवून आणण्यास मदत केली पाहिजे. माझ्या मुलाचें ठीक चाललें आहे. मेहरबानी करून माझ्या प्रकृतींत काय चलबिचल होते ती त्यास कळवूं नका. त्याच्या विषयींचा माझा अंदाज चुकीचा नसेल तर माझ्या प्रकृतीविषयीं तो फारच काळजी लावून घेतो असें मला वाटतें. ( ८।२।८६ चें पत्र. )

पुढें मात्र सरकारी कामाखेरीज दुसरीं कामें घ्यावयाचीं रावसाहेबांनीं बंद केलीं; " तथापि जुनीं कामें फार असल्यामुळें ताप होतो. " असें म्हणत.

विकृति बंद झाली असें त्यांस वाटलें परंतु शक्तीचा ऱ्हास वर्षभर होत होता. " क्षुधा सामान्य. सालगुदस्त थंडी सोसत असे तितकी सोसत नाहीं."

"एकदां काशीस असतांना आलेला ताप वाईट होता. एका अर्थी तो आला तें बरें झालें. त्याच्यामुळेंच प्रकृतीचें निदान चांगलें करतां आलें. सर्व प्रकारें ती सुधारेल अशी व्यवस्था करीत आहें. 'अनायासेन मरणम्' कसें साधेल एवढाच प्रश्न सोडवावयाचा आहे, पण सुटत नाहीं. बनारसचे वैद्य म्हणतात 'तुम्हांला तारुण्य प्राप्त करून देतों.' ही त्यांची कल्पना मला आवडत नाहीं. तथापि माझा रोग ते बरा करीत आहेत तेव्हां स्वस्थपणें ते देतील तें औषध घेतलें पाहिजे."

या पुढील पत्रांत उदासीनतेचा छटा फार येऊं लागला. " प्रकृति सुमारवट आहे. परंतु आतां अनायासेन मरणम् विना दैन्येन जीवनम् याकडे लक्ष देण्याचा धर्म आहे. ह्मणून पत्राच्या सरणीस उदासीनतेचा रंग येतो." ( वे॥ वामनराव जोशी यांस २०।१।८७ चें पत्र. ) " अशा रीतीनें आणखी एक उन्हाळा गेला. तेवढ्यानें मीं पुष्कळ शिकलों. अजून एक शिकावयाचें आहे. काम म्हणजेच मला जीवन्तपणा वाटतो. त्याच्या उलट अरेरे ! सर्वच खेद कारक ! मी त्यासच मृत्यु म्हणतों ! ! "( डा. डि.कूना यांस ३।३।८७ चें पत्र. ) "वैद्य यांचें म्हणणें अन्य मनोव्यापारांत शिरावें तेंच मला इष्ट आहे. परंतु एकदम घोडें भरधांव चालतांना थांबविण्याचें जड पडेल. वामनरावजींच्या मतें महिन्यानें प्रकृति सुधारेल. तसें होऊ. पण आतां स्थित्यंतर पाहिजे." ( भास्करराव गाडगीळ यांस पत्र २।८।१८८७ )
सर्व पत्रें हातांनीं लिहिण्याचा क्रम असे तो याच्यापुढें त्यांनीं बंद केला.

" मी सांगून हें पत्र दुसऱ्यानें लिहिलें आहे त्याची माफी असावी."

( १३।१।८८ चें राजेंद्रलाल मित्र यांस पत्र )

गोवर्धनदास खटाव हे जिमखाना काढीत होते त्या संबंधें काम करण्याच्या आड प्रकृतिमान येत आहे असें रावसाहेबांनीं त्यांस कळविलें-२८-१-८८. "मी निराश झालों असें पत्रांवरून वाटत असेल पण तसा नाहीं. पण फार

आशाही वाटत नाहीं. भगवद्गीतेचा बारावा अध्याय वाचा. सामाजिक, नैतिक व राजकीय भूमीचा नकाशा काढतांना आतां पटावर बिन्दू नवे घेतले पाहिजेत. मी प्रकृति राखण्याचें करीत आहें. तिचा ऱ्हास करीत नाहीं. परिस्थिति बलवान आहे. पण तिच्यावर अम्मल बसवीन." ३०।४।८८ चें बापूसाहेब आठल्ये यांस पत्र.

आतां जबर खटपटी अगदीं बंद केल्या होत्या. मि. वुड यांनीं एक श्रमाचें काम करण्यास रावसाहेबांस विनंति केली होती. त्याला उत्तर असें मिळालें:—माझ्यानें होण्यासारखें असेल तें करण्याची माझी तयारी आहे. परंतु माझें नांव हल्लीं कित्येक महिने आजारी मनुष्यांच्या यादींत आहे. माझा रोग अतिश्रम हा आहे.याला उपाय लोहाबिहा शिवाय पूर्ण विश्रान्ति हा आहे. हा शेवटला तर मला अगदीं खपत नाहीं. पण काय करूं ! त्याचे पुढें हात टेंकले पाहिजेत. २८–८–८८.

" बापू मला म्हणतात तुम्हीं हल्लीं निराश दिसतां. असें दिसावयाला स्वर्गींच्या गन्धर्वाला ही कधीं कधीं कारण घडतें. पण मी सिसीफस*प्रमाणें काम करीत आहें. तसेंच चालो ! उद्योग म्हणजे सजीवता व सजीवता म्हणजे उद्योग. ( ४–५–८८ चें दाजीसाहेब खरे यांस पत्र. )

कृष्णाजीपंत नूलकर यास प्रकृतीची स्वयंकृत उपेक्षा म्हणत. या सतत आरामनिरपेक्ष उद्योगानें उत्तम प्रकृति आतां कायमची विशीर्ण झाली व मनाची तयारी यापुढें झालेली दिसते:—" माझ्या मुलाकरतां आणखी कांहीं वर्षें जगावें अशी इच्छा आहे. व मला आशा वाटत आहे परंतु आयुष्याची दोरी जर तुटतच असेल तर माझी पूर्ण तयारी आहे. ( १६–९–८८ चें बापूसाहेब

* तार्तारस प्रांतांतील या ग्रीक मनुष्यास सक्त मजुरीची शिक्षा दिलेली होती. ती प्रमाणें त्यानें एक मोठ्या वजनाचा दगड डोंगराच्या पायथ्यापासून वर शिखरापर्यंत लोटीत न्यावयाचा होता व तो पुन्हां खालीं ढकलून दिल्यावर पुन्हां वर लोटीत न्यावयाचा होता; म्हणजे याच्या या कष्टावह कामास अन्त नव्हता.

आठल्ये यांस पत्र. ) " १८८८ च्या जून महिन्यापासून माझी प्रकृति अस्वस्थ आहे. तिचा शेवट अक्टोबर महिन्यांत दिवाळीच्या सुमारास झाला होता. श्रीरामाच्या कृपेनें कालचक्र फिरून आतां स्वास्थ्य झाल्यासारखें झालें आहे. "

या सालीं अक्टोबर महिन्यांत रावसाहेब आपल्या वाड्यांत पुण्यास रहात होते. डॉ. भिकाजी चोभे औषध देत होते.भूक लागूं लागली. तीन मैल चालूं लागले. संस्कृताचें वाचन सुरू केलें; व मुंबईस जाण्याचें मनांत आणलें, तों त्यास मूर्च्छा आली व ज्वर ही आला. ' ब्राइट्स डिसीझ ' नांवाचा रोग झाला होता. तेणें करून लघ्वींतून आल्ब्यूमन म्हणून एक पदार्थ जाऊं लागला. त्यावर लोह व अभ्रक यांनीं मुंबईस आल्यावर गूण येत होता. १८८८ च्या अखेर जुन्या कामाची व सरकारी कामाची व्यवस्था तीं न होतील तर करून ठेवली होती. तरी काम अगदीं टाकलें नव्हतें एवढेंच नाहीं, पण बाहेर देशांत काय चाललें आहे तिकडेही लक्ष देत. त्रिविक्रमराव आठल्ये हे ब्रम्हदेशांत जाऊन येथील लोकांस वर्तमान पत्रांत लेख लिहून तिकडे व्यापारास बोलावित होते त्या गोष्टीकडेही रावसाहेब लक्ष देत होते.

" तुम्हीं हकीकत लिहिली ती ऐकून आनंद झाला. इकडील लोक तुमच्या सारिखे जाण्याजोगे जे असतील ते व्यापाऱ्याच्या निमित्तानें तेथें गेल्यास कोणता व्यापार ते करूं शकतील तें लिहिण्याजोगें असल्यास लिहावें.
( ४-१-८९ चें पत्र )

कारण त्यांनीं अजून धीर सोडला नव्हता " माझी प्रकृति चांगली आहे असें म्हणवत नाहीं परंतु माझा निश्चय झाला आहे. दिवसानुदिवस मी बरा होणार असा आग्रह धरला आहे. "

तर्ट शास्त्री यांस मुंबईस आणून डा. राजेंद्रलाल मित्र यांकरतां व आपणांकरतां औषधें रावसाहेब करवीत होते. १८८९ च्या फेब्रुवारीमध्यें पुन्हां मूर्च्छा आली. तरी " माझी प्रकृति बरी होईल अशी वैद्यांच्या तोंडची वार्ता आहे. " अशींच पत्रें जात असत.

"रामाची मर्जी असेल तसें होईल.काळ विपरीत दिसतो." १०।२।१८८९ वै॥ जोशीबुवांस पत्र. )

" श्रम करूं नये व काळजी सोडावी. दुसरीनेंच मला तडाका दिला आहे. या गोष्टीचा पुढें फायदा घेण्याचा विचार आहे. माझें दुखणें कठीण आहे. ही गोष्ट तुम्हांपासून मला लपवितां येत नाहीं. "

( नवलबिहारी वाजपेयी यांस पत्र )

आतां भोंवळ येऊं लागली व पाठ दुखूं लागली. पुढें पुढें हृदय अशक्त झालें. रावसाहेबांनीं फोटो काढून देण्याविषयीं शिशिरबाबूंची विनंति मागें एकदां अमान्य केली होती. परंतु आतां त्यांचे मित्र डा. कीर्तिकर यांनीं विनंति केल्यावरून फोटो घेऊं दिले व त्यांच्या कांहीं प्रतीही त्या प्रसंगाच्या स्मरणार्थ काढवून आणवल्या.

पुन्हां जरा बरे होऊन मार्च महिन्यांत हायकोर्टांत जाऊं लागले. तों तेथेंच त्यांस त्याच महिन्याच्या २७ व्या तारखेस मूर्च्छा आली. बेशुद्ध अवस्थेंत त्यांस घरीं आणलें. दोन महिन्याची रजा काढली, तेव्हां शांताराम नारायण यांची नेमणूक त्यांच्या जागेवर झाली. न्या. कॅन्डी., न्या. जार्डिन, मि. फार्बस इ. इंग्रज व हिंदी मित्रांची समाचारार्थ गर्दी झाली. रस्त्यावरून गाड्यांच्या चाकांची कटकट होईल म्हणून शेजारच्या रस्त्यांवर गवत पसरविलें होतें. एप्रिल महिन्यांत जरा बरें वाटलें. स्टूडन्ट्स लिटरारि आणि सायन्टिफिक सोसायटीच्या मुलींच्या शाळांच्या बक्षिस समारंभाच्या चिठ्या सुद्धां रावसाहेबांच्या नावानें निघाल्या. पण तें फुकट होतें. डॉक्टर होजेल, डॉ. देशमुख व डॉ. खेर यांचे प्रयत्न सर्व फुकट गेले. शेवटीं मे. महिन्याच्या ९ तारखेस त्यांचा अन्त झाला. अन्तकालची एकच गोष्ट मोठी सांगण्यासारखी व विचार करण्यासारखी आहे ती अशी.

शेवटीं रावसाहेबांस ताप १०८ डिग्री आला होता. त्या योगानें १२ तास बेशुद्ध स्थितींत होते.शेवट केव्हां होईल तें कळण्या सारखें नव्हतें;म्हणून जवळ

एक दोन विश्वासाचीं माणसें ठेऊन डाक्तर मंडळी जरा गच्चीवर उकाडा फार होत होता म्हणून उघड्यावर जाऊन बसली. अन्त इतका जवळ आला आहे असा संशयही आला नव्हता. मध्येंच ऐकतात तीं मोऱ्यांनीं उच्चारलेला "राम" शब्द सर्वांच्या कानीं त्रिवार पडला. चपापून जाऊन पहातात तों प्राणोत्क्रमण झालेलें होतें. जो प्राणी १२ तास मूर्छावस्थेंत होता त्याची ती मूर्छा जाऊन ही प्राणोत्क्रमण वेला आहे, आतां परमेश्वरनामस्मरण करण्याचा क्षण आला आहे ह्याचें ज्ञान त्यास होऊन तीन वेळां रामनामाचा घोष करण्याचें त्यास सुचलें ! याचें नांव पूर्व पुण्याई ! इहलोकींची तपश्चर्या ! व परलोकाची आशा ! हिला आर्यसंस्कृति म्हणतात. तिची योग्यता आर्यांसच कळेल. इतरांस कळणार नाहीं. भगवन्तानीं म्हटलें आहे.

**। अन्तकालेच मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् ।**
**। यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥**

( भगवद्गीता. )

आपला शेवट असा होण्याची त्यांची इच्छा पहिल्यापासून होती. १८७१ सालीं आपली कुंडली एका विद्वान् ज्योतिर्विदास त्यांनीं दाखवावयास पाठविली. ती बरोबर एक प्रश्नांची यादी होती त्यांत अन्ते नारायणस्मृतिः असा प्रसंग येईल कीं नाहीं हा एक प्रश्न होता. या त्यांच्या जन्मभर केलेल्या बलवत् इच्छेप्रमाणें त्यांना परमगति प्राप्त झाली असलीच पाहिजे यांत संशय नाहीं.झालें ! रावसाहेब आपल्या पुत्रास, ज्याला ते आश्रमांतील तरुण आशा * असें म्हणत असत,त्या आपल्या आवडत्या पुत्रास, आप्तेष्टांच्या थोर परिवारास,व ज्यां करितां त्यांनीं आपला देह जन्मभर झिजविला त्या आपल्या देशबांधवांस, ते मागें सोडून गेले. त्यांची सतेज मूर्ति, कण्ठाचा सिंहनाद व वाघाची चपलगति हीं ज्यांना परिचित होतीं त्या आप्तेष्टांच्या पोटांत जो कढ त्यावेळीं आला असेल त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.

---

* Young hope of the Hermitage.

काहीं मृत्युलेखांचा सारांश पुढें दिला आहे त्यावरून भिन्न मतांच्या पुरस्कर्त्यांचीं मतें रावसाहेबांच्या चारित्रपद्धतीविषयीं कशीं होतीं तें दिसून येईल

मुंबई गॅझेट ( इंग्रजीचें भाषांतर. )

अंगची विद्वत्ता, कायदेपंडितांत उच्च पदवीची प्राप्ति, मुंबईच्या व कलकत्त्याच्या काउन्सिलांत हातून घडलेली अद्वितीय कामगिरी, यांच्या योगानें प्रसिद्धि पावलेला एक मुंबईचा प्रमुख नागरिक रावसाहेबांच्या मृत्यूनें नाहींसा झाला.

असा मनुष्य हातचा जाऊं देण्याची आमची सोय नव्हती. त्यांच्या पृथु-विद्यालंकृत तीव्र बुद्धीला आपला प्रभाव दाखविण्यास त्यांच्या वकीलीच्या धंद्यांत व कायद्याचे प्रमाणभूत ग्रंथ लिहिण्यांत फार अवसर सांपडला. पहिल्यानें मुंबईच्या कायदे काउन्सिलांत व नंतर वरिष्ठ काउन्सिलांत आपल्या उद्योगानें व अनुभवानें रावसाहेब आपल्या देशबांधवांचा फायदा करूं शकले. मुंबईच्या स्वतंत्र म्युनिसिपल संस्थेची उभारणी बळकट व सशास्त्र पायावर करण्यास यांनीं साहाय्य केलें. पुरातन धर्माभिमानी पक्षांतले हे ब्राह्मण असून आपल्याप्रमाणें लोकहित करण्याची इच्छा असणाऱ्या सर्व मनुष्यांबरोबर सौहार्दानें काम करूं शकत. याचें कारण त्यांच्या हृदयांत सहानुभूति वसत होती. व त्यांची बुद्धि सर्वग्रहणशक्तिसंपन्न होती. त्यांचें वाचन पुष्कळ असून त्यांचा खाजगी ग्रंथसंग्रह फार मोठा होता. त्यांत पौर्वात्त्य विद्याविषयक पुस्तकें, कायद्याचीं पुस्तकें, पार्लमेंटचे रिपोर्ट व पाश्चिमात्य देशांतील तत्त्वज्ञानविष-यक पुस्तकें होतीं. संग्रहीत केलेलीं पुस्तकें शोभेकरतां कपाटांत लावलेलीं नव्हतीं; पण उपयोगाकरतां होतीं. असाधारण विद्वान इंग्रज गृहस्थांस सुद्धां प्रसिद्धीस आणील इतकें त्यांनीं शेक्सपिअर, मिल्टन, स्पेन्सर, व इतर इंग्रज कवि यांच्या कवितांचें ज्ञान मिळविलें होतें. वरील कवींच्या काव्यांतील उत्तम उतारे ते तोंडपाठ म्हणत व त्यापासून त्यांच्या संवादी व सोत्साही मनास त्यांतील सौंदर्य सौख्यकारक होई. हे उदार मताचे होते

व यांच्या बुद्धीला आधुनिक उपयोगी वळण लागलें होतें. शेवटीं शेवटीं त्यांस असें वाटूं लागलें होतें कीं आमच्या प्रगतीच्या आड येऊन जे लोक पूर्व संप्रदाय व आचार यांचा विचारच करीत नाहींत ते लोक तिला अप्रतिष्ठा आणतील. लोकांच्या मनाची तयारी झाल्याच्या अगोदरच जी सुधारणा लादावयास इतर लोक पहात होते ती सुधारणा करण्याचें काम हळु हळु वाढत जाणाऱ्या लोकांच्या मतावरच ठेवण्याची त्यांची प्रवृत्ति होऊन सर्व चळवळीपासून ते साशंकपणें अलिप्त राहिले. रावसाहेबांचें बुद्धिसामर्थ्य अगोदरच मोठें होतें. त्यांनीं मोठें विद्याबल प्राप्त केलें होतें. व त्यांत उत्तम शीलाची भर पडल्यामुळें दुसऱ्यानें आरंभ केलेल्या कार्यास उचलून धरण्यापेक्षां आपणच आरंभ करण्याची त्यांची इच्छा दिसे. त्यांच्या मर्दानी स्वभावामुळें युरोपियन समाजांत त्यांनीं पुष्कळ दृढ मित्र संपादन केले होते. त्यांचा स्वतंत्रपणाचा बाणा म्हणजे आपल्याच मताप्रमाणें वागण्याचा निश्चय अथवा हट्ट आहे असें म्हणण्याचा कित्येक वेळां पडणारा मोह जरी सदोदित बाजूला सारणें शक्य नव्हतें तरी रावसाहेबांच्या मर्दानी स्वभावामुळें त्यांच्या वरील स्वतंत्रपणाच्या बाण्यास युरोपियन मान देत असत. श्रीमंत ब्रह्मकुलांत जन्म घेऊन पेशव्यांच्या दरबारांत त्यांच्या पूर्वजानीं मिळवलेल्या उच्च पदवीचा अभिमान बाळगणारे हे खरे हिंदु होते. अनन्यसाधारण बुद्धिमत्ता आणखी ज्ञानप्राप्ति यांच्या जोरावर यांनीं आपल्या भाग्याचें मंदीर स्वतांच उभारलें होतें. सरकारानें त्यांची किंमत ओळखण्यांत निर्मात्सर्य बुद्धि दाखविली होती. हे आठ वर्षें मुंबइ काउन्सिलचे सभासद होते. व चार वर्षें वरिष्ठ काउन्सिलचे होते. सरकारी वकीलाचें जबाबदारीचें काम सरकारास समाधानकारक झालें व त्यांसही प्रतिष्ठाकारक झालें. त्यांना रावसाहेब व सी. एस्. आय् या पदव्या दिल्या त्या त्यांच्या गुणांपुढें कांहींच नव्हत्या. हिंदु धर्मशास्त्रावर यांनीं लिहिलेल्या ग्रंथांमुळें व तशीच इतर मराठींत व इंग्रजींत लिहिलेल्या ग्रंथामुळें वाङ्मयविषयक कीर्ति यांस प्राप्त झाली आहे. अशा मनुष्याचें नांव बहुतकाळ राहील.

**टाइम्स** ( इंग्रजीचें भाषांतर. )

रावसाहेब **विश्वनाथ नारायण मंडलिक** यांच्या मृत्यूनें डॉ. **ब्लेनी** म्हणाले त्याप्रमाणें एक **मुंबई**च्या अखिल हिंदुसमाजाचा पुढारी नाहींसा झाला व त्याची जागा भरून घेणें अशक्य नसलें तरी कठीण जाईल. दिवसानु-दिवस नाहींसा होत जाणाऱ्या वर्गांतील ते एक होते. हिंदूंतील उत्तम हिंदू असून पाश्चात्य विद्येंत त्यांनीं दृढावगाहन केलें होतें. हिंदी लोकांस बुद्धिम-त्तेबद्दल उत्तेजन देण्याची व बाक्षिस देण्याची ब्रिटिश राज्यव्यवस्थेंत दिसून येणारी जी निःपक्षपाती चाल आहे तिच्या योगानें हे फार पुढें आले. तरी पेशव्यांच्या घराण्याशीं आपला संबंध होता हें ते कधीं विसरले नाहींत. हिंदी वकीलांत यांनीं पहिली पदवी मिळविली व सरकारी वकील होण्यापर्यंत वाढत गेले व यांस जर आणखी आयुष्य लाधलें असतें तर हायकोर्टाच्या जज्जाची पदवी यांस प्राप्त झाली असती. कायद्याच्या प्रश्नांत यांची कुशल मति चांगलीच चाले.

त्यांनीं आपली जी रौप्य तुला केली ती त्यांच्या पूर्वजांस अधिक शोभली असती.

यांना मिळालेला फुरसुतीचा अर्धावेळ यांनीं राजकीय व शिक्षणविषयक सुधारणांचा पुरस्कार करण्यांत घालविला व दुसरा अर्ध ज्या सामाजिक सुधा-रणेस दुसरे पुष्कळ त्यांचे सुशिक्षित देशबांधव अधिक मान देतात ती कर-ण्याच्या प्रयत्नाचा अवमान करण्यांत घालविला.

त्यांच्या उत्कृष्ट ग्रंथसंग्रहालयांत इंग्रजी सारस्वतांतील उत्तम उत्तम ग्रंथ भरलेले आहेत व त्यांचा त्यांनीं बारकाईनें अभ्यास केला होता. तरी त्यांची प्रसिद्धि संस्कृत विद्येंत उत्तम प्रवीणता मिळविलेले अशीच सर्व हिंदुस्थानभर होती. ह्यांची बुद्धि दृढसंकल्पवती, इच्छाशक्ति बलवती व मति विविधविषयाकर्षक आणि विलक्षण होती. **एलफिन्स्टन्** इंस्टिट्यूट मधून जे पहिल्यानें बुद्धिमान विद्यार्थी तयार होऊन बाहेर पडले त्या सर्वांत

यांच्या एवढा कदाचित् दुसरा होऊन गेला नाहीं. विद्यादेवीपासून फायदा झाला हें ते कधीं विसरले नाहींत. मुंबईच्या विश्वविद्यालयाची भरभराट व्हावी म्हणून आमरणांत त्यांनीं सारखे प्रयत्न चालविले होते, कॉरपोरेशनच्या पूर्वीं जे. पीं. च्या समूहांत व कॉरपोरेशनची स्थापना झाल्यावर कॉरपोरेशनमध्यें व टाउन काउन्सिलमध्यें काम करतांना त्यांचेकडे पुढारीपण असे. × × × मुंबईच्या व कलकत्त्याच्या काउन्सिलांत ते आपणांस लोकांचे प्रतिनिधि समजून स्वतंत्र बाण्यानें काम करीत. तत्त्वाकरतां झगडण्यांत ते कधीं कधीं पराकाष्ठा करीत; परंतु आपल्या सहकारी जनांचा मान ठेवीत आणि त्यांच्याशीं सार्वजनिक वादांत पडल्यावर कितीही मतभेद झाला तरी आपल्या प्रतिस्पर्ध्यांशीं जें त्यांचें खाजगी नातें असेल त्यांत ते कधींही बिघाड पाडूं देत नसत. आणि कदाचित् या विषयीं कालच मि. ऑलिव्हन्ट यांनीं त्यांचा फारच प्रामाणिकपणें गौरव केला आहे. मि. ऑलिव्हन्ट म्हणाले ‘ आम्हां दोघांमध्यें पुष्कळ मतभेद होत असे तरी माझ्या मुंबईकर हिंदी मित्रांत राव-साहेबांच्याहून अधिक प्रामाणिक हितेच्छु झाला नाहीं. ’ हिंदुधर्मशास्त्रावर त्यांनीं लिहिलेले ग्रंथ आधारभूत झाले आहेत. विविध मार्गांनीं प्रसिद्धि मिळवण्यास वकिलीचा धंदा संभाळून वेळ तरी कसा मिळाला याला उत्तर डॉ. ब्लेनी यांनीं दिलें आहे. डॉ. ब्लेनी म्हणाले ‘ पहाटे ४ वाजल्यापासून निजावयाची वेळा होईतोंपर्यंत ते एकसारखे कामांत व्यग्र असत. ’ याच डॉक्तरांच्या अभि-प्रायावरून आम्हीं असें म्हणतों कीं हेंच अविश्रांत उद्योगसातत्य यांचा मृत्यु लवकर ओढवण्यास कारण झालें. रावसाहेबांस भर घोसांत मरण आलें. रावसाहेबांची उत्तरोत्तर जी अभिवृद्धि होत गेली ती असें सांगते कीं बुद्धि-मान् हिंदी गृहस्थांस ब्रिटिश राज्यांत फार वर चढतां येत नाहीं ही जी कांहीं लोकांची समज आहे ती खोटी आहे. पुढें मागें रावसाहेबांचें चरित्र लिहिण्यास एकादा त्या कामाला योग्य असा मनुष्य मिळेल व ते रत्नागिरीस इंग्रजी शाळेंत जाऊं लागल्यापासून गव्हर्नर जनरलच्या सभेंत त्यांचा प्रवेश होई तों जेवढा त्यांचा चरित्रभाग होईल तेवढा प्रसिद्ध होईल अशी आशा आहे.

**इंदुप्रकाश** ( इंग्रजीचें भाषांतर )

या हिंदी समाजाच्या ज्ञानवृद्ध पुढाऱ्याच्या मृत्यूचें वृत्त ऐकून या देशांतील सर्व लोक गाढ शोकांत निमग्न होतील. मंडलिकांची उदात्त व कीर्तिमान चारित्र्यपद्धति, सार्वजनिक हिताला जपण्यास रक्षापुरुषाप्रमाणें त्यांनीं दाखविलेली जागरूक भक्ति व सर्वांत श्रेष्ठ असा त्यांच्या स्वभावांत दिसून येणारा स्वातंत्र्याचा बाणा या गोष्टींनीं सार्वजनिक कामें करणाऱ्या मंडळींत यांस अद्वितीयत्त्व प्राप्त झालें होतें व भिन्न भिन्न लोकांच्या मनांत त्यांस जितकी उच्च पदवी प्राप्त झाली होती, तितकी मिळणें फारच थोड्यांच्या नशीबीं येतें. यांनीं विविध मार्गांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व सरळ भावानें देशसेवा केली व अमूक एक करणें सर्वथा उचित आहे अशी त्यांची खात्री झाली कीं तें ते निर्भयपणें करून टाकण्यास मोठ्या धीरानें लढत असत. महाराष्ट्र मंडळीचें यांच्या मृत्यूनें झालेलें नुकसान बरेचदिवस भरून येणार नाहीं. महाराष्ट्र मंडळींत यांची जागा कोण भरील याचा शोध करणें व्यर्थ आहे. तेलंग हे उदयोन्मुख तारा आहेत. रावसाहेबाची पदवी प्राप्त होण्यास त्यांस अजून अवकाश आहे. तथापि सरकारी नोकरीची शृंखला तेलंगांच्या पदीं न पडल्यामुळें स्वतंत्रपणें व निर्भयपणें हिंदी लोकांच्या हिताकरतां लढण्यास योग्य असा एक पुरुष फक्त तेच आहेत. व आम्हीं फक्त त्यांच्याकडेच बघत आहोंत. गेल्या तीन वर्षें सामाजिक सुधारणेविषयीं जो कडाक्याचा वाद सुरू होता त्यांत मंडलिक यांनीं जो पक्ष उचलून धरला त्याच्या योगानें कांहीं ठिकाणीं कित्येक लोकांचें मन त्यांच्याविषयीं दूषित झालें आहे व त्यांनीं कांहीं कटु शब्दांचा उच्चार केला तो तसाच एका पूर्व कालीं अनुच्चारित होता. आमच्या मतें या पूर्वग्रहप्रेरित प्रकाराला मुळींच कारण नव्हतें. रावसाहेबांनीं सुधारणेविषयीं मनाची अधिक उदारता जर दाखविली असती तर अधिक सुधारणा झाली असती तथापि अशी आशा व कुरकुर करण्यास आम्हांस जागा नव्हती. कारण सामाजिक बाबतींत त्यांचें पुराणमतवादित्व ज्ञानोद्दीपित होंत. एका काळीं या बाबतींत आपल्या समकालीन मित्रांच्यापुढें यांनीं आघाडी मारली होती पण त्यास आतां तीस वर्षें होऊन

गेलीं. स्त्रीशिक्षणाचे फायद्याविषयीं व अवश्यकतेविषयीं यांची एक वेळ खात्री झाल्याबरोबर ते नेहमींप्रमाणें निर्भय व सोत्साह अशा चित्तानें स्त्रीशिक्षणाचे कैवारी थोडे असतां व त्यांच्यापुढें विकृत लोकमताचा डोंगर उभा असतां स्त्रीशिक्षणाचें कार्य अंगावर घेते झाले. व सामाजिक बाबतींत समूल क्रांतिकारक झाले. कांहीं दिवसांनीं ज्ञानाच्या प्रसारानें कांहीं लोक स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत त्यांच्या बरोबर आले. व कांहीं त्यांच्या पुढें जाऊन अधिकाधिक सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचें प्रतिपादन करूं लागले. त्यापासून रावसाहेब परावृत्त राहिले. म्हणून कालही फिरला. इतर मनुष्य पुढें गेले व रावसाहेब जेथें होते तेथें राहिले. असें पाहिलें म्हणजे सुधारणेचे बाबतींत एक वेळा ते समाजक्रांतिकारक कसे गणिले गेले व मागाहून पुराण मतवादी कसे गणले गेले त्याचा उलगडा होतो. सामाजिक सुधारणे संबंधें त्यांची कामगिरी सर्वोत्तम नसली तरी राजकीय व शिक्षणविषयक व स्थानिक स्वराज्य-विषयक व वाङ्मयविषयक त्यांनीं जें कार्य विश्वविद्यालयांत, कारपोरेशन-मध्यें, कायदेकानू करणाऱ्या सभेमध्यें विलक्षण उद्योगानें, उत्साहानें व निर्भय-पणें केलें, त्यामुळें त्यांचे सहकारी मित्रसुद्धां चकित झाले. असा मनुष्य आमच्यांतून गेला ही एक आमच्या राष्ट्रावर आपत्तिच कोसळली म्हणावयाची.

**सुबोध पत्रिका** ( इंग्रजीचें भाषांतर )

जवळ जवळ तीस वर्षें रावसाहेबांनीं विविधरीतीनें या शहरांतील, इला-ख्यांतील व देशांतील लोकांच्या हिताचें भिन्न प्रकारें हित करून लोकदृष्टि आपल्याकडे वेधून घेतली. रावसाहेबांचें नांव ज्याच्या तोंडीं नाहीं असा एक बुद्धिवान पुरुष कोठेंही आढळला नाहीं. इतक्या वर्षे सार्वजनिक कामें करीत असतां त्यांचा सहवास असंख्य जनांशीं आला. भिन्न भिन्न मताच्या लोकांनीं त्यांच्यावर उलट सुलट टीका केली परंतु त्यांनीं जें उत्तम शील दाखविलें त्या बाबतींत शत्रू व मित्र हे दोघेही त्यांची प्रशंसा करते झाले. सामाजिक बाबतींत त्यांनीं मारलेली आघाडी पुढें पुढें टिकली नाहीं. पुरातन सांप्रदाय व पूर्वग्रह यांस ते अधिक मान देऊं लागले. तरीसुद्धां रावसाहेबांची प्रशंसा

करण्यास आमच्याजवळ पुष्कळ कारणें आहेत. व आमच्या देशबांधवांनीं त्यांचा अभिमान बाळगण्याला हीं कारणें आहेत. त्यांनीं जीं कांहीं कामें केलीं तीं त्यांच्या उद्यमसातत्याच्या, अद्वितीय संकेतानुवर्तनाच्या व नियमित संवयींच्या जोरावर केलीं. हें बहुतेकांस साधलें नाहीं. या तिन्हीं गुणांच्या अभावाविषयीं त्यांचे इतर देशबांधव (सुशिक्षित धरून) प्रसिद्ध आहेत. हे तिन्ही गूण त्यांनीं लहानपणींच प्राप्त करून घेतले होते. त्यांच्या वक्तशीरपणाची किंमत लोकांस ओळखली नाहीं कारण त्या बाबतींत त्यांची वागणूक फार कडक होती. टॉड कृत विद्यार्थ्यांस उपदेश करणारें पुस्तक रावसाहेबांनीं कालेजमध्यें असतांना वाचिलें व त्याचें त्यांनीं भाषांतरही केलें; परंतु स्वतःची सुधारणा करण्याचा त्यांचा निश्चय दुसऱ्या कोणी दाखविला नाहीं. त्याचप्रमाणें आपलीं मतें लोकांस रुचलीं नाहीं तरी धीटाईनें व अपूर्व स्वतंत्र बाण्यानें लोकांपुढें आपल्या आशुप्रेरित भाषेंत मांडावयास मागें घेतलें नाहीं. या गुणाची तारीफ युरोपियन लोकांनीं केली आहे. क्रॉफर्ड प्रकरणाच्या बुडाशीं हिंदी अधिकाऱ्यांचा भित्रेपणा होता असा अभिप्राय सर आर. वेस्ट यांनीं दिला. बहुतेक हिंदी लोकांत असणारा हा भित्रेपणा रावसाहेबांत नव्हता. मनाचा निश्चय स्वतंत्रतेचा बाणा, नियमित संवयी व प्रबल इच्छाशक्ति या सर्वांचीं उदाहरणें मागें राहिलेल्या लोकांनीं शिकवण्यासारखीं आहेत. आधीं कोणी अनुकरण करण्यासारखे होऊन गेले नाहींत अशी तक्रार करण्यास पुढील सुशिक्षित लोकांस तक्रार राहिली नाहीं. ज्यांनीं यांची मूर्ति प्रत्यक्ष पाहिली होती त्यांच्यावर यांचें वजन पडल्याशिवाय राहिलें नाहीं. व ते यांच्या उदाहरणानें प्रेरितझाल्याशिवाय राहिले नाहींत. अजून कित्येक पुढील पिढींतील लोकांच्या मनावर मंडलिकांच्या उदाहरणानें जसा ठसा बसेल तसा कोणच्याही परकीयाच्या उदाहरणानें बसणार नाहीं.

**मराठा.** [ इंग्रजीचें भाषांतर ]

**रावसाहेब विश्वनाथ नारायण** मंडलिक यांच्या मृत्यूचें वृत्त ऐकून

अखिल हिंदी समाजाला आकस्मिक धक्का बसेल. एक मोठा मनुष्य गेला व तसा दुसरा केव्हां मिळेल तें कळत नाहीं. त्यांची नुसती स्थानिक कामगिरी लक्षांत घेतली तरी फक्त तिच्यामुळेंच आम्हीं त्यांची स्मृति सन्मानपूर्वक जागृत ठेवावी एवढा तिचा आमचेवर हक्क आहे. परंतु रावसाहेबांचें कार्यक्षेत्र फार विस्तृत आहे. भिन्न भिन्न समाजांतील लोक, म्हणजे पार्शी, मुसलमान, गुजराथी, दक्षिणी व युरोपियन हे सर्व या विद्वान ब्राह्मणाच्या स्वतंत्र बाण्याची प्रामाणिकपणाची व उद्योगाची तारीफच करीत. मतभेद—जो आतांशा दुर्दैवानें अधिकाधिकच उत्किरूढ होत आहे तो—त्यांचा व इतर कोणाचा नव्हता असें नाहीं;पण कसेंही असलें तरी ज्यांच्याशीं त्यांचा मतभेद असे त्यांनीं असें मोकळेपणें कबूल केलें आहे कीं प्रामाणिकपणा व प्रबल इच्छाशक्ति हे या पुरुषाचे मुख्य गुण होते. त्यांच्या लोकप्रियतेचे रहस्य याहून खोल आहे. परायत्त असल्यामुळें दक्षिणी ब्राह्मणाचें या दिवसांत जेंव्हां व्यक्तिशः निर्दलन होत आहे, जेव्हां भित्रा, अधृतिमान, धाडसा शिवाय लोभी व वरिष्ठाचें अनुकरण करणारा अशा विशेषणांनीं त्याची निंदा होत आहे तेव्हां ज्याच्या अंगीं सलपिशिअस, व्हॅरो आणि मसीनास यांतील प्रत्येकाचे सद्‌गुण व सर्वांची कीर्ति अशीं वसत होतीं त्या पुरुषाकडे अभिमानानें वळण्यांत मोठें सुख होत आहे. परायत्ततेचें बंधन तोडून आपल्या शीलाच्या जोरावर ते प्रसिद्धीस आले. उच्च कुलाचा अभिमानी, जसा बहिरंगानें तसा अंतरंगानें हिंदू, स्वाभिमानी, दुसऱ्यास आज्ञा करण्यास जन्मलेला, पण कोणाची ऐकावयास न झालेला हा पुरुष आमचे कलकत्तेकर समकालीन व्यवसायबंधु म्हणाले तसा ज्या जातीनें एकदां मोंगलांच्या हातांतून राज्यसत्ता हिरावून घेतली व अधिक प्रबल शक्ति जर हिंदुस्थानांत मध्यें पडली नसती तर जिनें सर्व हिंदुस्थानचें राज्य संपादन केलें असतें त्या जातीचा योग्य प्रतिनिधि होता. असल्या व्यक्तींनीं राष्ट्रास सजीवता येते. राष्ट्राचें शील बनतें. व राष्ट्र इतिहासप्रसिद्ध होतें. रावसाहेबांत दोष नव्हते असें म्हणण्याचा आमचा अभिप्राय

नाहीं. कोणताही मानव दोषरहित नाहीं. पण रावसहोबांच्या दोषांचें मूळ त्यांच्या प्रबल इच्छाशक्तींत होतें. दिव्य दृष्टीच्या बुद्धिमान् मनुष्यास जे दोष प्रबल मनाच्या पुरुषांत आढळतात ते दोष रावसाहेबांत होते. परंतु हे दोष, हल्लींच्या शिक्षणविषयक व राजकीय परिस्थितींत आमच्या अंगीं मनाच्या दुर्बलतेचे, अस्थैर्याचे व नेहमींच भीतीनें तोंडी करीत सुटण्याच्या संवयीचे जे दोष खेळत आहेत त्याहून बरे.

**रीस आणि रयत.** ( इंग्रजीचें भाषांतर )

या देशाच्या दुसऱ्या बाजूस म्हणजे पश्चिम इलाख्यांत मृत्यूनें एवढी मोठी व्यक्ति हिरावून नेली आहे कीं अजून दीर्घ काल त्यास पुन्हां कापणी करावयास नको. आमच्यातील ज्ञानर्षि आमच्यांतून निघून गेले. यांच्याहून एखादा वयोवृद्ध असेल परंतु तो यांच्या प्रसिद्धीप्रत पावला नाहीं. मंडलिक हे पोथ्या घेऊन कोनांत बसणारे पंडित नव्हते अथवा अज्ञातवासांत राहून आपल्या लोकहितेच्छेचें संगोपन करीत बसणारे लाजाळू मुत्सद्दी नव्हते, अथवा आपलें वक्तृत्व व राजकीय ज्ञान निंनावी पत्रें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करीत जन्म जन्म घालवणारे प्रकाशक नव्हते. हे सार्वजनिक कल्याणाला वाहिलेले स्वतंत्र पुरुष होते. हे लोकांचे पुढारी व प्रतिनिधि म्हणून प्रसिद्ध होते व लोकांस मान्यही होते. ते कांहीं बोलावयास निघाले कीं त्यांस श्रोते मिळत एवढेंच नाहीं परंतु लोक आपण होऊनच त्यांस बोलावयाचें आमंत्रण देत. ब्रिटिश अंमलाखालीं हिंदभूमीचे पुत्र ज्या पदाची प्राप्ति आपणास व्हावी अशी कायदेशीर इच्छा धरूं शकतील त्यापदाची प्राप्ति आपणास व्हावी अशी इच्छा त्यांनीं केली व ती सफल झाली.केवळ हिंदी मनुष्यास मुत्सद्याचें जें स्थान प्राप्त होणें शक्य आहे तें त्यांस मिळालें होतें. त्यांस कोणी दाबूं शकला नाहीं किंवा मागें लोटूं शकला नाहीं. ते स्वतः अप्रसिद्ध राहाणारे पुरुष नव्हते. किंवा त्यांस तसें ठेवणें इतरांस शक्य नव्हतें. त्यांच्या अंगीं पौरुष्यहीन त्वरा नव्हती अथवा अपरिमित अनहंकार नव्हता. स्वतःची योग्यता ते जाणत होते. व तेवढी प्राप्त करून घेतल्याशिवाय ते स्वस्थ बसणारे नव्हते. स्वतांविषयीं

असलेल्या आपल्या मताचा अंगिकार दुसऱ्यांनीं करावा अशी ते आशा करीत. आपले हक्क काय आहेत ते पुढें आणण्याची संधि कधींहीं वांया जाऊं देत नसत. कालीं अकालीं, उठल्या बसल्या उगाच आपण पुढें यावें म्हणून सामान्य जनांप्रमाणें वल्गना करीत सुटणारे हे नव्हते. हे व्यवहारज्ञान प्राप्त झालेले ब्राम्हण होते. परकीयांच्या सेवेंत राहून यांस शिस्त प्राप्त झाली होती. हिंदू लोकांचें चातुर्य व सदसन्निर्णयशक्ति यांच्या अंगीं नसती तर हे एवढ्या पदास ब्रिटिश राज्यांत पोंचले नसते. ब्रिटिशांस अनाहूत संघर्षण आवडत नाहीं. तसा प्रकार या ब्राम्हणाच्या हातून एखादे वेळा घडता तर यांच्या नशीबाची वाढ तेथेंच खुंटली असती. यांचें वय पूज्यावस्थेला पोहोंचलें होतें. यांचें शरीर भव्य, वर्ण गोरा, आकृति मनोहर व व्यक्ति ऐश्वर्ययुक्त होती. सारांश ते आमच्यांतील सन्मान्य महर्षि होते. हे आम्हां मानवांचे राजेच होते. यांच्या देशबांधवांस जेवढें राजकीय महत्व प्राप्त झालें होतें तेवढ्यावरून पहातां ब्रिटिश साम्राज्यांत सर्वांत प्रसिद्ध असे हे मुंबई इलाख्यांत एकच होते. खिस्तोदास पॉल यांच्यानंतर मुत्सद्यांचे हेच प्रमुख होते. कित्येक महत्वाच्या बाबतींत वरील बाबू पेक्षां हे वरचढ होते. यांचें राजकारण निष्कलंक होतें. यांनीं राजकारणाचा दर्जा वाढवला, यांनीं पारावर उभे राहून प्राकृत जनांस उच्च स्वरांत आपलें वक्तृत्व दाखविलें नाहीं किंवा प्राकृत जनांत चळवळ केली नाहीं. तथापि ते देशाभिमानी होते. सार्वजनिक प्रश्नांचा नीट विचार करणारे होते. आपणांस जें वजन योग्यरीतीनें प्राप्त झालें आहे त्याची जबाबदारी ओळखून जें लिहावयाचें व बोलावयाचें तें ते लिहीत असत व बोलत असत.

यांस संस्कृताचें, गणिताचें, विशेषतः हिंदुधर्मशास्त्राचें व सामान्यतः कायद्याचें ज्ञान होतें व देशाचें पूर्णपणें ज्ञान होतें. पुष्कळ खात्यांत फिरून व काम करून सार्वजनिक विषयांवरील चर्चेला यांनीं महत्व आणलें होतें. असा मनुष्य कोणत्याही देशांत विरळा व या देशांत तर अधिकच विरळा, कारण येथें खऱ्या बुद्धिमत्तेचा अभावच आहे; विशेषतः पुरतेपणीं मिळविलेल्या माहि-

तीचा अभाव आहे. जसें खिस्तोदास पाल यांचें चरित्र ब्रिटिश राज्यावर शोकावह टीका करीत आहे तसेंच यांचेंही करीत राहील. हे आमच्यांतील उत्तमांतले होते; मोठ्या बुद्धिमंतांतील होते व महाराणी सरकारच्या विस्तृत साम्राज्यांतलि सुप्रतिष्ठितांतले होते. जितके त्यांस वाढूं दिले तितके हे वाढले. कारण हे लोकांस मान्य झाले व सरकारास मान्य झाले. तरी यांस अगदीं मोठ्या यशाची प्राप्ति झाली म्हणजे कसली झाली ? तर मुंबईस सरकारी वकील—एक लहानसा प्रांतिक कायद्यासंबंधें अधिकारी—या नात्यानें यांनीं आपलें निष्कलंक चरित्र व उज्ज्वल नोकरी हीं पुरीं केलीं. तिसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत हे मुख्यप्रधान झाले असते व पौर्वात्य प्रदेशांत प्रस्थापित झालेल्या दुसऱ्या युरोपियन राष्ट्रांच्या अंमलांत यांचा प्रवेश कॅबिनेट मध्यें झाला नसता तरी प्रधान मंडळांत झाला असता.

## हिंदू पेट्रिअट. ( इंग्रजीचें भाषांतर. कलकत्ता. )

**वि. ना.** मंडलिक यांचा जन्म महाराष्ट्रांत एका प्रांतिक सुभेदाराच्या उच्च कुळांत—यांचें नांव सुचवीत आहे त्याप्रमाणें—झाला. रावसाहेबांस त्यांच्या जातींत व समाजांत मोठी मान्यता होती. आपल्या अंगीं असलेल्या बुद्धिसामर्थ्यानें व शीलानें ते अखिल देशबांधवांस मान्य झाले होते. मराठ्यांचें दाक्षिण्य यांच्यामध्यें असल्यानें आपल्या देशबांधवांच्या पक्षाचें समर्थन त्यांनीं चांगलें केलें. यांच्या अंगीं नव्या पिढीचे दोष नव्हते. आपणास ते सुधारकही म्हणवीत नसत व मी देशाभिमानी आहें असेंही प्रकट करीत नसत. त्यांच्या वाटोळे पसरलेल्या सुधारकांविषयीं त्यांच्या मनांत सहानुभूति नव्हती. धार्मिक सुधारणेचा उपयोग स्वहित साधण्याकडे त्यांनीं करून घेतला नाहीं. धर्माचा व नीतीचा ज्यांनीं नुसता व्यापारच मांडला त्यांचा हे द्वेष करीत. त्यांस प्रतारणा किंवा ढोंग आवडत नसे. परंतु ते खरे देशाभिमानी व खरे सुधारक होते. त्यांनीं स्वतांची व आपल्या निर्माणकर्त्याची प्रतरणा केलीं नाहीं. यांत त्यांच्या सर्व गुणांचें सार आलें. त्यांस गूढ हिंदुधर्मशास्त्र अवगत झालें होतें.

आणि त्यांनीं केलेलें मयूखाचें इंग्रजी भाषांतर त्यांच्या हिंदुधर्मशास्त्रांतील प्रवीणतेची साक्ष देत आहे.

### अमृतबझार पत्रिका. ( इंग्रजीचें भाषांतर. )

विश्वनाथ नारायण यांच्या मृत्यूनें आमचा एक खाजगी मित्र, एक देशाभिमानी पुरुष, एक विद्वज्जन व एक मुत्सद्दी असा नाहींसा झाला. कदाचित् हल्लींच्या काळांतील सर्वांत मोठा हिंदू नाहींसा झाला. कितीही गूढ प्रश्न निघाले म्हणून ज्यांची सुसंस्कृत मति कुंठित होत नसे व ज्यांच्या बुद्धींत अगाध सामर्थ्य असे त्या ऋषींची व ज्यांचा वर्ग आतां दिवसानुदिवस नाहींसा होत आहे त्या ब्राह्मणांची आह्मांस हे आतां आठवण करून देत आहेत. एक राष्ट्रीय पुरुष—परमार्थानें राष्ट्रीय असणारा पुरुष—नाहींसा झाला. हे खरे हिंदु होते व यांस हिंदूंमध्यें कसले पुरुष निर्माण होऊं शकतात त्यांचा नमुना म्हणून पृथ्वीतलावर कोठेंही नेऊन दाखवितां आलें असतें. त्यांच्या मनुस्मृतीचा ग्रंथ त्यांचें नांव सदोदित राखील. हा प्रचंड ग्रंथ या प्रचंड बुद्धीच्या पुरुषास शोभेसा आहे. पुष्कळ बाबतींत व दिसण्यांत सुद्धां बाबू भूपदेव मुकर्जीशीं यांचें साम्य होतें. आमच्या देशाच्या उद्धाराविषयीं आम्हीं तासाचे तास भाषण करण्यांत यांच्याशीं घालविले आहेत. आम्हांला यांच्या सारखा दुसरा आतां कसा मिळेल !

### मुंबई युनिव्हर्सिटी.

दुसऱ्या वर्षी झालेल्या पदवीदानसमारंभाच्या वेळीं डॉ. मॅकिकन यांनीं व्हाइस चॅन्सेलर या नात्यानें पुढें दिल्याप्रमाणें भाषण केलें.

रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक फार दिवसांचे सेनेट सभेचे, तिला भूषविणारे अलंकारच होते. ते नाहींसे झाल्यामुळें सर्व समाज दुःखाकुल झाला आहे. आमच्या सभांत हजर राहून जे आपल्या बुद्धिमत्तेनें त्या सभांची प्रतिष्ठा वाढवीत, व त्यांतील विद्याविषयक वादविवादांस भारदस्तपणा व गौरव प्राप्त करून देत त्यांस आम्हीं आतां अंतरलों ! ते स्वतां विद्वान होते.

विद्वानांचे पोशिंदे होते.केवळ संसारिक सुखाच्या मागें न लागतां मनुष्याच्या पुढें उच्चतर ध्येय आहे व त्या ध्येयाची भक्ति कशी करावी व ज्या बौद्धिक देणग्या परमेश्वर मनुष्यास देतो त्यांचा उपयोग विद्येच्या अभिवृध्यर्थ कसा करावा तें या विश्वविद्यालयांतून बाहेर आलेल्या विद्यार्थ्यांस स्वतांच्या उदाहरणानें त्यांनीं दाखवून दिलें आहे. या उदाहरणाला त्यांच्या साध्या राहणीनें व स्वतंत्रतेच्या बाण्यानें फारच किंमत आली आहे.सरळपणा,साधेपणा, प्रामाणिकपणा, कर्तव्य-परायणता हे त्यांचे गूण ज्या मनुष्यांचा त्यांच्याशीं मोठा मतभेद असे त्यांना सुद्धां स्पष्टपणीं दिसून येत. अशा कांहीं त्यांच्या चरित्रांतील मुख्य मुख्य स्वरूप दाखविणाऱ्या गुणांची आम्हीं आज प्रशंसा करीत आहों.

## मुंबई म्युनिसिपॅलिटि.

म्युनिसिपॅलिटीच्या कार्पोरेशनचे अध्यक्ष मि.ग्रिअरी दुःखप्रदर्शन करतांना म्हणाले:—रावसाहेबांनीं आपल्या दीर्घ सन्मान्य हयातींत या शहराची व या इलाख्याची वाखाणण्यासारखी सेवा केली. वकील मंडळाचे ते एक पुढारी होते व कायद्याच्या प्रश्नांत त्यांचें मत प्रमाणभूत होतें. या इलाख्याच्या कायदे काउन्सिलांत मनुष्य मनुष्यांतील व्यवहारांच्या ज्ञानानें व स्वतांच्या बुद्धिमत्तेनें पुष्कळ कामागिरी ते करूं शकले. अव्यंग व्यवहारज्ञान, अश्रांत उद्योग, व्यापक दृष्टि व प्रामाणिकपणा या गुणांच्या योगानें त्यांस मोठा मान मिळाला व लोक व सरकार या दोघांच्या विश्वासास पात्र झाले. हे फार विद्वान होते.त्यांच्या सारखें हिंदुधर्मशास्त्राचें ज्ञान इतरांत वारंवार आढळत नसे. वरिष्ठ कायदे काउन्सि-लांत त्यांची जी नेमणूक झाली ती या प्रांतांतील लोकांतून पहिलीच झाली. स्थानिक स्वराज्याच्या अभिवृध्यर्थ त्यांनीं खूप मेहनत घेतली व शहाणपणाच्या सुधारणा करण्याकरतां अविसंगत स्थैर्य दाखविलें. १८७२ सालीं म्युनिसि-पॅलिटीचा नवा कायदा करण्यांत आला व शहरवासीयांचे अधिकार वाढविण्यांत आले तेव्हां त्या कायद्याचा मसुदा तयार केल्यावर सर-कारानें त्यांचें मत विचारिलें होतें, त्याचा फार उपयोग झाला. या दिवाणखान्यांत आपल्या नगरवासी बंधूस आपल्या अनुभवाचा व दृढ

निर्णयशक्तीचा फायदा यांनीं दिला. म्युनिसिपॅलिटीचा कायदा घडत गेला तेव्हां यानीं आपला वेळ खर्चून त्याला चांगली आकृति देण्याकरतां त्या कामांत लक्ष घालून चांगला सल्ला दिला. जर परमेश्वरानें त्यांस आणखी आयुष्य दिलें असतें तर त्यांनीं आमच्या सभांस हजर राहून आपल्या सहानुभूतीनें मोठा पाठिंबा दिला असता. त्यांचा मृत्यु आम्हांला दुःखग्रस्त करीत आहे व त्यांच्या गुणांस मान देण्याकरतां ही कारपोरेशनची सभा कांहीं काम काज केल्याशिवाय तहकूब करण्यांत येत आहे.

### डॉ. ब्लेनी यांनीं या प्रसंगीं केलेल्या भाषणाचा सारांश.

माझा व रावसाहेबांचा निदान एक पाव शतक वर्षें ऋणानुबंध होता व प्रथम वयांत त्यांनीं दाखविलेला उद्योग नवल वाटण्यासारखा मला दिसला असें मीं कबूल करतों. यांना फारच काम पडे हें आज पुष्कळ दिवस लोकांच्या दिसण्यांत आलें व जशीं वर्षें लोटत गेलीं तसें त्यांचें तें काम वाढतच गेलें व वाढतां वाढतां त्या कामाखालीं ते चेंगरून गेले याविषयीं मला संशय नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं त्यांचें आरोग्य राखून आयुष्याची वृद्धि होण्याकरितां त्यांच्या प्रकृतीची काळजी वाहणाऱ्या मित्रांनीं त्यांस अगदीं कळकळीनें सांगितलें कीं तुम्हीं सार्वजनिक चळवळींतून आपलें अंग काढून घ्या. मनास व शरीरास विश्रांति द्या. अशी विश्रांति अवश्य आहे. मित्रांच्या या सर्व विनवण्या मागें सारतांना जरी वृद्धदशेबरोबर रांगत येणारा अशक्तपणा त्यांस भासत होता तरी त्यांनीं सार्वजनिक हिताच्या कामीं नागरिक या दृष्टीनें आपलें असलेलें कर्तव्य जेथपर्यंत हातून होत आहे तेथपर्यंत सतत करीत राहण्याचा व तें सोडून विश्रांति न घेण्याचा आपला निर्धार व्यक्त केला. सर्व परिश्रमाचा त्याग करून प्रकृतीकरतां विश्रांति घेण्याचें त्यांनीं नाकारिलें एवढेंच नाहीं पण आपले परिश्रम इतके सपाट्यानें चालू ठेविले कीं त्यास एक क्षणाचीही फुरसत उरत नसे. मी माझ्या स्वतांच्या माहितीवरून असें सांगतों कीं ते पहांटे ४ वाजल्यापासून रात्रीं निजेतों पर्यंत एक सारखे उद्योगांत व्यग्र असत. कारपोरेशनमध्यें आणखी टाऊन काउन्सिलमध्यें जितक्या वर्षें

यांचा संबंध होता तितक्या वर्षे यांनीं आस्थेनें काम केलें. हा त्यांचा गुण त्यांच्या इतर कामांतही दिसून येत असे. त्यांची निर्णयशक्ति फार निर्दोष असे. त्यांच्या प्रामाणिकपणाविषयीं कोणी शंका घेऊं शकला नाहीं. त्यांच्या मतांत स्वतंत्रतेचा बाणा फार दिसत असे. म्युनिसिपॅलिटीच्या अभिवृध्यर्थ ज्या लोकांनीं उद्योग केला त्यांचे हे म्होरके होते. त्यांनीं या कारपोरेशनमध्यें जीं जीं मतें दिलीं जीं जीं भाषणें केलीं तीं तीं सर्व म्युनिसिपल संस्थांच्या अभिवृध्यर्थ व स्थानिक स्वराज्याचा कायदा यशस्वी करून दाखविण्याकरितांच दिलीं व केलीं. या बाबतींत त्यांच्या अंगांत मला इंग्लिशमनची हिम्मत दिसून येते. आमचे अध्यक्ष म्हणाले त्याप्रमाणें त्यांनीं आपली विद्वत्ता व व्यक्तिशः आपलें विशेष व्यवहारज्ञान दाखविलें. त्यांच्या सहानुभूतीचें स्वरूप मग कसें होतें? तर असें म्हणा कीं ते ज्या जातींत उत्पन्न झाले होते तिचेच एकटीचे ते पुढारी होते असें नव्हे तर सबंध हिंदूसमाजाचे पुढारी होते.

## मुंबई सरकार

मंडलिकांच्या कुटुंबास झालेल्या दुःखाबद्दल नामदार गव्हर्नर साहेबांच्या अन्डर सेक्रेटरींकडून एक दुखवट्याचें पत्र नामदार गव्हर्नर साहेबांच्या आज्ञेवरून आलें होतें.

## हायकोर्ट

कोर्ट उघडल्यावर मुख्य न्यायाधीश सर चार्लस सार्जंट, वकिलांना उद्देशून म्हणाले:—तुमच्या मंडळांतील एकाच्या—म्हणजे रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या—मृत्यूविषयीं दोन शब्द बोलण्याची संधि घ्यावी असें मला वाटतें. नवा व जुना काळ यांच्यामधला एक दुवा त्यांच्या मरणानें नाहींसा झाला. त्यांचा उमदा स्वभाव व स्वतंत्र बाणा व कांहीं विशिष्ट विषयांत त्यांची विद्वत्ता—जी हल्लींच्या शिक्षण पद्धतीमुळें दिवसानुदिवस हळु हळु कमी कमी होत जात आहे अशी मला भीति वाटते ती विद्वत्ता—या गुणत्रयामुळें सर्वजण त्यांस मोठा मान देत. आम्हीं त्यांना सर्वोत्तम रीतीनें मान देत आलों व गृहस्थहो तुम्हांलाही त्यांचा अभिमान होता हें मी निःसंशयपणें

सांगतों. या चिरपरिचित ठिकाणीं त्यांच्या दर्शनाच्या अभावामुळें आम्हांला बरेच दिवस दुःख होईल.

## रत्नागिरि.

रत्नागिरीस दुःखप्रदर्शनार्थ मोठी सभा झाली तेव्हां तेथील कलेक्टर डॉ. पोलन यांनीं भाषण केलें तें:—एक खरा खरा पुढारी, आपल्या अंगच्या शीलानें विशिष्टपणा पावलेला, सर्वसंरक्षक व्यवहार ज्ञानानें संपन्न असलेला, व जसे फक्त महात्मेच आढळून येतात तसा साध्या वागणुकीनेंच उदात्त दिसणारा एक मनुष्य रावसाहेब मंडलिक यांच्या मृत्यूनें नाहींसा झाला म्हणून सर्व हिंदुस्थानास दुःख होत आहे. विशेषतः रत्नागिरि आपला एक पुत्र नाहींसा झाला म्हणून शोकग्रस्त झाली आहे. हा पुत्र तिला गर्व बाळगण्याला हेतु झाला होता. यानें जिल्ह्यांतील प्रत्येक तरुणाला अनुकरणाकरतां उदाहरण घालून दिलें आहे. लहानपणापासून आपल्या वक्तशीरपणानें व काळाच्या पद्धतवार वांटणीनें व स्वतंत्र बाण्यानें मंडलिक हे प्रसिद्धीस आले असें ज्यांची ज्यांची त्यांच्याशीं ओळख होती त्यांनीं त्यांनीं प्रथित केलें आहे. या विशिष्ट गुणाचा अनुभव मला स्वतांला आला होता. सरकारचा अन्डर सेक्रेटरी असतां मी मंडलिक यांस त्यांच्या घरीं भेटावयास गेलों. वास्तविक पाहिलें असतां दुसऱ्या सर्व अन्डर सेक्रेटरींप्रमाणें मला माझ्या महत्वाची जाणीव होती तरीही मला गेल्याबरोबर त्यांची वाट बघत बसावें लागलें. मी तेथें गेल्यावर चांगलीं पुस्तकें ज्यांत संगृहीत केलीं आहेत अशा त्यांच्या स्वतांच्या बसावयाच्या जागेंत मला नेण्यांत आलें. तेथें पंधरा वीस मिनिटें काढल्यावर मंडलिक स्वतां आले व थोडक्यांत म्हणाले कीं तुम्हांला तिष्ठत बसावें लागलें याबद्दल मला क्षमा करा. हा वेळ मी सहसा पूजेंत घालवीत असतों तथापि भेटी करतां संकेत वेळ जर ठरवून घेतली असतीत तर मी अगदीं नेमक्या वेळीं आलों असतों. + + + भाषणास आरंभ केल्यावर पांच मिनिटांतच आपली बुद्धिमत्ता, दूरदर्शित्व व व्यवहारनैपुण्य हीं त्यानीं माझ्या निदर्शनास आणून दिलीं. एटिक बुद्धिमत्ता अंगीं असण्याचा जो रत्नागिरी-

करांचा उपजत हक्क आहे तो त्यांच्या अंगीं होता. एटिक बुद्धिमत्ता हे शब्द मी मुद्दाम वापरले आहेत कारण ज्याप्रमाणें युरोपांतील बुद्धिमत्तेचें आगर म्हटलें म्हणजे ( एटिका ) ग्रीस प्रदेश त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील ( एटिका ) ग्रीस प्रदेश म्हणजे रत्नागिरि होय. रत्नागिरीच्या ब्राम्हणांत असलेली प्रतिविषदता व कार्यवाहकता हिंदुस्थानांत इतर कोणच्याही लोकांत दिसून येत नाहीं. मी रावसाहेब मंडलिक यांस काउन्सिलच्या दरबारांत व कायदे करणाऱ्या निवडक मंडळींत बोलतांना पाहिलें तेव्हां त्यांच्या सयुक्तिक, स्पष्टार्थ व वक्तृत्त्वपूर्ण वादशक्तीनें थक्क झालों होतों. मंडलिक हे सरकारला पुष्कळ कामांमध्यें सल्ला देण्याच्या कामीं येत. विशेषतः रत्नागिरीसंबंधीं व त्यांतूनही खोतीसंबंधीं. मंडलिक यांनीं हें विशेष यश मिळविलें परंतु त्याचा लाभ होण्याइतकी त्यांची योग्यताच होती. त्यांनीं यशाची प्राप्ति हट-कून संपादन केली हें खरें. पण ती करतांना ते मोठा उद्योगही करीत. त्यांच्या-जवळ जवळच्या लोकांना सुद्धां ते सन्मान्यच वाटावेत असे कांहीं त्यांच्यामध्यें विलक्षण गूण होते. म्हणतात कीं महात्म्यास सर्वत्र मान असतो. नसतो तो त्याच्या देशांत किंवा त्याच्या घरांत; परंतु या नियमाला रावसाहेब अपवाद होते. ते आपल्या घरांत मान असलेले, आपल्या गांवांत मान असलेले, आपल्या नगरांत मान असलेले असे महात्मे होते.याला पुरावा त्यांच्या संस्मरणीय गुणांस मान देण्याकरतां आज जी सभा भरली आहे तीहून दुसरा मोठा पुरावा देण्याम नको.

## * मार्टिन वुड.

हिंदी पौरुषेयाचा दुर्मिळ नमुनाच रावसाहेब विश्वनाथाबरोबर नाहींसा झाला. त्यांच्यामध्यें गुणदोषांचें विलक्षण समतोल आस्तित्व होतें. त्यांच्या कांहीं खासगी व सार्वजनिक आयुष्यक्रमाकडे पाहिलें म्हणजे कित्येक बाब-

* हे टाईम्सचे एडिटर होते व रावसाहेबांच्या मित्रांपैकीं होते. त्यांनीं हा लेख इन्डियन स्पेक्टेटर पत्रांत छापिला होता.

तींत ते एका पिढीनें आमच्या मागें पडलेले दिसत व कित्येक बाबतींत एका पिढीनें पुढें गेलेले वाटत. त्यांच्या मस्तकांत उत्पन्न होणाऱ्या विचारांची घटना चक्रवर्ति नृपतीला उचित अशी होती. त्यांत पुष्कळ शहाणपणा व कदाचित् त्याहून पुष्कळ मानीपणा होता. ते मुत्सद्दी नव्हते पण त्यांस मुत्सद्याचा धंदा चांगला साधला होता. संघटित रचना करण्यांत त्यांचा हात धरणारा साऱ्या देशांत दुसरा नव्हता. त्यांस नेता म्हणावें तर त्यांची सहानुभूति सर्वांकडे सारखी नव्हती. त्यांच्या मताप्रमाणें ते खरे देशाभिमानी होते. व त्यांनीं काउन्सिलांत व कारपोरेशनमध्यें उत्तम कामगिरी केली. त्यांचें खासगी वर्तन अगदीं कित्ता घेण्याजोगें होतें असा सार्वत्रिक समज आहे. मत्सर वाढण्यासारखी नाहीं तरी त्यांस अनन्यसाधारण पदवी समाजांत प्राप्त झाली होती. सर्वांत एक विलक्षण गोष्ट ते हौसेनें मला सांगत ती अशी कीं त्यांचे मित्र पारशीच अधिक आहेत; परंतु कसेंही असो हा सदैव अविश्रांत श्रम करणारा प्राणी निघून गेल्यावर त्याच्याशीं जुनीं भांडणें उकरून काढून त्याला कां त्रास द्यावा ! त्याच्या आत्म्यास शांति मिळो व त्याची स्मृति सदैव राहून त्याचा सन्मान होवो !

( हिंदुस्थानांतील प्रत्येक वर्तमान पत्रांत मृत्युलेख येऊन गेले. त्यांतील अर्थ वर दिलेल्या उताऱ्यांत कमी अधिक मानानें आहे तसाच असल्यामुळें त्यांचे उतारे दिले नाहींत. )

**गोविंद रामचंद्र गरुड** यांच्या अध्यक्षतेखालीं धुळें येथील नगर वासी जनांची सभा भरली होती. तिनें **रावसाहेबांच्या** चिरंजीवांस दुःखवट्याचें पत्र पाठविलें होतें. " होते हिंदूंत हिंदू " इत्यादि शोकमय कविता त्या सभेंत प्रारंभीं म्हटल्या गेल्या त्यांची प्रत सोबत होती.

**रत्नागिरी** खोती असोसिएशन; **मुंबई** नेटिव्ह डिस्पेन्सरी ( व्यवस्थापक मंडळी ); हिंदु बेरियल ग्राउन्ड कमीटी; गोरक्षक मंडळी **मुंबई**; **फ्रामजी** कावसजी इन्स्टिट्यूट, नेटिव्ह जनरल लायब्ररी; हिंदु यूनियन क्लब **मुंबई**; **सातारा** सार्वजनिक सभा मुद्दाम खास सभा, भरवून; पुणें सार्वजनिक सभा;

श्रीमंत गंगाधरराव उर्फ दादासाहेब चिटणीस यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली **नागपूर** वक्तृत्वोत्तेजक सभा; **गोपाळराव हरि भिडे** यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली **नागपूर** येथील शहरवासि जनांची सभा; ब्राह्मण सभा **मुंबई**; व **हरिश्चंद्र** आर्य विद्यालय **मेवाड** ( उदयपूर ); दापोली तालुक्यांतील शाळामास्तर यांची सभा इ० संस्थांनीं दुःखप्रदर्शित ठराव करून **रावसाहेबांचे** चिरंजीव **बाळासाहेब मंडलिक** यांस दुःखवस्यांचीं पत्रें आलीं.

व्यक्तिशः पत्रें अनेक आलीं त्यांत श्रीमंत **पतंगशहा** जव्हार संस्थानचे राजे, यांचें पत्र आलें होतें.

हरिश्चंद्र कार्यालयांतील विनायक शास्त्री यांनीं संस्कृत श्लोक सभेंत रचून म्हटले होते त्यांची एक प्रत त्यांनीं पाठविली. नागपूर येथील **नारायण वामन** टिळक यांनीं ‘ गेले ते नच परतुनि येती ’ या शब्दांत शोकप्रदर्शन करणाऱ्या कविता रचून पाठविल्या.

**धारवाडकरांची** नेटिव्ह जिमखान्यांत सभा भरून तिनें एक दुखवस्याचें पत्र पाठविलें होतें. त्यांत भाविकपणा फार आहे. **रावसाहेब** राजमान्य व लोकमान्य होते असें म्हणून त्यांचे गुणवर्णन करतांना शोक अनावर झाल्यावर असें म्हटलें आहे कीं, आमचें आयुष्य देऊन **रावसाहेबांचें** आयुष्य वाढलें असतें तर आम्हीं दोन दोन वर्षें दिलीं असतीं. पुढें **रावसाहेबांच्या** चिरंजीवांस आग्रहाची अशी विनंति केली आहे कीं, तुम्हांस पुत्ररत्न होईल त्याचें नांव विश्वनाथ ठेवा म्हणजे तो आजाप्रमाणें पराक्रमी निघेल.

**। वसत पूर्व दिशेंत न जो गुण ।**
**॥ ( हिणविती किति पश्चिमिचे जन!!! ) ॥**
**। अविरतश्रम उद्यम तो तुझा ।**
**॥ बघुनि कौतुक वाटत इंग्रजा ॥ १ ॥**
**। कृतनिश्चयपालनव्रतीं ।**
**॥ तवतुल्या गमते तुझी रती ॥**
**। नरपुंगव तूंच वा खरा ।**
**॥ न नमलास जनीं कधीं नरा ॥ १ ॥**

। न अधिकारबला कधिं वांकलें ।
॥ स्वजनसंकटिं आर्द्रचि जाहलें ॥
। हृदय आर्यजनोद्धरणा सदा ।
॥ तवचि तत्पर नीतिविशारदा ॥ ३ ॥
॥ अविदितबीज न विप्रतेज झालें ।
॥ म्हणुनि तुवां भुवनास दाखवीलें ॥
॥ उचितचि वास तुझाहि आश्रमांत ।
॥ विहित तुझी गणना ऋषीश्वरांत ४

इत्यादि कविता प्रोफेसर दामोदर गणेश पाध्ये एम्. ए. यांनीं नेटिव्ह ओपिनियन मध्यें प्रसिद्ध केल्या.

। गेला प्रताप शिखि हा विझुनी तुषारें ।
॥ या टिट्टिभें उपसिला जलधी कसा रे ॥
। हा लोपला, नवल ! सूर्यचि अल्प हातें ।
॥ हा सागरीं ढकलिला गिरि, लेश वातें ॥ १ ॥

इत्यादि कविता प्रसिद्ध कवि विठ्ठल भगवंत लेंभे यांनीं आपल्या " कृतान्त कैतव " नामक काव्यांत प्रसिद्ध केल्या.

। गणती न होय इतुकीं असतांही पाठ पुस्तकें, ज्यानें ।
॥ नामसहस्र हरीचें जावें घोकीत नित्य नेमानें ॥ १ ॥
। होती स्वकीर्ति पृथिवीपर्यटनातें करूनि जरि आली ।
॥ भावें प्रदक्षिणा जो वृंदादामोदरास तरि घाली । २ ॥
॥ नागविली ही धरिणी जाणत असतांहि आळसें सारी ।
॥ जो धनराशि लुटाया करुनि तुला भिक्षुकांस पाचारी॥३॥
। तो विश्वनाथनारायणनामक गुणकरंड चोरून ।
॥ गेला कृतान्ततस्कर घेउनियां आमच्या समोरून ॥ ४ ॥

इत्यादि निंदागर्भ व्याजस्तुतिमय कविता शोकरसकाव्यनिर्माणनिपुण कवि गंगाधरपंत मोगरे यांनीं प्रसिद्ध केल्या.

---

## प्रकरण ७६ वें.

# पत्रव्यवहार.



Of all arts, in which the wise excel,
Nature's chief master piece is writing well. ( Shefield, Duke of Bukingham shire )

। प्राज्ञाः कलासु सकलासु यशोऽतिरिक्तम् ।
॥ सम्पादयन्ति सततं किल यासु तासु ॥
। या सुष्ठुलेखनकलेति निरूपिता सा ।
॥ श्रेष्ठा विनिर्मितिरहो भुवने विधातुः ॥

( वरील इंग्रजी ओळींचें भाषांतर—स्वकृत )

**रावसाहेबांचा** पत्रव्यवहार म्हणजे एक त्यांच्या आयुष्यांतील चिरस्मरणीय महत्वाची बाब होय.

पत्रव्यवहार नित्य कर्मांपैकींच एक आहे असें समजून तो ते फार आस्थेनें करीत असत. ते म्हणत पत्रव्यवहार हा पैशाच्या व्यवहारांतील दुसऱ्याकडून घेतलेलें कर्जच आहे. जसें पैशाचें कर्ज हप्ता न दिल्यानें वाढत जातें तसें उत्तर न लिहिल्यामुळें पत्रव्यवहाराचें कर्ज * वाढत जातें. नोकरींत असतां सरकारी काम व इतर व्यवसाय करूनही उत्तर पाठविण्यास **रावसाहेबांस** वेळ मिळे, म्हणून **भास्कर दामोदर पाळंदे** यांनीं एका १८।१।१८५६ च्या पत्रांत आश्चर्य प्रदर्शित केलें आहे. त्याचें निराकरण **रावसाहेबांनीं बाळकृष्ण शास्त्री बापट** यांस लिहिलेल्या २।१।१८७६ च्या पत्रावरून होईल—मी हें पत्र ३ वाजतां पहांटेस लिहीत आहें, कारण कालरात्रीं मी ८ वाजून २० मिनिटांनीं झोपीं गेलों होतों.

* The debt of letter-writing increases by non-payment like other debts.

रावसाहेबांचें मोडी व मराठी व इंग्रजी अक्षर वळणदार होतें. परंतु त्यांना एका मुख्य गोष्टीची उणीव भासत होती ती ही कीं कोणत्याही कामास त्यांस पुरेसा वेळ मिळत नसे म्हणजे थोडक्या वेळांत पुष्कळ काम करावयाची त्यांस जी संवय लागली होती—व तीही लहानपणापासून—तीमुळें त्यांना जी त्वरा करावी लागे ती त्यांच्या अक्षरांत सुद्धां विशेषतः मोडी अक्षरांत उतरत असे. एकदां कागदावर पेन ठेविलें कीं तें आंतील शाई सरेतों उचलावयाचें नाहीं. अशा बेतामुळें व एखादें मराठी अक्षर अथवा शब्द मोडी पत्रांत येई, त्यामुळें कित्येक वेळां यांचें अक्षर वळणदार असून अभ्यस्तासही लागावयास जड जाई. २३।१२।५२ च्या पत्रांत नानांनीं त्यांस सूचना केली होती ती अशीः—"आजपर्यंत तुमचीं पत्रें आलीं तीं बहुतेक चालीवरून लावून वाचितों. तत्राप प्रतिपत्रीं कांहीं मजकूर लागत नाहीं असें होतें. आणि समई कोठें कामाचा मजकूर असून लागला नाहीं म्हणजे नीट नाहीं. कालचे पत्रीं विकृतीचा कांहीं पर्याय लिहिला असून कांहींच चोघांस न लागला. त्यास आमचीच परीक्षा जाहली असें नाहीं. यास्तव तुम्हीं स्वतां लिहिल्यास मजकूर थोडा लिहावा परंतु मोठें अक्षर व वेगळें असें लिहावें. गणाबास अक्षरशहा सांगण्यास मोकळा करावा. येरव्हीं त्याजकडून लिहून, पुरें मात्र करीत जावें."

पत्र लिहितांना रावसाहेबांना त्वरा जरी आंवरली नाहीं तरी पत्र लिहिणें तें ते चांगल्या कागदावर समांतर ओळीनें व सफाईनें लिहीत. आंतिल अक्षरांची मोडणी ढळूं देत नसत.आंत मुद्याचा तेवढाच मजकूर लिहीत. कधीं कधीं मनोभावना प्रदीप्त झाल्यावर उच्च भाषा वापरण्यांत येई तरी पाल्हाळाला थारा मिळत नसे. पत्र लांबत चाललें तर " मी आतां आख्यान लावलें आहे असें तुम्हांस वाटेल म्हणून आंखडतें घेतों असें लिहून पत्र लागलेंच पुरें करीत. वेळ नसल्यास अवश्य तेवढ्याच शब्दांत अवश्य तेवढाच मजकूर लिहून झाल्यावर पत्र लागलेच पुरें करीत. " आज स्पेशल कोर्ट बसावयाचें आहे म्हणून तूर्त नमस्कार."

अशा व्यवस्थित रीतीनें चालविलेल्या पत्रव्यवहाराचें संरक्षण करण्यांत त्यांनीं अत्यन्त काळजी घेतली होती. १८५२ सालापासून शेवटल्या दिवसापर्यंत आपण लिहिलेल्या पत्रांच्या स्थळप्रती व त्यांचीं उत्तरें नियमानें रावसाहेब संगृहीत करून ठेवीत. *

पहिल्यानें टपाल खात्याची व्यवस्था आतां आहे तितकी उत्तम नव्हती. त्यामुळें टपालाची एक पृथक् वही घालून तींत पत्रांचीं नोंद करून ठेवीत. तींत तारीख, वाह्यनाम, पत्ता, टपाल हांशील इतकें लिहून त्यावर पोस्टाचा छाप घेत. त्यांतील १८५३।५४ सालांतील कांहींची नोंद मुद्दाम दिली आहे. तीवरून कोण गृहस्थ त्यावेळेस पत्रव्यवहार करणारे असे त्यांचे दृढ स्नेही होते व काय हुद्यावर होते तें दिसून येत आहे.

वासुदेव बापूजी कानिटकर—असिस्टंट सर्व्हेअर, व बिल्डर, गिरगांव, मुंबई.
हरि केशवजी—ट्रान्स्लेटर, सदर दिवानी अदालत, मुंबई.
नारायण बल्लाळ लिमये—एल्फिन्स्टन कालेज, मुंबई.
गणेश वामन गानू—लायब्रेरियन, नेटिव्ह जनरल लायब्ररी एस्प्लनेड, मुंबई.
मुकुंदराव भास्कर—इंन्टर प्रीटर, स्मालकाज कोर्ट, कुंभार तुकडी ओळ, मुंबई.
भास्कर दामोदर पाळंदे—रेव्हेन्यु डिपार्टमेंट सेक्रेटॅरिअट, खत्तरआळी, मुंबई.
कृष्णाजीपंत नूलकर—पोलिटिकल एजन्सी, मांडवी.
महादजी वासुदेव बर्वे—एल्फिन्स्टन कॉलेज.
महादाजी विष्णु पेंढारकर— ,, ,,
गणपतराव भास्कर— ,, ,,
हरि जनार्दनजी—सरकारी वकील, सदर दिवानी अदालत.

---

* त्यांतील काहींचा कागद चांगला नसल्यामुळें त्यांस कालान्तरानें स्पर्श सहन करण्याची ताकद न उरल्यामुळें झाड फेडीचे धक्के खाऊन त्यांचें चूर्ण होऊन गेलें आहे. ज्या शाईनें कांहीं पत्रें लिहिलीं गेलीं होतीं तींत हिराकसा सारखा आंत लोहांश असलेला पदार्थ असल्यामुळें शाईनें व्याप्त तेवढा त्यांचा भाग रांपून गळून गेल्यामुळें त्यांच्या जाळ्या झाल्या आहेत.

जान हार्कनेस—प्रिन्सिपाल एल्फिन्स्टन कालेज.
जेकब—पोलिटिकल एजन्ट, भुज. रजेवर आस्ट्रेलियांत.
विनायकराव भागवत—एल्फिन्स्टन कालेज मुंबई.
बाळाजी बाळकृष्ण लिमये—शिरस्तेदार सदर अदालत.
रामचंद्र कृष्णाजी बाळ–हेड अकाउन्टन्ट कस्टम हाऊस मुंबई.
श्रीधर मोरेश्वर पंडित–१४ रेजमेंट कराची.
पांडुरंग बाळकृष्णाजी–इंजीनियर आफीस कराची.
मुनशी नंदराम–सिंध नार्मल स्कूल.
ललुभाई मन्छाराम–ट्रेझरर कलेक्टर अहमदाबाद.
कृष्णाजी बापूजी बाळ–नार्मल स्कूल कराची.
इत्यादि पुष्कळ.

अशा वह्या १८५३, १८५४ व ५५ च्या सालांत ठेवलेल्या होत्या. पुढें त्यांची आवश्यकता पोस्टाची अधिक चांगली व्यवस्था झाल्यामुळें नाहींशी झाली असावी. नंतर बरींच वर्षें वर तारीख मांडून खालीं ज्यास पत्र लिहिलें त्याचें नांव व काय लिहिलें त्याची अत्यंत संक्षिप्त नोंद रोजनिशींत आरंभींच्या पानावर लिहून ठेवीत व शेवटीं दर महिन्यास किती पत्रें लिहिलीं तीं लिहून वर्ष अखेरच्या पत्रांची संख्या लिहून ठेवीत. एकदां कांहीं कारणामुळें कांहीं पत्रांची स्थळप्रत करावयाची राहिली म्हणून तीं पत्रें ज्या गृहस्थांस पाठविलीं होतीं त्यांच्याकडून प्रती काढून घेण्यास रावसाहेबांनी परत मागविलीं होतीं. ( वि. प. वैद्य यांस १६–६–७३ चें पत्र. ) एक दोन ठिकाणीं बारनिशींत शेरा आढळतो कीं या तारखेच्या गोळे यांचे पत्रावर उत्तर पाठविल्यामुळें बार नाहीं ३०–४–७६.

रावसाहेब प्रवासांत असले म्हणजे त्यांस मुंबईहून तेथील कामकाजासंबंधें पत्रें येत असत त्यांचीं जीं उत्तरें पाठवावीं लागत त्यांची नक्कल करून ठेवावयास वेळ मिळत नसे. म्हणून मुंबई येथील कारकुनाच्या मनांत जें काय पत्र रावसाहेबांस लिहावयाचें असेल तें कागदाची उभी घडी घालून त्याच्या

डाव्या बाजूच्या अर्ध्यांत एक दोन तीन असे आंकडे विषयक्रमानें घालून त्यांस लिहून पाठवावयास सांगत व आपण त्याच कागदावरील दुसऱ्या म्हणजे उजव्या बाजूच्या अर्ध्यांत क्रमवार उत्तरें लिहून तेंच पत्र मुंबईस पाठवून दप्तरीं राखून ठेववीत.

विचारलेल्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मिळतील अशी तजवीज करण्याकरतां याच युक्तीचा आदर करीत म्हणजे सदरहू प्रमाणें कागदाची उभी घडी घालून अर्ध्यांत १।२ असे आंकडे घालून डाव्या बाजूवर प्रश्न लिहून पाठवीत व उजव्या बाजूवर त्यांचीं उत्तरें मागवीत.

पत्रें व उत्तरें आपण वेळेवर पाठवितों तीं वेळेवर पोंहोचलीं कीं नाहीं हें त्यांच्या मालकांस कळावें म्हणून रावसाहेब कधीं कधीं पत्र किंवा उत्तर लिहिण्याची वेळ देत असत. "आतांच ६॥ वाजले आहेत. तेव्हां हें उत्तर उद्यांचे टपालांतून जाईल."

व्यवस्थितपणें पत्रें लिहिण्याची संवय नवीन पिढीला लहानपणा पासून लागावी अशी रावसाहेबांची इच्छा असे. " तुमचें २ आगष्टचें पत्र पोंचलें. तेंच पुनः मोठा कागद घेऊन चांगल्या लेखणीनें सावकाश, सुवाच्य व वळण-शुद्ध लिहावें. ' ( घरीं असलेल्या पुतण्यास पत्र. )

पत्र अगदीं लहान मुलाचें आहे किंवा दुसऱ्याच्या पत्रांत त्याचा निरोप आहे, त्यास उत्तर लिहिण्याची जरूर नाहीं, असें समजून त्याच्या पत्राची किंवा निरोपाची लघु गणना रावसाहेबांनीं कधीं केली नाहीं. "चिरंजीव सीताराम* यांस आशिर्वाद सांगावे. अद्यापि सर्वनामाचा उपयोग बरोबर करतां येत नाहीं व अक्षर अगदीं वळणशुद्ध नाहीं. गंजीफांची पेटी पाठवितों पण खेळांतहीं नियम पाहिजे."

पत्राचें उत्तर लिहितांना काहीं लेखक प्रश्नांचीं उत्तरें लिहीत नाहींत व निष्काळजीपणा दाखवितात. अशा इसमास तसें न करण्याबद्दल रावसाहेब

* रावसाहेबांचे पुतण्ये.

खुबीनें लिहीत. " तुमच्या लिहिण्याच्या शैलीवरून माझें पत्र अर्ध्या पानावर उत्तरास जागा ठेवून असावें असें अनुमान निघतें. तसें असल्यास, तुम्हीं उत्तर लिहितांना माझें पत्र जमा धरून उत्तर लिहावें. ( वामनराव मंडलिक रावसाहेबांचे पुतण्ये यांस पत्र. )

पत्र लिहिण्याबरोबर रावसाहेबांस उत्तर हवें असे. " वारंवार लिहिण्यास आयुष्य फार नाहीं. " ( स. काणे यांस १०।६।७३ चें पत्र. ) अगदीं रिकामपणचें असें रावसाहेबांचें कधीं पत्र नसे. तरी एखादे वेळीं कांहीं नुसता शिष्टाचार म्हणून पत्र लिहावें लागे. त्यांत तसाच बेताचा मजकूर असे. पण तोही वाचकास कांहीं बोधपर असे. " मेहेरबान × × दोस्तां × × सलाम दिगर. आपणा सारखे चार दोस्त आहेत, शोभा आहे. प्यार मोहबत असावी हे किताबत. ( ८।२।८५ चें बाबासाहेब खोत विंधणेकर यांस पत्र ) यांत मित्रभावपोषक दोन खुबीचे शब्द आहेत हे रसिक जाणतीलच.

लिहितां वाचतां येणाऱ्या लहान मुलापासून तों अगदीं वृद्ध माणसापर्यंत, आशिक्षितापासून तों महामहोपाध्याय पदवी मिळविलेल्या शास्त्र्यापर्यंत, किंवा अनेकविद्यापारंगत प्रोफेसरापर्यंत, आकिंचन मनुष्यापासून तों मोठ्या संस्थानिकापर्यंत, त्यांच्या घरच्या गड्यापासून तों अतिश्रेष्ठ अधिकाऱ्यापर्यंत सर्व तऱ्हेच्या लोकांस, स्वधर्मीयांस व परधर्मीयांस पत्रें लिहिण्याचा रावसाहेबांचा परिपाठ होता; तरी जो मायना ज्यास शिष्टाचारप्रयुक्त असेल तो ते लिहीत असत. वडिलांच्या वेळेपासून जे गांवावर कारकून होते त्यांस तीर्थस्वरूप राजमान्य राजेश्री असा मायना लिहून वडिलार्जितस्नेहाबद्दल प्रेमयुक्त पूज्यता दाखवीत.* अशा वर्तनानें वडील मनुष्याच्या मनांतील अपत्यस्नेह दृढ करून ठेवीत.

* सीतेचें हरण करीत असतां मार्गांत रावणाशीं केलेल्या युद्धांत घायाळ झालेल्या जराजीर्ण पक्षिराज जटायूला पाहून श्रीरामानें " तात " या नांवानें त्यास संबोधिलें आहे.

या प्रमाणें पत्रांत मायने लिहावयाचे ते जेथल्या तेथें लिहीत. ते आज प्रचारांत नाहींत. ते सर्व गोळा केले तर एक मायन्यांचें पुस्तक होईल.

काशींतील महान विद्वान पंडित बालसरस्वती बाळशास्त्री बुवा रानडे यांच्या सारख्यांस पत्र लिहितांना मायना तर यथास्थित असेच. शिवाय आंतील भाषा फार विनयशील असे. बरोबरी करणारें पद 'तुम्हीं' किंवा अहंपणा दाखविणारें पद 'मी' हीं पत्रांत मुळींच येत नसत. 'तिकडून सांगणें येईल तसेंच होईल.' असले शब्द योजण्यांत येत. बाळशास्त्री माटे, पुणें, यांस लिहिलेलें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे. "उत्तर देणें तें माझे कारकून बळवंतराव जोशी यांस दिलें म्हणजे ते रवाना करतील अथवा ते जवळ बसून लिहितील. प्रत्यक्ष दर्शन नसतांही पत्र लिहितों, त्याचें कारण दूर नाहीं. आपले शिष्य गणेश शास्त्री तर्टे यांच्या वर्गातील मी आहें म्हणून माझा एक प्रकारचा निदान परोपकारार्थ आचार्याकडे येण्यापुरता थोडासा हक्क आहे. इतकें कळवून कृपा असावी हें मागतों इ." ३०।१२।८२

इंग्रजी जाणणाऱ्यास इंग्रजींत पत्रें लिहीत. निव्वळ मराठी, गुजराथी अथवा हिंदी जाणणाऱ्यांस अनुक्रमें मराठींत, गुजराथींत अथवा हिंदी भाषेंत पत्र लिहीत. महान पंडितांस संस्कृतांत पत्रें लिहीत. मुंबईचे विद्वान धर्मगुरु श्री गट्टुलालजी महाराज, बुंदीचे राजे ज्यांच्या पदरीं विद्वान शास्त्री असत ते, व कांहीं शास्त्री यांस संस्कृतांत पत्रें लिहीत.

जुन्या पद्धतीच्या लोकांस पत्र लिहितांना पत्रावर तारीख न घालतां मिति घालीत व साध्या वारांच्या नांवाबद्दल इंदुवार, भौमवार इ० संस्कृत नांवें घालण्यास विसरत नसत.

पत्रलेखन ही कला आहे. ती रावसाहेबांना एकाद्या आनुवंशिक गुणाप्रमाणें लभ्य झाली होती व त्यांनीं ती श्रमानें पूर्णत्वास नेली होती. ज्यास पत्र लिहावयाचें असेल त्याला आपला अर्थ समजेल अशा त्याच्या नेहमींच्या भाषेंत रावसाहेब पत्रें लिहीत यामुळें तीं अगदीं हृदयंगम व सुखदायक होत.

ज्यास पत्र लिहीत त्याच्या हृदय-तंत्रीची लागलेली तार नेमकी हलवून तींत स्वतांच्या भावनांशीं संवादी भावना उत्पन्न करण्याची हातोटी त्यांच्या पत्रांत दिसून येते. हें त्यांत उत्तम बुद्धिमत्तेचें, व्यवहारज्ञानाचें व मार्मिकपणाचें लक्षण दिसून येत आहे. एकादा ईश्वरभक्त, संस्कृतज्ञ नसल्यास त्याच्या पत्रांत तुकाराम, रामदास यांच्या सुबोध कवितांचा निर्देश असे. रामसत्ता करील तें खरें इत्यादि वाक्यें असत. ठाकूर देवळांतील बुवांस राम करील तें खरें असें लिहीत. यांचे एक कारकून फारशीं शास्त्रवचनें जाणणारे नव्हते.त्यांनीं कांहीं अन्यायाची सूचना केली होती म्हणून त्यांची कान उघाडणी करावयाची होती. रावसाहेब स्वतां मनूचे कायदे जाणणारे असून त्या पापाबद्दल मनूनें काय शासन सांगितलें आहे तें त्यांस न कळवितां नित्य परिचयाच्या सन्ताकडे बोट दाखविलें आहे तें फार खुबीचें आहे. “ आणि दुसऱ्यास ताप देऊन आपण निरपराधी म्हणविणें असल्या कृतीस टेंका दिला नाहीं म्हणजे गांवच्या कुळांवरील वजन जाणार! याला गोरा कुंभार काय म्हणेल ?” [४-३-८६ ]

एक स्नेही संस्कृतज्ञ नव्हते. परंतु त्यांची महाराष्ट्र साधुसंतांवर भक्ति होती. त्यांचे चिरंजीव दुर्धर व्याधीनें ग्रस्त झाले. मानवी उपाय थकले तेव्हां त्यांस रावसाहेबांनीं धीर येण्यास एत्र पत्र लिहिलें त्यांत अदृष्टादि गूढ मायावाद सांगितला नाहीं. फक्त एक गोड पद लिहिलें तें:—

**तारक तो जगदीश्वर । जाउनि अनन्य शरण रिघा ॥ १ ॥**
**ठेउनियां कर दोन्हीं, कटींवर । भक्तांसि भेटे उभा ॥ विठु हा ॥**
**आस धरावी कास तयाची । देणार नाहीं दगा ॥ २ ॥**

हें त्र्यंबक कवीचें पदच त्यांच्या स्नेह्यास दुसऱ्या कोणत्याही पांडित्यापेक्षां मनाला स्थैर्य आणण्यास कारण झालें असेल यांत संशय नाहीं.

मित्र बेचरदास यांची प्रिय कन्या निवर्तल्यावर त्यांस सांत्वनपर पत्र रावसाहेबांनीं लिहिलें तें असें:– ” अशा प्रसंगीं सर्वसत्ताधारी परमेश्वराच्या इच्छेला सविनय प्रणातिपूर्वक वश होणें हा एकच कालांतराच्या जोडीला

उपाय कामास पडतो. आपणावर आलेल्या या विपत्ती धैर्यानें सोसल्या पाहिजेत. पांडवांनाही मोठमोठ्या विपत्ती सोसाव्या लागल्या तशाच रामचंद्रजींनां. (१२-५-८१) बेचरदास हे गुजराथी गृहस्थ असल्यामुळें रामचंद्रजींना असें म्हटलें आहे. हाच गृहस्थ कोणी महंमदी धर्माचा असेल व त्याच्या आपत्तीबद्दल समाधान करणें असेल तर असें लिहीतः— ज्या गोष्टी होणार त्यावर कुद्रती अम्मल इलाई शिवाय कोणाचा नाहीं. तोच जरा कोणी विद्वान वेदान्ती असल्यास त्याचें सांत्वन करण्याकरितां लिहिलेल्या पत्रांत प्रारब्धसंचय, अदृष्ट, प्रस्थानत्रयी इत्यादि शब्दांची योजना करीत. या विद्वानांपैकीं कोणी जास्त परिचियाचा असेल व पत्र साधें असेल तर पत्र पुरें करतांना 'विश्रब्धेषु विस्तरेण अलं' किंवा नुसतें 'इत्यलम्' अशा त्याच्याच पद्धतीनें पत्रें पुरी करीत. एका महान् पंडितास पत्रीं लिहिलें होतें कीं "तुमची आमची प्रत्यक्ष भेट सध्यां होणें शक्य दिसत नाहीं. गिरेः ममुरे इ या न्यायानें एकमेकांस पत्रानें भेटण्याचा रस्ता धरतों. बाकी अलं हे विनंति." तात्पर्य ज्याला पत्र लिहावयाचें आहे त्याला लेखकाचे विचार जी भाषासरणी बरोबर समजावून देईल त्या भाषा सरणीचा लेखकानें अवलंब केला पाहिजे. हें वर्म रावसाहेबांस चांगलें समजलें होतें म्हणून पत्रीं विचार रावसाहेबांचे असत, पण भाषा मात्र ज्याला पत्र लिहिण्याचें त्याची असे.

रावसाहेबांच्या पत्रांचा ओघ स्थिर व गंभीर असे. त्यांत एकादी कधीं कधीं विनोदाची लहर उत्पन्न होत असे. आपले मित्र कृष्णाजी पंत बागूल यांस रावसाहेबांनीं १।८।५६ च्या पत्रांत "पुष्कळ नमस्कार" लिहिले होते.

"एक गृहस्थ कुटुम्बासह घोड्यावर बसून प्रवासास जाण्यास निघाला होता. तेव्हां त्यानें घोड्याचें तोंड बांधून ठेविलें होतें. एकानें असें करण्याचें

---

* नाना मंडलिक यांस ही कला साध्य होती असें त्यांच्या पत्रांवरून दिसून येईल. ३६ प्रकरण पहावें.

कारण विचारल्यावर त्यानें असें सांगितलें कीं घोडें आमची गृहस्थिति सांगतें म्हणून त्याची बंदी केली आहे. ”

( हरिहर शास्त्री द्रवीड यांस १०–२–८७ चें पत्र )

“ सोबतचें पत्र डोकें शांत ठेवून नीट वाचावें. कोणाचें तरी डोकें फिरलें आहे. परंतु माझें फिरूं देण्याची सोय नाहीं ” २२–१–८७ आठल्ये यांस पत्र.
“ कर्जाबद्दल ऋणकोस सांगितलेली कैदेची शिक्षा रद्द करणारा कायदा राणीसाहेबांच्या ज्युबिलीच्या अगोदर पास करून घ्यावा असें एकजण समाचार पत्रांत लिहितो. यावरून तो बहुधा दम्मणचा यात्रेकरू असावा ( सर ॲन्ड्र्यू स्कोबल यांस पत्र ) *

पुण्याचे रावसाहेबांचे कारभारी बळवंतराव जनार्दन उर्फ बाळासाहेब जोशी ( पेठ नारायण ) यांचा बाणा इंग्रजी शब्द मराठींत बोलत असतां अथवा लिहीत असतां न वापरण्याचा असे. त्यांनीं चुकून एक इंग्रजी शब्द वापरला. त्यांचें कौतुक करण्याकरितां रावसाहेबांनीं उत्तरांत लिहिलें “ पुण्यास माझ्या घराच्या जागेला मागणी अथवा तुम्हीं म्हणता त्याप्रमाणें ऑफर अद्यापि आला नाहीं. ” १९–११–८८.

“ आपण लिहिलेलें रामायण पाहिलें त्यांत राम राक्षस कीं रावण राक्षस हें समजत नाहीं. ”　　( ३१–७–८ बाबासाहेब कान्हेरे यांस पत्र. )

पत्रीं अनुचित भाषा न वापरण्याची खबरदारी रावसाहेब घेत. “ लोकांतील माझी मान्यता व स्वाभिमान यांस केव्हांही कमीपणा येतां कामा नये अशी माझ्या पत्रव्यवहाराची भाषा पाहिजे. ”　　( मि. बॅरो यांस पत्र. )

पत्रव्यवहाराचा मुख्य उपयोग जो विचारविनिमय तो हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानाच्या बाहेरील मित्राशीं वेळेवर अनलसपणें रावसाहेबांनीं शिस्तवार करून घेतला हें या ग्रंथाच्या वाचकांस दिसून येईलच. त्यांत

* शिक्षा टाळण्याकरितां गुन्हेगारांचा ब्रिटिश हद्द सोडून पोर्चुगीज लोकांच्या मुलुखांत जाण्याचा परिपाठ आहे.

आणखी मुख्य एक विशेष हा सांगावयाचा आहे कीं या देशांतील भिन्न ठिकाणच्या लोकांशीं ते जन्मभर पत्रव्यवहार करीत आले; पण त्यांना त्यांच्या पैकीं पुष्कळांकडून उत्तेजन मिळत नसे. उत्तेजन मिळत नसे म्हणजे उत्तरच मिळत नसे असें नव्हे तर समर्पक उत्तर मिळून त्यापासून कांहीं तरी कार्य-निष्पत्ति होईल अशा रीतीनें उत्तरें लिहिण्याची संवय आमच्या लोकांस नाहीं अशी ते तक्रार करीत असत. मद्रासेकडील एका मित्रास लिहिलेल्या पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं "आमचे मित्र या देशभर पसरलेले आहेत त्यांचा स्वभावच असा आहे कीं पत्रव्यवहारानें कार्यनिष्पत्ति घडवून आणणें त्यांस साधत नाहीं. हें माझें मत मी लपवून ठेवीत नाहीं. कामा काजासंबंधें कांहीं लिहा, तरी त्यांत खरें औत्सुक्य नाहीं ". हें माहीत असूनही रावसाहेब कधीं निराश झाले नाहींत. शक्य तेवढा विचारविनिमय व साध्य तेवढी कार्यनिष्पत्ति कर-ण्याचें काम त्यांनीं शेवट पर्यंत मोठ्या उमेदीनें चालविलें होतें.

म्युनिसिपॅलिटी, कायदेकाउन्सिलें, विश्वविद्यालय, व वकिली ह्यांचीं नित्याचीं कामें करीत असतां इतक्या व्यवस्थित रीतीनें पत्रव्यवहार करावयास वेळ कसा मिळे याचें आश्चर्य वाटतें. त्यांच्या पत्रव्यवहाराचा विस्तार सारखा वाढत गेला तो शेवटपर्यंत संकोच पावला नाहीं. १८८७ च्या मार्च महिन्यांत तिसऱ्या तारखेला त्यांनीं चवदा पत्रें लिहिलीं. त्यांचा गोषवारा असा आहे:—

| वाह्यनाम. | विषय. |
| --- | --- |
| महेश बाबू | कविराज या संज्ञेनें कलकत्त्याकडे प्रसिद्ध असलेल्या वैद्यांच्या, वैद्य-शास्त्रांत घेण्यांत आलेल्या परीक्षा. १७९३ मध्यें कायम धाऱ्याची पद्धति सुरू झाली तेव्हां असलेले पहिले जमीनदार. लार्ड कॅनिंग यांनीं 'फी सिंपल' इस्टेटीच्या नमु-न्याच्या जमिनींसंबंधें केलेले नियम. |

निझाम साहेबांचे शाळा खात्यांतील अधिकारी. — मनुस्मृति.

मि. मॅक्डोनाल्ड व दि. ब. आर. रघुनाथराव. — प्रसिद्ध झालेल्या सर्व शास्त्रीय व वाङ्मय विषयक पुस्तकांची होम गव्हर्नमेंटकडे असलेली यादी.

मि. आर. डी. मेथा. — पब्लिक सर्व्हिस कमिशननें विचारलेल्या प्रश्नांस द्यावयाचीं उत्तरें आगाऊ छापविणें.

हरिभाऊ परांजपे ( नेटिव्ह ओपिनियनचे एडिटर ). — शिंधी विरुद्ध रोमन आणि देवनगरी विरुद्ध मोडी.

ट्रॅफिक मॅनेजर. — मुंबईस परत जातांना आगगाडीचा डबा स्वतंत्र राखणें. वाटेंतील मुक्कामांचा कार्यक्रम.

पंडित देवनाथशास्त्री. — काशी व प्रयाग येथील कार्यक्रम.

डा. डि. कूना. — स्वतांचें प्रकृतिमान सविस्तर.

मित्र ( काशिस्थ. ) — काशीस जातां येतां ब्रह्मपुरीमध्यें उतरण्याकरतां घर विकत घेणें.

फडके ( जबलपूर ). — तेथील मुक्काम व व्यवस्था.

सुरेन्द्रनाथ बॅनर्जी. — कलकत्ता येथील मित्रांस निरोप; लवकरच होणारी रिपन कॉलेजची स्थापना. व तींत प्रस्थापक मंडळीस यश प्राप्त होण्याची ईच्छा.

आलोपीदीन डोमई — कलकत्त्याहून निघण्याचा बेत.

रेलवेचे अधिकारी — प्रवासाचे कार्यक्रम ( २ ).

ज्या ज्या विषयावर ते लिहीत तो तो विषय अधिकच आल्हादकारक

होई. प्रतिवाक्यांत त्यास शोभाच आणूं शकत. त्यांच्या शेवटच्या शेवटच्या पत्रांत जितका जोम भरलेला आहे तितका जोम तरुण लेखकांच्या पहिल्या पत्रांतही दिसून येत नाहीं. एकाद्या पक्षाच्या समर्थनार्थ आणलेलीं कारणें वाचतांच वाचकांचे विचार जागृत होतात. संशयित लिहिणें त्यानीं कधीं केलें नाहीं. पत्रांत केलेल्या विधानाची सत्यता वाचकांस त्वरित पटूं लागते. असें त्यांच्या आतां पर्यंत या ग्रथांत दिलेल्या व पुढील कांहीं पत्रांवरून दिसून येईल.

## स्वावलंबन.

( मि. शाबुदिन यांस रावसाहेबांचें १३–४–५६ चें पत्र. भाषांतर इंग्रजींतून )

" तुम्हीं स्वावलंबनाचा धडा शिकावा, व तो जितक्या लवकर शिकाल तितका तुम्हाला या संसारांत सुखावह होईल. मी आतां काय करूं कसें करूं या विषयींचा उपदेश दुसऱ्याला पदोपदीं जन्मभर विचारीत रहाण्याची जी संवय हिंदुस्थानच्या लोकांत आढळून येते ती त्यांच्या नाशास कारण होते. बरें ज्याला विचारावयाचें तो आपल्याहून शहाणा आहे कीं वेडा आहे याच्याकडे न बघतां दुसऱ्याच्या उपदेशयष्टीच्या आश्रयाशिवाय यांचें पाऊल उचलत नाहीं. आपल्यापेक्षां जे गुणानें, शहाणपणानें, व अनुभवानें श्रेष्ठ आहेत त्यांचा उपदेश घेऊं नये असा अर्थ माझ्या म्हणण्याचा नाहीं. बेलाशक अश्यांचा उपदेश घ्या, त्याचा अनुकार करा; परंतु तो तरी कोठपर्यंत ? तुमचें स्वावलंबन धोक्यांत पडलें नाहीं तोंपर्यंत !

## तरुणांस उत्तेजन.

तुम्हीं भलत्याच मनुष्याला आपलें हृत्पटल खोलून दाखविलें नाहीं. दुसऱ्याच्या मनोभावनांचा सहानुभूतिपूर्वक आदर करण्याइतकी तत्परता दाखविणारी अम्लानता माझ्या हृदयाच्या ठायीं आहे. मोठेपणाची हांव राखणें व तो मिळेल अशी आशा करण्या इतका तरुणाचा जोम माझ्या अंगीं आहे, तथापि माझ्या वयाला ४३ वर्षें पुरी झालेलीं आहेत. तुमच्या वयाचा असतांना जें मला सांगूनही खरें वाटलें नसतें तें आतां प्रत्यक्ष दिसूं लागलें आहे.

माझ्या विचाराबरोबर लेखणी धांव घेत नाहीं म्हणून वाईट वाटतें. × × × मला एकदम मुद्यावर येऊन म्हटलें पाहिजे धीरे धीरे धीरे. मालवत्या दिव्याच्या वातीप्रमाणें मागाहून लागलेच नष्ट होण्याकरतां एकदम प्रदीप्त होऊन लोकांत प्रकाशित व्हावयास तुम्हीं एकदम पुढें यावयास नको. दोन, तीन किंवा इतकींच काहीं कमी अधिक वर्षें अभ्यासाकडे लावणार असें तुम्हीं म्हणतां. मी म्हणतों कीं तुम्हीं जन्मभर अभ्यास करण्याचे बेत केले पाहिजेत व त्याकरतां अश्रान्त जबरदस्त श्रम केले पाहिजेत व ते सोसतील तितके केले पाहिजेत. आयुष्याचे दिवस सारे पुढेंच आहेत. आतां कोठें प्रारंभ झाला आहे. त्याचा शेवट इथेंच होत नसतो. अशा जीविताकरतां आम्हीं जर सपाटून काम केलें नाहीं तर आमच्यापैकीं पुष्कळांस कुलाब्याच्या इस्पितळांत ( वेड्यांच्या ) कोंडून ठेवावें लागेल. पण माझें पुराणांतील प्रवचन लांबत नाहींना चाललें ! मुद्यावर आलें पाहिजे. मी तुम्हांकरतां स्वतंत्र धंदा पाहण्याच्या विचारांत आहे. ( ४।२।७६ बापूसाहेब आठल्ये यांस पत्र ) ( भाषांतर इंग्रजींतून )

## काश्मीरच्या नृपतीकडून सन्मान

( ३१।८।८५ रोजीं काश्मीरनृपतीनें कांहीं स्मृतिकर चिन्ह म्हणून एक महामूल्य महावस्त्र ( शाल ) रावसाहेबांस पाठवून तिचा स्वीकार होईल अशी आशा पत्रीं प्रकट केली. या भेटीचा स्वीकार करावा कीं नाहीं हा प्रश्न रावसाहेबांच्या मनांत आला व तिचा स्वीकार करावयाचें कां ठरविलें त्याचीं कारणें महाराजांच्या खासगी कारभाऱ्यास पाठविलेल्या उत्तरांत दिसून येतात. )

सदंतःकरणपूर्वक पाठविलेल्या उपायनाचा स्वीकार करण्यांत मला फार आनंद होत आहे. महाराजांची कांहीं एक सेवा न करतां उपायनाचा स्वीकार करणें सहसा उचित नाहीं म्हणून त्याचा स्वीकार करण्याचें सुखावह कर्तव्य करावें कीं न करावें या संशयांत मन पडलें असतां पुरातन आचारांची मान्यता असलेला प्रसाद महाराजांनीं निरभिलाषवृत्तियुक्त देशाभिमानानें प्रेरित होऊन पाठविला आहे, हें कारण त्याचा स्वीकार करण्याला फार बलवत्तर आहे. त्याचा स्वीकार न करणें म्हणजे उलट महाराजांचा अपमान

करणें होय. यास्तव उपायनाचा स्वीकार करण्यांत येत आहे. उपायनीकृत वस्तु फार उच्च पुरुषाच्या हातून पुढें केलेली आहे म्हणून तिला पडलेल्या मूल्याहून तिचें मूल्य अधिक आहे. आमची अशी भावना महाराजांप्रत निवेदित व्हावी. ( भाषांतर इंग्रजींतून. )

### एक देवाची चाकरी.

सहस्रावधि अडचणी आल्या तरी खरें सोडूं नये. परंतु हल्लींच्या राहाटीप्रमाणें प्रथम फार दुःख भोगावें लागेल हें पक्कें ध्यानांत ठेवा. व एकदां पाऊल टाकलें कीं तें विचार करून टाकलेलें असावें व माघारी फिरूं नये. कोणीही गरीबाला उपद्रव होऊं नये असा माझा इरादा आहे. त्याकरतां माझें कितीही नुकसान झालें तरी सोसण्यास तयार आहें. आम्हीं सरकारची रयत आहों म्हणून अमंलदारांनीं आम्हांस लागेल ती योग्य मदत देऊन आमचें रक्षण केलें पाहिजे. परंतु गरीब रयतेस उपद्रव होईल तर पैशाचा उपयोग काय ? यास्तव लागेल तितका पैसा खर्च करून दुसऱ्याचें दुःख हरण करणें ही एक देवाची चाकरी आहे. ( कारकूनास पत्र. मराठी )

### सृष्ट्यनुकरण.

हिंदी व्यापारी मंडळीचे तुम्हीं जर सभासद असाल तर त्या मंडळाला चांगलें स्वरूप देण्याचा प्रयत्न कराल अशी माझी इच्छा आहे. इंग्रजी चेम्बर आफ् कामर्सच्या व्यापारी मंडळाचा दर्जा किति वाढला आहे पहा. सतत उद्योग, व फलप्राप्ति होईतोंपर्यंत फिरून फिरून प्रयत्न करणें यांनीं काय शक्य नाहीं ? सृष्टीचें अनुकरण करा. रवीचें सदागतित्व, भरतीची वाढ यांकडे पहा. त्यांच्या संवयी लावून घ्या. विश्वदर्शन हें उत्तम आहे. त्यानें चित्तशुद्धि होते, मन उदात्त होतें व बुद्धि संस्कृत होते. ज्यास्त लिहिलें तर धार्मिक प्रवचन करीत आहें असें वाटेल.

( १३।१।८६ चे हरकिसनदास यांस इंग्रजींत पत्र. )

### व्यावहारिक भूमितीचा पहिला सिद्धांत.

तुम्हीं मुरूड येथील राहते ठिकाणाची कुंपण घालीत अहांत असें समजतें. त्यांत उत्तरेकडे आपटे यांचे ठिकाणाची वहिवाट सखारामपंत बापु काळे

करतात. त्यांच्या लिहिण्यांत तुमचे डांभे बरोबर पडत नाहींत व त्यास तुम्हीं बळवंतराव, गणेशपंत मोडक यांस नेऊन काळे यांच्या समक्ष जितक्या ठिकाणीं संशय नसेल तेथें पुरे डांभे घालावे, जेथें संशयास जागा असेल तेथें तितका नकाशा काढून मला पाठवावा व सखाराम बापु यांस माझे नमस्कार सांगावे. तंटा वाढविण्याचा नाहीं हा पहिला व्यावहारिक युक्लिडचा सिद्धांत पोटांत ठेवावा. बाकी संसारीं दक्ष राहिलें पाहिजे, हें ही खरें आहे. ( चिंतोपंत दामले यांस ८।८।१८८३ चें मोडी पत्र )

विद्वान पंडितांशीं रावसाहेब संस्कृतांत पत्र व्यवहार करीत त्याचा नमुना.

**श्रीलक्ष्मीकेशवौ जयतः**

स्वस्ति श्रीमन्महाराजाधिराजगोस्वामिमहाराजश्रीगोवर्धनलालजीनां मुंबापुरस्थरावसाहेबेत्युपपद्धारिनारायणसूनुविश्वनाथशर्मभिः कृताः सविनयं साष्टांगप्रणतयो विलसन्तुतराम् । अधुना श्रीभगवत्कृपया सर्वतः कुशलिनः स्मः । मानवधर्मशास्त्रग्राहिष्णुभिः श्रीमद्भिस्तत्संग्रहार्थं सहस्ररूपकमौल्यपत्रिकाऽर्धार्धभागेन प्रेषिता साऽस्माभिः स्वीकृत्य तावत्कानि पुस्तकानि श्रीमतां शिष्येभ्यो देयानीति मनसि निश्चित्यातः कौशेयवाससा सम्यग्वेष्टनपूर्वकं बंधनं कृत्वा श्रीमत्सन्निधौ प्रेषितानि । तत्प्राप्त्युत्तरंश्रीमन्तोज्ञापकपत्रिकां प्रेषयन्तीत्याशास्महे । अपि च ग्रन्थोद्धारकर्मण्येतादृशमौत्सुक्यं सर्वेषामानंदकरं स्यात् किमस्माकं स्यादित्यनेन । भूयोप्याशिषः पत्रिकाद्वारा स्वोदन्तं श्रावयिष्यन्तीति विज्ञप्तिः अलं सूज्ञानामतिलेखनेन इति शिवम् ।

अद्य श्रावणशुद्धशकाब्दाः १८१०

हल्लींच्या म्हैसूरच्या राजांचे वडील वयांत येऊन त्यांस राज्याभिषेक झाला. त्या समारंभास रावसाहेबांस खास आमंत्रण होतें. परंतु त्यांस जाण्यास सवड नसल्यामुळें आशीर्वचनपूर्वक एक संस्कृतांत रावसाहेबांनीं सविस्तृत पत्र लिहिलें त्यांतील शेवटचा भाग.

" अहं तु प्रभुकार्यव्यापृतत्वेन प्राप्तसार्वजनिककार्यानुरोधेन च शरीरतः

तत्रागन्तुं असमर्थोऽपि मनसा सर्वात्मना तत्र प्रभूणामभीष्टं चिन्तयितुमागत एवाऽस्मीति विभाव्यमित्यनुग्रह एवमस्तु इति विज्ञापये. *

## सान्त्वनपर पत्र.

नवल बिहारी वाजपेयी यांस १३. ५. ८३ चें पत्र. ( इंग्रजीत )

मत्प्रिय वाजपेयी,

वरवर भासमान होणाऱ्या विलंबाची क्षमा असावी. गेल्या खेपेस आपण आलां तेव्हां माझी प्रकृति जशी असावी तशी नव्हती व नाहीं.

उद्योग करून देहाचें झिजणें पतकरलें पण स्वस्थ बसून गंजणें नलगे. अगदींच अविचारानें मर्यादेच्या बाहेर वागतां कामा नये, म्हणजे अगदीं उद्योगशून्यता व उद्योगातिरेक याचा मध्य काढा व स्थलांतर व उद्योगांतर केल्यानें पुष्कळदां विश्रांति मिळते. आपल्या मातोश्रींच्या निधनानें सहजच वृत्तींत उद्वेग उत्पन्न होईल. गेल्या गुरुवारीं रुग्णावस्थेंत असलेल्या मातोश्रींस भेटून आलों. आपलें गणित आपल्याला असें सांगेल कीं आघात व प्रत्याघात हीं समसमान आहेत. व विरुद्ध द्वंद्वें आहेत. सुख व दुःख यांसीं त्यांचीं तुलना केली तर समजूत होईल. ज्यानें ज्यानें सुख होतें त्यानें त्यानें अगदीं नियमानें दुःख होतें. आणि जेव्हां आपण नीतिधैर्यानें दोघांशीं सारखा सामना देतों म्हणजे सुख झालें असतां फुगून जात नाहीं व दुःख झालें असतां म्लान होत नाहीं तेव्हांच आम्हीं खरे विद्वान् झालों. असो.

मी पुराण सांगून चऱ्हाट वळूं लागलों अशी भीति वाटते म्हणून थोडक्यांत सांगतों भगवत्गीता वाचा व उपनिषदें वाचा. आपण हायकोर्ट वकिलीचा अभ्यास करतां पाहून आनंद होत आहे. मी स्वतः ज्ञानावलंबी आहें व आशावादी आहे. नसतों तर निराशेच्या तडाक्यांनीं मागेंच चिरडून नाहींसा झालों असतों. हल्लींचा काळ आमची परीक्षा घेत आहे. त्यांत दुसऱ्यानें आम्हांस

*उद्यांच्या मंगलविधिप्रसंगीं मी हजर राहूं शकत नाहीं ह्मणून वाईट वाटतें. सोबतची अभिनंदनपर संस्कृत पत्रिका महाराजांस अर्पण करण्याची कृपा करावी.

( २४।३।८० चें कर्नल हे यांस पत्र )

जसें वागवावें असें वाटतें तसें जर दुसऱ्यास आपण वागवूं लागलों तर त्याचें चांगलें फळ मिळेल याविषयीं मला शंका मुळींच वाटत नाहीं.

## श्रीमंत तुकोजीराव महाराज होळकर यांस इंग्रजी पत्र.

महाराजांचा प्रसाद असो. सिमल्याहून जाऊन येण्याच्या अल्पप्रयासानें प्रकृतिस्वास्थ्याचा पुनः लाभ महाराजांस झाला म्हणून मन अगदीं उत्साहित असतां या ओळी महाराजांच्या हातांत पडतील असा भरंवसा आहे. मला माझ्या इंग्रज मित्राचें पत्र कालरात्रीं आलें. त्यानें लिहिलेला वृत्तांत ऐकून आनंद झाला. पण संसार करतांना एकजात सुख मनुष्याला मिळणें नाहीं एवढें म्हणणें सरते शेवटीं भाग आहे.

राजधानीला परत आल्यावर महाराजांस तो चिरपरिचित व हास्ययुक्त चेहेरा—जो सर्व सुखमय व कष्टमय परिस्थितींत अविकृत असे तो आपल्या मित्रश्रेष्ठांचा वामनराव अण्णा *गरुडांचा चेहरा-दृष्टीस पडणार नाहीं.

ही पडलेली खिंड कांहींतरी करून भरून काढणारा एक कालावधीच समर्थ आहे. व माझ्या बुद्धिवान् तरुण मित्राचें धैर्य व अवश्य वृद्धिंगत होणारें स्थैर्य आपल्या चुलत्यांची व वडिलांची उच्च पदवी स्पष्टपणें राखण्यास पुष्कळ अंशीं कारणीभूत होईल. १९—९—८२

## दुव्यांस आंच.

एक एक दुवा तुटून गेला कीं बाकीचे दुवे जुळविण्यास आंच द्यावी लागते. स्मृतिगत झालेल्या मित्रा बद्दल जें आपण लिहिलेंत तें अक्षरशः खरें आहे. परंतु मनुष्य एक योजना करतो त्याची वाट परमेश्वर अन्यथा लावतो या अन्यथाकर्तृत्वशक्तीच्या अनुरोधानें सर्व रचना केली पाहिजे. काल हा माणसें निर्माण करतो. या विषयीं मी केव्हांही शंका घेतली नाहीं. व तसें मिळण्याविषयीं प्रार्थना करा व तसें मिळेल अशी आशा करतो. ( **धोंडोपंत** गरुड यांस पत्र १९।९।८२ )

## शास्त्रज्ञानाविषयीं हौस.

ब्रिटिश असोसिएशनच्या या वर्षाची सविस्तर हकीकत आपण वाचलीत

---

* यांच्या मागें यांच्या परलोकवासी बंधूंचा एक होतकरू मुलगा होता.

काय ? ती फार उंची आहे. शास्त्रीय विषयांत इतका उत्साह व कार्यक्षमता हिंदुस्थानांत प्रवृद्ध झालेली मी पहावयास जगेन काय ? आमचे इंजिनीयर, डॉक्टर, ज्योतिर्विद, प्राणिशास्त्रज्ञ इत्यादींच्या पुढें कार्यक्षेत्र मोठें आहे. मराठ्याच्या खंदकापलीकडील आमच्या देशबांधवांनीं बंगाल्यांत दोन नवीं मासिकें इंग्रजींत चालविलीं आहेत. तीं लक्षवेधी झालीं नाहींत, तथापि महत्कृत्यारंभांत अपयश आलें तरी तें यशस्करच आहे. ( १०-११-८२ चें प्रोफेसर छत्रे यांस पत्र. )

## स्नेहशीलपणा.

( बरोबरीचे लोक सृष्टिक्रमाप्रमाणें इहलोक सोडून गेले म्हणजे **रावसाहे**बांस फार वाईट वाटे. गोविंद पंत लेले म्हणून एक प्रतागडच्या देवीच्या संस्थानाचे सेवक होते. प्रतापगडची देवी **रावसाहेबांचें** कूळ होती. तिच्या भक्तीभावास्तव **रावसाहेबांनीं** फार श्रम करून तिच्या कज्ज्यांत यश मिळविलें. त्या कामांत गोविंदपंत हे **रावसाहेबांस** मदत करीत असत. हे मुंबईस येतांना आगगाडीखालीं सांपडून अपघातानें मृत झाले. तेव्हां **रावसाहेबांनीं** एका स्नेह्यास पत्र लिहिलें तें ) "गोविंदपंद दादा यांच्या परलोक गमनाचें वर्तमान, दोन दिवस झाले, समजलें. श्री. रामाची मर्जी झाली. देवीच्या चाकरींत परंतु असा शेवट झाला. आयुष्य लांबलें म्हणजे दुःखें ज्यास्त ऐकावीं व सोसावीं लागतात त्यास साधूनीं उपाय सांगितले आहेत. तरी आमचा तो अधिकार नाहीं." ( ३०–१–८६ चें वामनराव ओक यांस पत्र )

**रावसाहेबांना** घरच्या मंडळीनें पाठविलेलीं पत्रें कुशलपृच्छाविषयक व प्रपंचविषयक असत. इतर इष्टमित्रांनीं पाठविलेलीं पत्रें फार बोधप्रद व मनोरंजक आहेत, असें वाचकांच्या नजरेस आलेंच असेल. हीं पत्रें जे जे विषय **रावसाहेबांच्या** वेळेस लोकांच्या चर्चेस पात्र झाले त्या त्या विषयांवर लिहिलेलीं आहेत. त्यांतील पुष्कळ पत्रें **रावसाहेबांचा** काल कसा होता तें दाखवितात. म्हणून केवळ अप्रस्तुत ठरणार नाहींत. त्यांचा आदर केला पाहिजे. तरी ग्रंथविस्ताराच्या भीतिमुळें कांहीं थोडीं मासल्याकरतां पुढें दिलीं आहेत.

## चाकरीखत.

शके १७८१ × × आम्हां दोन असामीं पैकीं कृष्णाचे लग्नाकरितां मुद्दल रुपये २५ नक्त कंपणी घेतले. याची चाकरी खांडित वर्षे ६। (सवा सहा) बारमाही मुरुडास अथवा देशीं परदेशीं तुम्हीं सांगाल तेथें जी पडेल ती आम्हांपैकीं कृष्णा हा करील. त्याजकडून अंतर पडल्यास मी गंग्या सदरीचे कराराप्रमाणें करीन. समयीं वळणें येथें चाकरी केल्यास तेथें अडसेरी तेथील गांव शीरस्त्याप्रमाणें तुम्हीं द्यावी. मुरुडास अगर कोठें तुम्ही सांगाल तेथें चाकरीवर हजर असून तेथें तीन वक्त तुम्हीं पोटास घालावें, तें शीरस्त्याप्रमाणें. चाकरी करतांना आम्हांपासून तुमच्या हर एक जिनसाची तसनस अथवा दगाबाजी झाल्यास झाली चाकरी व्याजांत जाऊन मुद्दल रुपये २५ रोख त्या वक्तीं परत देऊं. नुकसान होईल तें भरून देऊं.

काहीं पत्रें मनाचे पूर्वग्रह दाखवितात. कांहींत अज्ञानमूलक मनोभूमींत दृढ झालेल्या लोकांच्या समजुती आढळून येतात.

## छापील शाई व अधर्म.

तुकारामाची गाथा रावसाहेबांनीं १८६७ सालीं छापविली होती. अभंगसंख्या ४५०० होती. ती छापण्यापूर्वी पंढरपुराकडे कसा काय खप होईल याची चवकशी आपल्या स्नेह्याकडे त्यांनीं केली होती. " तुकारामाच्या गाथांच्या प्रती पुष्कळ खपतील परंतु छापीलप्रती घेण्यास लोकांचा अंदेशा आहे. कारण शाईंत कांहीं वर्ज्य पदार्थ आहेत असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. अक्षर मोठें सुवाच्य व शिळाछाप असावें व शाईची खात्री द्यावी. "

( रावजी सखाराम लिमये यांचें २७–३–६७ चें पत्र )

## शकुनवन्ती.

घरांतून केळशीहून कोणास न विचारतां निघून तथून पांच कोसांवर निगडी म्हणून एक गांव आहे, तेथें आमचे स्नेही आहेत. त्यांचें घरीं आलों.

त्याच दिवशीं घरांतून शोध करण्याकरितां गडी आला. त्या गड्याजवळ तीर्थरूपांनीं पत्र दिलें होतें. त्या पत्रांत मजकूर इतकाच होता कीं आज दिवस वाईट आहे तुम्हीं घरीं निघून यावें आणि दिवस चांगला पाहून आपली मर्जी ज्या ठिकाणीं उमेदवारी करावयाची असेल त्या ठिकाणीं रवानगी करूं. यांत अंतर झाल्यास श्रीरामाची शपथ आहे! परंतु आम्हीं विचार केला कीं आज आम्हीं घरांतून निघून आलों काय आणि पुन्हां घरीं माघारी जावें काय! ही गोष्ट फार वाईट दिसेल; हें एक आणि आम्हीं निगडी येथून शकुनवंतीवरून प्रश्न पाहिले त्यांत असें आलें कीं तुम्हीं घरीं जाऊं नये. उद्योगास्तव पुढें जावें. असें आल्यावरून तीर्थरूपांस पत्र लिहून दिलें मग संमति मिळाली. ( *नारायण मोरेश्वर केळकर शके १८७४ )

## शाबरी मंत्र.

( जनार्दन नांवाच्या एका मित्रानें १५।९।१८६२ च्या पत्रांत खालील वृत्त मोठ्या श्रद्धेनें कळविलें )

१८६० च्या सप्तंबर महिन्यांत मला हिमज्वराची बाधा झाली. त्यादिवशीं शुद्ध नव्हती. तीन मासांनीं बरा झालों. आणखी तीन मास रजेवर जाऊन आलों. × × कामावर चित्त न लागे. काम न सुचे. त्रास येई. कचेरींत गादीवर निजावेंसें वाटे. चालतां चालतां अकस्मात् शक्ति नांहीशी होऊन ढोंपरावर हात देणें लागे. काम कसें होईल? कसें संपेल? सरकारी व खासगी काम न करवे. स्नान संध्येचा आळस. कोणताही उद्योग सुचेना. पुन्हा रजा घेतली. भगवत्स्मरण सुरू केलें. पुढें एकानें ( ज्यास मी १८६० मध्यें सहा रुपये दंड केला होता त्यानें ) वैर स्मरून आम्हांवर शाबरी मंत्रप्रयोग केल्याचें उघडकीस आलें. त्यानेंच येऊन सुचविल्यासारखें करून गूण करून दिला. आणि चार्ज घेणेंस सांगितलें. गादीवर बसेंतों पूर्व स्थितिच होती. काम करूं

* यांस रावसाहेबांची बहीण वेणूबाई दिलेली होती. हे पुढें पुण्यास जाऊन पैमाश्रीची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यापुढें मराठी वकील होऊन खानदेशांत वकीली करीत होते. यांनीं द्रव्यार्जन पुष्कळ केलें व सर्व खर्च केलें.

लागतांच शंका किंवा भीतिविरहित पूर्ववत् काम करीत आहें. आजवर शाबरी मंत्र खोटे मानीत असें पण आतां केवळ खोटेपणा वाटत नाहीं.

## चमत्कारिक भेट.

रावसाहेबांस एका स्नेह्यानें ( कृ. बा. भावे*यांनीं ) वाघाचें कातडें भेट म्हणून पाठविलें. त्यांत विशेष काय होतें त्याचें वर्णन बरोबरच्या १४।६।५७ च्या पत्रांत आहे:—बिब्या जातीच्या वाघाचें कातडें आपले करतां पाठविलें आहे. याच वाघानें एक माणुस मारला. व त्या माणसानें याच वाघाच्या डोक्यावर कुऱ्हाड मारली. व दुसरे लोकांनीं यासच सोट्यांनीं मारलें. या वाघाचें मांस मोठ्या कुशलतेनें काढलेलें आहे तें असें कीं त्याला शस्त्रानें न फाडतां सर्व मांस व हाडें तोंडांतून काढून घेतलीं आहेत.

" मला झुबा पाठवा;तुमचा अभ्यास संपला म्हणून तुम्हांस निरुपयोगी झालेलीं पुस्तकें आम्हांस द्या; रानावनांतील चमत्कारिक वस्तू पाठवा; गुरूजी शनीच्या भोंवतालची वलयें दाखविणार आहेत," इत्यादि मजकूर एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूट मधील विद्यार्थिदशेंत असलेल्या मित्रांच्या पत्रांत आढळतो.

" आम्हांस जागा द्या व देववा " अशा विषयीं चाकरीकरतां तयार असलेल्या स्नेह्यांच्या पत्रांत मजकूर आढळतो.

## नोकरीस हपापलेला.

आताशां सरकारी नोकरीचा बडेजाव लोकांत फार आहे. सरकारी नोकरी नाहीं म्हणून माझें मन फार उद्विग्न होऊन असें वाटतें कीं माझ्या पाळण्याचें थडें बनतें तर बरें झालें असतें.

२०।८।५३ चें श्रीधर रामकृष्ण यांचें पत्र.

## नवीन शिकलेले सरकारी नोकर व त्यांची क्वचित् ठिकाणीं होणारी संभावना.

येथील लोक माझ्या वरिष्ठांची व माझी सारखीच नावड करतात. अद्याप

*हे साई पेठ्याचे महालकरी, प्रकरण ८ वें पृष्ठ ५६।५७ पहा. हे सातारा जिल्ह्यांत मामलेदारीपर्यंत वाढून १८६९ सालीं अकालीं मृत्यु पावले.

त्यांच्यांत मिसळलों नाहीं. मिसळण्याचा हळू हळू प्रयत्न करणार आहें. पण बेटे ते सर्व एकसारखेच. आमच्या इकडील मनुष्य पाहिला कीं अरे कोंकणी आला असें मनांत म्हणून ते शक्य तितके दूर राहून आमचा संपर्कच होऊन देत नाहींत. एवढ्यावरून पहातां त्यांचा आमचा कधींही स्नेह जडून येणार नाहीं हें उघड आहे. (८–६–५६ बेळगांव )

## पापभीरु कारकुनाची जबानी

मी ईश्वरस्मरण करून आपल्या चरणांपासीं हें पत्र खरेपणानें लिहितों. इंग्रज सरकारचे व्यवहारांत २२ दिजंबर १८४७ रोजीं उमेदवारीस राहिलों तेव्हांपासून तारीख १३ मार्च सन १८५४ पर्यंत सरकारी नोकरीचा व उमेदवारीचा पैसा दरसाल ५०।७५ यांत मिळविला. त्यांत सुमारें २ रुपये खराब चालीनें—ते असे कीं तुझें काम करून देतों अशा भुलथापीनें—बाकी सर्व पैसा लिहिण्याचे मेहनतीचा आहे. २ रुपयां पुरता काय तो कमीपणा मजकडे आहे. तो तरी १८५१ तील आहे. शिवाय लिहितों कीं इतके मुदतींत एक पैचा जिन्नस किंवा नक्त कांहीं मिळविलें नाहीं. शिवाय इतके उमरींत दोन वेळां बैठकीस सन १८५४ चे पूर्वीं (१) व सन१८५६ (१) असा गेलों. माझी हल्लीं उमर २८ वर्षांची आहे. इतके उमरींत परस्त्री ठाऊक नाहीं. सदरहू लिहिल्याचे बाहेर माझी स्थिति केव्हां होईल ? मला वायू होईल तेव्हां. त्या शिवाय स्थितीचा बदल होईल अशी कल्पनाही करूं नये. (१८६१)

" या महिन्यांत अशा नेमणुका झाल्या, बदल्या झाल्या, बढत्या झाल्या, आम्हांला रजा देववा " हा मजकूर इतरत्र रोजगारांत शिरलेल्या स्नेह्यांच्या पत्रांत दिसून येतो.

याचा रावसाहेबांस कंटाळा येत नसे; कारण त्यांच्या हातून काम होईल तेवढें ते करीत असत. त्यांतूनही एकादा स्नेही, रावसाहेबांस या बाबतींत नाहीं तर नाहींच पण कसल्याही बाबतींत त्रास न देतां पत्र लिहिणारा भेटत असे.

## केवळ ओळखी खातर.

मधून मधून चार ओळी लिहून तुम्हांला त्रास देऊन तुमच्या मनाची शान्ति

घालविण्याचा माझा हेतु मुळींच नाहीं. आहे याहून जास्त किफायतशीर जागा मिळवावयाची नाहीं;इकडल्या तिकडल्या गप्पा गोष्टी कळवावयाच्या नाहींत; पण मी एक तुमचा गरीब ओळखीचा मनुष्य आहें एवढें स्मरण तुमच्या सदय अंतःकरणास व्हावें हाच हेतु आहे. ज्या गोष्टींची प्राप्ति सहज दैवगत्या मिळूं शकत नाहीं त्यांचा लोभ चित्तांत बाळगून नेहमीं अस्वस्थ राहणाऱ्या महत्वाकांक्षी लोकांपैकीं मी एक नाहीं. निढळाच्या घामानें मी जें मिळवूं शकेन व जें सर्व शक्तिमान प्रभु देईल त्यांतच समाधान मानून राहणाऱ्यांपैकीं मी एक आहें. माझें कसें चाललें आहे पुसाल तर वाईट नाहीं असें म्हटलें पाहिजे. ( **त्रिंबकराव दातार** यांचें १७।२।६६ चें पत्र. )

## साक्षीदार आणि वकील

पुढें इंग्रजी वकिलीची परीक्षा सुरू झाली. परीक्षा पास झालेले मुनसफ होऊं लागले. तेव्हांचीं पत्रें त्या विषयाला धरून असत.

"साक्षीदारांकडून कोडतांत शपथेवर पाहिजे तें वदवावें हाच आपला धर्म आहे असें येथील वकील समजतात. साक्षीदार हे चांगले पढवलेले असतात. हें स्पष्टपणें हमेश ओळखून येतें. माझ्यापुढें चाललेल्या कज्जांत मला असें आढळून आलें आहे कीं कोडतांत जेवढे मुद्दे लागलेले असतात तेवढ्यांच्या समर्थनापुरतीच एकस्वरूपी माहिती त्यांना सांगतां येते. त्याच्या बाहेर त्यांना एकही प्रश्नाचें उत्तर माहीत नसतें.

एका कज्जांत तंट्याची जमीन 'अ'च्या ताब्यांत होती कीं 'ब'च्या ताब्यांत होती असा मुद्दा होता. साक्षीदार कठड्यांत उभा राहिला. त्याला नांव गांव विचारतांक्षणींच त्यानें नांव गांव न सांगतां एकदम साक्षीला प्रारंभ केला व तंट्याची जमीन 'अ'च्या ताब्यांत आहे या शिवाय दुसरें कांहीं एक मला माहीत नाहीं असें सांगून मोकळा झाला."

ही हकीकत **वीरभद्र मदिवल्लाप्पा** म्हणून एक मुनसफ रावसाहेबांचे स्नेही होते, त्यांनीं **रावसाहेबांस** कळविली व लिहिलें कीं या पत्राचा उपयोग आपण वाटेल तो करावा. यापैकीं प्रत्येक अक्षर खरें आहे. मी तें सिद्ध

करून देईन. मात्र आपण वकिलांचे पक्षपाती असल्यामुळें राग येऊं देऊं नका. ( १८६७ )

पुढें पुढें विद्वान मित्रांशीं शिक्षणविषयक चर्चा सुरू झाल्यावर शिक्षण-विषयक चर्चा करणारीं पत्रें आलेलीं आढळतात.

## कालेजांतील फिरते अध्यापक.

रावसाहेबांच्या मनांतून कॉलेजांत जे अध्यापक नेमले जातात त्यांनीं शिष्यांस शिकवावें व आपणही अधिक शिकावें असें होतें. व त्यासंबंधें गुरुवर्य प्रोफेसर केरोपंत यांचें मत मागविलें होतें तें खालीं दिलें आहे.

" अध्यापकांचें काम कांहीं दिवस देशांत फिरावयाचें असलें पाहिजे. तेवढ्यांत त्यांनीं या देशांतील भूमिगत द्रव्यांचा शोध लाविला पाहिजे; यंत्र-कलेचा प्रसार केला पाहिजे; आमची भूमि जास्त उत्पादक केली पाहिजे; भूगर्भज्ञानाची वृद्धि करून भूमीचे थर कसले कसले आहेत त्याचें आकलन केलें पाहिजे; व तींत दुसरे पदार्थ काय काय आहेत त्याचा शोध केला पाहिजे; ते पदार्थ बाहेर कसे काढावे व त्यांच्यापासून मनुष्याचें हित कसें होईल तें पाहिलें पाहिजे; संस्कृतभाषेचा अभ्यास अन्य भाषांशीं तुलनात्मक पद्धतीनें झाला पाहिजे; आमच्या ज्योतिःशास्त्रांत सुधारणा केली पाहिजे; त्यांत नवीन शोध करून त्यांचा फैलाव सर्वत्र केला पाहिजे; आमच्या औषधिशास्त्रांत भर घातली पाहिजे; देशी विदेशी ओषधांचा अनुभव घेऊन तुलना केली पाहिजे; आमच्या विद्वान लोकांचा परस्परसंपर्क वाढला पाहिजे; त्या पासून अशी इच्छा उत्पन्न झाली पाहिजे कीं देशी औषधांत नवे शोध करून सुधारणा झाली पाहिजे; देशी शास्त्रांचें उच्चाटण करून त्यांच्या जागीं विदेशी शास्त्रांची स्थापना करावयाची नाहीं पण हल्लींचा कल त्या दिशेनें नाहीं. तक्षशास्त्र, शिल्पशास्त्र, वस्तुनिर्माणशास्त्र, अशीं शास्त्रें, कला, देशरीतिरिवाज, आमच्या भाषा, आमचे विचार हीं सर्व शीघ्र गतीनें नाहींशीं होत आहेत. त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागा युरोपियन शास्त्रें इत्यादिकांनीं व्यापिल्या जात आहेत ! अरेरे माझ्या भोंवतीं केवढा वस्तुविपर्यास मी पहात आहें ! !

पोशाख; घरचीं भांडीं; वाडे; गाड्या; लेखनव्यवहार व भाषा हीं सर्व इंग्रजीच होत आहेत ! !

म्हणून आमच्या अध्यापकानीं फिरावें व बाहेरच्या लोकांस बोध करून ज्ञानदान करावें. नुसत्या राजधानीच्या ठिकाणींच त्यांचें काय आहे ? आमची संस्कृति, आमचे विचार, पुरातन वस्तूंच्या अवशेषावरून कळण्यासारखा इतिहास, वैद्यकांतील व तशा दुसऱ्या शास्त्रांतील उपयोगी शोध, यां संबंधीं लोकांस त्यांनीं ज्ञान करून द्यावें. या दिशेनें ते जर स्वतः श्रम करतील तर सरकारचें व लोकांचें हितच करतील.

तुमच्यानें कांहीं होत असेल तर अशी योजना अम्मलात आणण्याची व्यवस्था करावी." १९।६।६९ चें प्रो. केरोपंत छत्रे यांचें पत्र.

## कांहीं दर.

जिल्हा रत्नागिरि.

साल १८५३:—भात, १३॥; नागली, १८; वरी, १६.

साल १८५४:—सरकारी फड भात, १७॥; नागली, २१; वरी, १६॥.

साल १८६१:—सोनें, १५॥=; तूप, शेर ४; आंजर्लें. सबंध घराचें भाडें १॥ रुपया. रत्नागिरि.

## पंढरपूर.

मी सन १८५० सालीं पंढरपूर प्रांतीं आलों. त्यावेळेस व पुढें सन १८६० सालापर्यंत जी धारण होती ती—

दर रुपयास ज्वारी, १२; बाजरी, ११; गहूं, १०; हरबरे, १०; तूप दर ३ मंदीप्रमाणें; तेल, १८८ मंदीप्रमाणें; गूळ, ८१० मंदीप्रमाणें; कडबा हजारीं ४; लांकडें २८८ दरखंडी; गवत, ८८ हजारी; मजूर मनुष्य गडी दरमहा पोटास घालून १८८; ब्राम्हण पोटास घालून २; याच प्रमाणें गाड्या घोडीं वगैरेचें भाडें पडत असे.

खाणावळींत दरमहा २८८ रु. पडत.

१८६५ सालीं धान्याचे दर सुरू आहेत ते—ज्वारी १२ शेर रुपयास, बाजरी ८, गहूं ७, हरबरे ७, तूप दरमणीं १४, तेल ५०४, गूळ ५, कडबा २० हजारीं, गडी ८ दरमहा शिवाय जेवण, ८ ब्राह्मण जेवण घालून, याच मानानें आहे.

खाणावळींत रुपये आठ द्यावे लागतात. या प्रमाणें पूर्वींची व हल्लींची माहिती आहे. ( रावजी सखाराम लिमये वकील पंढरपूर १४।११।१८६५ )

रावसाहेब राजकारणांत पडल्यापासून इंग्लंदमधील मि. इव्हॅन्स बेल यां सारख्या राजकारणी पुरुषांचें एकादें पत्र सांपडतें.

## क्षीणबल मृगयासक्ति.

**। गाहन्तां महिषा निपानसलिलं शृङ्गैर्मुहुस्ताडितं ।**
**॥ च्छायाबद्धकदंबकं मृगकुलं रोमंथमभ्यस्यतु ॥**
**। विश्रब्धैः क्रियतां वराहततिभिर्मुस्ताक्षतिः पल्वले ।**
**॥ विश्रान्तिं लभतामिदंच शिथिलज्याबन्धमस्मद्धनुः ॥**

( अभिज्ञानशाकुन्तल )

लोकांचें लक्ष माझेकडे चांगल्या रीतीनें वेधून घ्यावयास मी आरंभ केला आहे असें मला वाटतें. मला वाटेल तो गृहस्थ भेट देतो. मोठमोठ्या वजनदार लोकांत माझ्या उपदेशास जागा मिळते. तथापि पदरचा द्रव्यसंचय मात्र अक्षरशः आटून गेला आहे. मी आमच्या अफगानिस्थानाविषयींच्या धोरणावर आणखी पुस्तक लिहून छापणार आहें. तें येथील राजकारणी पुरुषांचें मनोरंजन करील.

तितकें मनोरंजन इतर हिंदी राजकारणविषयक लिहिलेलीं पुस्तकें करणार नाहींत. खर्चाची बाबही अधिक भरून येईल तथापि मला काटकसर करावी लागेल व शक्य तर हिंदुस्थानाचा विसर पाडून माझ्या स्वतांच्या कुटुंबाच्या सोयीचें स्मरण ठेविलें पाहिजे. एकादा ब्राम्हण दिवाण ( पाहिजे तर फडणीस म्हणा ) तो जें सांगेल तें करण्यास महाराजांचें मन वळवूं शकला नाहीं म्हणजे स्वेच्छाप्रदर्शन करतांना बडबडतो " आतां काशीस देहविसर्जन

करण्यास जावें" हें तुम्हांस ठाऊक आहेच. तसेंच हेंही ठाऊक असूंद्या कीं मी त्या दिवाणासारखा मात्र बडबडत नाहीं. इग्लंदांत जो बालंबाल खात्री करून देईल तेवढाच दरिद्री पुरुष ड्यूक व पार्लमेन्टाचे सभासद यांच्या सारख्यांशीं राजकीय सामना करूं शकेल. इतर नुसत्या गुणी पण दरिद्री मनुष्याचें हें काम नव्हे. माझ्यानें आणखी झालें असतें पण माझी मृगयासक्ति क्षीणबल झाली आहे. २१।४।१८६९

हें पत्र मथळ्यावरील श्लोकाची आठवण करून देत आहे.

भौतिक विषयांची चर्चा करणाऱ्या पत्रांत एकादें परमार्थदर्शक साधुसंताचें वर्णन करणारें पत्र सांपडतें.

## श्री. अक्कलकोटकर स्वामी.

" श्री अक्कलकोट स्वामींची वृत्ति जडोन्मत्त पिशाच्चाप्रमाणें आहे. पुरूष तेजस्वी आहे. मुंबई, पुणें वगैरे ठिकाणचे बहुत लोक स्वामींकडेस आपआपल्या कार्यासाठीं आले आहेत. निरंतर पांच पन्नास मंडळी त्यांच्याशीं आहेतच. लोकांत यां विषयीं अर्थवाद चाललेले आहेत. येथील स्वामींच्या स्थितींत बहुत अंतर आहे. हा पुरुष अत्यंत वितृष्ण आहे. "

( पांडुरंगोपाध्याय गुर्जर यांचें पत्र. )

## पोष्ट खात्याची १८५८ सालीं सुव्यवस्था.

कलेक्टर साहेबांकडे केलेला अर्ज परत आल्याचें कारण समजलें कीं लखोटा मुक्काम रत्नागिरी म्हणून गेला. तो, साहेब तेथें नसल्यामुळें होते तेथें गेला. तों हांसील जास्त *चढल्यामुळें त्यांणीं न घेतां परत झाला. लखोट्यावर सही नसल्यामुळें मुंबईस पोष्ट मास्तर जनरल यांजकडे गेला; तेथून परत आला. ( ता. १०।३।५९ चें नानांचें पत्र. )

---

* पत्र जितकें अधिक लांब जावयाचें असे तितकें त्याला हांशील जास्त पडे. इंग्रज सरकारचीं जीं उत्तमोत्तम खातीं आहेत त्यांत पोष्टखातें बरेंच वर येईल. त्याची व्यवस्था १८५८ सालीं सुद्धां व्यवस्थेशीर असे असें हें पत्र सांगतें.

या पत्रव्यवहारांत पंडिता रमाबाईंचें अल्प चरित्र सांपडतें *

**रावसाहेब मुंबई** असोसिएशनचे व काउन्सिलांचें काम करूं लागल्यावर व राजकारणांत अधिकाधिक पडूं लागल्यावर त्या संबंधें समर्पक विषयावरील मित्रांचीं पत्रें सांपडतात. त्यांत प्रो. केरोपंत छत्रे यांचें प्रतबंदीवरील पत्र; गोविंद बाबाजी जोशी यांच्या प्रातिनिधिक पद्धतीवर स्थापलेल्या ठाणें जिल्हा सभेची हकीकत; लिमये वकील यांचें महागाई व तिचीं कारणें या विषयीं पत्र; दिवाण बहादुर आर रघुनाथराव यांचे महाराणी **व्हिक्टोरिया** साहेबांकडे पाठविण्याकरतां राजकीय मागण्या करणारा अर्ज; सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांच्यावर कोडताची बेअदबी केल्याबद्दल खटला होऊन त्यांस झालेल्या शिक्षेसंबंधीं सर्व कागदपत्र; एका मिशनऱ्यावर समन्स बजाविलें असतां तो कोडतांत हजर झाला नाहीं म्हणून त्याजवर कृष्णाजीपंत नूलकर यांनीं वारंट काढण्याचा हुकूम केला, तो पुढें गैरकायदा होता असें सरकांतून ठरलें त्यासंबंधाचे कागदपत्र इ. शेंकडों कागद पत्र या पत्रव्यवहारांत सांपडतात. या प्रमाणें हा पत्रव्यवहार अगदीं सर्वसंग्रह स्वरूपाचा आहे.

## संस्कृत पत्रें.

रावसाहेबांस शास्त्रीजनांची पत्रें संस्कृतांत येत:—

श्रीमत्सु विश्वविदितकीर्तिषु परमधार्मिकमूर्तिषु, सकृत् विद्यावदातमूर्तिषु, निखिलजनरञ्जननिपुणमतिषु; श्रीविश्वनाथनारायणमंडलीकाभिधेयेषु मम अति प्रीतिपुरस्सरं प्रणातिततयः समुल्लसंतु । शमिह भवतां कृपया सर्वतो वरीवर्ति । श्रीमतां दर्शनदिनादारभ्य भावुकमनुदिनं श्रीविश्वनाथमर्थयामहे । मुम्बय्यामागतेनमया सर्व विषयेषु यत्सानंदसुखमन्वभावि तेनातितुष्टोऽहं श्रीमतां धन्यवादं दधामि। दधामिच निजहृदये परोपकारं । अथावश्यककर्तव्या-

---

* हें संगृहीत व्हावयास कारण असें झालें कीं शिक्षणविषयक कमीशन बसलें होतें. त्यापुढें रमाबाईची साक्ष व्हावी अशी शिफारस कांहीं दैनिक पत्रांनीं केल्यावरून या विदुषी बाईचें अल्पचरित्र बालबोध मासिकास सजेसें लिहितां येईल येवढी माहिती रावसाहेबांनीं मिळविली होती.

नेककार्यव्यग्रमनसा मया यत्पत्रप्रेषणे विलंबो व्यधायि तदपराधं क्षमापायितुं प्रार्थये। श्रीमतः क्षमाशालिनः सुजनान् इतिशम्। त्रिपाठि *रामेश्वर दत्तशर्मणः

श्रीमज्जगदीशप्रसादावाप्तनिखिलमनोरथेषु; लोकसुदुर्लभविद्याविनयसामानाधिकरण्यभूमिभूतेषु, अबाधितगुणग्रहणतत्परेषु, राजाधिकारणधुरीणेषु **राव**-साहेब इति संमानितपदमंडितेषु, **मं**डलीकोपाभिध **वि**श्वनाथनारायणनामकेषु निरंतरस्नेहाभिलाषिणः श्रीमत्त्र्यंबकक्षेत्रनिवासिनो लेलेइत्युपनामकस्य सदाशिवशास्त्रितनूभवस्य गणेशशर्मणोऽनन्तनतिपरंपरा विलसन्तुतराम् ॥ विज्ञापनीयांशस्तु इत्थं महाराष्ट्र गिरैवोच्यते.

×**ग**णेशशास्त्री लेले.

याच्या पुढील मजकूर पत्राच्यावरील भागांत सुचविल्याप्रमाणें मराठींत आहे.

या प्रमाणें शास्त्री मंडळी जे मायने लिहितात त्यांचे ठराविक स्वरूप नाहीं. मायन्याचा प्रारंभ गुणवर्णनात्मक असतो व तें गुणवर्णन अलंकारिक असतें.

कांहीं वाग्देवीचे सेवक **रा**वसाहेबांवर कविताप्रबंध रचीत असत त्याचा एक मासला पुढें दिला आहेः—

**रा**जन्ते यस्य चित्राणि **ब**हूनिचरितान्यतः। **क**थं न स्यात् सस्तवार्ह आर्यसंघे विशेषतः।

**व**र्यत्वं व्यवहारेऽस्ति **मं**डयन् हूणपत्तने। **यां**तीतिवादायस्याग्रे शीर्षण्यानामपिस्वयम् ॥

**सा**द्गुण्यमेवभवति **ड**मरी यस्य वर्णने **प्र**ल्हाद इव सद्ग्राहोऽर्वाचीनो भवेत्सतुः।

**हे**तुर्भेनेतियच्छब्दो **ली**नकामो न दुर्वहः **ति**ष्ठेत्सश्रीत्र्यंबकेतुदयार्हो विश्वनाथकः ॥

( त्र्यंबक रामचंद्र जोशी. )

---

*हे शास्त्री काशीचे रहाणारे होते.

×यांनीं कोलंबसाच्या जलाटनवृत्तावें मराठींत भाषांतर केलें होतें. व मुद्राराक्षसाचें गद्यात्मक भाषांतर हातांत घेतलें होतें.

## प्रकरण ७७ वें.

# रावसाहेबांचीं मतें.

। सुचिन्त्य चोक्तं सुविचार्य यत्कृतम् ।
॥ सुदीर्घकालेऽपि न याति विक्रियाम् ॥

( सुभाषित )

स्वतांचें असें कांहीं मत असणें हें मोठें बुद्धिलक्षण आहे. स्वयं निर्णय शक्तीबद्दल **राव**साहेबांची ख्याति होती. त्याचप्रमाणें मतांच्या निश्चितपणाबद्दल त्यांची लोक प्रशंसा करीत. म्हणून या प्रकरणांत त्यांचीं कांहीं विषयांवरील मतें आढळलीं तशीं दिलीं आहेत. त्यांत एखाद दुसरें त्यांच्या स्नेह्यांपैकीं एकाद दुसऱ्याचें दिलें आहे.

कोणताही कायदा करावयाचा झाला कीं त्यावर आपलें मत देण्यास **राव**साहेबांकडे सरकारांतून विनंतिपत्र येत असे. व त्याप्रमाणें **राव**साहेब आपलें मत विचार करून देत असत.

**सरकारांत होऊं घातलेल्या कायद्याविषयीं रावसाहेबांचें पहिल मत.** ( " शपथ व प्रतिज्ञा देण्या विषयीं हल्लीं कायदा चालू आहे त्यामध्यें न्यायाच्या कोडतांत पुरावा घेण्याची रीति मुख्यत्वें सुधारण्याच्या हेतूनें कांहीं फेरबदल केला असतां फायदा होईल किंवा कसें " इ. प्रश्न १८४० चा एक्ट ५ यांत फरक करण्याचा विचार करून सरकारांतून **राव**साहेबांकडे आले होते. त्यावरून त्यांनीं **व**सई मुक्कामचे बदली मुनसिफ या नात्यानें रिपोर्ट केला तो. )

१ सांप्रत न्यायाचे कोर्टामध्यें पुष्कळ लोक खोट्या साक्षी देतात यांत अगदीं संशय नाहीं आणि जरी त्यांस शपथ दिली अगर त्यांजकडून प्रतिज्ञा

करविली तरी खोटें बोलण्यास भीति राहत नाहीं. दुसरें असें अनुभवास येतें कीं जो खरें बोलणारा आहे तो शपथेशिवायहि खरें बोलतो.

२ मनुष्याच्या स्वभावाचा विचार करूं लागलें असतां मला असें दिसून येतें कीं सत्याची प्रीति आणि खोट्याचा द्वेष हीं मनुष्याच्या मनामध्यें विद्ये-वांचून उत्पन्न होणार नाहींत. जितक्या लांब लांब आपण शपथा अगर प्रतिज्ञा कराव्या तितक्या त्या अधिक निरर्थक होतात.

थोड्या अनुभवामध्यें असें माझे दृष्टीस आलें आहे कीं पुष्कळ साक्षीदार लोक कांहींच मनांत खऱ्या खोट्याचा विचार न करतां प्रतिज्ञा अगर शपथ करतात व घेतात. जसें कांहीं ओझें उचलून पावकोश न्यावयाचें त्याप्रमाणें इतके शब्द बोलले म्हणजे झालें असें ते समजतात.

३ गांवढ्या गांवामधील भोळे लोक ज्यांस विशेष या जगाच्या व्यवहाराचें ज्ञान नाहीं, त्यांस साक्षीस उभें केलें आणि प्रतिज्ञा द्यावयास लागलें म्हणजे ते प्रतिज्ञा ही काय आहे हें कांहीं न समजतां लागलेंच सांगतात. " साहेब मी खरें जें मला ठाऊक आहे तें सांगेन. " तेव्हां अशा तऱ्हेच्या लोकांस उगाच लांब लांब प्रतिज्ञा अगर शपथ दिल्यानें कांहीं फायदा होईल असें दिसत नाहीं.

४ शहरांतील अथवा मोठ्या गांवामधील लोक, यांतून क्वचित् सत्यवादी लोक खेरीज करून, शपथेची अगर प्रतिज्ञेची समजून उमजून नियमितप-णानें अवगणना करतात. अशा लोकांस जरी गंगेंत* बुडविलें अगर कुराणा-वर बसविलें अगर त्याचे डोक्यावर बैबल पुस्तक दिलें तरी ते खोटें बोल-ण्यास चुकणार नाहीं. अशा लोकांस खोटी शपथ दिल्याचें त्वरित शासन मिळण्याचा जर कांहीं सुलभ उपाय कायदे करणारे कौन्सिल योजतील तरच मात्र शुद्ध भीतीनें कांहीं खोट्या शपथेचा गुन्हा कमी होईल तर होईल, दुसरा कांहीं इलाज दिसत नाहीं.

५ या सर्व कारणांवरून मला असें वाटतें कीं ' मी खरें बोलेन एवढी प्रतिज्ञा देऊन सर्व लोकांची साक्ष घ्यावी. ' ता. २५।१।१८५९

*१८४० च्या ॲक्टाप्रमाणें हिंदु व मुसलमान हे गंगोदकाची व कुराणाची अनुक्रमें शपथ घेत असत.

## गुरुजी व देहदण्ड

देहदंड शिक्षकांनीं करूं नये असा बोर्ड आफ् एज्युकेशनचा ठराव आहे. तिकडे दुर्लक्ष अजूनही होत आलेलें आहे. हें रावसाहेबांस पसंत नसे. १८६६ सालीं दिसेंबर महिन्यांत त्यांचा एक भाचा जगन्नाथ शंकरशेटच्या शाळेंत जात असे. वर्गांतील शिक्षकानें अभ्यास न केल्याबद्दल देहदण्ड केला. या विरुद्ध रावसाहेबांनीं तक्रार केली. शाळेचे मुख्य प्रसिद्ध महादेव चिमणाजी आपटे ( मागाहून प्रसिद्ध वकील ) हे होते. त्यांनीं चवकशी करून ज्या शिक्षकानें देहदण्ड केला त्याच्या कडून क्षमा मागवून हें प्रकरण मिटविलें.

( आपटे यांचें ९–१–६७ चें पत्र. )

पुढें ३१–१–६७ च्या पत्रानें वरील शाळेंतील शिक्षकांच्या विरुद्ध वरील प्रमाणेंच शाळाखात्याचे मुख्याधिकारी यांच्याकडे डाक्तर नारायण दाजी यांनीं तक्रार केली. त्यांत त्यांच्या मुलाचा कान जोरानें पिळवटला म्हणून लिहिलें होतें. त्या प्रकरणाची चवकशी करून सर ग्रँन्ट साहेबांनीं उत्तर दिलें कीं एज्युकेशन इन्स्पेक्टर मध्यप्रांत यांच्या कडून या प्रकरणाची चवकशी करविली. त्यांत असें निष्पन्न झालें कीं शाळेची शिस्त व नियमितपणा राखण्याकरतां जें करणें वाजवी होतें त्यांहून अधिक कांहीं करण्यांत आलें नाहीं.

गोकुळदास तेजपाळ यांच्या धर्मादाय शिक्षण संस्थेचे रावसाहेब व्यवस्थापक मंडळींचे सभासद होते. या धर्मदायांतूनच चालविलेल्या मुलींच्या शाळेंतील एका शिक्षकानें ‘ रतन नांवाच्या माझ्या मुलीला देहदण्ड केला ’ अशी तक्रार रा. द्वारकादास वसनजी या गृहस्थाकडून रावसाहेबांकडे आली होती. या प्रकरणाची चवकशी करण्यास रावसाहेबांनीं पंच नेमिले व डॉ. भाऊ व डॉ. भिकाजी अमृत यांनीं या मुलीची तपासणी करून आपला अभिप्राय पंचांकडे पाठवावा अशी विनंति केली. येथवर आल्यावर मार दिल्याचा पुरावाच मिळाला नाहीं. म्हणून प्रकरण निकालांत काढण्यांत आलें.

## पार्लमेंत सभेंतील पक्ष व हिंदुस्थान.

हिंदुस्थान हें कोणत्या पक्षाला ( राजपक्ष अथवा प्रजापक्ष यांतून एकाला ) धरून नाहीं. ७।११।७९ चें ज. जेकज यांस पत्र.

## काउन्सिलचा सभासद कसा असावा.

काउन्सिलच्या नेमणुका सरकार करीत असे त्यांत लोकांकडून निवडणुकीचा भाग नसे. " माझ्या मताप्रमाणें जो मनुष्य नेमावयाचा तो कसला तरी धंदा करून द्रव्यार्जन केलेला, उच्चप्रतीचें शिक्षण न मिळालेला, दुर्लौकिकाचा अथवा महाराष्ट्रीय लोकांत प्रतिष्ठा न पावलेला असा नसावा. ( मि. वुड यांस पत्र ११।८।७२. )

## पोस्टेज

कित्येक देशांत पोष्टाच्या तिकिटांचा दर वाढवतात तेणें करून जो मतविनिमय जगभर चालत आहे त्याचा मार्ग खुंटला जातो. ( जेकब साहेबांचें पत्र. ३।१।६१ )

## विश्वाचा एक धर्म.

पुष्कळांनीं राष्ट्रीय धर्म काढण्याचे हिंदुस्थानांत प्रयत्न केले. हिंदुस्थानांतच काय पण सर्व जगांतच एक धर्म असावा. ही कल्पना मनांत आणली तर अशा धर्माचें पीठ कोण प्राप्त करील या प्रश्नांचें उत्तर २६–८–६४ च्या पत्रांत रावसाहेबांनीं दिलें आहे तें. " मनुष्याची प्रगति जशी जशी होत जाईल तशी तशी कायद्याची महती वाढून धर्माचें पीठ तो बळकावून बसेल. व विश्वप्रेम व जीवदया या पुष्पांनीं त्याची पूजा अर्चा होईल. "

## मुलकी व न्याय खात्याची फारखत.

कलेक्टर व मॅजिस्ट्रेट यांच्या अधिकारांची विभागणी करणें अवश्य आहे असें मत प्रदर्शित करणाऱ्या तुमच्या पत्रास उद्देशून मी असें म्हणतों कीं माझें मत तुमच्या मतांशीं जुळतें. ( १२–९–६७ चें एका इंग्रज मित्रास पत्र )

ही अधिकार विभागणीची इष्टता रावसाहेबांच्या मनांत १८६७ सालापासून घोळत होती असें हें पत्र सांगतें.

## वेदाभ्यास

**स्थाणुरयं भारहारःकिलाऽभूत् ।**
**अधीत्य वेदं नाविजानाति योऽर्थम् ॥**
**यो अर्थज्ञ इत् सकलं भद्रमश्नुते ।**
**नाकमेतिज्ञानविधूतपाप्मा ॥ १ ॥** ( यास्क )

**वासुकाका आठल्ये** यांस २९–८–७१ चें पत्र. " वेद शाळेचे कामांत **रत्ना**गिरी येथील स्नेही मंडळीस होईल तितकें साहाय्य करण्यास मी तयार आहें. परंतु जर वेदपठण सार्थ होणार नाहीं तर त्यापासून कांहींच उपयोग नाहीं असा माझा अभिप्राय आहे. सांप्रत जो पुष्कळ प्रकारचा अनाचार चालू आहे तो अर्थज्ञानशून्यतेपासून होतो असा माझा समज आहे. म्हणून जरी दोन अध्याय संहिता म्हटली तरी ती सार्थ म्हणावी आणि जरी सूत्रोक्त कर्म करणें झालें तरी तें सार्थ करावें. गरीबांनीं वेद म्हणावा व श्रीमंतांनीं म्हणूं नये असें मला वाटत नाहीं. आणि आपल्या हल्लींच्या पत्रावरून कोणीहि श्रीमंत वेद म्हणत असतील असें दिसत नाहीं. याज्ञिकी करणें तेंहि ऋत्विक् जर अहितछंदस् *असतील तर त्यांचा उपयोग आहे. हें आपण जाणतच आहांत. ज्योतिष शिकविणें तर प्रथम अंकगणित, भूमिति व त्रिकोणमिति पर्यंत गणित शिकवावें असा माझा अभिप्राय आहे. ...... आदौस्ववर्णाश्रम वर्णिताः क्रियाः कृत्वा शुद्धमानसः इत्यादीच्या उत्तरार्धांत स. दु. रा. असें आहे. तेथें समित् पाणीं श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं असें टीकाकार म्हणतात. ती वस्तु उत्पन्न करण्याच्या मार्गावर तरी शाळा असावी. आपल्या बंधूस संहितेची पोथी पाठवितांना लिहिलें होतें कीं वेदाच्या अर्थाचा विचार केलात तर उत्तम होईल. "

## नायकिणीच्या मुलांमुलींना सरकारी अथवा सरकारी मदत घेणाऱ्या शाळेंत येऊं देण्याविषयीं.

उघड उघड अनीतीचे मार्गाला लावण्यांत येणारीं नायकिणीचीं मुलें सार्वजनिक शाळांत येऊं देण्याची चाल हिंदुस्थानांत समाजास विघातक होईल.

* ज्यांस स्वहिताचा छंद नाहीं म्हणजे स्वहितानिरपेक्ष असे.

मि. वुइल्यम रॉबिन्सन यांचे विचार मला साधारणपणें पसंत आहेत त्यांत अधिक जें मला म्हणावयाचें आहे तें हें.

१८४८ पासून मुंबईंतील स्टुडंटसलिटररी आणि सायंटिफिक सोसायटीच्या मुलींच्या शाळांशीं माझा संबंध आहे. व वर निर्दिष्ट केलेल्या वर्गाच्या मुलीं संबंधें आमची वहिवाट नियमानें अशी आहे कीं जों पर्यंत यांचा संबंध नायकिणींशीं आहे तों पर्यंत यांस शाळेंत येऊं द्यावयाचें नाहीं. परंतु जेव्हां असें आढळून येईल कीं याच बायां पैकीं कित्येकांनीं लग्नें करून मूळ वर्गाशीं असलेला संबंध अगदीं तोडून टाकिला आहे व तेणें करून त्यांवर घडून येणारा अनिष्ट परिणाम बंद केला आहे असें आढळेल तेव्हां त्यांच्या मुलांस शाळेंत घेण्यास हरकत नसावी. शाळाखात्याचे सरकारचे सेक्रेटरी यांस १४।२।७९ चें पत्र.

## कायम धाऱ्याची पद्धत.

मी जितका जितका शेतकऱ्यांच्या स्थितीविषयीं विचार करतों तितकी तितकी माझी अधिकाधिक बळकट खात्री होत आहे कीं कायम धाऱ्याची पद्धत आमच्या लोकांना मिळाल्याशिवाय त्यांना शांतता मिळावयाची नाहीं. व हा इलाखा भरभराटीस येणार नाहीं. Free hold व absolute redemption जर तें मळेवाल्यांस देण्यांत येतें तर त्याप्रमाणें आम्हांला कां देऊं नये? (९–८–८१ चें मि. जे. केर्ड लंदन यांस पत्र.)

तीस वर्षांनीं बदलली जाणारी धाऱ्याची पद्धति अन्याय्य आहे म्हणून तिचें काम कसें काय चाललें आहे याविषयीं व पुन्हां धारा वाढविण्याच्या नियमाचा अभाव पाळला तर तेणेंकरून काय होईल असा प्रश्न मी एका काव्हनंटेड सिव्हिलियनाला विचारला. माझ्याशीं त्याला युक्तिवाद करतां येईना. तेव्हां म्हणाला कसें! धारा जर एकदांचा कायम ठरवून टाकला तर तुम्हीं अगदीं स्वतंत्र व्हाल. मग्रूर व्हाल, असें म्हणाला नाहीं अशी माझी खात्री नाहीं. (२–४–८० चें खिस्तोदास यांस इंग्रजीत पत्र.)

दुष्काळाचे प्रश्नाबरोबर कायम धाऱ्याच्या पद्धतीचा प्रश्न आपण हातांत घ्याल अशी आशा आहे. मुलकी खात्यांतील अम्मलदारांच्या क्षुल्लक बाबतींत हरहमेश होणाऱ्या त्रासांतून आमची मुक्तता झाल्याशिवाय आमची प्रगति

व्हावयाची नाहीं. बाहेरच्या लोकांना जीव नकोसा व्हावयाला नको असेल तर सर्वांची हरएक बाबतींत पूजा करावी लागते. माजी कर्नल बेर्ड स्मिथ याचा नार्थवेस्ट प्राव्हिन्सिसमध्यें १८६०–६२ सालांत पडलेल्या दुष्काळासंबंधें उत्तम रिपोर्ट आहे. त्यांत त्यांनीं कायम धाऱ्याची पद्धति सुरू करण्याविषयींचा पक्ष चांगलाच उचलून धरिला आहे. मला त्या पुस्तकाची प्रत आतां मिळत नाहीं. माझ्या एजन्टाला मिळाली तर पाठवीन.

( २१–८–८० चें रा. ब. म. गो. रानडे यांस इंग्रजींत पत्र. )

रावसाहेबांच्या मताला पुष्टि देणारे बंगाल्यांत प्रत्यक्ष जमीनदार आहेतच. परंतु मद्रासेंतही त्या मताचे कांहीं लोक होते. महाराणी साहेबांस पाठविण्याकरतां तयार केलेल्या अर्जांत कायम धाऱ्याची पद्धति सुरू करावी अशी विनंति दिवाण बहादुर आर रघुनाथराव यांनीं केली होती. पण याशिवाय आमच्या येथील दोन मोठे विचारी गृहस्थ म्हणजे रा. ब. रानडे व नामदार तेलंग यांचे मत पुढील पत्रांत आहे.

" दक्षिणेंतील कर्जानें बुजबुजलेल्या शेतकऱ्यांसंबंधें जो कायदा काउन्सिल पुढें आला आहे त्यासंबंधें तुमच्या मुंबईअसोसिएशननें पाठविलेली अर्जी वाचून मी फार समाधान पावलों. परंतु ज्यावेळीं अशा महत्त्वाचा कायदा राजसभेंत होऊं घातला आहे त्या ऐन वेळेसच तुम्हीं तिचे सभासद आधीं असूनहि आतां नसावेत हें मोठें दुर्दैव आहे. यानें सर्व देशाचें नुकसान होणार आहे. रा. रा. तलंगांचें मत असें आहे व माझेंहि तसेंच आहे कीं या प्रसंगाचा फायदा घेऊन शेतकऱ्यांची दुःस्थिति निवारण्याचा जो प्रश्न पुढें उभा आहे तो सोडवण्याचा हल्लींच्या स्थितींत एकच मार्ग म्हणून कायम धाऱ्याच्या पद्धतिची मागणी करण्यांत आली असती तर फार चांगलें झालें असतें. पुढें आलेल्या कायद्याच्या हेतूंशीं या मागणीचा संबंध नाहीं हें खरें आहे तथापि त्यांतील इंगित असें आहे कीं वेळीं अवेळीं हीच मागणी केली पाहिजे. वर्षानुवर्ष उलट उपाय योजणाऱ्या लोकांच्या हातून या प्रश्नाचा निकाल दुसऱ्या कोणत्याही तत्त्वावर होण्यासारिखा नाहीं. " ( ९।१।७९ रोजीं रा. ब. म. गो. रानडे यांनीं रावसाहेबांस लिहिलेलें पत्र. )

पेट्रिअट मधील एका इंग्रजी पत्राचा उतारा रावसाहेब देत तो असा " कायम धाऱ्याच्या पद्धतीमुळें जमिनदारांनीं इतका पैसा जमिनीवर खर्च केला आहे कीं बंगाल्यांत ज्या ठिकाणीं क्लाइव्ह असतांना दुष्काळ पडला म्हणजे मुलें विकून तांदूळ विकत घ्यावे लागत इतका कहर उडत असे तें ठिकाण आतां तेथें दुसऱ्या कितीही आपत्ती असल्या तरी सर्व पृथ्वीवर क्षुधेच्या बाधेशिवाय राहिलेलें असें एकच होय. " ( १८६५ ) कायम धारा पाहिजे असें जे रावसाहेब म्हणत तें स्वानुभवावरून म्हणत.

" आमची एक खार होती. तिला लागवडीस आणावयास व बांधबंधस्ती करावयास १५००० रुपये लागले. एवढे रुपये खर्च करून कौलाप्रमाणें आकार देऊन शेंकडा एक रुपया व्याज पडत नाहीं. आमचा सरकारावर लावलेला दावा रद्द होऊन याच्यापेक्षां वरचढ असलेल्या सर्व्हेच्या दरानें आकार द्यावा लागल्यास ती खार आम्हांस सोडून दिली पाहिजे. कायम धाऱ्याची पद्धत लागू झाल्याशिवाय मी जमीनींत एक पैही घालणार नाहीं. माझें मत सध्या असें झालेलें आहे. दुसऱ्याच्या पैशानें प्रयोग करून पहाणें हें एक व स्वतांच्या खिशांत हात घालणें हें निराळें आहे." वि. ना. भागवत यांस पत्र. २।११।१८७३.

मी लार्ड कॉर्नवालीस यांचा प्रशंसक आहें. मला वाटतें कायम धाऱ्याची पद्धत सर्व देशाला लावली पाहिजे ( १५।९।८८ डॉ. राजेंद्रलाल यांस पत्र. )

कायम धाऱ्याची पद्धत अजमीरास लागू करण्याला सरकारची संमति मिळाली. सर्व देशास ही लागू करावी अशी माझी इच्छा आहे. त्या योगें पुष्कळ खर्च वांचेल, निराशा होणार नाहीं व क्षोभास कारण राहणार नाहीं. ( ज. जेकब यांस पत्र. )

## संस्थानें.

संस्थानांविषयीं आमचें धोरण म्हणाल तर त्यांचें रक्षण करणें व त्यांची सुधारणा करणें. परंतु जमीन धाऱ्यासंबंधें विचाराल तर कायम धाऱ्याची

पद्धति सुरू झाल्याशिवाय एकासही सुरक्षितता प्राप्त व्हावयाची नाहीं. ( ४।९।८४ चें आपा आठल्ये यांस पत्र. )

हिंदी संस्थानांवर पुष्कळ शिकलेल्या लोकांची भक्ति होती. रावसाहेबांची तर विशेष होती. ने. ओ. मध्यें ते त्यांवर लक्ष ठेवून लेख लिहीत असत.

अनेक वेळां त्यांस दिवाण नेमण्याचा प्रयत्न झाला. पण ते गेले नाहींत. तें बरें झालें कारण त्यांचें तेथें पटलें नसतें. कां तें ज. जेकब यांनीं एका पत्रीं स्पष्ट केलें आहे तें असें:—

## संस्थानिक व पाश्चात्य संस्था.

" तरुण हिंदी लोकांस एक खोड लागून गेलेली दिसते ती ही कीं, आपणांस जी पाश्चिमात्य राज्यपद्धति आवडते ती सर्व हिंदुस्थानास आवडली पाहिजे असें त्यांस वाटतें. हिंदुस्थानच्या मध्यभागांतील लोकांस व सर्वत्र कोनाकोपऱ्यांत पसरलेल्या संस्थानिकांस पाश्चात्य विचार रुचत नाहींत. व पाश्चात्य संस्था तेथेंही लोकांच्या मनाची तयारी होण्यापूर्वीं स्थापन करणें म्हणजे मुलांना तट्टावर बसतां येण्यापूर्वीं मोठ्या घोड्यावर बसविण्यासारखें आहे. सावन्तवाडीस असतां मोठी शिवी दिलेली जी ऐकत होतों ती ही कीं:— " गोंव्याचा न्याय तुझ्या डोयीवर आदळो " ( २४।९।६७ क० जेकबचें पत्र. )

" माझी व कच्छचे राव यांची भेट झाली तेव्हां मी त्यांस इंग्रज सरकारास राजी ठेवण्याचा एकच उपाय सुचविला व तो कोणता तर प्रजेला सुराज्याचा लाभ देणें. " ( कित्ता )

## एक लिपी.

सर्वत्र एक भाषा असावी कीं नाहीं याबद्दल रावसाहेबांचें मत काय आहे तें कळलें नाहीं पण एक लिपी असावी असें त्यांचें मत होतें. " तामिळ लिपी लिहितां येत नाहीं म्हणून दुःख वाटतें कारण तो एक उणेपणाच आहे. होईल तें करून नेपाळपासून रामेश्वरापर्यंत एक लिपी करण्याकरितां सर्व हिंदुस्थान एक होईल तर काय मौज होईल ! "

त्रावणकोरचे राजे रामवर्मा यांस २५।१२।७९ चें पत्र.

## रेलवे व तिसऱ्या वर्गातील उतारू.

हिंदुस्थानांतील तिसऱ्या वर्गातील उतारूंचा प्रश्न त्या रेलवे इतकाच जुना दिसत आहे. या उद्वेगकारक प्रश्नाकडे रावसाहेबांचें लक्ष गेलें होतें. त्यांचे एक इंग्रज स्नेही कलकत्त्यास काउन्सिलर झाले व त्यांकडे रेलवेचें काम गेलें आहे असें समजतांच त्यांस २६।१०।८० रोजीं पत्र लिहिलें त्यांत पुढील मजकूर होता. “तुम्हीं आतां रेलवेच्या तिसऱ्या वर्गातील उतारूंचा प्रश्न हातांत घ्यावा अशी माझी इच्छा आहे. रेलवेच्या कामांत बहुत सुधारणा कर्तव्य आहेत. त्या केल्यानें उतारूंची संख्या वाढेल. द्रव्याची प्राप्ति वाढेल. बहुजन समाजास सौख्य होईल. हल्लीं तर त्यांस मेंढ्यांप्रमाणें वागविण्यांत येत आहे. व त्यांच्या डब्यांस मेंढवाडेच म्हणतात. बैल, घोडे इ. प्राण्यांस निर्दयतेनें वागविणाऱ्यांस शिक्षा करण्याकरितां मंडळ्या ज्या युगांत स्थापिल्या जात आहेत त्याच युगांत वरील प्रकार घडत आहेत.”

## योगिराज.

लोणारें हें गांव आपल्या टापूंत आहे काय? असेल तर त्याच्या जवळपास जाल तेव्हां थोड्या परिश्रमानें चौकशी करून खालील माहिती काढावी. तेथें जवळच एका गुहेंत एक योगिराज आहेत, असें ऐकितों. ते पाहिजे त्याची भेट घेतात काय ? घेतल्यास नीट बोलतात काय ?

‘पूर्वेकडे माझीं ३५ वर्षें’ या नांवाच्या होईल बगैर यांच्या ग्रंथांत मी एका योग्याच्या समाधीची हकीगत वाचिली. रणजितसिंगाच्या वेळीं त्या योग्यानें आपणास ४० दिवस जमिनींत पुरून घेतलें होतें. जर जीव अशा रीतीनें ४० दिवस कोंडतां येतो तर ४० वर्षें, नव्हे ४०० किंवा अधिक वर्षें कां कोंडतां येऊं नये ? फावल्या वेळीं माझे करितां या प्रश्नाचा विचार आपण करावा अशी इच्छा आहे. ( रावसाहेबांचें आपल्या एका शास्त्री मित्रास १३–४–७१ चें पत्र. )

दरभंग्यास एक योगिराज आहेत ( त्यांस लोक जोगिराज म्हणतात ) त्यांची चौकशी तुम्हीं आपल्या तेथील मित्राकडून करावी. त्यांची स्वारी अद्यापि तेथें

आहे कीं नाहीं तें मला कळवावें. त्यांचें नामाभिधान लक्ष्मीनाथ गोसाई असें आहे. त्यांचा तेथें एखादा मठ किंवा देवालय आहे काय ? त्यांची स्वारी तेथें असल्यास मी त्यांच्या दर्शनास आतां नाहीं तर येत्या मार्च महिन्यांत येईन.
( ९।२।८५ चें **फ्रामजी नवरोजी** शेट पार्शी यांस पत्र )

**अस्तास जातांना.**

नवीन अधिकारापन्न होणाऱ्याचा सन्मान केला तर तो सन्मान करणारा उदयोन्मुख रवीचा उपासक आहे असें लोक नांवें ठेऊं लागतात. त्याचप्रमाणें आपल्या आयुष्याचीं उत्तम वर्षें येथें घालवून परत देशीं अधिकारी जाऊं लागले व त्यांच्या सर्वच कृती सर्वांस आवडत्या नसल्या म्हणजे त्यांस मानपत्र वगैरे अर्पण करावें कीं नाहीं हा पेंच त्या मनुष्यांच्या मित्रांपुढें उभा रहातो. मानपत्र दिलें तर लोक नांवें ठेवतील; न द्यावें, तर मित्रविषयक कर्तव्य पार पडलें नाहीं असा दोष येईल. अशा कधीं कधीं येणाऱ्या प्रसंगीं कसें वागावें तें **रावसाहेबांनीं** ठरवून ठेवलें होतें. खासगी व्यक्ति या नात्यानें पहातां सर्व लोक विरुद्ध असले तरी त्या व्यक्तीचा सन्मान करण्यास कांहीं हरकत नाहीं असें ते म्हणत.

" तुम्हीं ( क्ष च्या ) स्मारकाच्या चळवळीपासून अलिप्त राहत आहां म्हणून मला आनंद होत आहे. खासगी व्यक्ति या नात्यानें पहातां या चळवळीच्या विरुद्ध माझें कांहीं म्हणणें नाहीं. परंतु अधिकारी या नात्यानें पहातां ते यशस्वी झाले नाहींत. जिकडून तिकडून त्यांचा उत्सवच लोकांनीं मांडला आहे. आमचा समाज वारंवार असें करून आपला आत्मघात करून आपलें अस्तित्व नाहींसें करून घेत आहे. या बाबतींत युरोपियन लोकांच्या अपराधापेक्षां आमच्या लोकांचा अपराध मोठा नसला तरी समसमान आहे. "

( हरकिसनदास यांस पत्र. )

याच तत्त्वावर **रावसाहेब** एका सरकारी अधिकारी असलेल्या मित्राच्या स्मारकार्थ व सन्मानार्थ भरविलेल्या सभेला मित्र म्हणून गेले होते. त्या सभेवर मित्रोदय पत्रांत इंग्रजींत टीका आली. ती रावसाहेबांनीं संगृहीत करून

ठेवली आहे. ती अशीः—" **क्ष** यांच्या घरीं **य**च्या स्मारकार्थ दुसरी सभा भरली होती. सभेला गर्दी निःसंशयपणें झाली होती. पण ती **य** च्या सन्माना-पेक्षां **क्ष** चा सन्मान अधिक करण्यास झाली होती. असल्या सभांस जाण्याची मोठी मौज असते. येथें कळसूत्री बाहुल्यांचा सुंदर तमाशा पाहण्यास सांपडतो. सभेच्या मध्यस्थानीं एक मनुष्य हातांत अर्धा डझन सूत्रें धरून बसतो त्यांतलें एक ओढतांच एक हास्यप्रसृतमुख गृहस्थ उभा रहातो. चार दोन वाक्यांची दीर्घ निर्घोषणा पटापट करून स्वस्थानीं उपविष्ट होतो. नंतर दुसरें सूत्र हालवितांच दुसरा एक महाजन स्वपदांवर भार देऊन उत्तिष्ठ होतो. व त्याच क्रियेची पुनरावृत्ति करून दाखवितो. तसलाच कंटाळवाणा प्रकार तास भरे तो यंत्रवत् चालू रहातो. सर्व सभासदांचे चेहरे मंदप्रभ व निरुत्साह दिसूं लागतात. खरा हृदयाचा भाव प्रकट करण्याकरतां ज्या सभा भरतात त्यांत जमलेल्या लोकांच्या चेहऱ्यावर जो सहर्ष उत्साह दिसतो, जी कार्याची उमेद दिसते, जी आस्था दिसते त्यांतलें येथें कांहीं एक दृष्टीस पडत नाहीं. "
" मंडलिक यांनीं **य**च्या खासगी गुणांची तारीफ करून आपणास लोकांच्या टिकेंतून वटाऊन " घेतल्याबद्दल त्यांची तारीफ करून हा उपहासात्मक लेख पत्रकारानें पुरा केला आहे.

## निर्गत मालावरील जकात.

" येथें उत्पन्न झालेल्या निर्गत मालावर जर कर बसवावयाचें तुम्हीं सुचविलेंत तर त्यानें निर्गत माल कमी होईल, व तो माल तयार करणारे, गिरणींत काम करणारे आमचे मजूर बेरोजगारी होतील. "

( सोराबजी बेंगाली यांस ३।१।८६ चें कलकत्त्याहून लिहिलेलें पत्र. )

## धंदे शिक्षण.

"कामाच्या अडचणीमुळें तुमच्या कृपापत्राचें उत्तर लिहावयास वेळ झाला नाहीं. धंद्यासंबंधाचीं व इतर कामें आधींच हातांत येऊन इतकीं पडलीं आहेत कीं आणखी कांहीं कामें घेण्यास वेळ नाहीं. तथापि मुंबापुरीच्या हिता-

कारितां माझ्यानें होईल तें करण्यास मी तत्पर आहें. म्हणून माझा उपयोग जर होत असेल तर तुम्हीं योजलेल्या कमीटींत माझें नांव घालावें.

आतां जी योजना पुढें आणली गेली आहे, तिनें मुंबापुरीचें कायमचें हित साधेल असें वाटत नाहीं. जर आम्हीं कांहीं लाख खर्चावयाचें मनांत आणलें आहे तर लोकांस त्याचा मोबदला दिलाच पाहिजे. व तो कांहीं शृंगारिक रचना, चित्रांचें प्रदर्शन या रूपाचा नको. तो ज्यांची स्थापना झाली असतां लोक चार धंदे करूं लागतील, त्या धंदे शिक्षणाच्या शाळांच्या रूपांचाच हवा." २६।६।८४ चें ॲडम्स यांस पत्र."

" लार्ड रिपन यांचे चिरकालिक स्मारक आम्हांस करावयाचें आहे. व तें धंदेशिक्षणाची संस्था काढून करावयाचें आहे. ती काढल्यावर पूर्णतावस्थेस न्यावयास कालावधि लागेल. तों पर्यंत एक दोन धंद्याच्या शाखा काढण्याची आम्हांस आशा वाटत आहे. उदाहरणार्थ सुतार काम, ओत काम, टांचणी कशी करावी या लघु कलेपासून जहाजें कशी बांधावीं या कलेपर्यंत सर्व प्रकारच्या हस्तकलांचें शिक्षण लोकांस द्यावयाचें मनांत आहे.

## आमची श्रीमंती व खर्च.

आम्ही श्रीमंत होत आहों का गरीब होत आहों ! × × × × × × क्ष आमच्या श्रीमन्तींचें चित्र चांगलें रंगवून काढीत आहेत. मुंबई शहर पाहून तुम्हीं दिपावून जाणार नाहीं अशी आशा करतों. मुंबई म्हणजे हिंदुस्थानाचा सर्व पश्चिम प्रान्त नव्हे. सुधारणा वाढत आहे असें लोक म्हणतात; पण खर्च त्याहून अधिक झपाट्यानें वाढत आहे !

( १५।१२।८५ चें मि. बर्डवुड यांस पत्र. )

## फंड.

सार्वजनिक कामें फुकाची होत नाहींत ' सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः ' या न्यायानें प्रत्येक कार्याचा आरंभ करतांना द्रव्याची गरज लागते. द्रव्य गोळा करण्याचे प्रसंग रावसाहेबांवर अनेक आले. व तें कार्य त्यांस चांगलें साधलें

होतें. त्याची किल्ली त्यांनीं आपले मित्र हरकिसनदास यांस एका पत्रांत अशी कळविली होती " द्रव्य गोळा करण्याचा हेतु काय तो आधीं निश्चित करा व मग द्रव्य गोळा करावयास आरंभ करा. या काळांत रुपयांच्या दसकड्या अथवा शंभऱ्या यांचें नांव काढूं नका. लोक आतां दिवसानुदिवस गरीब होत चालले आहेत. २०।१।८७

## ब्राह्मण मद्यपी.

" दारू पिणाऱ्या ब्राह्मणास देशरिवाजाप्रमाणें व शास्त्राप्रमाणें अपंक्त ठेवावा. आपल्या जातीच्या लोकांस दारू जो पिण्यास सांगेल त्यानें पिनल कोडाखालीं गुन्हा केला आहे असें समजत नाहीं. शंकराचार्यांनीं हें काम अवश्य केलें पाहिजे. कारण आचार्य व प्रायश्चित्तकार यांनीं घर ओटी ठेवणें आहे. त्यांच्या हुद्याप्रमाणें त्यांचें कर्तव्य आहे. तसें त्यांनीं न केल्यास दोषार्ह होतील. " ( ६।३।८३ चें सातारकर गोविंदपंत खांबेटे यांस पत्र. )

# प्रदर्शन.

## बहुरत्ना वसुंधरा

माझ्या कांहीं हिंदी व इंग्रज मित्रांनीं माझा सल्ला विचारल्यावरून मी एक राष्ट्रीय प्रदर्शन अथवा ज्यांत जगांतील सर्व राष्ट्रांस भाग घेतां येईल असें सर्व राष्ट्रांत परस्पर व्यवहारसंबंध घडवून आणणारें मुंबईंत भरविण्याची योजना तयार करीत आहें.

त्यांतील कांहीं विविक्षित वस्तूंचें तरी प्रदर्शन दर वर्षास भरवावें म्हणजे त्यास औद्योगिक संमेलनाचें स्वरूप येईल व तेथें देशांतील सांपत्तिक स्थितीचा विचार होईल. अशी संमेलनें उत्तर हिंदुस्थानांत पूर्वीं भरत त्यास ' मेळे ' ही संज्ञा देत.

डॉक्टर वेअर, आमच्या आरोग्य खात्याचे मुख्य, यांनीं—ज्यांच्याशीं ही योजना अमलांत आणण्यास कोणते उपाय योजावे यासंबंधें खल चालविला आहे त्यांनीं—मि. हार्ट यांजवळ ही गोष्ट काढवून ठेवलीच आहे. तथापि

नामदार व्हाइसरॉय साहेबांचा सौहार्ददर्शक नेट मिळाल्याशिवाय या कार्याला आरंभ आपण होऊनच मला करतां यावयाचा नाहीं. याकरितां या ओळी मी घाई घाईनें लिहीत आहें.

ही सर्व व्यवस्था आम्हीं पक्क्या काटकसरीनें जुळवून आणूं व उत्तम रीतीनें पार पाडूं. पैशाच्या पिशवींत हात घालणें झालेंच तर जितका कमी खोल घालावा लागेल तितका घालूं. आमच्या गिरणीवाल्या शेटजींचा व थोर व्यापाऱ्यांचा मला खरा पाठिंबा मिळवावयाचा आहे. व तो सुद्धां त्यांना या पासून कांहीं तरी त्यांचा फायदा होईल असें प्रत्यक्ष दाखवून दिल्यावर! हें कसें घडवून आणावयाचें त्याची सविस्तर योजना मी व्हाइसरॉय साहेबांस पुढें मागें आधीं कळवीन व मग मुंबई सरकारचे पुढें ठेवीन म्हणजे त्यास तीवर उघडपणें नीट विचार करावयास सांपडेल. नंतर मुंबई सरकारच्या मार्फत सर्व प्रकरण व्हाइसरॉय साहेबांकडे रवाना होईल. हें प्रदर्शन मला एक राष्ट्रीय संस्थाच करावयाची आहे. व तिचा उपयोग लोकशिक्षणाचे कामीं ( लोकशिक्षण या शब्दाचा जितका उच्च अर्थ आह्मीं करतों तितक्या अर्थानें ) होईल. म्हणून मी विनंति करतों कीं एवढी गोष्ट—तिच्या मेहेर नजरेनें विचार होण्याकरितां—लार्ड रिपन यांचे पुढें ठेवावी ह्मणजे उपकार होतील. ( मि. प्रिमरोज यांस १०।१२।८३ चें पत्र. )

## पुणें डेक्कन एज्युकशन सोसायटीचें कालेज व सरकारी ग्रॅन्ट*

* डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना होण्यापूर्वी प्रोफेसर **वामन शिवराम आपटे** यांनीं **रावसाहेबांचा** सल्ला विशेषतः संस्थेचे नियम करण्यांत घेतला होता. संस्थेच्या चालकांस म्हणजे शिक्षकवर्गास मेहेनताना काय असावा, एकादा संस्थेस जन्मभर वाहून घेतलेला सभासद आंत राहिल्यानें संस्थेची गैरसोय होऊं लागली तर काय करावें, संस्थेचे जे निधिसंरक्षक असतील त्यांची जबाबदारी किति असावी इ. बाबींविषयीं **रावसाहेबांनीं** आपलें मत दिलें होतें. यासंस्थेचे **रावसाहेब** पेट्रन, ट्रस्टी व, फेलो होते, व या संस्थेच्या चालकांकडे यांचें लक्ष सदैव असे.

" बळवंतराव टिळ्कांकडून अथवा दुसऱ्याकडून त्यांच्या व त्यांच्या सहकारी

नवीन नेटिव्ह कालेजाची स्थापना ज्या अंतर्गत तत्त्वांवर होणार आहे तीं तर बळवंतरावांनीं सांगितलेल्या तत्त्वांच्या अगदीं विरुद्ध आहेत. बाळांच्या लीला बाळांसच आनंदवितात या अर्थाचा जो गोल्डस्मिथचा चरण आहे त्याचें तेवढें स्मरण करून देण्याच्या कामीं या कोनाशिला समारंभाचा उपयोग होत आहे दुसरा कांहीं नाहीं. ( ६।३।८५ चे दाजीसाहेब खरे यांस पत्र. )

( सरकारी ग्रँट मंडळी घेणार असें समजल्यावर )

आमच्या पुणेकर तरुण मित्रांनीं दुपारच्या एक वेळच्या जेवणाखातर आपणांस विकून घेतलें. यांच्या नूतन विद्यालयास दारिद्र्यांत आणखी पन्नास वर्षें पडून राहावें लागलें असतें, तरी मला बरें वाटलें असतें पण राजकीय तंत्रास वश होऊन त्यांचें श्रीमंत होणें रुचत नाहीं. ( प्रि. वर्ड्स्वर्थ यांस पत्र २८।११।८५ )

## उच्च दर्जाच्या जागांवर हिंदी लोकांची नेमणूक.

सिव्हिल सर्व्हिसमध्यें हिंदी लोकांचा खरा प्रवेश १८३३ सालीं झाला. नंतर विलायतेस होणाऱ्या परीक्षेला बसण्याचा अधिकार मिळाला. परंतु तिकडे येथून जाणें सुलभ नसल्यामुळें त्या अधिकाराचा फायदा हिंदी लोकांस मिळत नाहीं अशी पार्लमेंत सभेपर्यंत तक्रार हिंदी लोकांनीं केली, त्यामुळें येथें स्टॅटच्यूटरी सर्व्हिस सुरू झाली. त्यांत भरती नेहमींच चांगल्या लोकांची होत नाहीं अशी तक्रार सुरू होऊन सरकारानें चालू असलेल्या स्थितीची चवकशी करण्यास एक कमीशन बसविलें. त्याचे प्रश्न रावसाहेबांकडे आल्यावर त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें आपलें मत दिलें:—

---

मित्रांविषयीं कांहीं तुम्हांस कळून आलें आहे काय ? येत्या अक्टोबरच्या सातव्या तारखेपासून केसरीशीं विरोध करणारें एक वृत्तपत्र निघणार आहे. आपसांतील मतभेद बरेच दिवस धुमसत होते असें म्हणतात; ते आतां पेट घेणार ! पुण्यपत्तन-वासी जेसूट नाश पावणार ! त्यावर कांहीं उपाय चालण्यासारखा आहे काय ?"

( २४।८।८८ चें यशवंतराव ऊर्फ बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

" स्टॅटयूटरी सर्व्हिसच्या कायद्याचा अम्मल काळजी घेऊन करावा व मनुष्यांची निवड करतांना मेहरबानीला जागा न मिळावी म्हणजे खुशामत करण्याच्या भानगडींत कोणी पडणार नाहीं. व ज्या उमेदवारांची योग्यता सिद्ध झाली आहे त्यांचीच निवडणूक करावी; त्यानें देशाचा फायदा होईल. पाहिजेत त्यापेक्षां दुप्पट लोकांची निवडणूक करवून मग त्यांची परीक्षा घ्यावी व तींत लायक ठरतील तेवढे घ्यावे.

सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा एकसमयावच्छेदें करून हिंदुस्थानांत व इंग्लंदांत भरावी *

येथील परीक्षा उतरल्यावर तरुण उमेदवारांस इंग्लंदला पुढील शिक्षण मिळण्यास पाठविण्याच्या मी विरुद्ध आहें. पुढील शिक्षण येथें मिळण्यासारखें आहे. त्यांस कोणी मार्गदर्शक पाहिजे असें मी ३५ वर्षांच्या सार्वजनिक कामाच्या व ११ वर्षें मुंबई इलाख्यांत सरकारी विविध खात्यांत केलेल्या नोकरीच्या व २४ वर्षें हायकोर्टांत वकीली केल्याच्या अनुभवावरून सांगतों. तरुण वयांत मनुष्यास दोन वर्षें परक्या देशांत आपला समाज व इष्टमित्र यांच्या पासून दूरदूर राहून मन विलोभून जाण्याच्या अनेक संधी असतां परत येतांना तत्त्वतः झालेल्या सुखाच्या मोटा पदरांत बांधून आणतां येणार नाहींत. तो येतो तेव्हां त्याच्या राष्ट्रीय भावना नष्ट झालेल्या असतात. वरवर पाहून परकीयांच्या संवयी त्यास जडलेल्या असतात; आपल्या लोकांविषयीं त्याचें मन सहानुभूतिरिक्त असतें व युरोपियन सुधारणांचें मुख्य आगर बघून ज्या भावना मनांत उद्भवतील त्यांच्या आधारावर त्याचीं मतें बनलेली असतात. एकदम देशान्तर केल्यानें त्याची प्रकृतिही बिघडण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत कोणत्याही आईबापांनीं आपल्या मुलास इंग्लंदला पाठविणें शहाणपणाचें होणार नाहीं. माझा संपर्क पुष्कळ युरोपियनांशीं झाला व मला त्यांच्यापासून जरूर त्या शिक्षणाचा लाभ झाला.

* आतां परीक्षा दोन ठिकाणीं भरत असतां दोन ठिकाणीं परीक्षा कां भराव्या त्याचीं रावसाहेबांनीं दिलेलीं कारणें देण्याची जरूर नाहीं. ह्मणून तीं दिलीं नाहींत.

कांहींनीं साक्षींत असें सांगितलें कीं हिंदूंच्या सवयींत व कल्पनांत या बाबतींत फेर होऊन आज जें ते करूं इच्छित नाहींत तें दहा वर्षांनीं फार खुषीनें करूं लागतील. या सामाजिक भविष्यावर माझा भरंवसा नाहीं. युरोपच्या इतिहासास आरंभ झाला नव्हता तेव्हां पासून हिंदूंचें हिंदुत्व हजारों वर्षे कायमच आहे व ते आपला धर्म व राष्ट्रीयत्व अजूनही पाळतील अशी माझी खात्री आहे. प्रौढ मनुष्य कांहीं विद्या शिकण्यास गेला तरी हरकत नाहीं. कित्येक साक्षी हिंदी लोकांची निंदा करणें म्हणजे शिष्टसंप्रदाय समजतात. एक म्हणतो " उच्चवर्णांतील हिंदूंना उन्हांत कष्ट करतां येत नाहींत ! " त्यांनीं असें काम करणारे मामलेदार व तहशीलदार, महालकरी व पोलीस अधिकारी कोड्यावारी काम करतात ते पाहिले नाहींत. यांतले बहुतेक उच्च वर्णांतलेच असतात.

कित्येक हिंदी लोकांच्या प्रामाणिकपणाविषयीं शंका घेतात. मला याची दाखलेसूद माहिती पाहिजे. मी असें म्हणत नाहीं कीं, सर्वच सत्याचे पुतळे आहेत. सर्व देशांतील मेंढ्यांच्या कळपांत कृष्णवर्ण मेंढ्या सांपडणारच.

कांहीं म्हणतात एक पिढीपर्यंत हिंदी अधिकाऱ्यांस शिक्षण मिळूनही कोणीही नित्य व्यवहारांतील गोष्टींत कांहीं कल्पना लढवून सुधारणा घडवून आणली नाहीं. ज्या काय सुधारणा केल्या त्या सिव्हिल सर्व्हन्टांच्या हातून झाल्या आहेत. यावर मी असें विचारतों कीं हिंदी लोकांस तुह्मीं संधि केव्हां दिलीत? व जी मर्यादा त्यांच्या कार्यक्षेत्रास तुम्हीं आंखून दिली होती तींत त्यांनीं आपलें काम वरिष्ठांस समाधानकारक रीतीनें केलें आहे किंवा नाहीं? या युक्तिवादानें मला इसापाच्या गोष्टींतील सिंह आणि मनुष्याची आठवण होते.

एकानें हिंदी समाजांत फार भेद आहेत असें दाखविण्यास दक्षिण महाराष्ट्रांतील लिंगायतांस पुढें आणलें आहे. यानें एक वेळ पंढरपूरची वारी करावयास पाहिजे होती. ह्मणजे त्याला तेथें लिंगायत व लिंगायतेतर एकाच देवाचे भजन करतांना आढळतील. उत्तम राज्याच्या कारकीर्दींत पौर्वात्य

अथवा पाश्चिमात्य देशांत सर्व भरभराटीच्या वेळीं राजकीय प्रसंगीं राष्ट्रैक्याला बाध आला नाहीं असें जगाचा इतिहास साक्ष देईल. खुद्द इंग्लंदमध्यें धार्मिक भेद तीव्र आहेत. हें लॉर्द रिपन यांची नेमणूक झाली तेव्हां समजलेंच आहे. वरील इसमानें साक्ष दिली तेव्हां यूरोपच्या इतिहासाचें त्यास विस्मरण झालें असावें.

सिव्हिल सर्विसमधील लोकांच्या पगाराचा प्रश्न कमीशनपुढें आहे. चांगले लोक या सर्व्हिस करतां मिळावे म्हणून मोठ्या पगाराची आवश्यकता आहे असें कांहीं युरोपियन म्हणतात. सिलोन सारख्या ठिकाणीं यांचा पगार काय असतो? माणसें तेथेंही चांगलीं मिळतात यावरून पगार हा ज्या जागीं जी जबाबदारी असते तिच्या मानानें ठरविलेला असतो व किति दूर यावें लागतें या लांबीच्या प्रमाणावर नसतो. देशीं मिळत नाहींत असे कांहीं फायदे त्यांस हिंदुस्थानांत आल्यानें मिळतात.

नुसत्या उदरनिर्वाहाच्या प्रश्नाकडे पाहिलें तर हिंदु रोज सहा पेन्सावर ( चार आण्यांवर ) आपला निर्वाह करूं शकेल, त्याचप्रमाणें इंग्रज, आयरिश अथवा स्काट्समन करूं शकेल. प्रोफेसर न्यूमन व त्याचे हजारों अनुग जर चार आण्याच्या किंमतीच्या पात्रावर भोजन उरकूं शकतात तर हिंदुस्थानांतील अगदीं मोठ्या जागेवर असलेला युरोपियन सुद्धां राहूं शकेल. खरें बोलावयाचें म्हणजे कमीवर राहूं शकेल. कारण येथें अन्न कमी लागतें. ज्यांस पक्वान्नेंच पाहिजे असतील त्यांस खर्च अर्थात ज्यास्ती लागेल, पण तसा हिंदीजनांसही लागेल. मद्यमांसाशनाशिवायही ऐषआरामांत हिंदी लोकांस राहतां येतें. कोणत्या वस्तू हिंदूच्या स्वस्त मिळतात तें मला कळत नाहीं. चांगल्या घरांत राहिलें असतां आम्हांस तितकेंच भाडें द्यावें लागेल. रिव्ह्यू, मासिकें, नियत कालिक वृत्तपत्रें ( विलायतेंतील व येथील समाजाच्या वर्गण्या व इतरांस द्याव्या लागणाऱ्या वर्गण्या, गाडी घोडे, रेल्वे व आगबोटीचा खर्च आह्मांस युरोपियनां इतकाच पडतो. आपल्या जड पगारांतून विलायतेस ठेवलेल्या आपल्या कुटुंबाच्या पोषणार्थ हुंडणावळ भरून युरोपियनांस पैसे पाठवावे लाग-

तात. यांतील कांहीं आम्हांसही वर्षानुवर्ष वाढत्याप्रमाणावर द्यावे लागतात. व शिवाय आमच्या गरीब दुबळे लोकांस आम्हांसच भिक्षा घालून पोसावें लागतें. त्याकरतां सरकाराला एक पैही खर्चावी लागत नाहीं. व गरीबांच्या पोषणार्थ त्यांच्या कडून काम करून घेण्यास कांहीं विशिष्ट, मोठ्या खर्चाचे, गरीबांस चीढ आणणारे कायदे करून द्यावे लागत नाहींत. यावर कोणी असें म्हणेल कीं वरील चित्रांत दाखविलेल्या भपक्यानें हिंदी लोक रहात नाहींत परंतु त्यावर आमचा असा जबाब आहे कीं हल्लींच्या त्यांच्या पगाराच्या कमी प्रमाणामुळें त्यांना असें वागतां येत नाहीं. म्हणून त्यांची रहाणी सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. व त्यांच्या असल्या काटकसर करण्याबद्दल त्यांचा मनोभंग करण्यांत अर्थ नाहीं. म्हणून पगार ठरविणें तो जागेच्या जबाबदारीच्या मानावर ठरवावा. तेथें जातिवर्णाचा भेद मनांत आणूं नये.

कांहींचें म्हणणें असें पडतें कीं राज्यकारभाराचें यंत्र भानगडीचें आहे. राज्यकारभाराचें काम जोखमाचें आहे म्हणून त्यांत एकदम फरक करणें इष्ट नाहीं हें म्हणणें मला कबूल आहे. आकस्मिक फरक करणें मला आवडत नाहीं. परंतु आम्हीं अगदींच स्वस्थ बसून उपयोगी नाहीं. गाऱ्हाण्याला योग्य कारण आहे. त्यावर उपाय योजलाच पाहिजे. कित्येक म्हणतात, ‘ कांहीं वरिष्ठ जागा युरोपियनांसच दिल्या पाहिजेत. उदाहरणार्थ कलेक्टर युरोपियन असले म्हणजे जिल्हा जज्ज युरोपियन पाहिजेत. नाहींतर न्याय खात्याच्याच कामास अपाय होईल. हायकोडतांत न्यायाधीश जज्ज नेमावयास माणसें मिळावयाचीं नाहींत. ’ हिंदी लोकांत बुद्धिदौर्बल्य आहे, असा प्रकार मुळींच नाहीं. आमचा इतिहास वैभवशाली आहे. व मध्येंच घडून आलेली कांहीं आकस्मिक भिन्नस्थिति सोडून दिली ह्मणजे तो ऐतिहासिक काल दीर्घकालिक आहे. व त्यांतील अर्वाचीन कालांतूनच कांहीं उदाहरणें काढून मी असें सिद्ध करतों कीं चांगलीं कार्यक्षम बुद्धिमान माणसें निपजविण्याची योग्यता आमचे अंगीं आहे. मी हें पश्चिम हिंदुस्थानासंबंधीं बोलत आहें. तेंच अवश्य तेवढा फरक करून सर्व हिंदुस्थानाला लागू पडेल.

**अहिल्याबाईनें** १७६५ पासून १७९६ पर्यंत माळवा प्रांतावर राज्य केलें व १७९६ सालीं साठाव्या वर्षी स्वर्लोक गांठला. " मी माझ्या अधिकारांत केलेल्या प्रत्येक कृत्याबद्दल मी परमेश्वरास जबाबदार आहें असें ती म्हणे. " ( मालकमकृत मध्य हिंदुस्थानचा इतिहास ). ख्रिस्ती राज्यांत सुद्धां या तत्त्वांवर भरंवसा ठेऊन वागणारे लोक मिळतील. ( कलकत्ता रिव्ह्यू १८६९ ) दुसरें उदाहरण मी सातारा जिल्ह्यांतील माहुली येथील **रामशास्त्री** * **प्रभुणे** यांचें देतों. ते **पुणें** दरबारांतील महाराष्ट्राचे सरन्यायाधीश होते. १७९५ पर्यंत शेवटचा बाजीराव राज्यावर येई तों पदारूढ होते. मराठ्यांच्या इतिहासावर कडक टीका करणाऱ्या **ग्रॅन्ट डफ** सारख्या इतिहासकाराला सुद्धां या विद्वान, शुद्ध आचरणाच्या पुरुषांत कांहीं खोड ठेववली नाहीं. ( पहा ग्रँट डफ कृत इतिहास भाग ३ )

तिसरे नरपुंगव **आप्पासाहेब** महाराज **सातारकर** हे होत. यांनीं दिवाणी, फौजदारी काम—विषेत: दुसरें—आपल्या बंन्धूंच्या कारकीर्दीत व राज्यपदारूढ झाल्यावर केलें तें उत्तम होतें अशी ख्याति आहे. या तीन व्यक्ती हिंदू होत्या. मराठा समाजांतील तीन जातींतून प्रसिद्धीस पावल्या होत्या. पहिल्या दोन व्यक्तींस इंग्रजी शिक्षणाचा गंध नव्हता. त्यांचे शिक्षण केवळ स्वराष्ट्रीय होतें. **आप्पासाहेब** महाराजांना मात्र **ग्रॅन्ट डफ** यांची बंधूं बरोबर मदत झाली असण्याचा संभव आहे. परंतु मी ज्या काळाला अनुलक्षून लिहिलें आहे त्याकाळीं ते एकटेच अनन्यसहाय होते. जर शिक्षण अगोदर मिळालें असें म्हटलें तर बुद्धिमत्ता व कार्यक्षमता हे त्यांचे गूण त्याच्या अगोदरचेच होते. मी आणखी

---

* यांनीं दिलेले चोख निवाडे प्रसिद्धच आहेत. रावसाहेबांनीं आपला हिंदुधर्म शास्त्रावरील प्रसिद्ध मयूख हा जो ग्रंथ प्रसिद्ध केला त्याच्या तयारी करितां सरकारी दप्तरांत संगृहीत असलेले यांचे निवाडे मिळवण्याची पुष्कळ खटपट केली होती.

" हे निवाडे पुणें येथील दप्तरांत नसतील तर मि. **स्टील** यांनीं सारांश काढला त्यावेळीं त्यांस मदत करण्याकरतां जी कमिटी नेमिली होती तिच्या कागदपत्रांत असावे. ( ३१–३–१८७१ चें **वेडरबर्न** यांस पत्र )

उदाहरणें देत बसत नाहीं. परंतु कमी प्रतीच्या जागांवर सुद्धां आमचे पुष्कळ लोक आपापल्यापरी उत्तम काम बजावणारे दाखवितां येतील.

तात्पर्य माझें म्हणणें एवढेंच आहे कीं ज्या आमच्या समाजांत वर निर्दिष्ट केलेल्या व्यक्ती निर्माण झाल्या त्या आमच्या समाजास आतां मार्ग दाखवून त्याच्या शीलास बलवत्ता आणली पाहिजे. अधिकाराचीं मोठीं कामें करण्याकरतां त्यास उचलून विलायतेसच शरीरतः न्यावयास नको. १८३३ सालीं सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा निघाली त्यावेळेस सर सी मेटकाफ व माउंट स्टयूअर्ट एलफिन्स्टन यांचेही मत तसें नव्हतें. २२।२।१८८७

### इष्ट फल

" काउन्सिलांत प्रजेतर्फे प्रतिनिधी पाहिजेत; एक सत्तात्मक राज्यपद्धतीविषयीं माझे मनांत अनेक शंका होत्या. व सालोसाल माझी अशी खात्री होत चालली आहे कीं आम्हांस प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क कायद्यानें मिळाला पाहिजे. प्रत्येक विषयाची चर्चा इंग्लंदांत झाली पाहिजे. जूरीच्या पद्धतीनें न्याय मिळण्याचा हक्क प्रयत्नानें आम्हीं मिळविला पाहिजे.

केलेल्या कायद्यावर कांहीं दाब पाहिजे. सुप्रिम् कोर्टें होतीं तितकीं स्वतंत्र हल्लींचीं हायकोडतें नाहींत." २६।३।१८७६ वेडरबर्न यांस पत्र. ( यांतील बहुतेक हक्क प्राप्त झाले आहेत ते यशस्वी करून दाखविणें लोकांकडे आहे. )

### आकांक्षा.

१८७९ सालीं व १८८८ सालीं

"आम्हांला अधिक चांगले म्युनिसिपल कारभाराचे हक्क पाहिजेत. निरर्थक अवाढव्य जमाखर्चाचे खर्डे नकोत. व सरकारी खात्यांची वाढ नको."

( ५।९।७९ ज. जेकब यांस पत्र. )

" दादाभाई इंग्लंडांत राहून पार्लमेंट सभेंत प्रवेश होण्यास झटत आहेत. त्यानें आम्हांला चांगली जमीन धाऱ्याची पद्धति मिळेल काय ? लष्करी खर्च कमी करतां येईल काय? स्टाफकोरची दुःस्वप्नवत् भासणारी रचना

रद्द करता येईल काय ? हिंदुस्थानाकरितां लागणारें कर्ज हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानांतच काढणें भाग पाडतां येईल काय ? राजकीय स्वरूपाचा जो रेलवेचा विस्तार आहे तो तितकाच ठेवतां येईल काय ? पुढें चालवावयाचा असेल तर त्याचा खर्च इंग्लंदच्या तिजोरींतूनच व्हावा असे ठरवितां येईल काय ? इतक्या गोष्टी एका मनुष्याच्यानें पार्लमेन्टांत बसून होतील काय ? ( ५८।५।८८ चें पत्र. )

## सामाजिक परिषद्

राजकीय प्रश्नांचा विचार करण्याकरतां राष्ट्रीय सभा भरूं लागल्यावर तिच्या मागून कांहीं वर्षांनीं सामाजिक प्रश्नांचा विचार करण्याकरतां सामाजिक परिषद भरूं लागली. तिच्या विषयींचें आपलें मत शेट आर. डी. मेथा ( कलकत्तेकर एक मित्र ) यांस रावसाहेबांनीं एका पत्रीं कळविलें होतें तें.

अलाहाबादेहून ज्या बातम्या येत आहेत त्यांवरून पहातां आतां सामाजिक परिषद् पटावर येणार आहे. तींत कोणी वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध हिंदूला भाग घेतां यावयाचा नाहीं. अशा पारिषदेंत भलते भलते ठराव पुढें मागें येण्याचें बीं आज रुजत घालून ठेवलें जाईल व तेणेंकरून पुष्कळांची सहानुभूति नाहींशी होईल. कांहीं युरोपियन मित्रांस कसें तें मी दाखवून दिलें आहे. व त्यांसही तें पटलें असें दिसतें. पण या दिवसांत काय काय होणार आहे तें कोणी सांगावें ? ( २५।१।१८८९. )

## हिंदुस्थानची भावि स्थिति

हिंदुस्थानाच्या भाविस्थितीविषयींचे प्रश्न पुष्कळ दिवस लोकांच्या मनांत घोळत आहेत असें विनायक कोंडदेव ओक यांच्या प्रश्नाचा उल्लेख या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत आहे त्यावरून दिसतें. त्या प्रश्नाला उत्तर रावसाहेबांनीं दिलें नाहीं. दि. बा. आर. रघुनाथराव यांस त्यांनीं उत्तर पुढें दिल्याप्रमाणें दिलें आहे. “ माझें भाकीत खोटें ठरो अशी इच्छा करतों. मला वाटतें कीं आमच्या लोकांनीं अश्रान्तपणें पुष्कळ काम करण्यास शिकलें पाहिजे ह्मणजे कांहीं पुढच्या अजात पिढ्यानीं त्यांचें फळ दृष्टीस पडूं लागेल. (८।३।१८८५)

## प्रकरण ७८ वें.

# रावसाहेबांचीं किरकोळ भाषणें.

। तथ्यं पथ्यं सहेतु प्रियमतिमृदुलं सारवद्दैन्यहीनम् ।
॥ साभिप्रायं दुरापं सविनयमशठं चित्रमल्पाक्षरंच ॥
। बह्वर्थं कोपशून्यं स्मितयुतघनदाक्षिण्यसंदेहहीनम् ।
॥ वाक्यंब्रूयाद्रसज्ञः परिषदि समये सप्रमेयाप्रमत्तम् ॥ १ ॥

रावसाहेबांनीं आपल्याबरोबर श्रोत्यांस वाहून नेणारीं झंझावातसदृश भाषणें केलीं नाहींत. लोकांच्या पूर्वग्रहांच्या आधारापेक्षां तर्कबद्ध विचारसरणीचा आधार त्यांस पसंत पडे. प्रस्तुत विषयाला धरून असलेल्या आपल्या अर्थभारवती व गंभीर वाणीनें ते जे शब्द उच्चारीत त्यांतील एकादा कर्णपथांतून निसटून जाईल म्हणून श्रोते त्यांचें भाषण एकाग्र मनानें ऐकत असत. त्यांचीं भाषणें लांब नसल्यामुळें आंतील सरसपणा कायम राहून श्रोत्यांस कंटाळा आणीत नसत. त्यांत कल्पकता असल्यामुळें त्यांस कौतुकार्ह होत असत. जीं उपलब्ध आहेत त्यांतील कांहीं दिलीं आहेत. त्यांतून अस्सल महाराष्ट्रीयाचा खणखणीत ध्वनि निघालेला वाचकांस ओळखूं येईल.

### सर बार्टल फ्रियर यांचा सन्मान.

१८६७ सालीं सर बार्टल फ्रियर, मुंबईचे गव्हर्नर, हे स्वदेशीं जावयास निघाले तेव्हां त्यांस मुंबईच्या म्युनिसिपॅलिटीनें मानपत्र द्यावें अशी सूचना शेट मंगलदास नथूभाई यांनीं आणली, तिला पुष्टि देतांना रावसाहेबांनीं भाषण केलें त्याचा सारांश:—" म्युनिसिपॅलिटीच्या कारभारासंबंधें उघडपणें व मोकळ्या मनानें वादाविवाद करण्याची सोय या देशांत नव्हती ती सर बार्टल फ्रियर यांच्या कारकीर्दींत झाली. म्युनिसिपॅलिटीपुढें एकादा बिकट प्रश्न

उपस्थित झाला किंवा सरकाराकडून एकाद्या प्रश्नावर मत मागण्यांत आलें तर स्वतंत्रपणें वादविवाद होण्याची सरकारची इच्छा दिसून आली.

मद्रास व कलकत्ता येथील म्युनिसिपॅलिटयांची गोष्ट आतांच निघाली होती. त्यांचें आमच्या म्युनिसिपॅलिटीशीं बहिणीचें नातें आहे. असें नातें असलेल्या हिंदुस्थानांतील कोणत्याही संस्थेविषयीं निरुत्तेजक शब्द उच्चारण्याची माझी इच्छा नाहीं. परंतु मुंबई म्युनिसिपॅलिटीचा मला अभिमान वाटतो, आम्हीं सर्व तिचे घटकावयव आहोंत. आमच्यामध्यें आपसांत कितिही मत-भेद असला, अथवा आमच्यामध्यें व आमच्या कारभाराकडे सदैव लक्ष देऊन त्याविषयीं काळजी बाळगणाऱ्या सरकारामध्यें कितिही मतभेद असला तरी जे जे बिकट व भानगडीचे प्रश्न आमच्या पुढें भिन्नप्रकारें येत आले त्यांची विल्हेवाट लावते वेळीं जो वादविवाद होत आला त्यांत भाग घेणाऱ्यांस आपली बुद्धिमत्ता व उदार दूरदृष्टि दाखविण्यास यांच्या कारकीर्दींत अवसर मिळत आला आहे. त्याकरतां आम्हीं स्वदेशीं परत जाणाऱ्या गव्हरनर साहेबांचे ऋणी आहोंत. त्यांची आमच्या संस्थेवर व तशा या इलाख्यांतील इतर संस्थांवर जितकी मेहर नजर असे, तितकी दुसऱ्या कोणी अद्यापि दाखविली नाहीं.

## सर बार्टल फ्रियर यांच्या सन्मानार्थ भरलेल्या सार्वजनिक सभेंत रावसाहेबांनीं केलेल्या भाषणाचा सारांश.

रे. मि. फ्लेचर यांनीं आतांच आणलेल्या ठरावास पुष्टि देतांना मला फार आनंद होत आहे. माझ्या अगोदर भाषण करून गेलेल्या वक्त्यांनीं या विषयावर जेवढें बोलण्यासारखें होतें तेवढें बोलून टाकलेंच आहे. नामदार एड्व्होकेट् जनरल यांनीं सर बार्टल फ्रियर यांच्या कारकीर्दीचें विवरण केलेंच आहे व इतरांनीं त्यांनीं संपादन केलेल्या तेजस्वी चरित्राचें वर्णन केलें आहे. रेव्हरंड डॉक्तर विलसन् यांनीं तर त्यांच्या चरित्रांतील अनावृत गोष्टी आपल्या ध्यानांत असलेल्या—सांगून त्यांच्या चरित्रसूत्रांस चांगला रंग

दिला आहे. सर बार्टल फ्रियर यांच्या चरित्राकडे दृष्टि फेंकतांच एक प्रश्न विचारावा असें वाटतें. तो हा कीं नुसता सिव्हिल सर्व्हिस मधला एक मनुष्य इतक्या उच्च पदाची प्राप्ति कशी करूं शकला ? मला वाटतें कीं हें त्यांच्या प्रचंड उत्साहाचें, अविश्रांत प्रयत्नांचें, राक्षसी उद्योगाचें व विवक्षित कार्य-निष्पत्ति करतांना विवक्षित उपाय योजण्यांत दाखविलेल्या विलक्षण चातुर्याचें फळ होय. कोकणांत असिस्टंट कलेक्टर म्हणून यांच्या कामगिरीकडे बघा, अथवा दख्खन प्रांतांत असिस्टंट रेव्हेन्यु कमीशनर असतां यांच्या कामगिरीकडे बघा ! सातारच्या कमीशनरच्या जागेवर होते तेव्हांची कामगिरी लक्षांत घ्या, अथवा सिंध येथें कौन्सल असतां तरुण ईजिप्तचा कारभार हांकीत असतां, अफगाणिस्थान व बलुचिस्थान—ज्यांस हिंदुस्थानचा दरवाजा उघडण्याच्या दोन किल्ल्या समजतात त्यांकडे सारखें लक्ष देण्याची यांची कामगिरी लक्षांत आणा ! किंवा या इलाख्याचे लार्ड कॅनिंग हे अधिपति असतां त्यांस विश्वास्य स्वरूपाचे सल्लागार या नात्यानें केलेली त्यांची कामगिरी लक्षांत घ्या ! इतक्या सर्व ठिकाणीं जो जो प्रसंग येईल त्यास त्यास उपलब्ध असलेल्या साधनांनींच तोंड देण्याची यांची हातोटी नजरेस येत आहे. या इलाख्यांतील लोकशिक्षणाला उत्तेजन दिल्याबद्दल यांचे आम्हीं आभारी आहोंत. सार्वजनिक काम करणारें खातें यांच्या दूरदृष्टीची व अमित उद्योगाची साक्ष देईल. गेल्या थोड्या वर्षांत हिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ पडले. पहिल्यानें नॉर्थ वेस्ट प्रॉव्हिन्समध्यें, नंतर बंगाल्यात आणि शेवटीं मद्रासेस. मुंबईंत मात्र सार्वजनिक कामें विस्तृत प्रमाणावर सूज्ञपणें काढून सर बार्टल फ्रियर यांनीं आपल्या कारकीर्दींत दुष्काळाचें भविष्य अगोदर जाणून त्याचें उग्र स्वरूप सौम्य करून टाकिलें; नाहींतर या इलाख्यांतील बऱ्याच ठिकाणचा इतिहास खेदकारक झाला असता असें सिद्ध करण्याची मी हमी घेतों. आजची सभा सर बार्टल फ्रियर यांच्या कारकीर्दी-वर आपलें मत देणारी एक राजकीय ज्यूरीच भरली आहे असें मी हिम्मतीनें म्हणतों. या ज्यूरीचें मत एकच पडलें आहे आणखी तें कोणचें तर यांची

कारकीर्द विजयी झाली. या ज्यूरीचे मताला व्यवहार्य स्वरूप देण्याकरतां आज ज्या ठरावास पुष्टि देण्याचा मला मान मिळाला आहे त्या ठरावाप्रमाणें आज एक कमिटी नेमण्यांत येत आहे. ( ११–२–१८६७ )

## दुसरे सर जमशेटजी.

११ आगष्ट १८७७ सालीं दुसरे सर जमशेटजी जीजीभाई यांचें स्मारक करण्याकरतां एक कमिटी नेमावी अशी सूचना मुंबईच्या नागरिकांच्या सभेंत आली असतां रावसाहेबांनीं भाषण केलें त्याचा सारांश:—

डेक्कन कॉलेजांतील महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या वतीनें त्या कॉलेजाची भव्य इमारत बांधून दिली म्हणून परलोकवासी सर जमशेटजी जीजीभाई यांचे आभार मानण्याकरतां मला या सभेंत बोलतां येईल, अथवा एल्फिन्स्टन कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या वतीनें ही बोलतां येईल, कारण त्यांच्या कॉलेजाचा जो द्रव्यनिधि आहे त्याचे सर जमशेटजी हे ट्रस्टी होते, अथवा याहून उच्च नात्यानें म्हणजे हिंदुस्थानांतील नागरिकांतील ज्या विश्वकुटुंबवाद्यांनीं पारसीकांस-नामदार गव्हरनर साहेबांनीं आतां तज्जातीयांस स्मरण करून दिलें त्याप्रमाणें-आपल्या देशांत प्रथम थारा दिला त्यांतील एक खासगी व्यक्ति या नात्यानें मला बोलतां येईल. सर जमटेशजी हे हिंदी समाजांत प्रमुख होते. तत्त्वत: ते मुंबईस चैतन्य आणणारे तिचा आत्माच होते. दुसरे प्रशंसार्ह नागरिक डा. वुइल्सन निवर्तल्यावरच्या अशाच स्मारकप्रसंगाची मला आठवण होत आहे. त्यावेळीं केलेली माझी उक्ति सर जमशेटजी यांस लागू पडत आहे. पारसी समाजाचे सर जमशेटजी हे सामाजिक बाबतींत पुढारी होते. त्याच्याहून एका विस्तृत अर्थी, फार विस्तृत अर्थी, सर जमशेटजी हे ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजधानींच्या शहरांत जे भिन्न भिन्न समाज पृथक् पृथक् प्रवाहाप्रमाणें आढळतात त्या सर्वांचा संयोग घडवून आणणारे पूलच होते. नामदार गव्हर्नर साहेबांनीं आतांच सुचविलें आहे कीं सामाजिक व नैतिक क्षेत्रांवर पराक्रम करून प्रसिद्धीस येण्यास जागा आहे त्यावरूनच मी म्हणालों कीं आमच्यांतील एक सामाजिक पूल तोडला गेला. १८६० सालापासून

आतांपर्यंत कामा, पटेल व इतर पारसी कुटुंबांतील जे पुरूष, या नगरीस, शरीरास जसा कणा, तसे आधारभूत झाले होते, त्यांस उद्देशून नामदार अध्यक्षांनीं भाषण केलें. त्यांतील तत्त्वास अनुसरून तुम्हीं नवशरवान यांच्या पावलांवर पावलें ठेऊन त्यांच्या पथानें म्हणजे न्यायपथानें चालाल या विषयीं मला संशय नाहीं. कारण न्यायपथवर्तन हा जो चांगला गुण आहे त्या विषयींच नवशरवान यांची ख्याति होती व त्याबद्दल त्यांस ' मोठा ' नवशरवान म्हणत. न्यायपथानेंच वर्तन केलें असतां ज्या हृदयसंभव व बुद्धिसंभव गुणांमुळें जमशेटजींच्या कुळांतील पुरूष प्रख्यातीस आले ते गुण आम्हांस आचरणानें आपल्या अंगीं असल्याचें सिद्ध करतां येईल. ”

## फॉसेट यांचें स्मारक.

प्रोफेसर फॉसेट यांचें स्मारक करण्याकरतां टाऊनहालांत भरलेल्या लोकांच्या सभेंत रावसाहेबांनीं केलेल्या भाषणाचा सारांश:—

माझे मित्र बद्रुद्दीन यांनीं मोठें वक्तृत्त्व करून तुमच्या पुढें जो ठराव आणला आहे त्याला मी पुष्टि देतों. १८६६ सालापासून म्हणजे ज्या सालीं पार्लमेंटसभेंत मि. फॉसेट यांनीं पहिल्यानें आपल्या वाणीचा छाप बसविला त्या सालापासून निरीक्षणपूर्वक टीका करण्याच्या व स्वतंत्र मत देण्याच्या सद्गुणाबद्दल त्यांची प्रसिद्धि झाली. व या दोन्हीं गुणांची तारीफ लोकांच्या सभेंत व लॉर्डांच्या सभेंतही होऊं लागली. हाऊस ऑफ् कॉमन्समधील आयर्लंडांतील प्रतिनिधींचे पुढारी मॅककार्थी यांनीं सांगितल्याप्रमाणें त्यांच्यांतला मुख्य गुण कोणचा म्हणाल तर सर्व वादविवादाच्या प्रसंगीं त्यांनीं दाखविलेली मनाची विशुद्धता हा होय. गृहस्थहो ! प्रोफेसर फॉसेट यांच्या कामगिरीची कृतज्ञतापूर्वक प्रशंसा हिंदुस्थानानें, विशेषतः पश्चिम हिंदुस्थानानें, अनेक वेळां केलेली आहे. मुंबई असोशिएशननें फॉसेट साहेबांच्या ब्रायटन येथील मतदारांची एकदां मानपत्रद्वारा प्रशंसा केली होती. आणि पुन्हां मुंबईच्या नागरिकांनीं हॅकनेतर्फे फॉसेट साहेब निवडून येण्यास उभे राहिले

तेव्हां त्यांस झालेला खर्च निभावण्याकरतां वर्गणी केली होती म्हणून अंशतः तरी आमच्या लोकांनीं फॉसेट साहेबांची उपकृति मान्य केली नाहीं असें म्हणण्यास जड जाईल. परंतु मला वाटतें त्यांचे श्रम कृतज्ञतापूर्वक मान्य करण्याचा आतां समय आहे. एक अमोलिक जीव नष्ट झाला एवढेंच तसें करण्याला कारण नाहीं. तसें करण्याला दुसरें एक कारण आहे तें हें कीं या देशांत व इंग्लंदांत महत्त्वाचे प्रश्न उद्भवले आहेत व त्यांवर वादविवाद करण्याच्या प्रसंगीं श्रम घेऊन काम करणाऱ्या फॉसेट साहेबांची फार उणीव भासेल. गेल्या कित्येक वर्षें सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा हिंदुस्थान व इंग्लंद या दोहों ठिकाणीं भरविण्याची आम्हीं चळवळ चालविली आहे. ती संबंधें फॉसेट साहेबांनीं काय केलें तें ध्यानांत आणा. इंग्लंदांत सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा देणें हिंदी लोकांस फार जड जातें म्हणून ती परीक्षा हिंदुस्थानांत भरली पाहिजे या गोष्टीकडे हाउस ऑफ कामन्सचें लक्ष जाण्याकरतां १८६८–६९ सालीं एक ठराव आणला. हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा खर्डा कामन्सच्या सभेंत अगदीं शेवटीं शेवटीं येतो हें तुम्हांला विदितच आहे. परंतु एकटे फॉसेटच दरवर्षीं या खर्ड्याचें विस्तृत रीतीनें विवेचन करीत व सांगत कीं हिंदुस्थानविषयक प्रश्नांकडे हाऊस ऑफ कामन्सनें अधिक लक्ष देण्याची अवश्यकता आहे. १८७३ सालीं हिंदुस्थानाच्या आर्थिक स्थितीची चौकशी करण्याकरितां जें कमीशन बसविण्यांत आलें तें तरी फॉसेट साहेबांच्या मुळेंच. व प्रत्यक्ष चवकशी सुरू झाली असतां त्यांनीं दाखविलेलें या विषयाचें सूक्ष्मज्ञान वाखाणण्यासारखें होतें. शिवाय फॉसेट साहेबांनीं आणखी एक कामगिरी केली आहे. आमच्या सार्वजनिक काम करण्याच्या खात्यांत उधळपट्टी फार होते, कामाची योजना अकल्पित होते व त्यावर देखरेख योग्य होत नाहीं. याविषयीं त्यांनीं चिकित्सा केली. ( येथें रावसाहेबांनीं कांहीं फॉसेट साहेबांच्या भाषणांतील उतारे वाचून दाखविले ) फॉसेट साहेबांचें कोणचेंही भाषण घ्या त्यांत हिंदुस्थानाला पूर्णपणें न्याय दिला पाहिजे असेंच मत

आढळून येतें. ( टाळ्या ) मॅन्चेस्टरच्या आयात मालावर बसविलेला कर काढून टाकण्याच्या विरुद्ध फॉसेट होते. जो कर कमी करावा म्हणन हिंदुस्थानांतील लोकमतांत विलक्षण ऐक्य दिसून येत आहे व जो कर वाढवावा लागला तर मी माझा उजवा हात तोडून टाकीन पण तो वाढविण्यास कारणीभूत होणार नाहीं असें ज्याविषयीं बोलतांना बंगालचे ले. गव्हर्नर नुकतेंच म्हणाले तो मिठावरील कर कमी केला पाहिजे या मताचे फॉसेट होते. ( टाळ्या ) त्याचप्रमाणें मुस्कुट दाबीच्या कायद्याच्या विरुद्ध फॉसेट होते. म्हणून आमचा समाज जागा होऊन आजच्या प्रसंगाला उचित व आमच्या समाजाच्या योग्यतेला अनुरूप व फॉसेट साहेबांच्या कामगिरीला शोभेल असें स्मारक करील अशी माझी खात्री आहे. २–९–८५

## नामाभिधान चिकित्सा.

१८८० सालांत अफगाणिस्थानाच्या मोहिमेंत कामीं आलेल्या हिंदी सैनिकांच्या विधवांस व पोरक्या मुलांस द्रव्यद्वारा साहाय्य करण्याकरतां फंड गोळा करण्याचें थोर थोर मंडळीनें ठरविलें. त्याकरतां टाउन हॉलमध्यें सभा भरावयाची होती. फंडाचा नामकरणविधि मुंबईचे लार्ड बिशप साहेब यांच्या मुखें व्हावयाचा होता. म्हणजे कार्यपत्रिकेंत लिहिल्याप्रमाणें त्याचें नांव स्वदेशप्रीतिप्रेरित फंड असें ठेवावयाचें होतें त्या विषयींचा ठराव सभेपुढें मांडण्याचें काम लार्ड बिशप साहेबांकडे सोपविलें होतें. आतां या ठरावास पुष्टि देणारा गृहस्थसुद्धां पुष्कळ योग्यतेचा मनुष्य पाहिजे म्हणून तें काम रावसाहेबांकडे आलें होतें. ‘ मुंबईच्या हिंदी प्रमुख लोकांस हें नांव आवडलें नाहीं कारण ही लढाई सर्व हिंदी लोकांस पसंत होती असा अर्थ या नांवांतून ध्वनित होतो. या संबंधें तुमचें मत काय आहे ? व तुम्हीं उद्यांच्या सभेंत या फंडाला अमुक नांव द्यावें अशा सभेपुढें येणाऱ्या ठरावाला पुष्टि देणार आहांत. तेव्हां योजलेल्या नामाभिधानाच्या युक्ततेवर कांहीं बोलणार आहांत असें मि. फिरोजशा मेथा म्हणत होते. तें खरें कीं काय ? ’ असें पत्र मि. महमद अली रोगे यांनीं सभा भरावयाच्या आधीं रावसाहेबांस लिहिलें होतें.

नांव बदलावें असा आशय पत्र लिहिणाराचा असावा किंवा नसावा यांतलें कांहींच खरें धरतां येत नाहीं. परंतु रावसाहेबांनीं बिशप साहेबांस कळविलें कीं अफगाण लोकांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली असती व आत्मरक्षणार्थ जर हिंदुस्थानाला लढाई करावी लागली असती तर हें नांव यथार्थ दिसलें असतें. रावसाहेबांनीं ही सूचना बिशपसाहेबांस मित्राच्या नात्यानें केली होती.

अफगाणिस्थान येथील लढाईंत आपत्तींत सांपडलेल्यांस साहाय्य करण्याकरतां जमविलेला फंड असें या फंडाचें वर्णन वरील कार्याकरतां १७।८।८० रोजीं भरलेल्या सभेच्या हकीकतींत सांपडतें.

रावसाहेबांनीं लार्द बिशप यांच्या ठरावास पुष्टि देतांना भाषण केलें त्याचा सारांश:—

" आतांच लार्द बिशप यांनीं जो ठराव आणला तो लोकांस मान्य होण्याकरतां त्याची विशेष रीतीनें शिफारस माझ्या तोंडून होण्याची अवश्यकता नाहीं ही मोठ्या सुखाची गोष्ट आहे. देशाकरतां ज्यांनीं आपले प्राण संकटांत घातले त्यांच्या विषयींचें आपलें कर्तव्य करण्यास सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांस मुंबईचे नागरिक म्हणून नव्हे तर या मोठ्या ब्रिटिश साम्राज्याचे नागरिक म्हणून तत्परतेनं पुढें होण्याचा आजचा प्रसंगच आहे. सरकार या नात्यानें व प्रत्येक सत्कार्यांत मुंबईकरांचे नेते या नात्यानें सरकारानें आपली जबाबदारी ओळखून कार्यारंभ अगोदरच कसा केला आहे तें नामदार गव्हर्नर साहेबांनीं आपल्या प्रथमारंभीं केलेल्या भाषणांत उघड केलेंच आहे. त्या कार्यारंभास हातभार लावून सरकारच्या कृतीला टेंका देऊन आपली मान्यता प्रदर्शित करण्याचें काम भिन्नवर्णाच्या या सभेंत जमलेला समाज करील असा माझा भरंवसा आहे. सर्व उचित प्रसंगीं मुंबईचे लोक आपल्या सर्व दर्जाच्या प्रतिनिधींमार्फत आपलें कर्तव्य करण्यास आनंदानें व धीरानें तत्पर असतात. या फंडाला 'देशाभिमानास्तव जमविलेला' फंड असें नांव द्यावें कीं न द्यावें या विषयीं वर्तमानपत्रांत आलेल्या चिकित्सेला अनुलक्षून नामदार बिशप कांहीं शब्द बोलले त्याविषयीं माझें म्हणणें असें आहे कीं फंडाचें नामाभिधान तर

बदललेंच आहे. या देशांतील लोक आपला देशाभिमान ( ज्यास प्रांतिक असें विशेषण मी लावीत आहें तें चाललें तर तो) सोडून देतील, त्याचप्रमाणें या संयुक्त राष्ट्राचे नागरिक, जे आमचे राष्ट्रीयबन्धू आहेत ते, आपण जलपरिवेष्टित म्हणून जगापासून पृथक् असलेल्या द्वीपाचे रहिवासी असा आपला अभिमान—( ज्यास मी पार्थक्योद्भव असें विशेषण किंचिदपि निन्देचा भाग सूचित केल्याशिवाय लावूं शकतों तो )—सोडून देतील, तर प्रत्येक नागरिक या साधारण स्वरूपाच्या कार्यास साहाय्य करील, व मनुष्यत्वसहज भूतदयेच्या सामान्य नात्यानें पुढें येईल व त्यास जें कर्तव्य करण्यास सांगण्यांत येत आहे तें तो करील म्हणजे या नगरीवर व या ब्रिटिश हिंदुस्थानावर ज्यांचा हक्क आहे त्या शिपायांस, त्यांच्या कुटुंबांस, व मी समजलों आहें त्याप्रमाणें जे केवळ शिपाईच नव्हते पण ज्यांस प्रस्तुत लढाईंत कष्ट सोसावे लागले आहेत त्यांस साहाय्य करण्यास उचित असा द्रव्यनिधि जमवील. ” टाळ्या. ( १७–८–१८८० )

## बाबू ख्रिस्तोदास पॉल.

कलकत्ता येथील टाऊन हालांत नामदार बाबू ख्रिस्तोदास पाल यांचें, डोळ्यांचें इस्पितळ बांधून व ऊर्ध्वकाय प्रतिमा उभारून, स्मारक करण्याकरतां जमलेल्या सभेंत रावसाहेबांनीं केलेल्या भाषणाचा सारांशः—

डॉ. महेंद्रलाल सरकार व नामदार चीफ् जस्टिस् यांचीं वक्तृत्व पूर्ण भाषणें झाल्यावर माझें काम फक्त त्यांनीं पुढें आणलेल्या ठरावास अनुमोदन देऊन बसण्याचें होय. परंतु माझें व ख्रिस्तोदास पॉल यांचें बंधुत्वाचें नातें आज वीस वर्षें जुळलें होतें. आम्हीं दोघे वृत्तपत्रप्रकाशक होतों. म्हणून मी जे मुद्दे माझ्या अगोदर बोलून गेलेल्या वक्त्यांच्या संभाषणांत आले नाहींत त्या मुद्यांवर थोडें बोलतों. हिंदू पेट्रिअट पत्राची कीर्ति सर बेली म्हणाले त्याप्रमाणें अगोदरच पाहिल्या बुद्धिमान व कांहीं कमी प्रशंसक टीकाकारांच्या मतानें उत्सूत्रप्रकृति अधिपतीच्या कारकीर्दींतच प्रसृत झाली होती.

माझ्या स्वतांविषयीं विचाराल तर पहिल्या व दुसऱ्या अधिपतींच्या लेखांपासून मला बराच बोध नेहमीं प्राप्त होत असे. दोघांची दृष्टि समालोचक असे. व आपलीं मतें ते फार मोठ्या औत्सुक्यानें प्रदर्शित करीत. ज्यांतील लोकांच्या कल्याणाकडे अत्यंत काळजीपूर्वक ख्रिस्तोदास पॉल यांनी लक्ष दिलें नाहीं, असा हिंदुस्थानांतील कोनाकोपऱ्याचा एकही भाग मिळणार नाहीं. राष्ट्रीय महत्त्वाची कामें निघालीं असतां तिकडे यांचें लक्ष गेलें नाहीं अथवा त्यांस पाठिंबा यांनीं दिला नाहीं असें केव्हांही झालें नाहीं. बंगाल्याच्या बाहेरील इतर प्रांत बंगाल्यास परके वाटत आहेत असें जर कोणी म्हणेल तर मी त्याचा जोराचा निषेध करण्यास येथें उभा आहे. हा सदय अंतःकरणानें आम्हांस सरकाराकडून मिळत असलेल्या शिक्षणाचा परिणाम म्हणा अथवा हिंदू पेट्रिअटमध्यें जे लेख येत असत त्याचा परिणाम म्हणा परंतु एवढें खरें आहे कीं हा परिणाम हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत दिसून येत आहे. आम्हीं एकमेकांस झालेल्या अपायांनीं सारखे दुःखित होत आहोंत व सारख्याच आकांक्षा मनांत बाळगीत आहोंत. ( टाळ्या. ) सरकारनें हिंदुस्थानची प्रगति होण्याकरतां एक मोठी शिक्षणाची योजना केली ती सफल करून दाखविण्यास ख्रिस्तोदास पॉल यांचा सहकार कारण झाला. कोणाच्या मनांत अविश्वास उत्पन्न झाल्यास तो दूर करण्याच्या कामीं ख्रिस्तोदास पॉल यानीं आत्मसंयमपूर्वक स्वार्थत्याग जन्मभर जसा दाखविला तसा दाखविणें लोकांचें काम आहे. जी प्रगति अविश्रांत कष्ट केल्याशिवाय होते ती प्रगतिच नव्हे. हिंदुस्थानच्या या बाजूला शिक्षणविषयक संस्थांचा उदय पुष्कळ झाला त्यासंबंधें पॉल यांच्या एका कृतीकडे लक्ष द्यावें असें येथें हजर असलेल्या, विशेषतः हिंदी, लोकांस सांगतों. या देशांतील पुरातन शास्त्रांचें व विद्यांचें—ज्यांची हल्लीं केवळ भूषाप्रकार म्हणून उपेक्षा करण्यांत येते—त्यांचें संरक्षण करा अशी प्रार्थना पॉल हे वारंवार करीत असत. हिंदुस्थानांत ज्ञानाचा सांठा नाहीं. कांहीं जुने परंपरागत सांप्रदाय नाहींत. व हिंदुस्थान म्हणजे एक नुसता कोरा करकरीत पट आहे अशी कल्पना

करून घेऊन या देशांतील हल्लींचे तरुण सुशिक्षित धांव घेत सुटले आहेत. ज्यांनीं प्रोफेसर मॅक्स मुल्लरादि विद्वान बुधजनांच्या लेखांचें मनन केलें आहे ते मात्र ज्याप्रमाणें बाबू खिस्तोदास यांनीं आपल्या देशबांधवांस जें ज्ञान स्पष्ट करून शिकवलें, ज्या करतां त्यांनीं त्यांचें एकवेळ कौतुक केलें व आतां ज्या करतां शोक करीत आहेत तें ज्ञान आपल्या देशबांधवांस त्याप्रमाणें शिकवतील. खिस्तोदास एकंदर मनुष्य जातीचे मित्र होते यांत संशय नाहीं. म्हणून मनुष्य जातीचें दुःख हरण करणाऱ्या संस्था स्थापून तिशीं बाबूंचे नांवाचा संबंध यावा हें उचित आहे. महेंद्रलाल सरकार यांची विस्तृत प्रमाणावर स्मारक करण्याची योजना चुकली असें मला वाटत नाहीं. ती अजूनही हातांत घ्याल अशी आशा करतों. कोठल्याही प्रकारचें स्मारक करा; मरहूम बाबूंचा मुंबईकर मित्र या नात्यानें मी त्यास संमति देतों.

१० जानेवारी १८८५

## एल्फिन्स्टन कालेजच्या नव्या इमारतींचा उद्घाटनसमारंभ.

१८८९ सालीं एल्फिन्स्टन कालेजाकरतां सरकारानें फार मोठी इमारत बांधविली तिचा उद्घाटन समारंभ लार्ड रे यांच्या हस्तें झाला. त्यावेळेस सर्वांत जुने एल्फिन्स्टन कालेजशीं संबंध असलेले म्हणून भाषण करण्याचा मान रावसाहेबांस मिळाला. तेव्हां लार्ड रे यांस कालेजाची इमारत खुली करण्याची विनंति करतांना रावसाहेबांनीं भाषण केलें त्याचा सारांश.

"एल्फिन्स्टन कालेजाशीं माझा स्वतांचा संबंध आज ४०।४२ वर्षे आहे. व त्यांत मला जें एका प्रकारचें शिक्षण मिळालें, त्याच्या योगानें विद्यार्थिदशेचा माझ्या अंगांत अजूनही अभाव झाला नाहीं. ( टाळ्या ) गतकालीं व आतां येथें अनेक प्रोफेसरांच्या हातून विद्यार्थ्यांस मिळालेल्या व मिळत असलेल्या शिक्षणाविषयीं व अभ्यासाविषयीं बोलतांना मतभेद ज्यांकडून प्रदर्शित केला गेला असेल त्यांनीं विषयाचा उपक्रम करतांना अव्य-

वहारिक मार्गानें विवरण न करतां ऐतिहासिक दृष्टीनें केलें पाहिजे. कालेजाकरतां मिळालेली ही पांचवी जागा आहे. तरी ज्या कित्येकांची अजून तृप्ति झाली नाहीं त्यांपैकीं मी एक आहें असें कष्टानें म्हणावें लागतें. तथापि लार्ड रे व त्यांचे पूर्वग हे शिक्षणाला उदारपणें नित्य उत्तेजनच देत आले आहेत तें लक्षांत आणलें म्हणजे माझी अशी खात्री होत आहे कीं सरकारापाशीं आम्हीं जी जी सकारण मागणी करूं ती तीकडे तें खुषीनें लक्ष देईल. आतांची आमची इमारत फार भव्य आहे तथापि गव्हर्नर साहेबांची अशी खात्रीकरून देतों कीं तींत विद्यार्थ्यांना अजून बरीच उणीव भासत आहे. तीविषयीं विस्तार आतां करीत बसत नाहीं. तथापि तेवढी उणीव भरून काढली असतां विद्यार्थ्यांचें हित होणार आहे. मात्र एवढें खरें आहे कीं आतां सरकार जें औदार्य दाखवील तें विवेकपूर्वकच दाखवील म्हणजे त्याचें प्रमाण साधारणच असेल. अधिक औदार्य दाखविण्याच्या स्थितींत तें आतां नाहीं. परंतु जेव्हां त्याची स्थिति सुधारेल तेव्हां अवश्य तें करण्यास सरकार चुकणार नाहीं. डाक्तर पिटर्सन यांच्या बोलण्यांत एक मुद्दा आला आहे. त्याविषयीं मी म्हणतों कीं शिक्षणविषयक संस्थांच्या कामगिरीविषयीं सरकाराच्या मनांत अप्रत्यय असला तरी एल्फिन्स्टन कालेजानें जी कामगिरी केली आहे तिचे स्वतंत्र परिणाम मला आठवत आहे त्या कालापासून फार दूरवर व पक्केपणीं जात आले आहेत. अशी मी खात्री देतों. म्हणून सरकारानें छिन्नसंशय मनानें चालू पिढींतील नव्हे तर मागच्या व पुढच्या पिढींतील एल्फिन्स्टन कालेजांतील विद्यार्थी विश्रंभपात्र आहेत असें समजावें. इतके सांगून ही इमारत प्रोफेसर व विद्यार्थी यांच्या उपयोगाकरतां खुली केली आहे असें जाहीर करण्याची विनंति नामदार गव्हर्नर साहेबांस त्यांच्या परवानगीनें डा. पिटरसन यांबरोबर करतों.

---

## प्रकरण ७९ वें.

# रावसाहेबांच्या म्हणी. *



। पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ।
॥ मूढैः पाषाणखण्डेषु रत्नसंज्ञा विधीयते ॥ १ ॥

मनुष्याचे स्नेही कोणत्या प्रकारचे आहेत हें समजलें म्हणजे, किंवा तो कोणतीं पुस्तकें वाचतो तीं समजलीं म्हणजे, त्याचा स्वभाव कळून येतो असें जें म्हणतात, त्याचप्रमाणें मनुष्य कोणत्या म्हणी वापरतो त्या समजल्या म्हणजे त्याचा स्वभाव कळून येतो असें म्हणतां येईल. म्हणून या प्रकरणांत रावसाहेबांच्या पत्रांत वारंवार आढळून येणाऱ्या म्हणी देण्याचा विचार केला आहे. या म्हणींचा विद्यार्थ्यांस व कार्यकर्त्या पुरुषांस चांगलाच उपयोग होईल. रावसाहेबांचा मोठेपणा कशांत होता व तो त्यांस कसा प्राप्त झाला किंवा त्यांनीं कसा मिळविला हें वाचकांच्या लक्षांत येईल.

रावसाहेबांच्या म्हणी म्हणजे त्या त्यांनीं स्वतः केल्या होत्या असें समजावयाचें नाहीं. इंग्रजी, संस्कृत, मराठी, कधीं कधीं गुजराथी क्वचित् हिंदुस्थानी व पर्श्यन इत्यादि भाषांतील सुभाषितांतून, वृद्धवचनांतून व बोधपर वाक्यांतून त्यांची निवड केलेली होती. आपलें मत पत्रामध्यें नमूद करून त्याच्या प्रतिपादनार्थ थोडक्यामध्यें, वकील ज्याप्रमाणें कायद्याचा

* म्हणींवरील ( सुभाषितां वरील ) आपलें प्रेम रावसाहेब खालील श्लोक म्हणून व्यक्त करीत.

। बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ।

अर्थः—चांगलें भाषण, मग तें लहानाच्या तोंडातलें कां असेना, तें थोरास ग्राह्य आहे.

आधार देतो त्याप्रमाणें आपल्या मतास पुष्टि येण्याकरितां एका सांप्रदायिक म्हणीचा सर्वसंमतसूत्रमय बोधवचनाचा रावसाहेब बहुशः उपयोग करीत. म्हणींमध्यें अल्प शब्दांत बह्वर्थाचा संचय झालेला असल्यामुळें रावसाहेबांच्या अल्पशब्द व बह्वर्थ पत्रांतील भाषेला व तदंगभूत विचारांना मोठी रुचि प्राप्त होई व वाचकाला त्यांच्या म्हणण्याचा चांगला प्रत्यय येऊन आनंद होई.

## कालविषयक.

**। आयुः क्षणलवमात्रं न लभ्यते हेमकोटिभिः क्वाऽपि ।**
**॥ तच्चेद् गच्छति वृथा ततः काऽधिका हानिः ॥ १ ॥**

अर्थ :—आयुष्यांतील लवमात्र क्षणही एकदां निघून गेला कीं तो कोट्यावधि सोनें देऊनही परत मिळणार नाहीं. असलें अमूल्य आयुष्य जर वृथा गेलें तर त्याहून अधिक हानि ती कोणती !

Life is short and great deal yet remains to be done.

अर्थः—मनुष्याचें आयुष्य हें अल्पप्रमाण आहे व अजून करावयाचीं कार्यें महत्प्रमाण आहेत.

Life is short and work is heavy.

वरील अर्थाची मराठी म्हणः—**रात्र थोडी व सोंगें फार.**

## उद्योगविषयक.

**दर्जीका बेटा जबलग जीवे तबलग शीवे**

अर्थः—शिंप्याचा मुलगा जितका वेळ जीवन्त आहे तितका वेळ तो शिंवीतच रहाणार.

My advice is, save, save, save, time, money and appearances.

अर्थः—माझा त्रिवार उपदेश असा आहे कीं क्षणाचें, धनाचें व मनाचें ( तनूचें ) रक्षण करा, रक्षण करा, रक्षण करा.

Work is the condition *sine qua non* of our existence.

अर्थः—आम्हांला जर जगावयाचें असेल तर त्याला एकच अट आहे व ती कोठली तर उद्योगाची. जो उद्योग करीत नाहीं त्याला जगण्याचा अधिकार नाहीं.

Work is life and life is work.

अर्थः—मनुष्याचें जीवित उद्योगमय आहे व उद्योग हा जीवमय आहे.

Idleness does good to nobody

अर्थः—आळसानें कोणाचेंही हित होत नाहीं.

A stitch in time saves nine.

अर्थः—वेळेस एक टांका घातल्यास पुढील नऊ टांक्यांची बचत होते.

Time registers it decrees unerringly; it is we that err.

अर्थः—विधि चुकल्याशिवाय आपल्या नियमाची व्यवस्था लावतो. आपण मनुष्येंच काय तीं चुकतों.

## विद्याविषयक.

**। अजरामरवत् प्राज्ञः विद्यामर्थंच चिन्तयेत् ॥**

अर्थ—आपणाला जरा प्राप्त होणार नाहीं. आपणाला मृत्यूची बाधा होणार नाहीं असें समजून ( सर्व वयांत ) विद्यार्जन करावें व अर्थचिन्तन करावें.

## यत्नविषयक.

**। यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ।**

अर्थः—यत्न करावयाचा तो केल्यावर जर सिद्धि प्राप्त झाली नाहीं. तर त्यांत दोष नाहीं.

## यत्नीं फल.

अर्थः—यत्न केल्यासच फल प्राप्ति होते.

## आरंभविषयक.

Better late than never

अर्थ—अगदीं अनारंभापेक्षां उशिरां आरंभ केलेला बरा.

In great attempts it is glorious to fail.

अर्थः—महत्कृत्यारंभांत अपयश आलें तरी तें यशास्करच होय.

॥ आरब्धस्यान्तगमनम् ॥

या अर्थाची मराठी म्हण:—**अखेरी मारल्याशिवाय खेळ पुरा होत नाहीं.**

### इच्छाविषयक.

Where there is will there is way

**अर्थः**—मनांत असेल तर मार्ग दिसेल.

### सत्यविषयक.

**। सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न बूयात्सत्यमप्रियम् ।**

**॥ प्रियंच नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः ॥ १ ॥**

अर्थः—सत्य बोलावें पण जें प्रिय असेल तें बोलावें; जें सत्य असेल पण अप्रिय असेल तें बोलूं नये. तथापि जें प्रिय बोलावयाचें तें असत्य असेल तर तें बोलूं नये.

**। नास्ति भूमिसमंदानं नास्ति दानसमोनिधिः ।**

**॥ नास्ति सत्यसमोधर्मः नानृतात्पातकं परम् ॥ १ ॥**

अर्थः—भूमिदाना सारखें दान नाहीं. दानासारखा द्रव्यसंग्रह नाहीं. सत्यासारखा धर्म नाहीं व असत्यासारखें पाप नाहीं.

### सत्येन मित्रम्.

अर्थः—सत्यापासून मित्राची प्राप्ति होते.

**। धर्मो जयति नाऽधर्मः सत्यं जयति नानृतम् ॥**

अर्थः—अंतीं धर्माचा जय होतो, सत्याचा जय होतो पण असत्याचा होत नाहीं.

### न्यायविषयक.

**। यांति न्यायप्रवृत्तस्य तिर्यञ्चोऽपि सहायताम् ।**

अर्थः—जो न्यायानें वागतो त्याला पशू पक्षीही साहाय्य करतात.

### एकवचनविषयक.

**रामो द्विर्नाभिभाषते** *

---

* कैकयीनें दशरथापासून काय वचन घेतलें होतें तें श्रीरामांनीं विचारलें तरी तिच्यानें तोंडानें उच्चारवेना तेव्हां श्रीराम म्हणालेः—

## पापपुण्यविषयक.

**। अष्टादशपुराणानां सारं सारं समुद्धृतम् ।**
**॥ परोपकाराय पुण्याथ पापाय परपीडनम् ॥ १ ॥**

अर्थः—अठरा पुराणांचें मंथन करून सार म्हणून जें काढलें आहे तें हें कीं परोपकारासारखें पुण्य नाहीं व परपीडेसारखें पाप नाहीं.

## संतोषविषयक.

**। अकृत्वा परसंतापमगत्वा खलमंदिरम् ।**
**॥ अक्लेशयित्वा चात्मानं यत्स्वल्पमपि तद्बहु ॥ १ ॥**

अर्थः—दुसऱ्यास संताप दिल्याशिवाय, खलाच्या मंदिरीं पाऊल टाकल्याशिवाय, स्वतांच्या आत्म्याला क्लेश दिल्याशिवाय जी काहीं स्वल्प प्राप्ति होईल ती पुष्कळच होय.

## द्रव्यविषयक.

**विना दैन्येन जीवनम्**

अर्थः—आपला जन्म दैन्य वांट्यास आल्याशिवाय कसा जाईल ( ही मनुष्यांनीं काळजी बाळगावी ).

Money is valuable, but there are many more valuable things than money.

( श्रीमंत थोरले तुकोजीराव होळकर यांस २–२–१८८० चें पत्र ).

---

**। अहं हि वचनाद् राज्ञः पतेयमपि पावके ॥**
**॥ भक्षेयं च विषं तीक्ष्णं पतेयमपिचार्णवे ॥ १ ॥**
**। तद्ब्रूहि वचनं देवि ! राज्ञा यदभिकांक्षितम् ।**
**॥ करिष्ये प्रतिजानेच रामोद्विर्नाभिभाषते ॥ २ ॥**

अर्थः—हे देवि ! राजानें काय वचन दिलें आहे तें सांग. त्याचे वचन पाळण्याकरतां मीं अग्नींत प्रवेश करीन, मी विष भक्षीन, समुद्रांत उडी घेईन ! राजानें जें वचन दिलें असेल तें पुरें करीन असें प्रतिज्ञापूर्वक वचन देतों. राम दोनदां बोलत नाहीं. जें बोलतो तेंच करून दाखवितो. वचन बदलीत नाहीं !

अर्थः—पैसा ही मूल्यवान वस्तु आहे. परंतु पैशाहून अधिक किंमतवान अशाही वस्तू आहेत.

**मानोहि महतां धनम्**

अर्थः— मोठ्या लोकांचें धन म्हटलें म्हणजे मान होय.

**न शरीरं पुनः पुनः** *

अर्थः—शरीर पुनः पुनः मिळत नाहीं.

**अर्थस्य पुरुषोदासः** ही म्हण व्यवहाररीत्या खरी आहे ( हरिहर शास्त्री द्रविड यांस पत्र )

**अर्थाचा दास पुरुष अर्थ नव्हे पुरुषदास बा पाहें** ( मोरोपंत– )

## याचनाविषयक.

**। देहीतिवचनद्वाराद् हृदिस्थाः पञ्चदेवताः ।**
**॥ मुखान्निर्गत्य गच्छन्ति श्रीधीह्रीतुष्टिकीर्तयः ॥**

अर्थः–'दे' इतक्या वचनाचा उच्चार करण्याकरतां तोंड उघडल्याबरोबर त्या द्वारांतून हृदयाचे ठिकाणीं वास करीत असणाऱ्या श्री, धी, ह्री, तुष्टि आणि कीर्ति या पंच देवता बाहेर निघून जातात !

## मित्रर्णविषयक.

प्रश्न—**टक्या ! जाशी कुठें ?**

उत्तर—**सखा तोडायला !** *

## धर्मविषयक.

Charity begins at home.

अर्थः—आधीं दिवा घरीं तेवा व मग मशिदींत दुसरा ठेवा.

असें न केल्यास काय होतें तें पुढील म्हण सांगते.

---

* **॥ पुनर्दारा पुनर्वित्तं न शरीरं पुनः पुनः ॥** असा पुरा चरण आहे.

* अगदीं खरें आहे. भीड घालून स्नेह्याजवळून आप्ताजवळून लोक पैसा कर्जी घेतात व स्नेहाचा व नात्याचा फायदा घेऊन पैसे बुडवितात. बुडावयास नको असल्यास व्यावहारिक उपायांची योजना केली तर स्नेह व आप्तपणा नष्ट होतात !

**घरनां छोकरा घंटी चाटे अने परोना आवीने लोट खाय।**

अर्थः—घरचीं मुलें जांत्याच्या पेढी चाटतात व दुसऱ्याचीं येऊन पीठ खाऊन टाकतात!

**॥ गृहीत एव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ।**

अर्थः—धर्म करावयाचा त्याची वाट बघत बसूं नये. मृत्यूनें आपल्याला गांठून आपली शेंडी धरलेली आहे. व तो इतक्यांत आपल्याला ओढणार असें समजून धर्म करून टाकावा.

Let not thy right hand know what the left does.

अर्थः—धर्म म्हणून साहाय्य करणें तें अशा मुग्ध रीतीनें करावें कीं या हाताचा धर्म त्या हाताला कळूं नये.

You must not examine the gift horse in the mouth.

अर्थः—दिलेल्या घोड्याचे दांत किती आहेत इ० चवकशी करतां कामा नये.

## परोपकारविषयक.

**परोपकाराय इदं शरीरं**

अर्थः—दुसऱ्यावर उपकार करण्याकरतांच परमेश्वरानें मनुष्याला शरीर दिलें आहे.

## वंचनाविषयक.

I should always be the deceived rather than the deceiver.

अर्थः—दुसऱ्यांस फसविण्यापेक्षां स्वतांच फसणें बरें.

### मनाविषयीं

It is the mind that makes the body.

अर्थः—शरीर हें मनःप्रधान आहे.

It ( mind ) can make a heaven of hell or a hell of heaven.

अर्थः—मन हें नरकाचा स्वर्ग व स्वर्गाचा नरक करूं शकतें.

×। तस्माच्चित्तं सर्व तो रक्षणीयम् ।
॥ स्वस्थे चित्ते बुद्धयः संश्रयन्ते ॥

चित्ताचें ( ह्मणजे मनाचें ) रक्षण केलें पाहिजे. त्याचें रक्षण केलें ह्मणजे त्यास स्वस्थ ठेविलें तरच बुद्धीचे प्रकार सुचतात.

। न कुत्रचित् क्वापिच दुस्थिता मतिः ।
॥ लभेत वाताहतनौरिवास्पदम् ॥

अर्थः—मति जर दुःस्थितींत ठेवली ( अस्थिर असली ) तर तिला कोठेंही, केव्हांही ठाव मिळणार नाहीं, जसा वादळांत सांपडलेल्या नौकेला.

## सौख्यविषयक.

Pleasure comes on wings,
But is remembered by the stings!

अर्थः—सुखाला त्वरेनें उडत यावयाला पंख आहेत पण त्याची जी आठवण राहते ती तें मागून शंख करावयाला लावतें म्हणून राहते.

## भवितव्यताविषयक.

। अवश्यं भाविभावानां प्रतिकारो भवेद्यदि ।
। तदा दुःखैर्नालिंपेरन् नलरामयुधिष्ठिराः ॥ १ ॥

**अर्थः**—अवश्य घडून येणाऱ्या गोष्टींचा जर प्रतिकार करतां आला असता तर नळ, राम व धर्मराज यांना दुःखाचा स्पर्श झाला नसता !

। यत्र धर्मसुतो राजा गदापाणिर्वृकोदरः ।
॥ कृष्णा स्त्री गांडीवं चापं सुहृद् कृष्णस्ततो विपद् ॥ १ ॥

**अर्थः**—जेथें प्रत्यक्ष यमधर्माचा पुत्र युधिष्ठिर हा राजा, गदा घेऊन तयार भीमसेन, द्रौपदी सारखी स्त्री, ( अस्त्र युद्धांत प्रवीण अशा अर्जुनास ) गांडीव

---

× गीता अनेक आहेत. त्यांपैकीं एकींत रावसाहेबांनीं हा एक श्लोक वाचला होता. त्यांतील दोन चरण ते नेहमीं वापरीत असत. या गीतेचे ३०० श्लोक आहेत. तिचा शोध रावसाहेबांनीं चालविला होता. असें कांहीं पत्रांवरून दिसतें.

धनुष्य सहाय आणि श्रीकृष्णासारखा सखा तेथें विपत्ति असावी! हा सर्व भगवंताच्या मर्जीचा प्रकार आहे असें भागवत सांगतें.

## रागद्वेषविषयक.

### राग व द्वेष हीं अज्ञानजन्य आहेत.

## ईश्वरेच्छा विषयक.

Heaven orders the best when we do not and can-not understand them.

**अर्थः**—ज्या कांहीं गोष्टी घडून येतात त्या तशा कां घडून आल्या अशा कां आल्या नाहींत इत्यादि आम्हांस मात्र समजत नाहीं, आम्हीं समजूं शकणार नाहीं. तेव्हां हें उघड आहे कीं जें जें कांहीं घडतें तें तें परमेश्वर आमच्या कल्याणाकरतां घडवून आणतो असें समजावें.

There is providence in the fall of a sparrow.

**अर्थः**—यःकश्चित् चिमणीचें झाडावरून पतन होणें हें ईश्वरेच्छेनें नियमित आहे.

**यदभावि न तद्भावि भाविचेन्न तदन्यथा ।**

**अर्थः**—जें व्हावयाचें नाहीं असें परमेश्वरानें ठरविलें तें होणार नाहीं व जें होणार म्हणून ठरविलें तें अन्यथा होणार नाहीं.

So there is nothing for us but to work and wait.

अर्थः—म्हणून आपलें कर्तव्य करून स्वस्थ बसणें एवढेंच आपल्या हातांत आहे.

**मार्गानें जातां जातां जें प्राप्त होतें त्यास भवितव्यता म्हणतात व अशावेळेस जी आपत्ति प्राप्त होते तीस सन्मुख असलें पाहिजे.**

Man proposes and god disposes.

अर्थः—मनुष्य एक योजना करतो परंतु ईश्वर तिची वाट अन्यथा लावतो. या म्हणीची सत्यता मान्य करून रावसाहेब तिला एक वाक्य जोडीत तें

The proposal must have a sound basis.

अर्थः—काय योजना करावयाची ती पायाशुद्ध पाहिजे. नाहींतर कांहींतरी योजना करून व कार्यसिद्धि झाली नाहीं कीं देवाजीच्या मनास आलें नाहीं, त्याची योजना निराळी आहे असें म्हणून आपल्या जबाबदारींतून लोक मोकळे होतील.

## देहप्रारब्धविषयक.

**प्रत्येक माणसाच्या मागं देहप्रारब्ध असतें परंतु त्यासाठीं जीं प्रवाहपतित कार्यें आहेत तीं सुटत नाहींत. प्रियजनाच्या वियोगदुःखाचा विसर पडणें कठीण आहे. तो कालान्तरानें व पूर्ण ईश्वराधीनतेनेंच पडणें शक्य आहे.**

Time and perfect resignation are the only cures for separation by death.

( अर्था करतां वरील ४ ओळी पहा )

**विपदः सन्तुनोशश्वत् तत्र तत्र जगद्गुरो !**
**भवतो दर्शनं यत् स्यात् । अ-पुनर्भवदर्शनम् ॥ १ ॥**

अर्थः—हे जगद्गुरो ! विपत्तीच्याच प्रसंगीं तुझी आठवण होते व तुझी आठवण झाली, तुझें दर्शन झालें म्हणजे पुनः या भवाचें, या दुःखमय संसाराचें दर्शन चुकतें. म्हणून सतत विपत्ती वांट्यास येणेंच चांगलें म्हणजे सतत तुझें दर्शन होईल व भवाचा ताप सततचा चुकेल !

## कज्जांविषयीं.

A man who fights his own case,
Has generally a fool for his client.

अर्थः—आपल्या कामांत आपणच वकील झालों तर आपला पक्षकार कोण ? तर एक मूर्ख !

याच अर्थाची दुसरी म्हण

**स्वतांच्या दुःखण्यास स्वतां वैद्य होऊं नये.**

## अनुभवविषयक

You can not transfer exprience by cheque.

अर्थः—मनुष्याला हुंडी देऊन पैसा दुसऱ्याच्या नांवावर करतां येतो, दुसऱ्याला पैसा देतां येतो. पण अनुभव देतां येत नाहीं. अनुभव हा विकतच घेतला पाहिजे. किती वेळा सांगितलें तरी सांगणाऱ्याच्या अनुभवाकडे ऐकणारा लक्ष देतच नाहीं. अनुभव स्वतः घेऊन पाहिल्याशिवाय फुकट आहे.

## विचार व आचार यां विषयीं

## प्रथम विचार मग आचार.

Examples work more effectually than precept.

अर्थः—करणीचा परिणाम वाणीहून थोर

## वादविषयक.

## वादे वादे, जायते तत्त्वबोधः

अर्थ—वादावादांतून तत्त्वबोध निष्पन्न होतो.

## कपटविषयक.

Tricks multiplied by tricks are equal to tricks raisd to square.

कपटानें कपटाला गुणलें असतां ( कपटामागून कपटाचरण केलें असतां ) कपट प्रबन्ध होतो.

## कायद्यांच्या घाईविषयीं.

Legislate in haste and repent at leisure.

अर्थः—उतावीळपणानें कायदे करा व सावकाशपणें हळहळत बसा !

None are so blind as those who will not see.

अर्थः—जे डोळस असून ( वस्तुस्थितीकडे ) बघतच नाहींत त्यांच्या इतके आंधळे तेच.

## जुलुमाविषयीं

Tyrants are slaves.

अर्थः—दासांवर जुलूम करणारे धनी हे स्वतां ( मनो विकारांचें ) दासच असतात. त्यांच्यानें जुलमी रूढी मोडवत नाहींत. प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पना सोडवत नाहींत. खोट्या सत्तेची माया तोडवत नाहीं. म्हणजे रूढी, प्रतिष्ठा व सत्ता इत्यादिकांचे ते दासच असतात.

## उपायविषयक.

**मांजराच्या गळ्यांत घांट कोणी बांधावी याचा निर्णय करण्याचें काम उंदरांच्या सभेंत आल्यापासून म्हणजे इसापाच्या वेळेपासून आज २८०० वर्षें झाला नाहीं.**

### प्रत्यक्ष दर्शनविषयक.

A few words in person go a longer than a note.

अर्थः—प्रत्यक्ष भेटीनें जें मोजक्या शब्दांनीं कार्य साधेल ते पत्रोंपत्रीं होणाऱ्या कार्याहून मोठें साधेल.

## मित्रत्व व वैर यांविषयीं.

**आदौ स्नेहः पुनर्वैरं । पुनः स्नेहं न कारयेत् ।**

अथः—आधीं स्नेह असून ज्याच्याशीं वैर पडलें त्याच्याशीं पुनः स्नेह करूं नये.

## वसतियोग्यग्रामविषयक.

**। धनिकः श्रोत्रियो राजा तरी वैद्यस्तु पञ्चमः ।**
**॥ एते यत्र न विद्यन्ते न तत्र दिवसं वसेत् ॥ १ ॥**

अर्थः—ज्या गांवीं संपन्न गृहस्थ नाहीं, विद्वान् मनुष्य नाहीं, राजा म्हणजे कोणी शास्ता पुरुष नाहीं, नदी असून ती तरून जाण्याचें तरीसारखें साधन नाहीं व यांत पांचवा आणखी वैद्य नाहीं तेथें एक दिवसही राहूं नये.

## विश्वासविषयक

We can not trust those who do not trust us.

अर्थः—जे आमच्यावर विश्वास ठेवीत नाहींत त्यांवर आम्हीं विश्वास टाकतां कामा नये.

## भयनिवारणाविषयक.

। शंकटं पंचहस्तेन, दश हस्तेन वाजिनम् ।
॥ हस्तिनं हस्तसहस्त्रेण, देशत्यागेन दुर्जनम् ॥ १ ॥

अर्थः—गाड्यापासून पांच हात, घोड्या पासून दहा हात व हत्तीपासून सहस्र हात दूर राहिल्यानें आत्मरक्षण होतें परंतु दुर्जनापासून आत्मसंरक्षण करण्यास देशत्याग करावा लागतो.

## गुणसंभावनाविषयक

Genuine merits often go unrewarded in the world.

अर्थः—इहलोकीं तरी अस्सल गुणांबद्दल मनुष्यास बक्षिस मिळत नाहीं असेंच वारंवार घडतें.

## पुराव्याविषयीं.

### सशाचे पारधीस वाघाचा पुरावा.

### प्राप्तिविषयक

No gain without pain.

अर्थः—कष्ट सोसल्याशिवाय लाभ होत नाहीं.

## केवल चापल्य व केवल बल यांविषयीं.

The race is neither to the quick nor the battle to the strong.

अर्थः—शर्यत ही नुसत्या चपळांची नाहीं व लढाई नुसत्या सशक्तांची नाहीं.

हळू पण दमानें चालणारें कांसव चपळ पण लवकर दमून जाणाऱ्या सशाच्या पुढें जातें. युक्तिवान कोल्हा सशक्त सिंहाशीं लढून जय मिळवितो.

The dead rule the living.

**अर्थः**—मृत झालेले लोक जीवन्त असलेल्यांवर राज्य करतात.

**। चुन आ-हन्गे रफ़्तन् कुनद् जान् ए-पाक् ।**
**॥ चे बऱ्ह् तखत् मोर्दन-चे बऱ्ह् रु-हा खाक ॥ १ ॥**

**अर्थः**—एखाद्या महात्म्याच्या मनांत देह विसर्जन करावयाचें आल्यास स्वर्गारोहण करतांना त्यानें आपला देह सिंहासनावर ठेवला काय अथवा मातींत ठेवला काय त्याला सारखेंच आहे.

## असत्यविषयक.

**। असत्याद्भीतिरधिका महतां नरकादपि ।**

**अर्थः**—नरकाहून असत्याची अधिक भीति मोठ्यांना असते.

**संदिग्ध लिहिण्यापेक्षां न लिहिणें बेहेत्तर आहे.**

## सुखदुःखविषयक.

**। सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।**
**॥ एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥ १ ॥**

**अर्थः**—सुखदुःखाचें संक्षेपतः लक्षण असें आहे कीं मनुष्याचें सर्व दुःख परवश होण्यांत आहे व सर्व सुख आत्मवश होण्यांत आहे.

**सुखदुःखाविषयीं आयुष्य क्षीण करण्यांत अर्थ नाहीं.**

## इतरांशीं वागणुकीविषयीं.

Do unto others as you would be done by them.

**अर्थः**—दुसऱ्यानें आपल्याशीं जसें वागावें असें आपल्यास वाटतें तसें आपण दुसऱ्याशीं वागावें. ×

---

× रामदास म्हणतात.

**आपण दुसारियास करावें । तेणें स्वयेंची उसणें घ्यावें । जनां कष्टावितां कष्टावें । लागेल स्वयें ॥ १ ॥ म्हणोन दुसारियासीं सुखी करावें । तेणें आपण सुखीं व्हावें । दुसारियासी कष्टावितां कष्टावें । लागेल स्वयें ॥ २ ॥**

## गुरुजनविरोधविषयक.

**। गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।**
**॥ उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ १ ॥**

( वाल्मीकि रामायण )

**अर्थः**——एकादा मनुष्य वडील आहे पण अवलिप्त होत्साता कार्य कोणतें व अकार्य कोणतें याचें ज्ञान न झाल्यामुळें मार्ग सोडून जाऊं लागल्यास त्याचें शासन अवश्य करावें लागतें.

**। अन्ते नारायणस्मृतिः ।**

**अर्थः**——अन्तकालीं नारायणाची स्मृति झाली पाहिजे.

(ही **रावसाहेबांची** इच्छा कशी सफल झाली तें प्रकरण ७५ वें पृष्ठ ९१९ वें पहा.)

---

## प्रकरण ८० वें.

# रावसाहेबांच्या रोजनिश्या.

**अहोरात्री साठ घडी । लोटितां पापपुण्याची**
**जोडी । किति झाली हें घडी घडी । विचारित**
**अससी कीं. ॥ १ ॥** ( मुक्तेश्वरकृत सभापर्व. )

रोजनिशी लिहिणें म्हणजे वेळेचा जमाखर्च ठेवणें होय. जो मनुष्य पैशाचा जमाखर्च ठेवीत नाहीं त्याला प्रपंच अथवा धंदा किफायतशीर होत आहे कीं नाहीं याचा अंदाज कळत नाहीं. अनाठायीं खर्च कसा होत आहे, व काटकसर कोठें व कशी करतां येईल हें त्याच्या ध्यानांत येत नाहीं. आल्यास वेळेवर येत नाहीं. उधळपट्टीच्या उतरणीवर घसरणाऱ्या त्याच्या प्रपंचाच्या गाड्यास खीळ घालून आवरतां येत नाहीं. म्हणून त्याची हानि फार होते.

उलट जो मनुष्य जमाखर्च ठेवितो त्यास प्रपंच किंवा धंदा व्यवस्थित रीतीनें करतां येतो. असें जर आहे तर पैशाहून अधिक मूल्यवान् जो वेळ त्याचा जमाखर्च ठेवल्यापासून म्हणजे रोजनिशी लिहिल्यापासून किती फायदे होतील हें सांगावयासच नको. मनुष्याच्या आयुष्यांतील जेवढ्या काळाचा सद्व्यय होतो तेवढ्यावरूनच जर त्याचें आयुष्य मापण्यांत येईल तर आज दीर्घायुषी म्हणून मानलेलीं माणसें अल्पायुषीच ठरतील; परंतु काळाचा अपव्यय न करतां सद्व्यय करणारीं माणसें अल्पायुषी असून दीर्घायु ठरतील. रोजनिशी ठेवणारीं माणसें काळाचा अपव्यय न होऊं देण्याची व सद्व्यय करण्याची खबरदारी घेऊं शकतात म्हणून तीं वर निर्दिष्ट केलेल्या तत्त्वाप्रमाणें दीर्घायु म्हणजे चिरकीर्ति होऊं शकतात. रावसाहेब या दुसऱ्या वर्गांतील होते. म्हणून त्यांच्या रोजनिशांविषयीं जरा विस्तृतपणें लिहिण्याचा विचार आहे.

रोजनिशी लिहिण्याची कल्पना त्यांना प्रथम केव्हां सुचली हें समजत नाहीं. तथापि त्यांच्या संग्रहीं एका रोजानिशींत एक मोडींत लिहिलेली तीन कलमी यादी सांपडते ती खालीं दिली आहे. तींतील दिनचर्येचा मसुदा अभ्यास संपला नाहीं तोंच प्रपंचाचे धडे शिकणाऱ्या तरुण मुलाकरतां केलेला दिसतो.

**" यादी दिनचर्या कशी ल्याहावी त्याचा मसुदा "**

प्रपंचाचा झाडा लिहिणें तो नित्याचा लिहूं नये. नैमित्तिकाचा मात्र लिहावा. तारीख इंग्रजी माहे आक्टोबर सन १८४४ मराठी मिति. भाद्रपद वद्य ५, मंगळवार. वृद्धिक्षय तिथीस येईल तो वृद्धीचा आंकडा येईलच. क्षय मिति आल्यास शुद्ध अगर वद्य लिहून पूज्य घालावें.

१ वद्य—वार—अभ्यास नेमाप्रमाणें झाला. रत्नागिरीस डांकेतून पत्र पाठविलें. अमुक गांवचा गडी अमुक गृहस्थाकडून आला होता. कांडपास भात अमुक मण घातलें. नारळ दोन रुपयांचे फोक्त केले. अमुक मनुष्यास रोजगार लागला. अमुक हरिदास यांचें अमुक गांवीं कीर्तन झालें.

२ शुद्ध—वार—नित्यवत् अभ्यास झाला. अमुक भटजी अमुक गांवी गेले अगर आले. अमुक गृहस्थास पुत्र झाला हें लिहिणें तें मोठ्या आर्ततेनें लिहावें.

३ शुद्ध २ वार सोमवार वृद्धि इ० झाली असेल तर त्याप्रमाणें शु॥ २ वार मंगळवार ० वार—बुधवार क्षय झाला असेल तर त्याप्रमाणें.

मसुद्यांत इंग्रजी तारीख, माहे अक्टोबर सन १८४४ अशी दिली आहे. ती जर मसुद्याची तारीख असेल तर रावसाहेबांच्या ११।१२ व्या वर्षींच त्यांच्या हातांत हा मसुदा पडला असावा. परंतु त्या तारखेची रोजनिशी उपलब्ध नाहीं. तेव्हां ती तारीख काल्पनिक असावी अथवा रोजनिशी लिहिण्याचा विचार त्या सुमारास त्यांच्या मनांत आला असावा अथवा वडील मनुष्यांनीं रोजनिशीचा मसुदा त्यांस दिला असावा. परंतु तो विचार अमलांत यावयास १० वर्षें लागलीं. रावसाहेब रोजनिशी लिहिण्याचें काम रात्रौ निजावयास जाण्यापूर्वी करीत असत. १८५४ पासून यांच्या रोजनिश्या उपलब्ध आहेत. त्यांतील काहींत केलेली दैनिक वृत्ताची नोंद फार सविस्तर, मार्मिक व मनोरंजक आहे. कांहींतली त्रोटक असून कांहींस लेखणीचा नुसता स्पर्श मात्र झालेला आहे. तरी रोजनिशी लिहिण्याची अगदींच विस्मृति झालेली होती असें मात्र शेवटपर्यंत दिसत नाहीं. या रोजनिशांतील कांहीं टिपणांचा उपयोग चरित्रांत योग्य ठिकाणीं केला आहे व कांहीं टिपणें पुढें दिलीं आहेत.

रावसाहेबांस त्यांच्या वडिलांनीं लहानपणीं विद्या शिकवितांना योजिलेला अभ्यासक्रम विशिष्ट स्वरूपाचा होता. त्याची यादी रोजनिशींत जपून ठेवलेली आढळते ती मननीय आहे म्हणून दिली आहे.

**यादी विद्याभ्यास गृहस्थांचे मुलांस आर्ततेनें करावयाचा असेल तर त्यांनीं कोणत्या वेळीं कसा अभ्यास करावा त्याचा तपसील—**

घटकांचा नेम घटका ६०.

३ पहांटेस तीन घटका रात्रीं म्हणजे सुमारें अरुणोदयीं उठून

—

१ घटका कित्ते गिरवावे उर्फ वळवावे.

१ नंतर शौचविधि मुखप्रक्षाळण करून अल्प प्रातःस्मरण करावें. नंतर स्नान. तेव्हां तीथ वार नक्षत्रादि चंद्र सूर्य गुरु कोणत्या राशीस आहेत तें स्मरोन संकल्प करून चारी अर्घ्यें द्यावीं. वस्त्रपरिधान होई पावेतों गंगाष्टक म्हणावें.

१ गोपीचंद विधियुक्त धारण करून *अजपाजपाचें उदक सोडून प्रातः संध्या करून त्रीच्या कल्पाचे नमस्कार चार आवृत्ती प्रमाणें घालावे इतकें येक घटकेंत होईल. नमस्कार येकदम घालूं नये. थोडे थोडे चढवून लिहिल्या नेमापलिकडे गरज नाहीं. नमस्कार घातल्यावर ×-।।।- दुध, ६ मासे साखर घालवून घ्यावें. क्रिमी उर्फ जंतांची विकृत जाहल्यास दोन गुंजा पासोन सोसेल तितकी सुंठ घालावी.

---

३

६ सूर्योदयाबरोबर शाळेंत हजीर व्हावें.

---

२ दोन घटका कित्ते मोडीचे व बाळबत गिरवावे.

२ खर्डीं ल्याहावीं. त्यांत दोन खर्डीं बारीकही असावीं.

१ पूर्व दिवशीं समजोन घेतलेलें असेल त्यास आवृत्त करावी.

१ नवा अभ्यास करावा.

---

६

१ घरीं येऊन भस्मस्नान करून ब्रह्मयज्ञ करून भोजन करावें.

---

* या जपाचें उदक स्त्रियाही सोडतात. लेखकाच्या मातोश्री अद्यापपर्यंत सोडीत आहेत. या मंत्राचा संकल्प करून उदक सोडल्यास सहजप्रवृत्त श्वासोश्वासाच्या बरोबर जप सहजीं होतो अशी कांहीं कल्पना याच्या मुळाशीं आहे.

× दीढ पंचपात्री.

१ खेळावें परंतु शरीरास इजा न होण्याचा खेळ.

३ पढावें तें सांगणारा समई नसल्यास जुन्यास आवृत्त म्हणावी. मोठा अध्याय असल्यास येक घटका लागते. बाकी दोन घटकांत १०० सिलोकांची संथा होईल.

२ घरीं येऊन पान पत्रावळ पाहून त्रिसुपर्णादिक स्तोत्रपाठ. भोजन समई सुभाषित सिलोक वगैरे.

१ विश्रांति. त्यांत प्रपंचाची व्यवस्था प्रात:काल पासोन काय जाहली असेल ती सर्व चोकसी. कोठून पत्र आलें अगर पाठविलें. चाकर मनुष्यें काय काम करतात व जमा काय खर्च काय हें सर्व विचारोन घ्यावें.

४ भोजनोत्तर आवृत्त म्हणावी पाो देवधर यांचे घरीं २ घटका व दोन घटका नागु अण्णा अगर बाबा सामल यांचे विद्यमानें अनुक्रमानें सर्व म्हटलेल्यास व्हावी.

१० शाळेंत जावें. आणि रिवाजाप्रमाणें नवीन शिकणें आणि जुना अभ्यास आवृत्त व वाचणी वगैरे हिशेब पर्वाजा होऊन मंदवारीं श्रीमारुतीचे दर्शनास गुरुजीबरोबर जावें. मार्गानें जातां काळ कर्मणुकेस गोष्टी राजेरजवाडे यांच्या किंवा नकाशांतील रचना कोणदेश कोणीकडे दिशायुक्त या प्रकर्णीं किंवा कांहीं अभ्यास चाललेल्या गोष्टी बोलाव्या. पायांकडे निंच उंच, कांटा धोंडा, गुरूं वगैरे पहाण्याची नजर ठेवावी.

१ सायंकाळची संध्या काळीं. करावी दिनमानानें आदि पश्चात् मान करावें.

---

३२

२ स्तोत्रपाठ आरती देवे वगैरे.

१ भोजन.

२ गायन नवें व आवृत्ति ती ताल सुरीं.

२ पुस्तक वाचणें तें स्वरयुक्त अर्थ तात्पर्य मनांत आणोन. उगाच पारायण नीट नाहीं.

१ पोथी वाचते वेळीं तर्क घेऊन उपज घेतल्यानें विशेष विलंब लागेल आणखी दिनचर्या लिहिण्यामुळेंहि अवकाश पाहिजे याजकरतां ही घटका लिहिली. पुस्तकाचा अर्थ तात्पर्य मनांत घेऊन वादविवाद करावा. मग श्लोक अथवा वोव्याचा नेम केला नाहीं तत्रापि चिंता नाहीं. दाखला दृष्टांत कोणी सांगेल तें स्मरण मनांत धरावें. कोणे प्रसंगीं उपयोग होतो.

२० अल्पवयास इतकी निद्रा लिहिली. शास्त्र प्रमाण चवदा घटका सांगितल्या आहेत त्या पहांटेस दोन जाजती व आवशीस तीन घटका जाजती. कोणत्या मतें पहाटे प्रहर, आवशीस दीड प्रहर असाहि आधार आहे.

—

६०

या यादींतील शिस्त वाखाणण्यासारखी आहे. तिला एका तऱ्हेचें ऐतिहासिक महत्व आहे.

अगदीं लहानपणीं **रावसाहेबांस** त्यांच्या वडिलांनीं विद्या शिकवितांना बुद्धिबळें गंजिफा इ० बुद्धिवर्धक खेळांचें ज्ञान करून दिलें असें चवथ्या प्रकरणांत सांगितलें. तें ज्ञान सोपपत्तिक होतें असें त्या खेळांची उपपत्ति दाखविणारीं दोन टिपणें एका रोजनिशींत जपून ठेविलेलीं आहेत त्यांवरून दिसतें. ती टिपणें जशींच्यातशींच छापलीं आहेत.

## गंजीफांचें प्रकर्ण.

कोणा येका बाछ्यानें तांबोळी याची बेटी उर्फ मुलगी बायको केली. आणि तिजला पानें चाळावयाचा अभ्यास होता. तो, बाच्छाहीण जाहली, सबब

नाहीं सारिखा जाला. त्याजमुळें तिजला तोच रोग होऊन कृष जाली तेव्हां वैद्य याणीं चिकित्सा केली. त्यांत तिजला कांहीं रोग नाहीं नित्य अभ्यास तो नाहीं. हें समजोन बाच्छा याचे भूषणानुसार योजना केली. ती प्रथम आठ बाजू, दर बाजूस बारा बारा पानें, राजा वजीर या अनुक्रमापासून पुढें येका पासून दहापर्यंत चित्रें त्यांत चढत्या बाजू व उतरत्या बाजू व त्या बांजूंचीं नांवें. त्यांचा शिलोक.

**चयं कांच्यन वरात खुमासी । दान पान चढतें हुकमासी ।**
१ २ ३ ४ ५
**ताज आणि गुलाम रुदरी । दान पान उतरते समसरी ।**
६ ७ ८

सदरहू गंजिफा प्रथम निर्माण. त्याजवरून पुढें दहा अवतार मच्छादिपासून कलंकीपर्यंत जाहाले. व त्यापुढें तिसरे प्रकारच्या मेषराशी पासून मीनराशी पावेतों बारा राशी झाल्या आहेत परंतु सर्वांची खेळण्याची व हुकूम चढते उतरण्याची रीत येक. तींत सदरहू डाव खेळतां विशेषपणा बुद्धीचा काय ? तर प्रथम गलत करून त्रिवर्गांचे हातीं दस्त आले म्हणजे दिवसास खेळतां राम राजापासून डाव सुरू होतो नंतर परस्परें पानें टाकितात. तीं अमुक पडलीं हें जो ध्यानांत धरील तो खेळणार चांगला. व सदरहू डाव खेळते समई ही अखेरी मारणें ही मुख्य गोष्ट आहे. सिवाय प्रथम आरंभ ज्या रीतीनें खेळण्याचे करार करावे त्या रीतीनें खेळावें त्याचा तपसील.

( पुढचा मजकूर नाहीं )

## बुद्धिबळें.

देहधारी या नामें राजा, मन हें प्रधान, इतर मोहरीं तीं इंद्रियें, तीं राजास रक्षक याप्रमाणें येका शरीरावर प्रकार दोन. शरीर म्हणजे पट, तेथें कल्पना राजाची आणि प्रधानाची, म्हणजे मनाची परस्परें जिंकणें विषयींची इच्छा यांत विशेष बुद्धि प्रखर ज्याची तो राजास शह देतो. आणि शेवट

प्याद्याचा शह देऊन कील केला म्हणजे अखेरी. अशा प्रकारें इंद्रियें मनाचे स्वाधीन होऊन सात्विक वृत्तीनें राजास जिंकावा. खेळते समई आपल्या व दुसरे याच्या सर्व मोहऱ्यांवर नजर नेऊन डाव खेळावा.

रोजनिशी लिहावयास लागतांना काय काय त्यांत लिहावयाचें हें निश्चित झालेलें नव्हतें. परंतु पुढें दोन वर्षांनीं त्यांनीं हेबर्स जर्नल वाचला. त्याची तारीफ करून त्याप्रमाणें रोजनिशा लिहाव्या असें रावसाहेबांचें मत झालें.

" हेबर्स जर्नल वाचला, जसा जसा वाचीत गेलों तसा तसा तो अधिक मनोरंजक वाटूं लागला. याप्रमाणें मला लिहितां आलें तर बरें होईल. पण ही इच्छा करणें युटोपिअन कल्पना आहे. तथापि चांगलें व मोठें होण्याची इच्छा करण्यांत नुकसान तर नाहींच. इच्छा करणें व तसें होणें हीं निराळीं आहेत. " ( २६।२।५६ रो. उतारा )

पुढें त्यांस असें आढळलें कीं " आमचे लोक आपल्या स्वतांच्या वेळेच्या अगदीं चिंधड्या उडवतात व दुसऱ्याला तसें करण्यास एका अर्थी भाग पाडतात ही मोठी कींव येण्याजोगी गोष्ट आहे. मला लोक भेटावयास येऊन तासांचे तास बोलण्यांत घालवल्यावर सुद्धां जर त्यांना ' जा ' म्हणून सांगावयाला लागलों तर मला लागलेच गर्विष्ठ म्हणून नांवें ठेवावयाला लागतील:—म्हणतील ' याच्या शिवाय कोणाला वेळाची किंमतच समजत नाहीं ' या गोष्टीचा मला मोठा त्रास होऊं लागला आहे व दिवसानुदिवस अधिकच होणार आहे. " ( ८।६।५७ रो. इं. भा. )

रोजनिश्यांत रावसाहेबांनीं मुख्य जोर वेळ व्यर्थ न जाऊं देण्यावर दिलेला आढळतो.

" पांच वाजतां उशिरां निजून उठलों. निद्राळू कोल्हा कोंबडीची शिकार करूं शकत नाहीं. तसेंच हा देह कबरींत पडल्यावर पुष्कळच झोंप घ्यावयाची आहे या इंग्रजी म्हणीकडे लक्ष दिलें पाहिजे; व तदनुरूप वर्तनहि केलें पाहिजे. " ( ४।७।५७ च्या रो. इं. उ. )

" सव्वाचार वाजतां प्रथम जागा झालों. पण पांच वाजले नाहींत म्हणून निजलों तो सात वाजेतों पुन्हा जागा झालों नाहीं ! केवढा आळशी ! दोन तास अमूल्य वेळास मी मुकलों ! " ( ५।१।५६ ची रोजनिशी. )

अवेळीं आलेली निद्रा दवडल्यानें पुढें नुकसान होईल तर ती दवडीत नसत.

" रात्रौ ८ ते १० हा काळ संस्कृत वाचनास दिला होता. ८। वाजतां झोंप आली यामुळें हें काम झालें नाहीं. आणि झोंपेचा भंग केला असतां प्रकृति बिघडून या दोन तासाबद्दल चार फुकट जातील असें वाटून पुन्हां उठलों नाहीं. " ( १७।१२।५८ रो. )

" मुरूडकर मंडळी महादेव सामल, बाळ बागूल, विठ्ठलभट वैशंपायन हे आले. लोकप्रियतेच्या विभ्रमास भुलून अशा रीतीनें माझा वेळ मी उडवूं शकणार नाहीं. ते जेवढें बोलले तेवढ्यापैकीं चांगलें म्हणून होतें त्यांत एक तास घालविण्याच्या लायकीचें तें होतें. परंतु पुढें तें बोलणें अनियमित रीतीनें वाढत गेलें. मला त्यांत कांहीं अर्थ दिसला नाहीं. "( ४।१।५९ रो. इं. उ. )

वरील लहानपणच्या फार न शिकलेल्या ग्रामस्थ गरीब मित्रांनीं त्यांचा कांहीं वेळ निरर्थक घेतला म्हणून त्यांस जितकें वाईट वाटलें तितकेंच वाईट, शिकलेल्या व श्रीमंत नागरिक मित्रांनीं त्यांचा वेळ घेतला म्हणून एक वेळ वाटलें.

" आज आबासाहेब पटवर्धन, बापू कानिटकर, रामभाऊ मराठे, विठ्ठलपंत भिडे, मंगळ भिकशेट, वसईकर फडके, गोपाळपंत चितळे, विनायक भागवत, गणपतराव भास्कर आले. लोकांच्या भेटीमध्यें माझा इतका वेळ जातो कीं मला त्यामुळें वाईट वाटतें. याशिवाय माझें कसें चालेल तें समजत नाहीं " ( ३–४–५९ चा रो. इं. उ. )

याचा अर्थ स्नेह्यांनीं येऊन भेटूं नये, किंवा बोलूं नये असा नव्हता.

" आमच्या वेळांतील कांहीं वेळ स्नेह्या सोबत्यांची बौद्धिक करमणूक होईल अशा संभाषणांत खर्च केला पाहिजे. हरिपंत तात्या व नाना लिमये यांजवळ पृथ्वीचीं खण्डें कशाची केलेलीं आहेत याविषयीं भाषण केलें. " ( १२।१२।५७ रो. इं. उ. )

" धोंडोपंत यांस सूर्यग्रहण व चंद्रग्रहण यांची उपपत्ति सांगितली व राहु केतु हें काय आहे तें दाखविलें ( १५।९।५७ रो. इं. उ. )

तथापि निरर्थक वाद करण्याची त्यांची तयारी नव्हती.

" पुष्कळ वादविवाद झाला. त्यांत दोन तास वेळ निरर्थक घालविला. तेव्हां असा बेत केला कीं इन उत्तर कारणाव्यतिरिक्त बोलणें सोडून देण्याचा प्रयत्न करावा. तर ईश्वर तसें करो अशी प्रार्थना आहे. "

२४।६।६० रो.

स्वतःची कोठें चूक होत असेल तर ती सुधारावयाची असा निश्चय करून तिचा निर्देश रोजनिशींत करून ठेवीत.

" असा निश्चय केला कीं ईश्वराची प्रार्थना करून खालीं लिहिल्या-प्रमाणें नित्य करण्याचा निग्रह चालवावा.

१, जरी मी समजून फार आळस करीत नाहीं तरी जितकें इंद्रियदमन असावें तितकें होत नाहीं यामुळें बुद्धि कमी होते म्हणून इंद्रियदमन करावें.

२, पहांटेस ४ वाजतां उठावें.

३, संस्कृताचें रोज वाचन करावें. "

२९।३।५८ रो. उ.

रावसाहेब याप्रमाणें नेहमीं ४।५ वाजतां उठून ९ पासून १० पर्यंत झोंपीं जात.

" हें करा तें करा असा दुसऱ्याला उपदेश करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चांगल्या संवयी लावून घेण्याविषयीं व्याख्यान देणें फार सोपें आहे. पण मी स्वतां सतत उद्योग करण्याची व नियमितपणाची संवय लावून घेतली आहे काय ? माझें मन मला खाऊं लागलें म्हणजे मी सबब सांगतों कीं मला फिरावें लागतें म्हणून मला अगोदर बेत करून सर्व गोष्टी नियमानें करतां येत नाहींत. यांत कांहीं अर्थ नाहीं. सर्व गोष्टी नियमानें करण्याचा प्रारंभ एकदम केला पाहिजे. माझ्या मार्गांत अडचणी आहेत. परंतु सर्व अडचणी

वलांडून जाण्यांतच पुरुषार्थ आहे. अगोदर बेत करून वेळाचें नियमन करावें. मी रोजचा संस्कृत धडा संपवीन. फॅमिली हेराल्डचीं कांहीं पानें वाचीन; व इतर आधीं ठरवून ठेवलेल्या गोष्टी करीन. यापुढें नियमित राहण्याच्या निश्चयापासून च्युत होणार नाहीं अशी आशा करतों.

( २०।२।५७ रो. इं. उ. )

१८६४ मध्यें आरंभ करून हा ग्रंथ* माझ्यानें तडीस गेला नाहीं ही गोष्ट मोठी लाजीरवाणी आहे. तर आतां याची पाठ घेत सुटलें पाहिजे. नाहीं तर तो पुरा होणार नाहीं. कृत निश्चय करून बाकीचें अगदीं अवश्य असेल तितकेंच केलें पाहिजे. ७।९।५७ रो.

या पुढें थोडें तरी भाषांतर केल्याशिवाय ग्रंथ संपेतों रावसाहेबांनीं दिवस सुना जाऊं दिला नाहीं.

" नवीन इंग्रजी वर्षाचा आरंभ आहे. यांत नवीन विद्या संपादन करण्याची व काळाचा सद्व्यय करण्याची उमेद धरिली आहे व तो तडीस नेणारा हरि आहे. "

कोणतेंही काम निश्चयानें रोज करावयाचें झालें म्हणजे तें रोजनिशींत लिहून ठेवीत व तसें तें झालें कीं नाहीं किंवा किति झालें हें तें तडीस जाई तों लिहून ठेवीत.

कित्येक वेळां उद्यां जें जें करावयाचें तें तें आज लिहून ठेवीत असत. व त्यांतील झालेलें काम खोडून टाकीत. व जीं झालीं नाहींत तीं न होण्याची कारणें बाजूला लिहून ठेवीत.

" आज निश्चयानें बहुतेक कार्य योजिलेलें तडीस गेलें. ईश्वर करो आणि असा निश्चय राहो. अहो निश्चयाचें बळ तुका म्हणे तेंचि फळ. "

( १९।१।५९ रो. )

या ठिकाणीं निश्चय तडीस गेल्यामुळें फार आनंद झाला आहे व राव-

---

* एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानच्या इतिहासाचें भाषांतर.

साहेब तो आनंद वरील तुकारामाचा अभंग रंगांत येऊन गाऊन दाखवीत आहेत असें त्या अभंगाच्या अगोदर लाविलेलें 'अहो' हें पद दाखवीत आहे.

### खेळ सोडला पाहिजे.

( गंजिफाचा ) एकच डाव खेळावयाचा म्हणून प्रथम आम्हीं बसलों. परंतु खेळावयाची इच्छा अनावर झाली असें दिसतें. आम्हीं १२$\frac{1}{4}$ वाजेतों थांबलों नाहीं व झोंप लागावयास आणखी तास लागला. या प्रमाणें तीन तास व्यर्थ गेले. यांचा उपयोग अधिक चांगल्या गोष्टीकडे अनेक तऱ्हेनें मला करतां आला असता. वेळ अशी उडून जात आहे व खेळाचें व्यसन— ( कारण खेळ हें व्यसनच आहे ) जर मी लावून घेऊं लागलों तर माझे हातून अहित घडेल. मला अभ्यासाचेंच एक व्यसन लागलें पाहिजे. दुसरें कसलें नको. ११।१।५९ इं. उ.

सुमारें ६$\frac{1}{2}$ वाजतां उठलों. हा १२$\frac{1}{2}$ वाजेतों खेळत बसण्याचा परिणाम. हें दोषार्ह आहे. हें ईश्वर करील तर पुन्हां घडून येतां कामा नये. माझा खेळण्याकडे वळलेला मनाचा कल आंवरला पाहिजे. कालेजांत असतां मी केव्हांच खेळलों नाहीं हें कसें ! मग मी आतांच कां खेळावें ? आतां तर मला अधिक महत्वाच्या अनेक गोष्टी करावयाच्या आहेत. पुष्कळ अभ्यास करावयाचा आहे. आणि माझा वेळ जर असा पोरखेळांत गेला तर माझी उन्नति कशी होणार ? म्हणून इतःउपर असा ठराव करतों कीं ईश्वर अनुकूल असेल तर या पुढें पूर्वीं प्रमाणें खेळ सोडून दिला पाहिजे व परमेश्वर मला तो तडीस नेण्यास शक्ति देईल अशी आशा करतों.

१२।१।५९ रो.

असा दृढनिश्चय करून त्यांनीं जीं खेळ किंवा इतर करमणुकीचीं साधनें सोडिलीं तीं पुन्हां धरिल्याचें एकाद दुसऱ्या अपवादभूत उदाहरणाशिवाय आढळत नाहीं.

याचप्रमाणें इतर बाबतींत आपली आपणच सुधारणा कशी करावी याकडे लक्ष देऊन रावसाहेब रोजनिशी लिहीत.

" फार वाचाळता करणें मला इष्ट नाहीं. आजपासून जिव्हा जरा आंवरून धरली पाहिजे ' मौन हें विभूषण आहे. तें मनुष्याचें रक्षण करतें ' ह्या अर्थाची इंग्रजी म्हण खरी आहे. "

( १९।६।५५ रो. )

विनायकराव भागवत यांचें पत्र वाचलें. माझें इंग्रजी भाषेवरच्या प्रभुत्वाचें क्षेत्र फार नियमित झालें आहे हें अगदीं खरें आहे. त्यांनीं मला याविषयीं सुचविल्याबद्दल आतांच पत्र लिहून त्यांचे आभार मानीत आहें. अभ्यास चालू ठेवण्याविषयीं कडक नियम करून ते अम्मलांत आणलेच पाहिजेत.

६।१।५६ रो.

घोड्यावरून फिरत असतां माझा अभ्यास करण्याविषयींचा बेत मनांत घोळूं लागला. माझी भाषासरणी उत्तम नाहीं असें मला वाटतें. ही खोड कशानें दूर करतां येईल ? अभ्यास ही एक किल्ली आहे. तिनें हव्या त्या रहस्यांचें द्वार उघडतां येतें. तर तिचा उपयोग मला कां करतां यावयाचा नाहीं ? माझी खोडी मला समजली आहे. मी उद्योग करीत असतों पण तो पद्धतवार होत नसेल. विनायकराव भागवत यांचे पत्र आल्यापासून माझ्या संवयींत बदल केला आहे. पहिली अभ्यास करण्याची संवय पुन्हां सुरू केली आहे. अथवा ती सुरू करण्याच्या रस्त्याला लागलों आहे असें म्हटलें तर अधिक खरें होईल. वाईट संवयी प्रयत्नाशिवाय लागतात. आळसाचा स्पर्श शरीरास एकदां झाला म्हणजे कोणी जादू केल्याप्रमाणें तो त्वरित सर्व शरीर हळुहळु व्यापून टाकतो. आतां रोज दोन बाजू लिहिल्या पाहिजेत.

१७।१।५६ रो.

यापुढें उत्तम उत्तम इंग्रजी पुस्तकें नित्य वाचण्याचा परिपाठ पूर्ववत् रावसाहेब ठेऊं लागले. याचमुळें त्यांचे इंग्रजी लेख वाखाणण्यासारखे झाले.

मि. रीड ह्यांचें माझें काल संध्याकाळीं पुष्कळ भाषण झालें, तें उत्तेजनपर होतें. आमच्या कल्याणाची ते खरी कळकळ बाळगतात. ती नुसती शब्दांनीं बोलून दाखविण्यापुरतीच नाहीं. कृति करून दाखविण्याची त्यांची इच्छा

आहे. त्यांनीं एक योजना करून ठेविली आहे. ती कशी काय ती मला त्यांनीं सांगितली आहे. ती अशी कीं आम्हीं एलफिन्स्टन् इन्स्टिट्यूट मधील पांच सहा विद्यार्थी मिळून आमच्या पसंतीच्या निरनिराळ्या विषयांत निबंध लिहून त्यांजकडे पाठवावे. त्यांस जोडून स्वतां एक प्रस्तावना आमच्या निबंधांतील वाक्यांतील एक शब्दहि फिरविल्याशिवाय त्यांनीं ते छापून प्रसिद्ध करावे. ही खटाटोप कां करावयाची? तर डॉ. बुइस्ट यांचें म्हणणें असें आहे कीं परीक्षेमध्यें जे कांहीं निबंध आम्हीं लिहितों ते आमचे नसून आम्हांस शिकविणाऱ्या प्रोफेसरांचे आहेत. हें म्हणणें खोटें पाडण्याकरतां हा प्रयत्न आहे. याप्रमाणें माझ्या वांट्याचा निबंध मी लिहिण्याचें ठरविलें आहे.

( १८५६ रो. )

आपला स्वभाव तापट आहे. राग येऊं न देण्याविषयीं प्रयत्न करावा असें त्यांस वाटत असे व त्यांच्या प्रयत्नास क्वचित् प्रसंगीं यशही आलेलें दिसतें.

क्ष मला भेटल्याशिवाय निघून गेला मोठा लुच्चा निघाला. य विषयीं माझें मन दूषित करण्याचा प्रयत्न करीत होता. ईश्वर त्यावर दया करो.

१६।११।५६ रो.

नेहमींच्या स्वभावावरून पहातां " क्ष " धडपणें गेला हें त्याचें नशीब !

यापुढें राग आंवरून धरण्याचा त्यांचा प्रयत्न नित्य चालू असे.

" मी राग येऊं दिला नाहीं. असेंच नित्य साधेल तर मोठा जय मिळविला म्हणावयाचा. ज्ञ एक मोठा लुच्चा बनला आहे. अथवा प्रथम पासूनच होता."

१४।४।५८ रो.

## विनाकारण संभाषण

महादेव शास्त्री यांचें गेल्या शनिवारीं व्याख्यान झालें त्यासंबंधें आमचें बोलणें झालें तेव्हां मी हरिपंत मोडक यांस कांहीं अपमानास्पद बोललों अशी कल्पना करून त्या विषयींचाच विचार करीत बसलेले मला ते दिसले. मी त्यांस त्यांतला कांहीं प्रकार नाहीं असें समजाऊन सांगितलें. आम्हीं ( मी व विनायकराव भागवत या दोघांनीं ) तुमचें खरें मत सदरहू व्याख्यानासंबंधें

काय आहे म्हणून विचारलें. त्यांनीं माझ्या प्रश्नांस कांहीं तरी उत्तरें देऊन उडवाउडव केली. हें त्यांचें करणें मला प्रामाणिकपणाचें वाटलें नाहीं व तसेंच मी हरिपंत यांस सांगितलें. पुढें हरिपंतानीं मतच दिलें नाहीं व हा वाद येथेंच मिटला असें मी समजलों. पण तें चुकीचें ठरलें. हरिपंत यांचें मन विकृत झालें आहे. विषयग्रहण करण्यास असमर्थच झालें आहे, अशी मला भीति वाटते. यापुढें अगदीं साध्या विषयावर सुद्धां त्यांच्याशीं वादविवाद करण्याचें कामाकाजा शिवाय सोडून दिलें पाहिजे. ते बुद्धिमान व तरुण आहेत. तथापि मला असें वर्तन पुढें ठेवणें इष्ट आहे, नव्हे अवश्य आहे असें खेदानें म्हणावें लागतें. कारण आतांशा असल्या निरुपयोगी विषयावर आम्हीं तासांचे तास घालवितों म्हणून असा ठराव करण्यांत येत आहे कीं ( परमेश्वर सहाय ) या वेळेपासून सर्व तऱ्हेचा निरुपयोगी वादविवाद बंद करण्यांत येत आहेत.

( १८।२।६१ रो. )

हरिपंताजवळ बोलत असतां ते ( हरिपंत ) म्हणाले, " तुम्हीं केव्हां केव्हां फारच स्पष्टपणें कांहीं व्यक्तींविषयीं बोलतां ". पुढें थोडेसें बोलून मी त्यांस म्हटलें. होय हा माझा दोष मला कळून आला आहे. परंतु बेतानें बोलण्यापेक्षां मुळीं मौन धारण करणें बरें म्हणून जीभ आंवरण्याचें सामर्थ्य मला द्यावें अशी मी परमेश्वराची प्रार्थना करीत जाईन. ( २।४।६१ रो. )

गंगादास किशोरदास आले होते ते म्हणाले ' तुम्हीं करसनदास तेनसी सारख्या गृहस्थाविषयीं बोलतांना त्याला अनुलक्षून ' भूत ' शब्दाची योजना केलीत ' मी म्हटलें तसें झालें असलें तर त्याबद्दल मला वाईट वाटत आहे. मी त्यांना अनुलक्षून कधींच बोललों नाहीं. जर असेल तर त्यांची तोंडीं व तुम्हीं सांगाल तर लेखी माफी मागावयास तयार आहें. '

जीविताला मौनानें सुरक्षितपणा येतो, मौन हें जीविताचें खरें भूषण आहे. मौन पाळण्याचें व्रत पतकरिलें पाहिजे. १।३।६१ रो.

लोकप्रियता संपादण्यास प्रसंगविशेषीं कांहीं चांगल्या तत्त्वांचा त्याग करावा लागतो. पण तसें करावयाचें नाहीं असा रावसाहेबांचा निश्चय होता.

‘ हरिपंत मोडक यांचें व माझें मोठें संभाषण झालें. माझ्या स्वभावांत थोडा फरक करून माझ्या संवयी आमच्या लोकांस जरा रुचतील असें केलें पाहिजे. असा त्यांचा विषय होता. मीं त्यांस स्पष्ट सांगितलें कीं सत्य व त्याचा आश्रय अभंगावह जो प्रामाणिकपणा, ह्यांचा जर मला त्याग करावा लागेल तर मी लोकप्रियता संपदण्याविषयीं आतुर नाहीं. मला मनाची शान्ति पाहिजे जग वाटेल तें म्हणो. मनाच्या शान्तीचीच मला किंमत अधिक आहे.

( ११।७।५७ रो. )

आज सारा दिवसभर अंगांत आळस भरून राहिला आहे असें वाटलें. त्याचें कारण अंशतः हवेची उष्णता व अंशतः कामें पुष्कळ करावयाचीं होतीं आणि नीटपणें एकही झालें नाहीं. एकाच चुलीवर एकाच वेळीं अनेक पदार्थ तयार करावयाचे असले म्हणजे जसें होतें तशीच बरोबर ही गोष्ट झाली असें नाहीं. माझ्या संस्कृत वाचनाची व भाषांतराची व्यवस्था जशी बसवून ठेवली होती तशी इतर कामाची ठेवली नव्हती.

२४।७।६२ ची. रो.

क्ष हे माझ्या विरुद्ध पक्षाचे वकील होते. कोडतांत त्यांचें सर्व बोलणें संपलें व खालीं बसले. मग माझ्या जवळ येऊन तंट्यांतील कांहीं गोष्टींविषयींची माहिती विचारली मी ती दिली. त्या सरसें त्यांनीं लागलेंच उठून तेवढी कोडताच्या कानावर घातली. बाब क्षुल्लक आहे. परंतु मनुष्याचें अंतःकरण दिसून आलें. मला ह्यांनीं इशारतच दिली. या मनुष्यापासून हातभर दूरच राहिलें पाहिजे. एवढ्या पुरते हे गृहस्थ माझे गुरूच झाले म्हणावयाचे.

जानेवारी १८६४

नंतर त्यांस असें आढळलें कीं मनुष्याच्या अवलोकनांत जें कांहीं चिरस्मरणीय असें येतें त्याचप्रमाणें जे चिरस्मरणीय विचार आपल्या मनांत येतात ते रोजनिशींत नमूद करून ठेवावे. म्हणजे आपली सुधारणा आपोआप होते. ( ६।७।५५ ची रो. )

या दिवसापासून रोजनिशींत कांहीं स्फुट व सुंदर विचारांचा संग्रह करूं लागले.

डाक्तर अनंत चंद्रोबा यांचे घरीं डाक्तर गजाननराव यांबरोबर रामायण व इतर पुराणें यांतील संदिग्धार्थ स्थलांचा निर्णय करणें व अशा स्थलांचा हिंदुसमाजावर घडून येणारा परिणाम यांविषयीं चर्चा करण्यांत दोन तास घालविले. असली चर्चा मला अगदीं निरर्थक वाटते. कांहीं समजुती डोक्यांतून घालवून दिल्यानें ही रिकामी पडलेली जागा भरून न निघाल्यानें मन अगदीं अनिश्चित होतें. या अशा विषयांवर प्रयत्नें करून शक्य तितकें अल्प भाषण करण्याचा निश्चय केला आहे. ( ३।८।५५ रो. इं. उ. )

भायखळा क्लबामध्यें कर्नल जेकब यांस भेटलों ते म्हणाले:—हिंदु समाज वाळवेच्या कणांनीं रचलेल्या दोरखण्डा सारखा आहे. क्लब स्थापन करण्यांत जें तत्त्व आहे त्याची त्यास फार अवश्यकता आहे असें मला वाटतें.*

( ८।९।५५ रो. )

## दसरा.

सखाराम बापू दातार ( पनवेल ) यांच्या बरोबर दसऱ्यानिमित्त सीमोल्लंघनास गेलों. माझी इच्छा नसतां लोकमताला मान देऊन या मौजेच्या प्रकारांत सामील झालों. आमच्या लोकांचा मोठेपणा नष्ट झाल्यापासून रिकामी पडलेली जागा असल्या निरर्थक गोष्टींनीं हे भरून काढीत आहेत. यांचा अगदींच उपयोग नाहीं असें नाहीं पण त्या लहान मुलांसच शोभणाऱ्या आहेत.

( २०।१०।५५ रो. )

जेफ्रेज यांचा फ्रेंच राज्यक्रान्तीवरचा निबंध वाचला. त्यापासून सुधारकांनीं धडा घ्यावा. त्यांना लोकांच्या संवयी, मनोभावना, रीतिभाती व प्रत्यक्ष

---

* ( Hindus are like a rope of sand. I think they want the clubbing principle very much. )

धर्म एका दिवसांत बदलून टाकावयास पाहिजे आहेत. जणुं काय मनुष्य हा चिखलाचा बनविलेला आहे व मनांत येईल त्याप्रमाणें त्याला आकार देतां येईल.

( २४।२।५६ रो. )

## हरिदास.

भाऊंकडे हरिदासांविषयीं बोलणें झालें. मूळचा कथांचा उद्देश एकीकडे जाऊन आतां कथा म्हणजे शुद्ध लोकरंजनाचे तमाशे झाले आहेत. लोकोपदेशास मूळ कारण उपदेष्ट्यामध्यें जो प्रेमळपणा असावा लागतो तो जाऊन नटवेपणा आला आहे. त्रिंबक बावा चांगले गवई व व्युत्पन्न आहेत असें सांगतात परंतु प्राचीन हरिदासांसारखा साधेपणा ईश्वरभक्ति इत्यादि कांहीं त्यांच्यांत दिसत नाहींत, साधारण रीतीनें जींत सारमंडळ, करताल, सारंगी इत्यादि संगीत व गाणें बजावणें याचें प्राबल्य ती कथा नव्हे. एक नवीन नाटकपद्धति म्हटली असतां चालेल.

( २६।८।५७ म. उ. )

जेवल्यावर बर्वे यांकडे जाण्यापूर्वी येक नाशिककर हरिदास आले होते. त्यांस बिदागी दिली. आतां विद्या म्हणजे शुद्ध पोटाकरतां असा या लोकांचा समज आहे. आणि एकदां पोटास मिळालें मग ते कसली अपेक्षा करीत नाहींत. पूर्वीच्या आपल्या लोकांस फार विद्येची अभिरुचि असे. विद्या ही विद्या म्हणूनच ते संपादीत. केवळ पैक्याचें साधन म्हणून नाहीं. यामुळें त्यावेळीं मोठमोठे विद्वान् होऊन गेले. आतां त्याचें स्मरण केलें पाहिजे.

( ३०।८।५७ रो. )

## वाचकाभिरुचि.

मुलकी खात्यांतील मि. लॅरेन्स, निझामपूर येथें, भेटले. त्यांनीं एक चमत्कारिक गोष्ट सांगितली. तिनें हिंदी समाजांतील वाचक वर्गाच्या अभिरुचीविषयीं चांगली कल्पना होते. कोणतीं पुस्तकें वारंवार वाचलीं जातात हा प्रश्न पुणें येथील नेटिव्ह लायब्ररीच्या व्यवस्थापकास विचारतां तो म्हणाला, ‘ लंदनच्या लोकांचें रहस्य ’ या मालेंतील पुस्तकें इतक्या वेळा वाचलीं

जातात कीं तीं दोन वेळां बांधून झालीं; म्हणजे हल्लींची त्यांची बांधणी तिसरी आहे.* ( २८।१२।५५ रो. )

### उपपत्ति

रायगडच्या बाजूला फिरत असतां **वाळसखुर्द**, **पणदेरी**, **दापवड**, **पानें**, **मांग्रुण** या सहा गांवात गांव पहारा करण्यास महार नव्हता, त्याचें काम देवीचे भगत करीत. कारण असें सांगण्यांत आलें कीं लग्नाचे वेळीं ग्रामदेवतेला कांहीं वस्तु अर्पण करावी लागे. ती केल्यावर देवी प्रसाद म्हणून त्या मनुष्यास कांहीं दागिने देत असे. परंतु ते परत द्यावे लागत. एका महारानें या प्रमाणें कांहीं दागिने घेतल्यावर परत दिले नाहींत म्हणून तिनें श्राप देऊन ठेविला कीं या सहा गांवांत कोणत्याही महाराची वसति व्हावयाची नाहीं.

१२।१।५६ रो. म. उ.

( प्रत्येक सामाजिक परिस्थितीची धार्मिक उपपत्ति लावण्याची प्रवृत्ति लोकांत प्रस्तृत असलेल्या या गोष्टींत दिसून येत आहे. )

### तुमचा धर्म कोण ?

फिरावयास गेलों होतों. बिऱ्हाडाकडे वळल्यावर मी **गोविंदशेट** यांस विचारिलें ' तुमचा धर्म कोण ? ' त्यांस पटकन उत्तर देतां आलें नाही. मग मी त्यांस म्हटलें माझे हजारों देशबांधवांची व तुमची अवस्था एकच आहे. पुष्कळांस आपला धर्म काय हें सांगतां येत नाहीं. यास त्याची मान्यता होती असें दिसलें. ४।२।५९

### दारूबाजी.

**शिरगांव** येथें कुडामेढीचीं घरें पाहून वाईट वाटलें परंतु येथें दारूचें दुकान नाहीं हें पाहून संतोष वाटला. दारूबाजी हा गांवढ्या लोकांना जडलेला महाव्याधिच आहे. २५।२।५९ रो. उ.

### सुधारणेचें भविष्य.

**मंगळदास** यांचे कडे फिरतां फिरतां गेलों होतों. त्यांनीं मला सुधारकांच्या

---

* आज सत्तर वर्षांनीं ती अभिरुचि तशीच आहे कीं काय ? नसेल.

मतांविषयीं व ते अनुसरीत असलेल्या मार्गाविषयीं पुष्कळ प्रश्न विचारले व सुधारकांची अप्रत्यक्ष रीतीनें थट्टा केली + + + मंगळदास म्हणाले, येत्या दहा वर्षांत आमच्यामध्यें युरोपीयन लोकांप्रमाणें नाच सुरू होतील. या विषयीं मात्र मला संशय वाटला.

## अचिंत्य प्रकार.

केरोपंत यांजवळ मेसमेरिझम्, मनोधर्म, आत्मस्वरूप, सृष्टि व तिचा कर्ता, जीवित कर्तव्य, मरणानंतरची स्थिति इत्यादि विषयांवर भाषण झालें. उलट सुलट कारणांचें विवेचन झालें. बटलरचें ( सादृश्य संबंध ) व बर्क्ले यांचा ( बाह्य शून्यवाद ) या ग्रंथांतील तत्त्व; मनुष्याच्या विचारशक्तीची मर्यादा; अध्यात्मशास्त्रासंबंधें फार व्यापक स्वरूपाचीं विधानें ठोकून देण्यांत असलेली भीति; यां विषयींही संभाषण झालें. मग बाळशास्त्री जांभेकर यांचें चरित्र; हिंदी लोकांचें शारीरसामर्थ्य व त्याच्या वृध्यर्थ योजलेले हानिकारक उपाय; या विषयांकडेही वळलों होतों. अगदीं पहिल्या विषयांवर बोलतांना केरोपंतांनीं एक गोष्ट सांगितली ती अशी:—जेव्हां जेव्हां ते स्वतां अथवा त्यांचे बन्धू यांस कांहीं दुखणें येत असे त्याच्या अगोदर त्यांच्या मातोश्रीच्या तळव्याला कंड सुटत असे. चमत्कारिक पण अचिन्त्य !

१०।६।१८६३ रो.

## लोकभ्रम.

जांभूळपाड्याजवळ परळी गांव आहे तेथें आलों. बाळा वगैरे माणसें मागाहून आलीं. रामभाऊ धामणसकर यांच्या पडवींत उतरलों. ते म्हणाले "तुम्हांला आनंदानें जेऊं घालण्याची इच्छा आहे. पण मी कऱ्हाडा आहें. परिचयाशिवायचे लोक आम्हांकडे जेवावयास अनमान करतात. ( ३०।५।१८६४ )

## मारवाड्यांच्या बाक्या.

मारवाडी लोक व त्यांच्या काढलेल्या बाक्या या प्लेगाच्या सांथीप्रमाणें मला भीतिप्रद वाटतात. ( १७।५।५६ रो. )

## शिस्त.

एक फार बडे गृहस्थ स्टूडन्ट लिटररि सोसायटीच्या मुलींच्या शाळेंत गेले. परंतु वर्गातून गेले नाहींत. शाळा पाहण्याचा हेतु नव्हता. आपल्या जातीची मुलगी लग्नाची तेथें होती ती स्वतांकरतां पहावयाची होती. म्हणून त्यांनीं तिला पाहण्याचें या शाळेंत ठरविलें होतें. म्हणजे कोणाला समजल्याशिवाय तिला पहातां यावें हें जेव्हां मला समजलें तेव्हां मास्तरास बजावून सांगितलें कीं आमच्या शाळा नवऱ्या मुलींचे बाझार नव्हत. ( १।२।१८६५. )

## स्वप्न.

रावसाहेब हे स्वप्नदर्शी व स्वप्नांवर भरंवसा ठेऊन त्यांच्या दृष्टान्ताची वाट स्वस्थपणें बघत बसणारे नव्हते. व बऱ्याच प्रकारच्या गोष्टी रोजनिशींत त्यांनीं लिहून ठेवलेल्या आहेत त्यांत दोनवेळां स्वप्नें* काय पडलीं त्याचा उल्लेख आढळतो. त्यांतील एक असें आहे:—

‘ आज पहांटेस पांच वाजतां स्वप्न ( पाहिलें ) एक लहान हत्ती अंबारीसह पुढें आला आणि जवळ त्याची आई होती तिला पिण्यास लागला व घंटानाद जवळ झाला. ’

मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. एका मोठ्या गजान्तलक्ष्मी स्नेह्याचें दुसऱ्या मोठ्या गजान्तलक्ष्मी स्नेह्याच्या मार्फत काम करण्याचा रावसाहेबांचा मानस होता तद्विषयक फार चिंतन केल्यानें अंतर्गत विचाराला असें स्वरूप आलें असावें.

## पुढचें पुढं.

डाक्टर पीट यांनीं आपल्या कामाचा चार्ज घ्यावयास सांगितला. त्यांनीं चार्ज दिला व मी घेतला. कागदांवर उभयतांनीं सह्या केल्या. मग डाक्टर पीट यांनीं उपदेश केला कीं ‘ फार पुढचे पुढें करूं नका. महत्वाचें काम असल्याशिवाय मि. हॉवर्ड यांस भेटूं नका. ’ ( १०।३।५७ रा. )

## अपात्रीं दान.

आज सकाळीं जेऊन हपीसांत जाण्याचे तयारींत होतों व दादा काळे

---

* रोजनिशींत लिहिलेलें दुसरें स्वप्न ‘स्त्रीविरह’ या प्रकरणांत दिलें आहे.

यांजजवळ बोलत होतों. इतक्यांत एक ब्राह्मण ह्मणविणारा मनुष्य आला, त्यानें पारायणाचें निमित्त सांगून गाऱ्हाणें घातलें. तो माझ्या ओळखीचा नव्हता तथापि मी त्याच्या वेषावरून दक्षिणा दिली. पुढें तपास करतां तो खराब चालीचा मनुष्य आहे. तेव्हां असल्यास देणें अधर्म आहे, असें महादेव शास्त्री ( छापखान्यांतील ) यांचे जवळ ठरलें.

" असा ठराव करतों कीं धर्म करणें तो खालील शर्थींवर करावा.

१ अनाथ अगर पंगू असेल तर,

इतर रीत्या सत्पात्र असा खात्रीचा असेल तर. नाहीं तर दुसऱ्या अयोग्य अथवा अनोळखीच्या ब्राह्मणास तो ब्राह्मण म्हणून कांहीं देऊं नये. "

## खरे सुशिक्षित कोण ?

नंतर गोविंद नारायणजी यांस भेटलों. तेथें वाद झाला. मी सांगितलें कीं तुम्हीं ज्यांस सुशिक्षित म्हणता ते तसे नाहींत. पुस्तकी विद्येचें निरनिराळ्या विषयांत कांहीं पाठांतर घोकंपट्टीच्या योगानें असल्या लोकांकडून होतें. परंतु जोंपर्यंत त्यांना चांगल्या संवयी जडल्या नाहींत, जोंपर्यंत तन, मन, धन, यांचा आपण उपयोग कसा केला त्याचा नीट झाडा परमेश्वरास द्यावा लागेल अशी जबाबदारी त्यांस वाटूं लागली नाहीं तोंपर्यंत त्यांस सुशिक्षित म्हणणें मौर्ख्याचा प्रकार आहे. ( १३।१२।५७ रो. )

## कुमार्गवर्ती दोस्त.

दोस्त आहे आणि तो कुमार्गवर्ती झाला तर लागलीच त्याची दोस्ती तोडावी. ( ६।९।५८ रो. )

" सकाळीं ९ व १० च्या दरम्यान एक इसम × × × आला व म्हणाला " मी आपल्या वडिलांचा मित्र आहें व अमूक ठिकाणच्या दिवाणजींचा आश्रित आहें. बोलतां बोलतां समजलें कीं त्याला दोन बायका असून त्यांना रानोमाळ टाकून वेश्येच्या नादीं आहे व म्हणून दिवाणजींची मर्जी संभाळून आहे. असा वाईट मनुष्य आहे हें मला प्रथम माहित नव्हतें. मी त्यास असल्या वर्तनाबद्दल निर्दयपणें बोललों. दिवाणांच्या ओंगळ कारभारा-

बद्दलही बोललों. नातेवाईक म्हणून तुमचा संबंध सुटलाच आहे. तुम्हांपेक्षां मी गरीब आहें पण अगदीं गरीब नाहीं. तुमच्या पैशाची मला अपेक्षा नाहीं, इत्यादि. त्याचें मजजवळ काम होतें परंतु तो बोलला नाहीं. मग येईन म्हणून निघून गेला. मी सांगितलें हितेच्छु म्हणून बोललों. मला त्यांच्या पैशाची गरज नाहीं व या गोष्टी त्यांच्या कानावर जाव्या म्हणूनच बोललों. '

२९।११।१८६३ रो.

## हिंदी व इंग्रज यांतील एक भेद.

" खूप मेहनत घेऊन काम करण्यावर, नेटानें अभ्यास करण्यावर, हिंदी लोकांच्या स्वभावांतील एकांगीपणा व आळस हे जे दोन गूण आढळतात त्यांवर, विशेष विस्तृतपणें, गणपत कृष्णाजी छापखानेवाले यांचे चिरंजीव कान्होबा यांस व्याख्यान दिलें व या दोन गुणांची युरोपीयन लोकांची नाना विषय आकलन करण्याच्या शक्तीशीं व उद्योगशीलतेशीं तुलना करून दोघांत किति अंतर आहे तें दाखविलें व सांगितलें कीं तुम्हांला लागेल तसें साहाय्य करण्यास मी सज्ज आहें. " रो. उ.

" रामभाऊ साठ्ये भेटले होते. ते म्हणाले मि. हंटर यांस मराठी चांगलें येतें. कोणाची फारशी मदत घेतल्या शिवाय सर्व काम मराठींत लिहून घेतात. या देशीं येऊन त्यांस २।४ महिनेच झाले. " याचें नांव ॲन्ग्लोसॅक्सन लोकांची उद्योग करण्याची शक्ति व प्रीति !

## नवें वर्ष.

" आज १८६३ साल संपलें. ईश्वर माझेवर कृपा करो, व येत्या वर्षी निरंतर न्यायपथानें कर्तव्य करीत रहाण्यास मला शक्ति देवो. "

३१।११।१८६४

## क्षमाशीलपणा.

एका नोकरास तो नोकरींतून जातांना पत्रः—" ईश्वरानें मला माझ्या सर्व अपराधांची क्षमा करावी म्हणून मी इच्छितों, त्याप्रमाणें मी तुम्हांस मजसंबंधीं सर्व अपराधांची क्षमा करतों " २।१।१८६५

### सूर्यप्रकाश.

काय काम करावयाचें असेल तें सूर्यप्रकाश असतां म्हणजे दिवसासच करून घ्यावें व रात्रौ दिवा ठेवून कांहींही करावयास पडूं नये. या संबंधीं फ्रॅन्क्लिननें युक्ति सांगितली आहे. तीविषयीं कांहीं माहिती असली तर कृष्णाजीपंत नूलकर यांनीं विचारली आहे. ते लिहितातः–' कराचीस एक मनुष्य होता तो त्या युक्तीबरहुकूम वागत असे '. वरील नियम कसा काय पाळतां येतो तें बघावयाचें ठरविलें आहे.

### जमीनीचा मालक कोण ?

ग्रेट ब्रिटन व आर्यलन्ड येथील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या १८४१ च्या मासिक पुस्तकाच्या ४६ व्या पानांत कर्नल डाईक्स यांनीं लिहिलें आहे कीं, सर्व जमीन प्रजेच्या मालकीची आहे, राजाची नाहीं.

( गे. १८६१ )

### उत्तम भिक्षावळ.

*नाना मोरोजी यांच्या मुलाच्या मुंजीला गेलों होतों. मुलास भगवद्गीता भिक्षावळ घातली. तो आतां विद्यार्थी दशेंत प्रविष्ट झाला. त्याला हेंच बक्षिस उचित आहे. २०।५।१८६३

### ओशाळगत.

"क्ष हे गृहस्थ वारंवार पैशासंबंधें माझा फायदा होईल असें करतात. मला यांचें भय वाटतें. माझें विचारस्वातंत्र्य व क्रियास्वातंत्र्य नष्ट नाहींना होणार ?" ४।४।१८६४ रो. इं. उ.

### अंतःकरणाची खोली.

" मनुष्याच्या अंतःकरणाचा पूर्ण वेध घेणारा एकही मनुष्य नाहीं. "

८।११।१८६५

---

*हे प्रभु गृहस्थ कित्येक संस्थानांत दिवाण होते. मुंबईस चीफ प्रेसिडन्सी मॅजिस्ट्रेट होते.

## प्रसंगीं न डगमगणें.

" लखमीदास यांनीं विचारलें पांजरपोळाची नीट व्यवस्था लावावयाची आहे. तुम्हीं माझे बरोबर काम करावयास याल काय ? मीं सांगितलें प्रसंगीं तुम्हीं न डगमगाल व लोकांचें हित होत असेल तर मी कबूल आहें. "

१८।१।१८७२

## शहाणपण विरुद्ध सौख्य.

" १८७८ साल संपलें अधिक शहाणपण प्राप्त झालें. जरी त्याच प्रमाणानें सौख्य नाहींसें झालें तरी मी देवाचा आभारी आहें. "

३१।१२।७८

## अडचणीशीं झगडा.

" माझी नोकरी फिरती आहे. घड्याळाप्रमाणें वक्तशीर वागतां येत नाही. तथापि एवढ्या अडचणींतहि प्रयत्न केला पाहिजे व करीन. जेवढ्या अडचणी मोठ्या तेवढें मोठें श्रेय त्या जिंकून टाकण्यांत आहे. ( २०।१।५६ ) रो. इं. उ.

## जमाखर्चाचा उपयोग.

नंतर मी माझा जमाखर्च लिहिला कांहीं खर्च कमी केला पाहिजे. फिरतीवरून मूळ ठिकाणावर आल्यावर एक गडी व एक ब्राह्मण कमी केला पाहिजे. एक गडी व एक ब्राह्मण मला पुरेल. ( १४।२।५७ रो. इं. उ )

## न कळत दुसऱ्यांच्या हक्काचें अतिक्रमण.

रावसाहेबांचा एक स्वभावविशेष असा होता कीं ते दुसऱ्याच्या हक्काला बाधक असें कृत्य न करण्याची खबरदारी सतत घेत असत. तरीही न जाणतां अतिक्रम झाल्याचें उदाहरण त्यांनीं डायरींत लिहून ठेविलें आहे.

कुलाबा जिल्ह्यांत व्हिजिटर असतांना फिरतीवर होते. रात्रौ एका गृहस्थाकडे वसतीला होते. प्रातः उठून बहिर्दिशेला दूरवर परसावांतून जाऊ लागले. तेव्हां एकानें त्यांस हाक मारून विचारिलें ' दादा कोठें जातां ? या

ठिकाणांतून रहदारीचा रस्ता नाहीं.' हें ऐकून रावसाहेबांनीं रस्ता बदलिला व रोजनिशींत लिहून ठेवलें कीं 'चुकून कां होईना पण दुसऱ्याच्या हक्काचें अतिक्रमण झालें हें वाईट झालें.'

### माननीयांचा सन्मान.

हिंदुस्थानांत काम करणाऱ्या स्काटिश मिशनरी सोसायटीचे पहिले मिशनरी रेव्हरेन्ड डोनाल्ड यांच्या स्मरणार्थ

२० नोव्हेम्बर १८२८

( वरील रेव्हरेन्ड बुवांच्या सन्मानार्थ रावसाहेबांनीं डायरीचें सबंध पृष्ठ खर्च केलें आहे. अग्रभागीं उपरिनिर्दिष्ट दोन ओळी लिहून मध्यें वरप्रमाणें रिकामी जागा टाकून शेवटीं नुसती तारीख टाकिली आहे. ही तारीख वरील रेव्हरेन्ड बुवांची या देशांत पाय ठेवल्याची असेल.

कधीं कधीं कांहीं थोर लोकांच्या भेटीच्या प्रसंगांचें वर्णन आढळतें.

## लार्ड डफरिन यांची भेट.

( लार्ड डफरिन कलकत्त्यास आले तेव्हां त्यांची व रावसाहेबांची पाहिल्या हिंदी गृहस्थाची म्हणून लार्ड रिपन यांनीं ओळख करून दिली. ती लवकरच दृढमूल झाली असें पुढील संभाषणाचा वृतान्त रावसाहेबांच्या रोजनिशींत सांपडतो त्यावरून दिसतें. )

लार्ड डफरिनः—मी घेतली आहे अशी हातांची खुर्ची तुम्हीं बसावयास घेतलीच पाहिजे.

मीः—आहे हा चालेल. तीवर सुखानें बसतां येतें.

लार्ड डफरिनः—नाहीं. ( लार्ड डफरिनसाहेब उठले व आपले शब्द कृतीनें खरे करून दाखविण्यास मला एक, हातांची खुर्ची त्यांनीं आणून दिली. ) नंतर बंगाली विद्यार्थी, सरकारी नोकऱ्या व स्वतंत्र धंदे यांविषयीं बोलणें झालें. त्यावरून तें कायम धाऱ्याच्या पद्धतीवर* रावसाहेबांनीं नेलें.

लार्ड डफरिनः—तुमच्या इकडे कायम धाऱ्याची पद्धति आहे असें मला वाटतें.

मीः—नाहीं महाराज ! ती केव्हां आम्हांस मिळेल तें सांगतां येत नाहीं. हल्लींची पद्धति पंगुता आणीत आहे.

नंतर बंगाली लोक ज्यांच्या पूर्वजांना मराठ्यांच्या खंदकापलीकडे मराठ्यांनीं हांकून दिलें ' त्यांच्याविषयीं बोलणें झालें. नंतर बंगाली लेखकांविषयीं बोलणें निघालें. तेव्हां सुरेन्द्रनाथ बॅनर्जींच्या नेमस्त लेखांचीं रावसाहेबांनीं प्रशंसा केली. पुढें हिंदुस्थानांतील भाषांविषयीं गोष्ट निघाली.

---

* हा विषय रावसाहेबांचा आवडता असल्यामुळें त्यांनीं ही संधि वांया जाऊं दिली नाहीं.

लार्ड डफरिन:—तुमची एकादी भाषा मला शिकली पाहिजे असें तुम्हांला वाटतें काय ?

मी:—इतका वेळ लार्ड साहेबांना मिळणार नाहीं. घरगुती हिंदुस्थानी कदाचित् उपयोगी पडेल. हा नुसत्या वेळेचा प्रश्न आहे.

लार्ड डफरिन:—( कागदांनीं व फायलींनीं भरलेल्या पेट्यांकडे बोट दाखवून ) पाहिलेंत ! मला एवढें काम रोज करावें लागतें. मी इकडे दहा तास लावतों व तितके पुरतील असें मला वाटतें.

मी:—होय इतका वेळ पुष्कळ खरा. या हपीसाचें काम म्हणजे एका मोठ्या गिरणीचेंच आहे.

लार्ड डफरिन:—खरें आहे. मि. मंडलिक तुम्हीं सांगा तुम्हांला किती भाषा येतात ?

मी:—मराठी, गुजराथी, सिंधी, हिंदुस्थानी ( म्हणजे हिंदी म्हणा ) संस्कृत, इंग्रजी व थोडीशी पर्श्यन.

लार्ड डफरिन:—तुमचे लोक खरोखर ध्यानांत ठेवण्यासारख्या त्वरेनें इंग्रजी बोलतात. एके दिवशीं मला फ्रेंच भाषेंत बोलावयाचें होतें. पण तें मला सोपें गेलें नाहीं.

मी:—त्यांत नवल नाहीं. मी ए. बी. सी. हीं इंग्रजी अक्षरें बाराव्या वर्षीं शिकावयास लागलों. बरें असो सिमल्याला मला केव्हां जावयाचें त्याच्या तारखा दैनिक वृत्तपत्रांनीं ठरवून टाकलेल्या दिसतात. त्या बरोबर आहेत काय ? कांहीं दिवस अगोदर जाण्याची मला परावनगी पाहिजे.

लार्ड डफरिन:—अलबत. तशा तारखा मला ठरवाव्या लागल्यो याचें कारण गरीब बिचाऱ्या कारकून लोकांस आपलीं माणसें नेण्याची व्यवस्था करावी लागते.

नंतर रावसाहेबांनीं जाण्याची परावनगी घेतली व पुनः केव्हां केव्हां येण्याची मागितली.

लार्ड डफरिन.—तुम्हांला वाटेल तेव्हां ! १९।१।१८८५

---

## प्रकरण ८१ वें.

# रावसाहेबांचे गुरुजी.

। य आतृणत्त्ववितथेन कर्णौ ।
॥ अदुःखं कृण्वन्नमृतं संप्रयच्छन् ॥
। तं मन्येत पितरं मातरंच ।
॥ तस्मै न द्रुह्येत्कृतमस्य जानन् ॥ १ ॥

( विष्णुस्मृति )

**रावसाहेबांचें** मराठी शिक्षण खुद्द त्यांचे वडील **नानासाहेब** यांनींच केलें. गांवांत मराठी शाळा होती. रोजनिशीप्रकरणांत दिनचर्येचा मसुदा दिला आहे तो मंडलिकांसारख्या प्रतिष्ठित पिढिजात घराण्यांतील मुलांच्या शिक्षणास शोभेल असाच आहे. आंत सन दिला आहे तो १८४४ आहे. तो खरा धरला व नुसता नमुन्याला म्हणून कांहीं तरी काल्पनिक दिला नाहीं असें धरलें म्हणजे त्यांतील गोष्टी **रावसाहेबांस** लागू करावयास हरकत नाहीं; कारण त्यासाली **रावसाहेब मुरूड** मुक्कामींच होते. १८४५ सालीं ते **रत्नागिरीस** इंग्रजी शिकावयास गेले. मसुद्यांत **नागु** अण्णा, **देवधर** व **बाबा** सामल यांकडे आवृत्त म्हणावी असें सुचविलें आहे. परंतु **नागुअण्णा** हे ज्योतिषी व वैद्य होते. **देवधर** विद्वान ब्राह्मण होते. **बाबा** सामल हे गृहस्थ होते. म्हणून **राव-साहेबांचे** मराठी शिकवणारे गुरुजी **बाबा सामल** असतील किंवा नसतील. पुढें असें म्हटलें आहे " शाळेंत जावें " पण तेथें शिक्षकाचें नांव दिलेलें नाहीं. यावरून **रावसाहेबांचे** मराठी शिकवणारे गुरु कोण तें नक्की कळत नाहीं व त्यांच्या शिक्षणाचा कोणता परिणाम **रावसाहेबांच्या** शीलावर झाला तें सांगतां येत नाहीं.

**रत्नागिरी** येथील इंग्रजी शाळेंतील गुरुजी **राम बाळकृष्णाजी** हे होते.

त्यांचें त्रोटक चरित्र प्रकरण ४ थें पृष्ठ २० येथें दिलें आहे. रावसाहेबांची त्यांच्यावर भक्ति अत्यंत होती व त्यांचें शिष्यावर प्रेम तसेंच होतें.

रावसाहेब मुंबईस एल्फिन्स्टन् इन्स्टिटयूट मध्यें आल्यावर त्यांस उत्तमोत्तम गुरुजींचा लाभ झाला त्यांत,

## डाक्तर हार्कनेस

हे प्रमुख होते. हे विद्वान इंग्रज गृहस्थ १८३५ सालीं पहिल्यानें हिंदुस्थानांत आले. त्यांचा संबंध शाळाखात्याशींच होता. त्यांच्याकडे इंग्रजी सारस्वत व तत्त्वज्ञान हे दोन विषय शिकविण्याचें काम असे.

शिक्षणावर देखरेख ठेवण्याकरतां जो बोर्ड नेमलेला होता त्याच्या सभासदांशीं यांचा नित्य संबंध असे. त्यांनीं यांची नेमणूक इन्स्टिटयूटच्या मुख्याध्यापकाच्या जागेवर केली होती. शिवाय सरकारी शाळांचे सुपरिन्टेन्डेन्ट हेच होते.

विद्यार्थी म्हणून रावसाहेबांस यांचें अन्तेवासित्व घडल्या दिवसापासून लवकरच त्यांची हुशारी पाहून डाक्तर हार्कनेस प्रसन्न झाले. त्यामुळें रावसाहेबांच्या कल्याणावर यांची दृष्टि सारखी होती.

" व्हिजिटरच्या जागा नव्यानें झाल्या त्यावेळेस दक्षिण कोंकणांत अथवा सिंधमध्यें नेमण्यास योग्य ह्मणून ज्या लोकांचीं नांवें मी सर पेरी यांस सुचविलीं त्यांत तुमचें नांव होतें. इन्स्पेक्टरांचा पगार १५० असून हाता खालच्या लोकांची नेमणूक करण्याचा अधिकार त्यांस दिलेला आहे. सुधोळच्या चीफची शिकवणी तुम्हांला दिली असती. परंतु भास्कर दामोदरानें ती पतकरण्याचें नाकारलें. तुम्हीं तसेंच केलें असतेंत. परंतु दृष्टि आड ह्मणून मला तुमचा विसर पडेल अशी भीति बाळगूं नको. " ( ४।५।१८५५ चें डाक्तर हार्कनेस यांचें पत्र. )

यांचें शिष्यांशीं वर्तन फार चांगलें असल्यामुळें ते सर्वांस प्रिय झाले होते. हे आल्यापासून मुलांची संख्या सारखी वाढत गेली. कालमानानें वाढतच गेली असती, हें खरें आहे. तथापि तिची विशेष वाढ होण्याचें कारण यांच्या

अंगांत मुलांचें चित्त आकर्षण करून घेण्याची शक्ति चांगली होती, यांत शंका नाहीं. हे शिष्यजनांस समतेनें व ममतेनें वागवीत. २।९।१८६३ च्या पत्रांत रावसाहेबांनीं क. जेकब यांस कळविलें कीं:—डाक्तर हार्कनेस हे प्रिन्सिपॉल असतां विद्यार्थी गरीब असोत किंवा श्रीमन्त असोत दोघांसही समतेनें वागवीत. विद्यार्थ्यांची श्रीमन्ती त्यांना विशेष रीतीनें वागविण्यास हेतु झाली नाहीं. सभ्य वर्तन श्रीमन्तालाच धरून बसलेलें नसतें हें त्यांस माहीत होतें. हिंदी समाजाची अंत: स्थिति त्यांस कळून आली होती. त्याचें होत असलेलें स्थित्यंतरही त्यांस विदित होतें. सारांश त्यांच्यामध्यें भिक्षुकी स्वभाव दिसून येत नसे. भिक्षुकी स्वभाव म्हणजे काय हें उदाहरण देऊन स्पष्ट करतों. अ आणि ब हे दोन विद्यार्थी एकाच वर्गांत आहेत. अचा बाप लाखोंपति आहे. अ हा बूट स्टाकिंग घालतो व भपकेदार पोषाख करतो. जहागीरदाराचा पडला! गरीबी-मुळें ब जवळ असली सामग्री नाहीं. प्रिन्सिपॉलनें अजवळ येऊन हस्तान्दोलन पूर्वक ‘ आपलें कुशल आहेना ? ’ म्हणून विचारावें. कां तर ‘ तो बडा सॉब ! ’ बजवळ हस्तान्दोलन कोठलें ! कुशल-वृत्तविचारणा कोठली ! त्याच्याशीं अधिक वाईट वर्तन नसलें तरी मुद्दाम दाखविलेलें औदासीन्य तर खरें ! ही म्हणावी यजमानाच्या संभावनेवर—त्याच्या जामदारखान्यांतील द्रव्यावर—अवलंबून असणारी भिक्षुकवृत्ति ! ती डाक्तर हार्कनेस यांस ठाऊक नव्हती ! ”

हे १८६० सालीं पेनशन घेऊन देशीं परत गेले. तव्हां सर्व जुन्यानव्या विद्यार्थ्यांनीं मिळून त्यांस बारा हजार रुपयांची रक्कम मोठ्या गौरवानें कृतज्ञतापूर्वक अर्पण केली.

आपल्या विद्यार्थ्यांस कालेज सोडल्यावर कोणती पदवी प्राप्त झाली व त्यांची सरकारांत किति बढती झाली व समाजांत केवढी प्रतिष्ठा वाढली याची चवकशी करून त्यांनीं एक नोंद करून ठेवली होती. व इंग्लंदास गेल्यावरही त्यांची चवकशी करीत असत. त्यांनीं १७।९।१८६३ च्या पत्रीं रावसाहेबांस

विचारलें कीं शेवटल्या परीक्षेंत जनार्दन सखाराम उत्तीर्ण कसा झाला नाहीं याचें मला आश्चर्य वाटतें. तो आतांशा आळशी झाला कीं काय ?

यांच्या १७।१०।१८६२ च्या पत्रावरून असें कळतें कीं एडिंबरोहून ग्लॅस्गोला जाणाऱ्या आगगाडीच्या डब्यांचा अपघातानें नाश पुष्कळ होऊन भयंकर प्राणहानि झाली. सुदैवानें यांच्या जिवावरचा मोठा भयंकर प्रसंग टळला ! कारण नेमके दहा दिवस अगोदर त्याच रस्त्यानें यांची गाडी गेली होती !

रावसाहेबांनीं विलायतेस जावें अशी यांची इच्छा फार होती. मधून मधून रावसाहेबांचे वडील मुंबईस येत तेव्हां डा. हार्कनेस त्यांस भेटावयास बोलावीत व त्यांचा आदरानें सत्कार करीत. त्यांनीं कितिही आग्रह केला तरी शेवटपर्यंत आपल्या मुलाला विलायतेस नेण्याची परवानगी नानासाहेब मंडलिक यांनीं दिली नाहीं.

एकंदरींत हे गृहस्थ फार थोर होते व त्यांचें नांव बरेच दिवस हिंदुस्थानचे इतिहासांत शिक्षणाचे पुरस्कर्ते म्हणून राहील यांत संशय नाहीं.

## प्रोफेसर पॅटन.

हे एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट मध्यें प्रोफेसर होते यांची रावसाहेबांवर फार मर्जी होती. यांनींच प्रथम क. जेकब यांशीं रावसाहेबांची ओळख करून दिली. म्हणून सिंधमध्यें चाकरी मिळविण्यास एका अर्थीं हेच मूळ कारण झाले. सर्व शिष्यगणास पूज्य व प्रिय वाटत होते. अकालीं मृत्यु आल्यामुळें यांच्या नशिबीं पेन्शन घेण्याचें नव्हतें. यांच्या मागें यांची विधवा व कांहीं मुलें राहिलीं होतीं. “ पश्चिम हिंदुस्थानच्या रहिवाश्यांच्या तरुण मुलांस ज्या उत्तम प्रतीचें शिक्षण देण्यांत प्रोफेसर मजकूर यांनीं जेवढें यश संपादन केलें त्या प्रतीचें शिक्षण आपल्या मुलांस देण्यांत तेवढेंच यश त्याच्या विधवेला मिळावें या बुद्धीनें यांच्या सर्व शिष्यगणानें आठ हजार रुपये जमवून तिच्या हवालीं केले. रावसाहेबांनीं पन्नास रुपये दिले. दादाभाई नवरोजींनीं एक पगार दिला. ( १–१–१८५५ चें वि. ना. भागवत यांचें पत्र. )

## सर ली ग्रँड जेकब.

हे कच्छमध्यें पोलिटिकल एजन्ट होते.* यांनीं आपल्याला हुशार व सद्वर्तनी असा मनुष्य खास मदतगार म्हणून नेमावयाचा आहे असें डा. हार्कनेस यांस लिहिल्यावरून डा. हार्कनेस यांनीं रावसाहेबांची शिफारस केली व सिंध प्रदेश जरी फार दूर होता तरी तेथील नोकरी रावसाहेबांनीं पतकरिली.+

डाक्तर हार्कनेससारख्या सद्गुरूच्या सहवासाला रावसाहेब मुकले हें खरें तथापि त्यांस कर्नल जेकब हे प्रति हार्कनेसच मिळाले. त्यांनीं रावसाहेबांस योग्यांना सुद्धां अगम्य अशा परम गहन सेवाधर्मावर, सेवाधर्माचा रावसाहेबांनीं स्वीकार करतांच उपदेश केला तो मननीय आहे.

" मनामध्यें कोणत्याही तऱ्हेच्या शंकेचा उदय होऊं देऊं नका. झाल्यास सर्व शंका दाबून आपल्याशींच ठेवाल असा मला भरंवसा आहे. ध्यानांत ठेवा. तुम्हीं आतां सेवाधर्म स्वीकारीत आहांत. सेवकाच्या अंगांत अवश्यमेव एक गुण असला पाहिजे तो हा कीं कधीं बोलावें व कधी मौन सेवून बसावें त्याचें सम्यग् ज्ञान. "

" सच्चा मनुष्य कधीं कधीं लुच्चा माणसाच्या कपटप्रयोगानें व अनृत वादानें भग्नोद्यम होतो, तेव्हां त्यानें कोणत्या तत्त्वाचा अंगिकार करून आचरण करावें तें तुम्हीं नवे अहांत म्हणून उमगलें नाहीं तर यत्न करून तर्कानें समजलें तर पहा. "

" मन अगदीं स्वस्थ व अविकृत ठेवा. दुसऱ्याला अंतःस्थिति दिसूं देऊं नका. राग आला आहे असें दाखविलेंत तर तुमच्याबद्दल अविश्वास उत्पन्न

* १८६९ सालीं हे कोल्हापूरचे पोलिटिकल एजन्ट होते व दक्षिण महाराष्ट्राचे कमीशनर होते.

+ जेकब साहेब यांचे हातीं कारकुनाची नेमणूक करण्याचा अधिकार आल्यापासून म्हणजे १८३९ पासून सुशिक्षित असल्याशिवाय आपल्या हाताखालीं घेण्यास कोणाचीही निवड केली नाहीं अशी त्यांची ख्याति होती. ( ३।३।६१ चें पत्र )

होऊन तुम्हांला मागें ठेवण्यांत येईल तें कामाचें नाहीं. तुमच्यापुढें राजकारण-कुशल होण्याचा उत्कृष्ट अवसर आहे. "

" प्रस्तराभावीं आपलीं घरें आम्हीं विटांनींच बांधलीं पाहिजेत. लोहमयी तुळया मिळत्या तर बरें झालें असतें पण मिळत नाहींत तर लांकडी तुळया वापरा. लोहाहून मृदु म्हणून लांकूड उडवून द्यावयाचें नाहीं. प्रत्येक वस्तु-मात्राचा उपयोग आहे. सारांश योजकच दुर्लभ आहे. "

कित्येक अलौकिक गूण जे रावसाहेबांच्या अंगांत दिसून आले त्यांतील कांहींचा प्रादुर्भाव होण्यास, कांहीं प्रादुर्भूत होते त्यांचा अधिक विकास होण्यास व विकसित झालेल्यांस चिरस्थायित्व येण्यास जेकब साहेबांची मैत्री बऱ्याच अंशांनीं कारणीभूत झाली. " संवयी आणि अभ्यास " हा आपला लोकोपयोगी ग्रंथ जेकब साहेबांस कृतज्ञतापूर्वक अर्पण करण्यापूर्वीं तसें करण्याची परवानगी त्यांजवळ मागतांना रावसाहेबांनीं त्यांस १।१०।१८५७ चें पत्र लिहिलें तें:—अभ्यासादि गुणांच्या ज्या संवयी मला संपादन करतां आल्या त्या सर्वांबद्दल मी अगदीं बहुतेक अंशीं माझ्या युरोपीयन मित्रांचा ऋणी आहें. व त्या सर्वांत पहिले व उत्तम प्रतीचे मित्र म्हटले म्हणजे—असें म्हणावयास मला अभिमान वाटतो—आपणच आहांत म्हणून जन्मभर ज्यांच्या करतां आपण अपूर्व श्रम करीत आलां त्या माझ्या देशबांधवांच्या सुधारणेकरितां मी केलेला हा अल्प प्रयत्न आपणास समर्पण करूं देण्याची परवानगी मला द्या अशी विनंति मला हक्कानें करतां येते. '' त्याचें कारण असें कीं रावसाहेब जेकब साहेबांस गुरु असें मानीत. " मी जेकब साहेबांच्या शिष्यांपैकीं एक अननुभविक व नम्र शिष्य आहें. परंतु माझ्या गुरूच्या लायकीला कितपत साजेसा आहें तें सांगणें भविष्य काळाचें काम आहे. "
**( शाबुद्दीन नामक मित्रास पत्र )**

आपल्या मोठेपणाचें योग्य तेवढें श्रेय दुसऱ्यास देण्यास मनाचा जो उदारपणा लागतो तो रावसाहेबांचे अंगीं होता असें वरील पत्रावरून उघड होत आहे.

एल्फिनस्टनकृत हिंदुस्थानच्या इतिहासाचें भाषांतर रावसाहेबांनीं मराठींत केलें त्याचा उपोद्घात ज. जेकब यांसच अर्पण केला आहे.

सर जेकब यांचें रावसाहेबांवर प्रेम होतेंच पण तें त्यांच्यावर बसण्यापूर्वी हिंदुस्थानच्या लोकांवर बसलेलें होतें. तें तसें बसण्याला अनेक कारणें होतीं. त्यांच्या कुटुंबाच्या माणसांचा १८१७ सालापासून या देशाशीं संबंध होता. त्याचा त्यांनीं एका ( १३।२।५६ ) च्या पत्रांत साभिमान उल्लेख केला आहे. " राईगड, राजगड, रायगड, इ. वाटेल तें नांव द्या याच नांवाचा किल्ला सर करतांना माझ्या भावांपैकीं एक ब्रिटिश सैन्यांत अधिकारी होता. श्रीमंत पेशव्यांच्या स्त्रिया आंत होत्या. व किल्ल्याला वेढा दिल्यावर जे हाल होतात ते स्त्रियांना सहन करावयास लावावे हें इंग्रजी दाक्षिण्याला अगदीं अननुचित म्हणून माझ्या भावानें त्या राजस्त्रियांस किल्ला सोडून सुखानें जाऊं दिलें. त्यांनीं आपल्या बरोबर मेण्यांत ९।१० लक्षांचें जवाहीरही नेलें त्याला हरकत केली नाहीं. तो किल्ला फारच मजबूत होता " नंतर त्यांनीं रावसाहेबांस विचारिलें " अरे ! पण त्या गरुडाच्या मूलाश्रय स्थानाचें दर्शन घेण्यास तुम्हांला प्रसंग कसा आला ? " *

दुसरें कारण असें कीं सर जेकब हे फार विद्वान होते. पुस्तक संग्रह—त्यांतून जुन्या पुस्तकांचा संग्रह—म्हणजे द्रव्यसंग्रहाप्रमाणें त्यांना प्रिय असे. बंडामध्यें नरगुंदच्या ग्रंथसंग्रहाचा विध्वंस झाला हें पाहून त्यांस दुःख झालें. ' नरगुंद येथें संगृहीत केलेल्या ग्रंथांचीं पानें वाऱ्याबरोबर वर विखरून जाण्यास उसकटून टाकण्यांत आलीं त्याचें मला दुःख होत आहे. हा धिक् ! एक वेळ रणभूमीवरील रुधिरप्रिय श्वान मोकळे सोडून दिले म्हणजे त्यांस आवरणें कठीण जातें "　　　( २२।९।५९ चें रावसाहेबांस पत्र )

---

*व्हिजिटर असतांना मी रायगडास जाऊन आलों असें रावसाहेबानीं यांस अगोदर कळविलें होतें.

संस्थानिकांच्या व बड्या लोकांच्या भेटी घेण्याकरितां सर जेकब यांच्या रेसिडेन्सीच्या इमारतींत जो मोठा दिवाणखाना होता तो उंची गालिच्यांनीं किंवा बहुमूल्य लांकडी सामानानें सजविलेला नव्हता, तर विविध विषयांवर अनेक विद्वान लोकांनीं लिहिलेल्या उत्कृष्ट ग्रंथांनीं सजविलेला होता. रावसाहेब आपला रिकामपणचा वेळ याच दिवाणखान्यांत ग्रंथ वाचून घालवीत असत *

१८५९ सालीं ज. जेकब देशीं जात्यावेळीं रावसाहेबांनीं त्यांचें स्मारक केलें. ज. जेकब यांचे चहाते अनेक होते. कृष्णाजीपंत नूलकरांसारख्यांनीं शंभर शंभर रुपये दिले. ते त्या कालमानाप्रमाणें पुष्कळच होते. शाबुद्दीन यांनीं एक महिन्याचा पगार दिला.

हिंदुस्थानांतील आर्यांच्या सुधारणेचा विशेष शोध लावावा अशी जेकब साहेबांची फार इच्छा होती. जाव्हा बेटाजवळ बलि नांवाचें एक लहानसें बेट आहे. तेथें ब्रह्मांडपुराण सांपडतें, चारी वेद सांपडतात परंतु आजमितीला ते संस्कृतांत सांपडत नाहींत. परंतु तेथील "कवि" नांवाच्या भाषेंत सांपडतात. पुष्कळांच्या मतें बळि बेटांतील हिंदू हिंदुस्थानांतून तिकडे जाऊन राहिले व बरोबर हें संस्कृत वाङ्मय घेऊन गेले. यांचें नांव निघालें कीं जेकब साहेबांस फार कौतुक वाटे. ते म्हणत. "बळि बेटांतील हिंदू लोकांचीं पवित्र शास्त्रें मिळविण्याचा हेतु माझ्या मनांत फार दिवसांपासून आहे. संस्कृत भाषा पूर्णत्वाला पोंचली असून त्या भाषेंतील मूळचें वाङ्मय, आपली स्वतंत्र भाषा जी 'कवि' तींतच भाषांतर करून ठेवण्याचा प्रसंग त्यांजवर यावा इतका विसर त्यांची मूळभाषा जी संस्कृत तिचा या बळिहिंदूंस पडावा हा केवढा चमत्कार आहे ! हें कोडें कोणी सोडवील तर प्राचीन वस्तुशोधकांवर मोठे उपकार करून ठेवील. कालाच्या प्रगतीच्या इतिहासाचीं कांहींही साधनें तुमच्या विशदमति पूर्वजांनीं कशीं ठेविलीं नाहींत ! कोणीतरी या

* आतां हा उत्कृष्ट ग्रंथसंग्रह या दिवाणखान्यांत दृष्टीस पडत नाहीं म्हणून रावसाहेबांच्या शाबुद्दीन नामक मित्रानें २०।५।६० च्या पत्रांत अश्रू गाळले आहेत.

विषयाकडे लक्ष्य देऊन जें तिमिरपटल या प्राचीन इतिहासास झांकून टाकीत आहे तें दूर करील अशी आशा करितों. (३-९-६१ चें रावसाहेबांस पत्र.)

बालि बेटांतील हिंदूंच्या संस्कृतीविषयीं ज. जेकब यांच्या मनांत केवट कुतूहल उत्पन्न झालेलें होतें तें वरील पत्रावरून दिसत आहे. पुढें त्यांनीं बालि हिंदूंच्या ब्रह्माण्ड पुराणाची जर नक्कल मिळेल तर ती मिळविण्याचा प्रयत्न चालविला. नुसती नक्कल मिळून फायदा नव्हता. तें पुराण कवि भाषेंत लिहिलेलें असल्यामुळें त्याचें इंग्रजींत भाषांतर पाहिजे होतें. जाव्हा बेटांतील बटेव्हियन मण्डळीचे मि. फ्रेडरिक नांवाचे एक सेक्रेटरी होते. त्यांच्याशीं यांनीं पत्रव्यवहार चालविला. त्यांनीं यांस ब्रह्माण्ड पुराणाच्या इंग्रजी अथवा फ्रेंच भाषेंत केलेल्या भाषांतराची प्रत काढून पाठवावी व मोबदला म्हणून यांनीं त्यांस हिंदुस्थानांतील १८ पुराणांच्या मूळ संस्कृतावरून प्रती काढून द्याव्या, असें ठरविण्यांत आलें. त्याप्रमाणें १८ पुराणांच्या प्रती कांहीं रावसाहेबां-कडून व कांहीं डा. भाऊंकडून काढवून घेतल्या. त्यांपैकीं तीन बटेव्हिया येथें पाठविल्या. पुढें मि. फ्रेडरिक हे बटेव्हियांतून बाहेर संशोधनकार्याकरतां जावयाचे होते म्हणून ते परत आल्यावर त्यांकडे पाठविण्यास ५ प्रती मुंबई रॉयल एशियॅटिक सोसायटींत अनामत ठेऊन दिल्या. बाकीच्या लंडन येथील वरील सोसायटीच्या मुख्य ग्रंथालयांत ठेऊन दिल्या. पुढें मि. फ्रेडरिक हे प्राचीनवस्तुसंशोधनाचें काम करतां करतां कोठें गेले त्याचा पत्ता लागत नाहींसा झाला. ही गोष्ट रावसाहेबांस विदित झाली. नंतर सिंगापूर येथील डच कॉन्सल जनरल यांची व रावसाहेबांची ओळख झाली. तेव्हां त्यांस वरील सर्व हकीगत कळवून रावसाहेबांनीं मुंबईस रॉयल एशियॅटिक सोसायटींत असलेल्या सर्व प्रती त्यांच्याकडे पाठवून दिल्या व त्यांस विनंति केली कीं जावाबेटांतील बटेव्हियन मंडळीचे जे कोणी अधिकारी असतील त्यांस या देऊन ब्रह्माण्डपुराणाच्या भाषांतराची प्रत लंडन येथील रायल एशिअॅटिक सोसायटीकडे पाठवावी. व तेथें असलेल्या हिंदूपुराणांच्या प्रती मागवून घ्याव्या. बटेव्हियाच्या संस्थेशीं संबंध असलेले प्रो. व्हॉन्डर

तंक व हे डच कॉन्सल व इतर विद्वान लोक हे १८७५ सालीं हेग मुक्कामीं एकत्र जमावयाचे होते. ही संधि पाहून हें जुनें प्रकरण रावसाहेबांनीं शेवटास नेलें. तें ऐकून जेकब साहेबांनीं रावसाहेबांस लिहिलें " माझा पुराणांचा गाडा चिखलांत रुतला म्हणून मी येथें जुपीटरची प्रार्थना करीत बसलों व तुम्हीं तेथून आपला खांदा चाक उचलण्याकरितां त्याच्याखालीं दिलात. "

या एका ब्रम्हाण्डपुराणाकरितां चार लक्ष ग्रंथसंख्येच्या प्रती जेकब साहेबांनीं करविल्या होत्या; यावरून त्यांची प्राचीनविद्यासंशोधनाची हौस केवढी होती हें दिसून येतें.

याप्रमाणें ज. जेकब यांस ताम्रपट, शिलालेख वगैरे पुरातन वस्तूंच्या संग्रहाची आवड होती. गुप्तवंशांतील नाणीं यांनीं मिळवलीं होतीं. हाच नाद रावसाहेबांस होता. त्या कामीं हे त्यांस उत्तेजन देत. ' तुमचें लक्ष पुराणवस्तुसंशोधनाकडे आहे हें पाहून मला फार आनंद होत आहे व मिळतील ते दृष्टीआड असलेले जुने लेख लोकांचे समोर आणण्याचा तुमचा स्तुत्य हेतु तुम्हीं मनांतून दवडणार नाहीं व त्या मार्गांतले तुमचे प्रयत्न सतत चालू ठेवाल अशी मी आशा करतों. एक पुराणलेखाची ओळ अज्ञातपूर्व अशा भारतेतिहास ग्रंथाच्या समग्र पानावर उजेड पाडील म्हणून मी जुन्या ताम्रलेखांस फार महत्व देतों.'

डॉ. भाऊ आपल्या स्नेह्यांसह संशोधनकार्याकरितां काश्मीरला जात आहेत हें ऐकून आनंदाचे भरांत त्यांनीं रावसाहेबांस ११।३।६३ रोजीं पत्र लिहिलें तें असें:—

" डाक्तर भाऊ काश्मीरकडे म्हणजे आर्यांच्या मूल आवासभूमीकडे जाणार ! तेथूनच तुमचे पूर्वज पर्वताग्रावरून समभूमीवर येऊन अनार्य लोकांस पिटाळून लाविते झाले. त्याच्यानंतर पुष्कळ काळ लोटला हें खरें आहे. तथापि जे तुमचे पूर्वज मनूच्या स्मृतीसारखें सर्वांगपूर्ण कायद्याचें शास्त्र ज्या कालीं लिहित होते व ताऱ्यांच्या गतीचें निरीक्षण करीत होते व ज्याकालीं पाश्चात्य देशांतील लोकांचे पूर्वज त्या प्रांतांत आपल्या देवांस मनुष्याचा बलि अर्पण

करून पशूंप्रमाणें रानोवनीं हिंडत होते, त्या काळाचें त्यांनीं एकाददुसरें दुर्मिळ नाणें व अलभ्य ताम्रपट यांशिवाय दुसरीं कांहींच इतिहासाचीं साधनें ठेवल्याशिवाय नंतर इतक्या पिढ्या जाऊं दिल्या हें कसें संभवतें ? ''

पुढें मुंबईस १८६६ सालीं मोठ्या मोठ्या नांवाच्या मंडळ्या निघून आपल्याबरोबर बऱ्याच भागिदारांस घेऊन बुडाल्या. त्यांत जेकबसाहेबांस सुद्धां एका बँकेच्या घालमेलींत बराच चट्टा बसला होता.

"या संकटप्रसंगीं माझें वार्षिक हजार पाउन्डांचें नुकसान झालें आहे. त्या पायीं हल्लींचें प्रशस्त सौख्यावह लंडन मधील बिऱ्हाड सोडून द्यावें लागत आहे. ''　　　　( २८।७।६६ चें पत्र ).

ही त्यांची स्थिति ऐकून सिंधमधील एका मित्रानें त्यांस साहाय्य करण्याची इच्छा रावसाहेबांजवळ प्रदर्शित केली. तें त्यांस कळतांच त्यांना फार समाधान वाटून त्यांनीं लिहिलें " मला तशी गरज नाहीं. पण माझ्या हितचिंतकाचें नांव तरी मला कळूं द्या ! ''

पुढें ' च्छिद्रेष्वनर्थाः बहुली भवन्ति ' या न्यायानें यांच्यावर दुसरें संकट आलें. " लंडनमधल्या सर्वोत्तम नेत्रवैद्यानें मला उघड उघड सांगितलें कीं दोन्हीं डोळ्यांत कांचबिंदू उद्भवल्यानें समूळ दृष्टिनाशाच्या पंथाला मी नीट लागलों आहें तेणें करून दिवसानुदिवस माझी दृष्टि अधिकाधिक अस्पष्ट होत जाऊन शेवटीं कृष्णवर्ण अंधःकारानें वेष्टिली जाईल, तेव्हां नेत्रांवर शस्त्रक्रिया करण्यांत येईल. ''　　　　(८–७–६६ चें पत्र.)

१८६९ सालीं यांस हिंदुस्थानचा तारा ही पदवी अर्पण करून सरकारानें यांचा बहुमान केला. परंतु पदवीविषयीं त्यांनीं कधीं आतुरता दाखविली नाहीं. त्यांनीं रावसाहेबांस लिहिलें कीं पदवी म्हणजे लहान मुलांस भुलवणारा एक अल्पार्ह फुगा आहे. बक्षिसाच्या आशेहून अन्य उच्च हेतु कोणतेंही काम करण्यांत ज्या लोकांच्या मनांत वसत नाहीं त्यांच्याकडून टोंचून टोंचून काम करून घेणाऱ्या पराणीसारखा तिचा उपयोग आहे.

जेकबसाहेबांवर जेव्हां स्त्रीविरहाचा प्रसंग दुर्दैवानें आला, तेव्हां त्यांनीं पुनः लग्न केलें नाहीं. " लग्नाचें वय नसल्यामुळें मी माझ्या बन्धूंची मुलगी दत्तक घेतली आहे. व ती माझीच असें समजतों. ही मुलगी फारच चांगली निघाली आहे. माझ्या घरांतील व्यवस्थेबद्दल मला काडीएवढा त्रास पडूं देत नाहीं."

( २१–३–६४ चें रावसाहेबांस पत्र. )

मिस जर्ट्रूड जेकब, ज. जेकब यांची दत्तक मुलगी, ही त्यांच्या सान्निध्यांत राहिल्यामुळें त्यांचीं मतें तिच्या मनावर चांगलीं बिंबलीं असावीं. तीं मतें उघड प्रसिद्ध न करतां तिला एक कादंबरी लिहाविशी वाटली. सरवाक देशावर राज्य करीत असलेला राजा सर जेम्स ब्रुक याचें चरित्र त्यांत वर्णिलेलें होतें. तो राज्य करूं लागला तेव्हां त्या प्रांतांत सर्वत्र घोटाळा माजलेला होता. परंतु त्या राजानें लोकांच्या समजुतीस मान देऊन तडजोडीचा मार्ग पतकरून त्या प्रांतांतील यादवी मोडून शान्ततेचें साम्राज्य स्थापिलें व लोकांना संतुष्ट केलें. तेणें करून तें राज्य भरभराटीस आलें.

लोकांस हें पुस्तक फार आवडलें. लार्ड ग्रे यांनीं या ग्रंथकर्त्रीशीं पत्रव्यवहार सुरू केला. खुद्द मि. ग्लॅड्स्टन यांनीं लंडन टाईम्समध्यें या पुस्तकावर टीका करून ग्रंथकर्त्रीचा सन्मान केला. या पुस्तकाला ज. जेकब यांनीं प्रस्तावना लिहिली होती.

सर जेकब यांसही पुस्तक लिहिण्याचा नाद होता. " बंडाच्या आधींचें व बंडाच्या वेळचें पश्चिम हिंदुस्थान. वस्तू बरहुकूम चित्रें" या नांवाचें पुस्तक त्यांनीं १८७१ सालीं प्रसिद्ध केलें. त्यांत हिंदीलोकांच्या स्वभावांत विशेष काय खुबी आहे ती संभाळून तिला सुखास येतील असे कायदे करावे अशी सूचना केली आहे.

क. जेकब १८२१ त हिंदुस्थानांत आले. व त्यांच्या कारकीर्दीचा काळ मोठ्या उलाढालींचा होता. व अनेक प्रसंग उद्भवल्यानें इंग्रज लोकांच्या अंगांतले जे खरे खरे गूण ते प्रादुर्भूत होण्यास या काळांत जेवढी संधि आली तेवढी कधीं आली नाहीं. यांचे गूण चांगले कसोटीस उतरले होते. व

मोठमोठीं कामें यांच्या हातून प्रत्यक्ष घडलेलीं होतीं. यामुळें यांचे विचार नेहमीं पोक्त व अनुभवास धरून असत. पेनशन घेतल्यावर इंग्लंदांत हे फक्त शरीरानें स्वस्थ बसले होते. पण यांचें मन जसें इंग्लंदांत तसें हिंदुस्थानांत घडून येणाऱ्या वृत्तांत व्यग्र असे. पार्लमेन्ट सभेंत व्हीग पक्षाचें ( प्रजा पक्षाचें ) प्राबल्य आहे कीं टोरी पक्षाचें ( राजकीय पक्षाचें ) प्राबल्य आहे, इंग्लंदचें परराष्ट्रीय धोरण या वेळेला कसें आहे, तुर्कस्थानचा प्रश्न असो, आयर्लंदचा प्रश्न असो अथवा एकादा खुद्द इंग्लंदचा घरचा प्रश्न असो किंवा हिंदुस्थानचा असो या सर्वांविषयीं चर्चा करणारीं पत्रें ते रावसाहेबांस लिहीत व हिंदुस्थानाच्या-संबंधीं विषय असला तर त्याच्याबद्दल आपलें मत देऊन रावसाहेबांचें मत काय आहे तें लागलेंच विचारीत. रावसाहेबांच्या मतांतील भाग त्यांस योग्य दिसेल तो मान्य करून जेथें त्यांस तें युक्तिसिद्ध दिसत नसे, तेथें तें लागलेंच त्यांस उलट कळवून त्याचीं कारणें लिहीत. या त्यांच्या व्यावहारिक चर्चेमुळें रावसाहेबांचा बराच फायदा झालेला आहे. पुष्कळ बाबतींत रावसाहेबांचा व त्यांचा मतभेद होई, परंतु मतभेद झाला तरी तो प्रामाणिकपणानेंच झालेला आहे ही दोघांची परस्परांविषयीं खात्री असल्यामुळें एकमेकांचीं मतें एकमेकांच्या आदरास पात्र होत. हृदयवृत्ती उचंबळून गेल्यावर हृदय अगदीं मोकळें करून टाकण्यास, विश्वासाचा, प्रेमाचा व सूज्ञ असा मित्र लागतो. *त्याप्रमाणें हे गुरु–शिष्य परस्परांस हृदयाविष्करण करण्यास विश्वासभूमि झाले होते. त्यामुळें दोघांचा पत्रव्यवहार व त्यांतील विचारविनिमय फार आत्मोन्नति-कारक, बोधप्रद व मनोरंजक झाला आहे. तो प्रसंगानुसार मागें या ग्रथांत दिलाच आहे आतां त्यांतील कांहीं पुढें दिला आहे.

---

* ज जेकब यांची पत्रोपत्रीं भेट झाली तर शेवटपर्यंत रावसाहेबांस परमानंद होत असे. " सोबतचें पत्र माझे मित्र जनरल जेकब यांचें आहे. तें वाचताना मला फार सुख झालें. मला स्वतंत्र वातावरणांत कांहीं वेळ त्यानें नेऊन ठेवलें.

( मि. कॅन्डी यांस २३–११–८० चें पत्र )

## परोपकार.

" एकमेकांस साहाय्य करणें हाच एक हेतु मनांत धरून मनुष्यानें जगावें असें मला वाटतें, जो कोणी स्वार्थाकरतां जगतो तो मनुष्य जातीच्या उपजत अंतःकरणप्रवृत्तींशीं विरोध करतो.

( १५।८।१८५४ चें ज. जेकब यांचें पत्र. )

## रजपूत.

हिंदुस्थानांतील लोकांविषयीं तशी राजेरजवाड्यांविषयीं ज० जेकब यांची सहानुभूति असे. रजपूत बाप व रजपूत लेंक यांचें एकमेकांशीं सदैव भांडण असावयाचेंच तें पाहून त्यांस वाईट वाटे. ते म्हणत " हे बेटे रजपूत कसे आहेत पहा. तुम्हीं यांचें भांडण होऊं नये म्हणून वाटेल ती खबरदारी घ्या पण ते आपले भांडणारच व या सर्वांचें मुख्य व मूळ कारण त्यांची बहु-भार्यत्वाची जातिरूढीच होय. "

## हिंदी पुरुष व हिंदी स्त्रिया.

हिंदीस्त्रियांविषयीं त्यांचें मत चांगलें होतें. हिंदी लोकांच्या इतके ( विशेषतः हिंदी बायकांच्या इतके ) दुसऱ्याकरितां अथवा मनांत बाळगलेल्या तत्त्वाकरितां जीव देण्यास तयार असे दुसरे कोणतेही मानव प्राणी मी पाहिले नाहींत. ( त्यांनीं १८७२ सालीं लिहिलेलें वेस्टर्न इन्डिया पुस्तकाचें पृष्ठ ४–८ पहा. )

## स्त्रीशिक्षण.

सर जेकब हे स्त्रीशिक्षणाचे कैवारी होते. त्यांस शिक्षण देण्याविषयीं हिंदी मित्रांस उपदेश करीत. " आपल्या मुलांस घरच्या घरीं शिक्षण देतां येईल इतकी योग्यता शिक्षणाच्या योगानें हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या अंगीं आल्याशिवाय पुढील पिढीच्या हातून महत्कृत्यें घडून येणार नाहींत. " ( २–९–१८६२ चें रावसाहेबांस पत्र )

कधीं कधीं नेटिव्ह ओपिनिअनमध्यें जर रावसाहेबांचें भिन्न मत त्यांनीं वाचलें तर आपलें मत त्या विषयावर लिहून पाठवीत व कोठें मतभेद आहे तें कळवीत.

## चळवळ्या पुरुष.

'बहुजन समाजाचें चित्त क्षुब्ध करीत राहणाऱ्या चळवळ्या लोकांस आमच्या इकडे मान नाहीं. व इंग्लंदांत' आहे असा अभिप्राय तुम्हीं ने. ओ. मध्यें दिला आहे. पण असा गैरसमज तुम्हीं करून घेऊं नका. चळवळ्या ह्या पदवीला येऊन चिकटेल असें कांहीं कृत्य केल्यावरून आमच्यांतील पुष्कळ लोकांचें वजन कमी झालें आहे. सुज्ञ लोक नेहमीं असें कृत्य कसें टळेल तें पहात असतात मि. ब्राइट यांचे असामान्य बुद्धिवैभव त्यांस अशीं कृत्यें करूनही नेहमीं वर मान करून चालण्यास उपयोगी पडत आहे. मि. डिकिनसन भला माणूस आहे असें मी ऐकतों. परंतु हिंदी लोकांस जें देतां येणार नाहीं तें द्यावें असें प्रतिपादन करून व पूर्णपणें माहिती द्यावयाला पाहिजे ती न देतां हिंदी लोकांविषयींचे प्रश्न हातांत घेऊन त्यानें आपलें इंग्लंदांतील बहुजनसमाजांतील वजन कमी करून घेतलें आहे. अशीच मि. + + यांची दशा झाली.

## स्त्रियांस मताधिकार.

"त्याचप्रमाणें दुसरा मोठा माणूस "क्ष" यानें चांगलें बुद्धिवैभव दाखविणारे लेख लिहून जें वजन प्राप्त करून घेतलें होतें तें सर्व आपल्या जहाल मतांनीं घालविलें. उदाहरणार्थ तो म्हणे प्रत्येक मनुष्यास मताधिकार दिला पाहिजे. स्त्रियांसही दिला पाहिजे ! पहिल्या सूचनेनें अमेरिकेंत काय परिणाम झाला आहे ! बहुजनसमाजाची खुषामत करून पुढें येणाऱ्या या लोकांच्या शहाणपणाची किंमत आम्हांला कळते. नवरा बायको, भाऊ व बहीण सुखानें नांदत असतां राजकीय प्रश्नांवर मतभेद होण्याला जागा देऊन कुटुंबाचें स्वास्थ्य बिघडविण्याची कल्पना आमचा समाज ज्या स्थितींत आहे त्याला योग्य नाहीं. किंबहुना हल्लीं एकंदर मनुष्यजातीची जी स्थिति आहे तिलासुद्धां योग्य नाहीं. विनयास देशोधडीं लावून पुंस्त्वाची जोड करून देणाऱ्या कामांशिवाय घरांतील रोजचीं कामें व समाजाचें हित साधणारीं कामें स्त्रियांचा वेळ दवडण्यास पुष्कळ आहेत. ज्या स्त्रियांची स्वतःची

स्थावर मालमत्ता आहे व तिची ज्या वहिवाट करीत आहेत, त्यांस मताधिकार द्यावयास माझी तयारी आहे."

## नुसती सावधगिरी.

रावसाहेब आपल्या मतें सावध असत. पण नुसती सावधगिरी उपयोगी नाहीं, असें ज. जेकब म्हणत. " सार्वजनिक कामांत यशाची प्राप्ति करून घ्यावयाची असेल तर तुम्हीं सर्पाची बुद्धि व पारावताचें अनपकारित्व हे दोन गुण संपादन केले पाहिजेत. "

## अनुगांशिवाय पुढारीपण व्यर्थ.

बहुजन समाजाच्या भरतीचा जोर मागें नसून आपण एकटेंच पुढें जाणें म्हणजे उथळपाण्यांतून चिखलांतून तंगड्या तोडीत खाडींतून वरवर जाण्यासारिखें आहे. एकतरी नौका चालूं शकेल इतकें भरतीचें पाणी आलें तरी पुरे, अशा रीतीनें तुमच्या हातून आपल्या देशबांधवांचा उद्धार घडो. "

( २–९–६३ चें पत्र )

## स्पष्ट मतप्रदर्शन.

स्वतःचें मत हे अगदीं स्पष्टपणें देत हें त्यांच्या पत्रांवरून कळून येईलच. हिंदी लोक आपलें मत स्पष्टपणें देत नाहींत अशी त्यांची मोठी तक्रार दिसते. ८–१२–६० च्या पत्रांत ते म्हणतात " सुशिक्षित हिंदी लोकांनीं आपले विचार स्पष्टपणें व निर्भयपणें कळवावे याहून दुसरी कोणतीही इच्छा हिंदुस्थानच्या हितचिंतकांच्या मनांत नसते. हिंदुस्थानावर राज्य करतांना अशा विचारांचें ज्ञान होत नाहीं ही एक मोठी अडचण भासते. असें मौन कां हें मला कळत नाहीं. इंग्रजी अम्मलाच्या रहस्याचें लोकांस अजून यथार्थ ज्ञान झालें नाहीं. " हिंदीसमाजांत शिक्षणाची फार प्रगति झाली आहे. अज्ञाननिमग्न इंग्रज जनतेकडून हिंदीजनतेचे हक्क न समजले जाण्याचा संभव आहे. "

" येथें दोन गोष्टींचें प्रस्थ आहे. ( १ ) हिंदुस्थानाच्या कारभारांतील प्रचलित प्रश्नांकडे इंग्रजजनतेचें सर्व साधारण दुर्लक्ष. ( २ ) इंग्रज वर्तमान पत्रांच्या अधिपतींचें त्याविषयीं मुद्दलांतच अज्ञान. जॉनबुलचें अज्ञान एवढें

अगाध आहे कीं हिंदुस्थानच्या कारभारांतील प्रश्न निघावा व याच्या डोळ्यांत धूळ टाकून याला हवें त्यानें फसवूं नये असें व्हावयाचेंच नाहीं. हिंदुस्थान-विषयक प्रश्नांस येथें खुली हवा खावयास मिळण्याचीच मारामार आहे. पार्लमेंट सभेंत जेव्हां हे प्रश्न निघतात तेव्हां दोन्हीं सभागृहें रिकामीं पडतात."

( १७।१०।६५ चें पत्र )

"आपलीं मतें स्पष्टपणें प्रदर्शित करणाऱ्या उत्तम प्रकारें चालविलेल्या वृत्तपत्राची किंमत मुंबईच्या श्रीमंत पुढाऱ्यांना केव्हां कळणार !" त्यांचें म्हणणें असें होतें कीं हिंदी लोकांनीं विलायतचीं पत्रेंही आपलीं करून ठेविलीं पाहिजेत.

"धनिक लोकांनीं पुष्कळ वर्गणी गोळा करून इंग्रजी पत्राशीं—ज्यांतील कांहीं थोडक्यांस कलोनियल ( वसाहतींचें हित पहाणारीं ) पत्रें असें म्हणतात त्यांशीं—संबंध ठेविला पाहिजे. इंग्लंदांतील मोठ्या वाचक वर्गाचें लक्ष्य वेधून घेण्याचें कार्य आम्हांस करावयाचें आहे. ' जो स्वतःवर विश्वासतो त्यास ईश्वर साहाय्य करतो ' या म्हणींत तथ्यांश पुष्कळ आहे." ( १७–१२–६५ चें पत्र )

पुढें २–१–६६ च्या पत्रांत ज. जेकबसाहेबांनीं वरील विषयाचें माहात्म्य पुनः एकवार गायिलें आहे. "इंग्लंदांतील जनतेशीं संभाषण करणाऱ्या व त्यांच्या मतास हिंदुस्थानच्या हिताचा मार्ग दाखविणाऱ्या अशा एका नियत-कालिक पत्राची जरूर आहे. हिंदुस्थानांतील नवकोटनारायण डोळे उघडून पहातील तर ना ! "

" तुमच्या संस्थानिकांनीं नवकोटनारायणांनीं इतर मूर्ख प्रकार सोडून देऊन जनतेच्या हिताकडे लक्ष दिलें पाहिजे व प्रत्यक्ष पार्लमेंत सभेमध्यें आपलें म्हणणें काय आहे तें ऐकवण्याची व्यवस्था करून घेतली पाहिजे. हा धिक् ! हा धिक् !! सहस्रशः हा धिक् !!! इंग्लंदांतील बहुजनसमाज हिंदु-स्थानाविषयीं मुळींच काळजी वहात नाहीं ! ( २६–३–६६ चें पत्र. )

पुनः ४–१०–३६ च्या पत्रांत हेंच लिहिलें आहे. "इंग्लंदांतील वर्तमान पत्रांचा उपयोग आत्मकार्यार्थ करून घेण्यासाठीं त्यांना आपलींशीं करण्या-पासून फायदे आहेत. लग्नें, नाच, तमाशे इत्यादि चैनीच्या व इतर मूर्ख

प्रकारांत खर्च होणाऱ्या पैशांपैकीं कांहीं अंश इंग्लंदांतील संभावित पत्रांकडे लावून हिंदीविषयांप्रीत्यर्थ कांहीं जागा त्यांच्याकडून नित्य राखून ठेवविली पाहिजे."

## स्वराज्य.

ज. जेकब यांच्या मनांतून लोकांस स्वराज्याचे अधिकार द्यावे असें होतें. "ग्रामसंस्थेच्या पायावर म्युनिसिपालिटीच्या संस्था उत्पन्न करून त्यांच्यामार्फत स्वराज्याचा अधिकार हळूहळू दिला पाहिजे व त्याचें पर्यवसान सुशिक्षित हिंदी लोकांचा प्रवेश सर्व प्रांतांतील काउन्सिलांत झाला पाहिजे." हें मत ७-४-७६ च्या पत्रांत जेकबसाहेबांनीं दिलें आहे. म्हणजे त्यासालीं काउन्सिलांची हल्लींची सुधारलेली रचना त्यांच्या दिव्य दृष्टीस दिसत होती. तथापि पूर्णपणें अशिक्षित व अज्ञ अशा लोकांस ते निवडणुकीचा अधिकार देण्याच्या विरुद्ध होते. कारण ते म्हणत असे लोक परप्रत्ययनेयबुद्धि असतात. ( २३-४-८० )

## नेटिव्ह शिपाई.

हिंदुस्थानांत एक पोलिसांत मोठे अधिकारी होते. नेटिव्ह सैन्य भ्याड आहे निरुपयोगी आहे इ० उद्गार त्यांनीं काढिले ते जेकबसाहेब यांस खपले नाहीं. त्यांस फार राग आला. ते म्हणाले " नेटिव्ह सैन्याची यांनीं बेअब्रू केली आहे. सोल्जरांच्यानें जें झालें नाहीं तें करून नेटिव्ह सैन्यानें माझा जीव वांचविला आहे. अनेक प्रसंगीं नेटिव्ह सैन्यानें इतकें शौर्य दाखविलें आहे कीं तितकें किंवा त्याहून अधिक शौर्य करून दाखविणें दुरापस्त आहे.

१७—५—७८ चें पत्र.

## प्रेस ॲक्ट.

लार्ड लिटन यांचा प्रेस ॲक्ट पास झाला तेव्हां यांच्या विनंतीवरून ज्या लेखांवरून अथवा ज्यांसारख्या कांहीं लेखांवरून हा कायदा हिंदुस्थान सरकारानें केला त्यांचे नमुने रावसाहेबांनीं त्यांस वाचावयास पाठविले व ज. जेकब यांनीं ते वाचले त्यावेळेस त्यांस फार वाईट वाटलें व आपण हिंदुस्था-

नांत इतके श्रम हिंदी लोकांच्या कल्याणाकरितां घेतले त्यांचें सर्व बक्षिस हे अविचारी लेख असें समजावयाचें कीं काय? हिंदुस्थानाकरितां जेवढे श्रम घेतले तेवढ्यांच्या अर्धे श्रम जर इंग्लंडांत राहून घरच्या लोकांच्या कल्याणाकरितां घेतले असते तर काय झालें असतें! इत्यादि निराशेचे उद्गार त्यांनीं काढले.

## नवे कर व कायदे.

नवे कर बसविणारे कायदे घडविण्यास काउन्सिलच्या ऐरणीवर ठेवण्यांत आले कीं क्वचित् प्रसंगीं रावसाहेबांनां जसा कांहीं स्नायुविकार होऊन त्यांचा चित्तक्षोभ होत असे. तेथें जेकब साहेबांचा मतभेद होई. ते म्हणत "नव्या करांचा मुंबईकर लोक द्वेष करतात तें मला पसंत नाहीं. इंग्रज सरकारानें जिकडे तिकडे शांतता केली त्यामुळें पेढीवाले व व्यापारी लोक यांचा विशेष फायदा झाला तर त्यांनीं सुद्धां करांच ओझें कांहीं उचलूं नये हें कसें होईल. आजपर्यंत त्यांनीं फारसें दिलें नाहीं.

अमुक कायदा केल्यापासून सार्वजनिक हित होणार नाही. एवढ्याच एका सार्वजनिक कारणास्तव तुम्हांला कोणत्याही होऊं घातलेल्या कायद्यास विरोध प्रामाणिकपणें करतां येईल. व जेव्हां जेव्हां तसा विरोध कराल तेव्हां तेव्हां तो कांहीं तत्त्वाला धरूनच झाला पाहिजे. तो वृथाभिमानमूलक अथवा स्वेच्छा मूलक केलेला कामाचा नाहीं.

मला वाटतें सरकार जो कायदा करूं जातें त्याच्या कडे तुम्हीं अनुकूल दृष्टीनें पहातच नाहीं. कांहीं कायदे करण्याचें प्रयोजन पडतें तें तशी स्थिति उत्पन्न होते म्हणून असें तुम्हीं मनांत आणीत नाहीं. परंतु कोणत्याही होऊं घातलेल्या कायद्याचे जे कांहीं दुष्परिणाम होतील असें वाटतें ते नेमस्तपणें दाखवून दिल्यास कायदे करण्याची ज्यांच्या हातांत सत्ता आहे त्यांस मदतच होते." ( २५।७।७९ चें पत्र. )

रावसाहेब कॉन्टेजस् डिसिझ ॲक्टाचे ( संयोगजन्यरोगप्रतिबंधक कायद्याचे ) विरुद्ध होते. पृष्ठ ५०० पहा. जेकब साहेब तर्फेचे होते. "मी गेल्या

खेपेला तुम्हांला एक लहानसें पुस्तक पाठवून दिलें होतें. तें तुम्हीं वाचावें व तुमचें मत जें संयोगजन्यरोगप्रतिबंधक कायद्याचे इतकें अगदीं विरुद्ध आहे त्यांत कांहीं बदल झाला असेल तर लिहून कळवा. मनुष्यजातीच्या दुर्वर्तनाशीं झगडतांना आपल्याला कधीं कधीं एकाहून जास्ती उपाय दिसतात. दोन्हींही थोडेथोडे अपायकारकच असतात. म्हणून त्यांतला जो कमी अपायकारक असेल त्याचाच अंगीकार सुज्ञ मनुष्य करीत असतो."

या नंतर गुरुशिष्यसंवाद पुढें चालावा अशी परमेश्वराची इच्छा नव्हती. १८८० सालीं जेकब साहेबांची प्रकृति फार हैराण झाली होती. ती कळवितांना ते म्हणाले "माझा भाचा मि. इ. कॅन्डी काठेवाडांत परत जातांना तुम्हांस भेटलाच असेल. त्यावेळेस माझ्या प्रकृतीची किति दुर्दशा झाली आहे तिचें वर्णन त्यानें तुमच्या जवळ केलेंच असेल. उद्यां माझे वयाला ७५ वर्षें पुरीं होऊन शहात्तरावें वर्ष लागेल. जेथें दुष्टांचा त्रास पोंचत नाहीं व श्रान्त झालेल्या आत्म्यांस विश्रांति मिळत्ये तेथें गेल्याशिवाय माझ्या कष्टांची निवृत्ति व्हावयाची नाहीं." २३–४–८० चें पत्र.

हें पत्र शेवटचेंच होतें. व तें मिस् जर्ट्रूड हिनें पाठविलें होतें. रावसाहेबांनीं मिस् जर्ट्रूड हिला लिहिलें:—"माझे मित्र हे माझ्या मनाचे स्थिर मार्गदर्शक आहेत व मध्यें जरी समुद्र व भूमिखंडें आहेत तरी आम्हीं जवळ जवळ आहोंत असेंच मला वाटतें. तुमचें पत्र हें या गोष्टीचा शेवटचा पुरावा आहे. शिवाय, माझ्या मित्राचें हें शेवटचें पत्र म्हणजे अवर्णनीय व अमूल्य वस्तु माझ्या या हल्लींच्या स्थितींत आहे असें समजतों."

येथें एक ज. जेकब यांच्या आवडत्या पक्षाची त्यांच्या दत्तक मुलगीनें लिहिलेली गोष्ट मनोरंजक म्हणून दिली आहे:—तुम्हांस लिहिलेलें पत्र काकांनीं आतांच पुरें करून आपल्या आवडत्या लहान पांखरास पिंजऱ्यांतून बाहेर मोकळें सोडून दिलें आहे. तें आतां उडत उडत त्यांच्या खांद्यावर बसत आहे. त्यांच्या मस्तकावरील रौप्यवर्ण झुलपाचे केंश उपटून आपल्या घरट्याला

(तें कोठें बांधावयाचे ठरविलें आहे कोणास ठाऊक!) उबारा आणण्याकरितां त्यांत नेऊन ठेवण्याचा त्याचा बेत दिसतो. अहाहा! हा लघुप्राणी किति माणसाळलेला आहे म्हणून सांगूं! त्याला आपली भीति म्हणून कांहींच उरली नाहीं. काकांच्या कागदांवर चालतें. त्याचें पेन पिंजून टाकितें! व खुद्द काकांस चिलटाप्रमाणें दंश करावयास सोडीत नाहीं!! (२४-४-८० चें मिस् जर्ट्रूड जेकब यांचें पत्र)

याच्यापुढें ज. जेकब दुसरें पत्र लिहिण्याच्या स्थितींत नव्हते. त्यांचा आजार जानेवारी १५।१८८१ रोजीं वाढूं लागला व त्यांस बरेपणा अनेक उपायांनीं वाटूं शकला नाहीं. सेवेला त्यांची मानलेली मुलगी होतीच व शिवाय एक नातेवाईक डाक्टर होता. २७ जानेवारीच्या रात्रीं औषधपाणी देऊन आरामखुर्चीवर त्यांस निजवल्यावर त्यांस झोंप लागली ती अगदीं शांत होती. एकाद दुसरा उसासाही टाकावा लागला नाहीं. या गाढ निद्रेंतून ते पुनः जागे झाले नाहींत. त्यांच्याच शब्दांत म्हणावयाचें म्हणजे ज्या प्रदेशांत दमलेले भागलेले आत्मे विश्रांति घेतात-कारण त्या ठिकाणीं त्यांस दुष्ट लोक उपद्रव देऊं शकत नाहीं-त्या प्रदेशांत ते गेले.

रावसाहेबांनीं टाइम्समध्यें वरील दुःखकारक बातमी तारेनें आलेली वाचली तेव्हां ते म्हणालेः-युरोपीयन मित्रांत माझा उत्तम मित्र नाहींसा झाला.

रावसाहेबांनीं मिस जर्ट्रूड हिला पत्र लिहिलें तें:—

"पाश्चात्यदेशांतून आमच्या देशांत आलेल्या साधुश्रेष्ठांपैकीं एक माझे मित्र-जनरल जेकब-यांची निधनवार्ता कळविणारी तार वाचून फार दुःख झालें. परमेश्वराची इच्छा! तुमचे काका म्हणत या जगाच्या पाशांतून विमोचन होतें तें परमेश्वराच्या इच्छेनें होतें."

यांनीं आपल्या मृत्युपत्रांत १०० रुपये रावसाहेबांस देण्याचें लिहून ठेविलें होतें. ते ट्रष्टींनीं पोंचते केले. रावसाहेब ही देणगी फार चाहत असत.

## वे॥ पांडुरंगोपाध्याय गुर्जर.

यांस रावसाहेब गुरु असें मानीत. हे प्रथम मुंबईस आले ते रावसाहेबांच्या विनंतीवरून आले. त्यांच्याजवळ रावसाहेबांस योगाचा अभ्यास करावयाचा होता. हे धर्मशास्त्रांत व ज्योतिःशास्त्रांत प्रवीण होते. मुंबईस असतां रावसाहेबांच्या घरीं श्रावणीसारख्या धर्मकृत्यांत आचार्यपणा यांच्याकडेच असे. गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांत रावसाहेबांनीं यांस शास्त्री म्हणून लाविलें होतें. वार्धक्यामुळें यांस मुंबई सोडावी लागली. तरी कोंकणांत गेल्यावर त्यांचा विसर रावसाहेबांस केव्हांही पडला नाहीं. " आपण स्वतः लिहिण्यास अशक्त आहांत पण कोणी जवळ असल्यास त्याकडून दोन ओळी लिहवाव्या. मला काउन्सिलांमध्यें घातलें आहे. अशा वेळेस आपण येथें नाहीं ही उणीव भासत आहे. " १२।८।१८७७ चें पत्र.

यांच्या वार्धक्याबरोबर यांच्या विषयींची रावसाहेबांची पूज्यबुद्धि वाढतच गेली. " इतका पक्व दशेला आलेला ब्राह्मण अलिकडे पाहण्यांत नाहीं. "

( वासुकाका आठल्ये यांस पत्र. )

यांच्या कुटुंबांतील सर्व पुरुष विद्वान होते. म्हणून रावसाहेब त्यांस फार मान देत. " कोठेंही असलों तरी आपल्या सन्निधच आहें. माझ्या हातून कांहीं चाकरी व्हावी असा कै॥ पांडुरंगोपाध्याय यांचा माझा संबंध होता तदनुरूप मला आज्ञा होईल अशी आशा आहे. ( गोपाळ पाध्ये यांस पत्र ). गोपाळ पाध्ये हेही विद्वान होते. ते रावसाहेबांस गुरुतुल्य वाटत. पांडुरंगोपाध्याय यांचे चिरंजीव कृष्णपाध्ये यांस रावसाहेब गुरुपुत्र म्हणून मान देत. " कृष्ण पाध्ये बिन पांडुरंग पाध्ये हे आमचे गुरुपुत्र आहेत." ( वा. आठल्ये यांस पत्र) यांस संस्कृताचा अभ्यास करण्याकरतां सांगलीस रावसाहेबांनीं ठेवलें होतें.

गुर्जर यांच्या एकंदर कुटुंबाविषयीं रावसाहेबांच्या मनांत आदर होता असें दिसतें. कारण बाबू पाध्ये कोतापूरकर यांच्या मोठ्या मुलाच्या निधनाबद्दल समाचार घेण्यास भिलवलीला रावसाहेब जाऊन आले.

गुरूजींचें स्वार्जित धन सरकारी नोटांत संचित होतें त्या गहाळ झाल्या होत्या. त्यामुळें कांहीं दिवस कुटुंबाच्या पोषणाची केलेली व्यवस्था बिघडली त्या नोटांबद्दल वारसाचें सर्टीफिकेट मिळवून त्या ऐवजीं दुसऱ्या मिळे तोंपर्यंत सर्व संस्कार **रावसाहेबांनीं** करविले. नोटा हातीं पडल्यावर ३।२।१८८५ रोजीं नामदार **गिब्स** यांस पत्र लिहून माझ्या गुरूच्या कुटुंबाच्या अन्नवस्त्राची सोय लुप्तप्राय झालेली पुन्हां प्राप्त झाली." म्हणून आनंद प्रदर्शित केला.

---

## प्रकरण ८२ वें.

# रावसाहेबांचे मित्र.

**। कराविव शरीरस्य नेत्रयोरिव पक्ष्मणी ।**
**॥ अप्रोक्तं प्रियं कुर्यात् तन्मित्रं मित्रमुच्यते ॥ १ ॥**

( सुभाषित )

स्नेहशीलपणा हा गुण **रावसाहेबांच्या** अंगीं विशेष होता त्यामुळें हे जेथें जात तेथें नवे नवे स्नेही प्राप्त होत असत. पण जुन्यांची विसर न पडल्यामुळें स्नेह्यांच्या संख्येंत भरच पडत जाई. त्यांचे जसे हिंदी स्नेही होते तसे इंग्रजही होते. व जितक्या जिव्हाळ्याचे हिंदी स्नेही होते तितक्याच जिव्हाळ्याचे इंग्रज स्नेही होते.

डॉ. **हार्कनेस**, सर **बार्टल फ्रियर**, न्या. **गिब्स**, क. **जेकब** यांची नोंद त्यांनीं आपले स्नेही म्हणून १८५९ सालीं एका अगदीं खासगत वहींत करून ठेविली आहे. श्रोत्रियाचा अश्रोत्रिय सखा असूं शकत नाहीं, शूराचा क्लीब असूं शकत नाहीं. तुल्यत्व गुण स्नेहाची उपज व्हावयास लागतो. कांहीं गांवांतील समवयस्क खेळगडी म्हणून, कांहीं एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूट

मध्यें शिकत असतां सहविद्यार्थी म्हणून, कांहीं विद्वान म्हणून, कांहीं पौरुष संपन्न म्हणून, कांहीं समान धंद्यांतले म्हणून, कांहीं म्युनिसिपॅलिटींत व कांहीं कायदे काउन्सिलांत व इतर लोकहितकारी संस्थांत कामें करीत असतां लोकहितेच्छु सहकारी म्हणन तुल्यगुण मित्र झाले होते.

कार्यप्रसंग आला तरच स्नेह जडं द्यावयाचा असा रावसाहेबांचा स्वभाव नव्हता. स्नेहास लायक मनुष्य आढळला तर आपण होऊन त्याची ओळख करून घेत असत. "डाक्तर नारायण दाजींबरोबर रॉय उमेदसिंग यांस भेटण्यास गेलों. हे होळकर यांचे माजी दिवाण फार बुद्धिमान व बहुश्रुत दिसतात." २८।११।६३ रो.

"बाबू सर प्रतापचंद्र रॉय यांचें लेक्चर प्रार्थना समाजांत झालें. मी गेलों होतों. उत्तम भाषण. डा. आत्माराम पांडुरंग यां बरोबर बाबू प्रतापचंद्र रॉय यांस भेटलों." १७।१।१८७८ रो.

मित्रावरून मनुष्याच्या स्वभावाची परीक्षा होते. म्हणून या ग्रंथास हें प्रकरण जोडून रावसाहेबांच्या मित्रांविषयीं त्यांच्या संग्रहांत असलेली माहिती दिली आहे.

## सर बार्टल–फ्रियर मुंबईचे गव्हर्नर.

यांचें व रावसाहेबांचें खाजगी नातें प्रेमळ स्नेही म्हणून होतें. सर फ्रियर सिंधमध्यें कमीशनर असतांना उभयतांचा स्नेह जडला होता. पुढें रावसाहेब मुंबईस आले व कांहीं दिवस नोकरी करूं लागले. तेव्हां सर फ्रियर गव्हर्नर होऊन आले. रावसाहेबांस पुस्तकांचा मोठा नाद आहे व त्यांचा संग्रह फार विविध व उपयोगी आहे हें गव्हरर्नर साहेबांस कळून आल्यावरून त्यांची खाजगी लायब्ररी सजाविण्याचें काम त्यांनीं रावसाहेबांवर सोपविलें होतें. "सर बार्टल फ्रियर यांस सकाळीं बंगल्यावर भेटलों, त्यांनीं माझ्या कौटुंबिक स्थितींची चौकशी केली व हिंदुस्थानविषयक पुस्तकें त्यांच्या करतां विकत घ्यावयास विनंति केली." (१८।९।६२ रो. उ.)

त्यांचें सरदारांशीं वर्तन सहानुभूतीपर होतें. त्यांस राज्यांत सुधारणा करण्यास उत्तम उपदेश करीत. १८६६ च्या पुणें येथील दरबारांत तर यांनी मुद्दाम मराठींत भाषण केलें. सर्वांशीं यांचें वर्तन फार सभ्य असे. हिंदीविद्वानांचे हे चहाते होते. मॅट्रिक्युलेशन पास झालेल्यास सरकारी नोकरी द्यावी. बी. ए. झालेल्यास मामलेदारी द्यावी इ. नियम यानींच केले. केरो लक्ष्मण छत्रे यांस प्रोफेसर यांनींच नेमलें व म. गो. रानडे यांस अक्कलकोटला कारभारी यांनीच नेमिलें. एक्झिक्युटिव इंजिनियरची जागा एका हिंदी गृहस्थास दिली व विनायकराव वासुदेव यांस शेरीफ नेमिलें. यांच्या पत्नी स्त्रीशिक्षणास फार साहाय्य करीत. स्टूडन्टस लिटररी सोसायटीनें त्याबद्दल त्यांस मानपत्र दिलें होतें. मुंबईच्या लोकांनीं सभा भरवून यांचें स्मारक केलें आहे.

## नामदार जेम्स गिब्स.

हे १८४६ सालीं सिव्हिल सर्विसची परीक्षा देऊन हिंदुस्थानांत आले. प्रथमतः आसिस्टन्ट जज्ज, मग सेशन्स जज्ज व नंतर सिंधमध्यें सर बार्टल फ्रियर हे कमीशनर असतां ज्युडिशल असिस्टन्ट झाले. तेव्हां रावसाहेब कमीशनरच्या खाजगत कारकुनाच्या जागेवर असतां त्यांचा व मि. गिब्स यांचा स्नेह झाला तो आमरणान्त होता.

१८५७ मध्यें शांतता स्थापण्यास मि. गिब्स यांचा उपयोग झाला. तेथें असतां यांनीं दोन उत्तम कामगिऱ्या केल्या. पोलिसांच्या छळाची व वेठ व बिगार यांची चक्क बंदी केली. ( १६।५।१८५७ चें अनंत चंद्रोबा यांचें पत्र )

हे रत्नागिरीस रेव्हिन्यू सर्व्हेचे सुपरिटेन्डेन्ट होते. नंतर प्राप्तीच्या कराचे मुंबईस कमीशनर होते. लोकांचीं मनें न दुखवितां यांनीं तें काम उत्तम केलें. रावसाहेब त्यांचे मदतनीस* होते. नंतर रजा घेऊन विलायतेस गेल्यावर ते बॅरिस्टर झाले. परत आल्यावर पुणें येथें जज्ज व सरदारांचे एजन्ट झाले. तेव्हां ते फारच लोक प्रिय झाले. नंतर १८६६ मध्यें हायकों-

---

* ही जागा युरोपियनास द्यावी असा आग्रह असतां मि. गिब्स यांनी मला मंडलिकच हवेत असा आग्रह धरला व शेवटास नेला.

र्टाच्या न्यायासनावर बसले. तेथें १८७४ पर्यंत त्यांनीं काम केलें. तेव्हां बॅरिस्टर, वकील, व पक्षकार यांस त्यांनीं संतुष्ट ठेविलें. पुढें ते काउन्सिलर झाले. म्युनिसिपॅलिटीच्या कायद्यासारखे महत्त्वाचे कायदे यांच्या कारकीर्दींत झाले. तेव्हां यांस सी. आय्. ई. हा किताब मिळाला. मि. गिब्स फार विद्वान होते म्हणून मुंबई रायल एशिॲटिक सोसायटीचे यांस दुय्यम अध्यक्ष निवडण्यांत आलें. नाण्यांची पुष्कळ दुर्मिळ माहिती देणारे यांनीं निबंध लिहिले. यांस मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर सरकारनें नेमिलें होतें. तेव्हां हे युनिव्हर्सिटीच्या कामांत फार लक्ष घालीत असत. मुंबई सरकार पुण्यास असलें-तरी सभेला आवर्जून येत असत.

पुढें यांनीं या जागेचा राजिनामा दिला त्या वेळेस यांस सर्व फेलोज मिळून मानपत्र दिलें व फेलोज व इतर लोक यांनीं बरीच रक्कम गोळा करून यांचें स्मारक म्हणून बी. एस. सी. च्या परीक्षेंत यांच्या नांवानें एक बक्षीस ठेविलें. कांहीं रक्कम विश्वविद्यालयाच्या पुस्तकसंग्रहाकडे लाविली.

पुढें यांची नेमणूक गव्हर्नर जनरल यांच्या काउन्सिलांत झाली. लार्ड रिपन यांस स्थानिक स्वराज्य व इलबर्ट बिल इ० कामांत त्यांचें चांगलें साहाय्य झालें. हे पेन्शन घेऊन विलायतेस १८८५ सालीं गेले. तेव्हां रावसाहेब व सर जमशेटजी यांनीं त्यांस सार्वजनिक पानसुपारी २९।४।८५ रोजीं केली. त्यावेळेस मुंबईंतील बडेबडे हिंदी व इंग्रज लोक हजर होते. तिलसमे-इ-जमाशिड (धीराचा साथीदार-सौख्य) हें नाटक मि. राणिना यांनीं बसविलें होतें त्याचा खेळ एका नाटक कंपनीकडून करवून दाखविण्यांत आला.

मि. गिब्स हे १८८६ मध्यें ख्रिस्त लोकवासी झाले परंतु आपला काळ जवळ आला हें त्यांस समजतांच त्यांनीं आपले मित्र मि. हॅशम यांस हिंदी लोकांस एक निरोप कळविण्याची विनंति केली. ते म्हणाले " माझ्या हिंदी मित्रांस माझे शेवटचे सलाम सांगा व त्यांस कळवा कीं, माझ्या दत्तक देशा-

वर माझें प्रेम इतकें होतें कीं, शेवटपर्यंत मला त्याच्याच आठवणी होत आहेत. हा उदात्त भावना उत्पन्न करणारा निरोप मि. हॅंशम् यांनीं राव-साहेबांकडे पाठवून सर्व मित्रांस कळविण्याची विनंति केली.

## डाक्तर भाऊ दाजी लाड.

डाक्तर भाऊ दाजी लाड यांचा ( जे लोकांत भाऊ दाजी या नांवानें व रावसाहेबांच्या मित्रमंडळांत नुसत्या भाऊ या नांवानें प्रसिद्ध होते त्यांचा ) जन्म १८२४ च्या सुमारास सावंतवाडी नजीक मांजरें म्हणून गांव आहे तेथें एका वैभवरहित कुलांत झाला. तथापि तीस वर्षांत ते आपल्या बुद्धि-वैभवानें फार प्रसिद्धीस आले. १८५४ च्या नोव्हेंबर महिन्याचे एका अंकांत मुंबई टाइम्सनें असें म्हटलें आहे कीं एलफिन्स्टन इंस्टिटयूशनची स्थापना झाल्यापासून त्या संस्थेनें फक्त तीनच पुरुष निर्माण केले. १ नारा-यण दिनानाथजी, २ नवरोजी फरदुनजी व ३ डाक्तर भाऊ दाजी.

एल्फिस्टन इन्स्टिटयूट मध्यें शिकत असतां त्यांस मोठाल्या शिष्यवृत्त्या मिळाल्या व एक सुवर्ण पदक मिळालें, अभ्यासक्रम पुरा होतांच त्यांस रसा-यन शास्त्र व तत्त्वज्ञान शिकविणाऱ्या प्रोफेसराची जागा मिळाली. कांहीं रजपूत लोकांत कन्या झाल्यास पुढें तिजवर येणाऱ्या आपत्ती टाळण्याकरतां बालपणींच तिचा वध करण्याची रूढि होती. तीवर भाऊंनीं उत्तम निबंध इंग्रजींत व गुजराथींत लिहिला, त्याबद्दल यांस एक मोठें बक्षिस मिळालें होतें. पुढें १८४५ सांत ते ग्रँट मेडिकल कालेजांत वैद्यकीचा अभ्यास करण्यास गेले. तेथेंही त्यांचें तेज सर्वांस दिसून आलें. हिंदू लोकांस शारीरशास्त्र शिक-तांना हाडाचा सांपळा तपासणें, कापा कापी करणें वगैरे गोष्टींची नावड असे. ती यांनीं दूर केली. त्यावेळेस डाक्तरी विद्येवर हिंदी लोकांचा फार भरंवसा नव्हता, म्हणून विद्यार्थ्यांची जीवनयात्रा कालेजांतील अभ्यास झाल्यावर कठीण पडूं नये व नवे नवे विद्यार्थी कालेजांत येण्यास मिळावे म्हणून शेवटली परीक्षा पास होतांच त्यांस देण्याकरतां असिस्टंट सर्जनच्या जागा

सरकारनें तयार ठेवल्या होत्या. त्यांतील १८५१ त एक भाऊ दाजींस मिळाली. परंतु भाऊंचा आत्मविश्वास मोठा होता. ती जागा त्यांनीं लवकरच सोडली व स्वतंत्रपणें धंदा करूं लागले. त्यांत त्यांची इतकी भरभराट झाली कीं येथें आलेल्या नामांकित युरोपियन डाक्तरांची दहा वर्षांतही तितकी सहसा होत नाहीं. डोळ्यांचे रोग व कांहीं स्त्रियांचे रोग शस्त्रप्रयोगानें नाहींसे करण्यांत त्यांचा हातखंडा असे. त्यांना गरीबांचा विसर पडला नाहीं, त्यांच्या करतां एक धर्मार्थ दवाखाना त्यांनीं काढला होता. त्यांत १०,००० रोग्यांस एका वर्षांत औषधें मिळालीं. कांहीं दिवसांनीं यांस साहाय्य करण्यास यांचे बन्धु नारायण दाजी परीक्षा पास होऊन आले. हे दोघे म्हणजे आमच्यांतील अश्विनी कुमारच होते.

सार्वजनिक कल्याणाचें काम निघालें व त्यांत भाऊ नाहींत असें होत नसे. स्टूडन्टस् लिटररि सोसायटीमध्यें यांच अंग होतें. स्त्रीशिक्षणाची यांस फारच हौस होती. लोहार चाळींत आपल्या खर्चानें एक मुलींची शाळा यांनीं चालविली होती. मुंबई रिफार्म असोसिएशनचे हे सेक्रेटरी होते, त्यांनीं लिहिलेल्या अर्जाची भाषा पोक्त व समर्याद असे. १८५२ मध्यें शिक्षण खात्याच्या बोर्डाचे त्यांस सभासद सरकारनें नेमिलें. रायल एशिॲटिक सोसायटीचे मुंबई शाखेचे हे सभासद होते व पुढें जिआग्रॉफिकल् सोसायटीचे हे सेक्रेटरी होते.

रावसाहेब एलफिन्स्टन् इंस्टिटयूटमध्यें आल्यापासून डाक्तर साहेबांचा व त्यांचा स्नेह जमला होता. इन्स्टिटयूट मधील विद्यार्थ्यांस भाऊ औषध फुकट देत असत व हे रावसाहेबांचे कुटुंबवैद्य होते. पुढें पुढें यांचा पुष्कळच घरोबा जमला. रावसाहेब ठाणें जिल्ह्यांत व्हिजिटर असतां फिरतीवर गेले होते. घरीं त्यांचें कुटुंब व बहीण व नोकर होते. त्या जिल्ह्यांत पुष्करणी नांवाचें एक तीर्थ आहे तेथें जातांना डा. भाऊ रावसाहेबांच्या बिऱ्हाडीं उतरले होते. त्यावेळेस त्यांस त्यांची इच्छा नसतां घरच्या मंडळीनें मेजवानी दिली; बरोबर माधवराव बर्वे होते.

डा. भाऊ कसला तरी शोध लावण्यांत सतत गुंतलेले असत. त्या कामांत रावसाहेब साहाय्य करीत असत. भुजेस रावसाहेब असतां तेथील कामगिरी डाक्तर साहेबांनीं रावसाहेबांकडे सोंपविली होती:—"मला गुग्गुळाच्या झाडाचा रोंपा पाहिजे, गुग्गुळाची ताजी खांदी फळें व फुलें यांसुद्धां मिळेल तर पाठवा, नाहीं तर जेकबसाहेबांचा चितारी जुमा तेथें असेल तर त्याकडून या वृक्षाच्या सपुष्प व सफल खांदीचें यथार्थ चित्र काढून पाठवा. झाड कोठें उत्पन्न होतें, ज्या जमिनींत उत्पन्न होतें तिचें वर्णन, व गुग्गुळ कसा तयार करतात त्याचा उपयोग लोक कसा करतात इत्यादि माहिती पाठवा."

"एक तऱ्हेचा बीटल् नांवाचा कीटक आहे. तो गोमयाचे गोळे करून आंत अंडीं घालतो. अंड्याचें कवच फोडून प्राणी निपजला कीं तो गोमयाचे गोळे आंतून कोरून खातो. तेणेंकरून ते गोळे अगदीं पोंकळ होतात. मग तो आंतून निघून बाहेर जातो. याविषयीं शोध त्यांनीं चालविला होता." भाऊं करतां कुलाबाजिल्ह्यातील एका तलाठ्या कडून रावसाहेबांनीं पत्रानें कांहीं माहिती मागाविली होती. त्याचें उत्तर आलें तें "तीन फांद्या ताड मिळत नाहीं. अलीबागेस येका माडास फांदी फुटली होती. ती मालकानें तोडिली. त्याची खूण आहे. तीन फांद्यांच्या पोफळीचा नकाशा पाठविला आहे."

१८५८ च्या डिसेंबर महिन्यांत वनस्पति वाटिका, विविध प्राणिसंग्रह, व वस्तुसंग्रह* महाराणी व्हिक्टोरिया यांच्या नांवें स्थापन करण्याकरतां मुंबईत डा. भाऊंनीं मोठी सभा भरविली होती. तींत त्यांनीं मोठ्या श्रमानें तयार केलेलें असें उपयुक्त भाषण केलें. इतर वक्त्यांचीं त्यांना दुजोरा देणारीं भाषणें झालीं, त्यांत दादाभाईचें सर्वोत्तम होतें. डाक्तर वुईलसन यांचें अगदीं प्रस्तावोचित होतें. विनायकराव जगन्नाथ शंकरशेट, मंगळदास नथुभाई व वरजीवनदास इ० बडी मंडळी हजर होती. ( १८।१२।५८ चें वि. भागवत यांचें पत्र )

* १८५६ सालीं रावसाहेब या सेंट्रल म्युझिअम कमीटीचे सभासद होते.

माधव वासुदेव बर्वे १८५८ सालीं रत्नागिरीस व्हिजिटर असतां डॉ. भाऊंकरतां रत्नागिरी येथील प्रसिद्ध पर्वत मिऱ्या यावर उगवणाऱ्या दिव्य औषधींचे नमुने मिळविण्याकरतां रावसाहेबांनीं एक मनुष्य पाठविला होता. तेव्हां त्या भागांतलि श्री करुणेश्वराच्या देवळांत कांहीं कोरींव लेख आहेत. त्यांची प्रत बर्वे यांनीं भाऊंकडे पाठविली होती. १८५९ सालीं डॉ भाऊ व रावसाहेब यांनी खंडाळ्यास जाऊन वनस्पतींचा शोध करण्याचा निश्चय केला होता. तेथें जाण्यास त्यांना त्यांचे मित्र वासुदेव बापूजी कानिटकर प्रसिद्ध इंजिनियर, यांनीं निमंत्रण दिलें होतें. सर्व देशभर जाहिराती प्रसिद्ध करून कविकुलगुरु कालिदास व त्याचा आश्रय दाता विक्रमादित्य राजा यांविषयीं भरंवशालायक वृत्तांत जो सांगेल त्या शोधकास सुन्दर बक्षिस देण्याचें १८६० सालीं भाऊंनीं* योजिलें होतें. त्याच प्रमाणें वराह मिहिराच्या जन्मभूमीचा व काळाचा व त्यांनीं लिहिलेल्या रमणिकसिद्धांत वगैरे ग्रंथांचा शोध करावयाचा होता.

१८६३ सालीं भाऊ दाजी आपले कांहीं शोधक स्नेही घेऊन, हिंदुस्थानभर प्रवास करण्यास गेले होते. त्यावेळीं आपल्या मंडळीचे त्यांनीं दोन विभाग केले होते. एका विभागांत वेदशास्त्र संपन्न पांडुरंगोपाध्याय गुर्जर व एक जैनाचार्य असे दोघेजण मिळून २६।२।६३ रोजीं मुंबईहून निघून कराची हैद्राबाद मार्गें जसल्मीर येथें जैन पुस्तकालयांतील संस्कृत ग्रंथांपैकीं काव्य, इतिहास, ज्योतिष व वैद्यक यां संबंधें जे ग्रंथ असतील ते पाहून त्यांच्या प्रती काढून घेण्याकरितां गेले होते. छंदोनुशासन, काव्यप्रकाशटीका, मागधी कोश, तत्त्वार्थप्रकाश वगैरे ग्रंथांच्या प्रती काढण्यांत त्यांचा बराच काल गेला. त्यांस कोठेंही अडचण

---

* डाक्तर भाऊंनीं जुने हस्तलिखित ग्रंथ वांचविण्याच्या कामीं पुष्कळ मेहनत घेतली ह्मणून त्यांची स्तुति रावसाहेब वारंवार करीत असत. कारण ते म्हणत " येथून असंख्य हस्तलिखित ग्रंथ गेले आहेत त्यांचें येथें पुनरागमन होणें नाहीं. "

पडूं नये व प्रवास सुखकर व्हावा म्हणून ठिकठिकाणच्या युरोपियन व हिंदी अधिकाऱ्यांना रावसाहेबांनीं शिफारस पत्रें दिलीं होतीं. भाऊ निघाले ते, प्रथम मद्रासेस गेले. तेथें गव्हरनर साहेब यांची भेट घेऊन पदार्थ संग्रहालयांत जाऊन आले. तेथें असतां इंग्रज व हिंदी प्रमुख गृहस्थांच्या भेटी झाल्या. तेथून कलकत्त्यास गेल्यावर एशिॲटिक सोसायटीपुढें भाऊनीं एक निबंध वाचला. तसेच बेथून सोसायटीपुढें एक भाषण करून स्त्रीशिक्षणाच्या प्रसारार्थ पुष्कळ श्रम घेतले पाहिजेत अशी बाबूलोकांना विनंति केली. नंतर राणीगंज येथील कोळशाच्या खाणी पहावयास गेले. व तेथून बर्दवानचे महाराजे यांच्या भेटीला गेले. त्यावेळीं त्यांच्या भव्य व सुशोभित राजवाड्यांतील सर्व हिंदुस्थानांत उत्तम व नीटनेटकें असलेलें सामान पाहिलें. प्राणिशाला व वृक्षवाटिका पाहून भाऊंचें मन प्रसन्न झालें. नंतर कलकत्त्यास गेल्यावर वनौषधी, वृक्ष व लता यांची बाग पाहून पाटलिपुत्र नगरास गेले, ते प्रयागाहून श्री क्षेत्र काशी येथें दाखल झाले. ( १५।२।६३ चें भाऊंचें पत्र )

यांचा प्रवास २।३ वर्षे चालला होता. परत येतांना आपल्या बरोबर ते असंख्य दुर्मिळ व अपूर्व वस्तूंचा संग्रह घेऊन आले. ( १२–५–६६ चे रामभाऊ उदास यांस पत्र ). त्यांत सुंदर चित्रें, शिल्पकाराचें कौशल्य दाखविणारे पुतळे, नानाविध शस्त्रें, चमत्कारिक यंत्रें, दर्शनीय शिलालेख इ० मनोवेधक वस्तू होत्या. वर सांगितलेल्या प्रांतांशिवाय ते जगन्नाथापासून दक्षिण हैद्राबादेपर्यंतही जाऊन आले. वाटेंत या देशांत आर्यांची वस्ती होण्यापूर्वींपासून येथें रानावनांत राहणाऱ्या ज्या बहुविध मूळ जाती आहेत त्यांच्या भाषांतील शब्दांचें भाण्डार गोळा करून त्यांनीं आणलें.

मुंबईस निघालेल्या पुनर्विवाहोत्तेजक सभेचे हे एक सभासद होते. प्रसिद्ध यदुनाथ महाराजांच्या खटल्यांत महाराजांच्या विरुद्ध यांनीं साक्ष दिली होती.

डाक्तर साहेबांची कीर्ति विलायतेस अगोदरच गेली होती. लंडन येथें वैद्यक विषयावरील प्रसिद्ध होणाऱ्या लॅन्सेट नामक पुस्तकांत यांचें त्रोटक

चरित्र १८५५ सालींच प्रसिद्ध झालें होतें. यांच्या मनांत विलायतेस जावयाचें फार होतें पण ते मजे करितां नव्हे. त्यांनीं १८६० मध्यें रावसाहेबांस पत्र लिहिलें तें. "सामाजिक व धार्मिक क्रान्ति घडून येईल अशी कांहीं तजवीज करण्याकरितां विलायतेस जाण्याचा विचार माझे मनांत येऊन दिवसानुदिवस तो बळावत चालला आहे व तो हेतु सिद्धीस जाईतों मीं जगावें अशी रोज परमेश्वरापाशीं मनांत एकनिष्ठेनें प्रार्थना करीत असतों. जसजसा हा विचार माझ्या मनांत घोळत राहतो तसतसा माझ्या देशबांधवांच्या अगाध अज्ञानाबद्दल मला अधिकाधिक खेद होऊं लागतो. एका व्यक्तीनें अथवा एका मंडळीच्या हातून हें अज्ञान अंशतः सुद्धां नष्ट करतां यावयाचें नाहीं असें कोणी म्हणेल तर मला तें खरें वाटत नाहीं."

रावसाहेबांचे वडील नानासाहेब यांची व भाऊंची चांगली ओळख होती. भाऊंकरितां आदरेखून कोकणच्या रानांतील २० निरनिराळ्या वनस्पतींचे चीक निरनिराळ्या बाटल्यांत घालून नानासाहेबांनीं पाठविले होते. कुड्याची साल व काजऱ्याच्या बिया अशीं माधवराव बर्व्यांकडून रावसाहेब भाऊंकरतां मागवीत; व रावसाहेब ठाणें जिल्ह्यांत नोकरीसंबंधानें असत तेव्हां सातविणीच्या सालींची ओझीं व सोनामुखीच्या पाल्याचे भारे, व कुचल्याच्या बियांची पोतीं पाठवीत असत.

भाऊंचे प्रशंसार्ह काम सतत चाललें असतां त्यांच्या मित्रांच्या प्रेमास केव्हांच ऊत येऊन त्यांचा कांहीं तरी सन्मान करावा· अशी त्यांच्या प्रेमळ मनांत लालसा उत्पन्न झाली. आधीं एक प्रास्ताविक सभा करून १४।६।६० रोजी सर अलेक्झॅन्डर ग्रँट यांच्या नांवानें एक विनंतिपत्रक मंडळीनें काढविलें.

## भाऊ दाजींचें सन्मान कृत्य.

"स्टूडन्टस् लिटररी ॲन्ड सायन्टिफिक सोसायटीच्या कारभारीमंडळीनें विचार केल्यावरून व मुंबईतील सर्व जातींतील कित्येक लोकांनीं त्यांस मोठ्या

उत्साहानें अनुमोदन दिल्यावरून असें ठरविण्यांत आलें आहे कीं या सोसायटीची नंबर १ ची लोहार चाळींतील मुलींची शाळा हिचा खर्च डाक्टर भाऊ दाजी यांणीं आजदिवसपर्यंत उदार बुद्धीनें चालविला आहे. तो त्यांजवरून काढावा, आणि एक वर्गणीची यादी करून, फंड जमा करून सदरहू शाळेच्या खर्चाची कायम नेमणूक करावी आणि ती शाळा डाक्टर भाऊ दाजी यांच्या नांवें चालवावी."

हा फंड जमा करण्यांत रावसाहेबांनीं पुष्कळ खटपट केली. त्यांस साहाय्य ही चांगलें मिळालें. बैरामजी जीजीभाई; गोकुलदास तेजपाळ; लक्ष्मीदास खिमजी; मंगळदास नथुभाई; डोसाभाई फ्रामजी; केरोपंत छत्रे; रामकृष्णपंत भांडारकर ( हे पुण्याची वर्गणी गोळा करीत होते); नारायणभाई दांडेकर; कृष्णशास्त्री तळेकर; नाना मोरोजी; माधवराव बर्वे इ. खटपट करीत होते.

१८६२ सालापर्यंत हा फंड १२½ ( साडेबारा ) हजार रुपयांवर गेला होता. यांत बाहिरामजी जीजीभाई यांनीं १००० दिले, मंचरजी पांथकी यांनीं उदारपणें मदत केली व स्नेह्यांकडून करवीन असें वचन दिलें.

सद्गुणांचा अतिरेक ह्मणजेच दुर्गुण असें ह्मणतात. उदाहरणार्थ उदारपणा हा गुण कळसाला पोंहचला ह्मणजे त्याला उधळेपणा ह्मणतात. यांचा यांना संसार असून सार्वजनिक कल्याणाच्या नादांत पैसा फार खर्च होई. शिवाय मुंबईत जो मध्यें एक शेअर बझारनें हा: हा: कार उडविला त्यांत भाऊंची सांपत्तिक स्थिति फार बिघडली. लाखों रुपयांचा त्यांचा व्यवहार होता. त्याप्रमाणें त्यांचें नुकसानही तसेंच झालें. हें पाहून त्यांच्या असंख्य मित्रांस फार हळहळ वाटली. " भाऊंसारख्या उदार मनुष्यावर आपत्ति यावी ! व कंजुष मनुष्याकडे संपत्ति वसावी ! हें पाहून मनास फार खेद होतो. " ( १८।५।६७ चें जेकबसाहेबांचें पत्र ) ह्मणून त्यांनीं ब्रह्मस्वाचें निवारण करण्याकरतां आपपसांत स्नेहभावानें आपलें सर्वस्व ट्रस्टींच्या हवालीं १८६५ सालीं केलें होतें, त्यांत रावसाहेब हे एक ट्रस्टी होते. खुद्द रावसाहेबांचेंही येणें पुष्कळ होतें.

लाखों रुपयांचा व्यवहार भाऊंनीं केला व तो त्यांच्या अंगास आला हें खरें आहे परंतु त्यांत पुरुषदोष नव्हता. दैवदोषच होता असें ह्मणावयाला पुष्कळ जागा आहे. नामदार एच्. एन्. न्यूटन हायकोर्ट जज्ज रावसाहेबांचे व भाऊंचे स्नेही होते. त्यांच्या १०।५।७७ च्य पत्रांतील उतारा वरच्या विधानाला आधार ह्मणून दिला आहे. " माझे कैलासवासी मित्र भाऊ दाजी यांच्या कुटुंबाची स्थिति त्यांच्या मागें चांगली आहे कीं वाईट आहे तें कळवा. मनुष्याचा प्रामाणिकपणा पूर्णपणें कसास लावावयाचा प्रसंग एकदां मला आला होता. त्याप्रसंगीं त्यांनीं जें वर्तन केलें त्या योगानें माझा त्यांच्या विषयींचा आदर तर फारच वाढला. " करसनदास माधवदास, मंगळदास सोभागचंद इ० मंडळींनीं भाऊंच्या धनकोंकडून त्यांस बेदावे पत्रें करून घेण्याकरतां खूप खटपट केली. प्रेमचंद रायचंद यांनीं सढळ खट-पट केली.

यांनीं महारोगावर औषध शोधून काढलें होतें त्यांत सर्व मुख्य द्रव्यें देशीच होतीं. त्याचे शास्त्रीय तऱ्हेन प्रयोग करून पहाण्यास कांहीं औषध रत्नागिरी येथें दिनशा पेटिट यांच्या मदतीनें महारोगाकरतां बांधलें गेलेल्या इस्पितळांत पाठविलें होतें. त्याचा गुण कसा काय आला याबद्दलची माहिती उपलब्ध नाहीं. परंतु भाऊंनीं खुद्द जेकब साहेबांस १८६७ च्या एका पत्रांत कळविलें होतें कीं माझ्या औषधानें हाताशीं धरलेले सर्व महारोगी बरे होत चालले आहेत, परंतु या व्याधीनें ग्रस्त झालेले जे लोक आहेत ते अगदीं दरिद्री असल्यामुळें त्यांस औषध अगदा फुकट द्यावें लागतें. एवढ्यावरून इतकें दिसतें कीं तयार केलेल्या औषधाच्या अमोघत्वाविषयीं त्यांना खात्री वाटत होती. व त्यांच्या अंगीं असले कांहीं शोध लावण्याचें सामर्थ्य होतें अशी लोकांचीही भावना होती. " डोकें विलक्षण आहे. चातुर्याबद्दल त्यांची मोठी वाहवा करतों. त्यांनीं आणखी कांहीं अजब शोध लावले असले तर मला कळवा. " जेकब साहेबांच ( ८।१।६७ चें रावसाहेबांस पत्र )

नामदार न्यूटन यांस भाऊंनीं आपल्या औषधांचीं नांवें सांगितलीं होतीं

व तीं गुणकारक होतीं असा त्यांचा भरंवसा दिसतो. त्यांनीं खालील पत्र रावसाहेबांस लिहिलें होतें. " भाऊंनीं काढलेलें महारोगावर औषध कोणत्या औषधींचें केलें आहे तें लोकांस सांगण्याची अजून हरकत आहे काय ? मला त्यांनीं तें गुप्तपणें सांगितलें होतें. मनुष्य जातीच्या हिताकरितां तरी आम्हांला तें सांगा असा येथील लोक मला फार आग्रह करीत आहेत. परंतु तें कोणास सांगूं नये अशी त्यांच्या कुटुंबांतील मनुष्यांची इच्छा असल्यास मला तसें करतां येत नाहीं. या औषधाचा गुण आल्याचीं कांहीं पत्रें रोग्यांच्या सहीचीं १८६८ सालच्या नेटिव ओपिनिअन मध्यें छापलेलीं आढळतात. कांहीं पत्रें १८७१ व १८७२ सालीं आढळतात. त्यांत कांहीं इंग्रज गृहस्थांचीं आहेत. भाऊनीं रुग्णावस्थेंतील फोटो व मागाहून बरे झालेले फोटो हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी ड्यूक ऑफ आर्गाइल यांकडे पाठविले होते. त्याचें प्रशंसापूर्वक पत्र आलें होतें.

सततच्या कष्टानें भाऊंना १८७३ मध्यें अर्धांगवायूचा झटका बसला, व तेव्हां पासून ते निरुपयोगी झाले.

यांचेकडून व्यवस्थापत्र रावसाहेबांनीं करविलें होतें. भाऊंच्या प्रामाणिक-पणाबद्दल रावसाहेबांची पूर्ण खात्री झालेली होती असें त्यांच्या रोजनिशींतील एक उतारा दाखवितो " एका पक्षकारानें येऊन सांगितलें कीं आम्हीं भाऊंच्या मार्फत हें काम चालविण्यास पुष्कळ पैसा खर्च केला ! त्यावर मीं सांगितलें हें खोटें आहे. मला जितकी माहिती आहे त्यावरून असें मीं सांगतों कीं तुमचा पैसा भाऊंच्या खिशांत उतरला नाहीं. " ७।११।१८६३.

भाऊ दाजी हे दिसण्यांत भव्य दिसत. बूट, ढिली इजार व दोन बंदांचा सैल आंगरखा व भलें लांब रुंद चक्रीदार मुंबई तऱ्हेचें पागोटें वापरीत असत व त्या वेळेच्या शिष्ट व सभ्य जुन्या पद्धतीप्रमाणें उपरण्याऐवजीं शाल दोन्हीं खांद्यावरून पुढें पोटावर लोंबती टाकीत असत.

यांची विद्वत्ता जाणून सरकारनें यांस युनिव्हर्सिटींत सिन्डीक नेमिलें होतें.

पुढें यांस शेरिफच्या जागेचा मान मिळाला होता. मुंबई असोसिएशन काढण्यामध्यें यांचें अंग होतें. १८५२ नंतर ही सभा निघाली तेव्हां अध्यक्षपद जगन्नाथ शंकरशेट यांकडे होते; व भाऊ हे चिटणीस होते.

औद्यौगिक सुधारणेकडे यांचें लक्ष असे; व सुताच्या गिरण्यांच्या उभारणींत यांचा उद्योग कारणीभूत झाला होता.

" अर्धांगवायूच्या झटक्यांतून भाऊ बरे झाले नाहींत. त्यांस ३१।५।१८-७४ रोजीं मृत्यु आला. मागें राहिलेल्या कुटुंबाची स्थितिही नंतर बिकट झाली. आपण भाऊ दाजी यांच्या कुटुंबाची चौकशी केलीत. बिचाऱ्याचा दुसरा मुलगा द्वारकानाथ गेल्या मे मध्यें निवतला. पहिला मुलगा बडोदा संस्थानांत नोकरीस आहे, व आपल्या विधवा मातोश्रीस संभाळण्या सारखा आहे.

नारायण दाजी हे वारले. मागें २ मुलगे आहेत. शिवाय एक विधवा व मुलगी होती. मुलगी मागाहून थोड्या महिन्यांनीं वारली. कांहीं इस्टेट आहे. तिचे ट्रस्टी त्यांनीं मला व शामराव विठ्ठल यांस नेमिलें आहे. पाटाची व्यवस्था आहे पण उत्तम नाहीं. " ( नामदार न्यूटन हायकोर्ट जज्ज्य यांस पत्र )

## डॉ. भाऊंचें स्मारक.

पूर्वींच्या वहिवाटीप्रमाणें स्मारकें ज्यांचीं तोच करीत असे. परंतु आतांच्या नवीन युगान्तरांत एकाद्या महात्म्यानें आपला काय, आपलें कांचन व आपला काल हे तीन ककार जनतेच्या कल्याणार्थ खर्च केले म्हणजे त्याचें स्मारक जनताच करूं लागली आहे. त्याप्रमाणें रावसाहेबांनीं भाऊ दाजी यांचें स्मारक करविण्याच्या कामांत फार मेहेनत घेतली. रावसाहेबांनीं प्रथम आपली मित्रमंडळी एका ठिकाणीं स्मारकासंबंधें विचार करण्यास जमविली. त्यांत काशिनाथपंत तेलंग होते. नामदार गिब्स्, डा. विल्सन्, हायकोर्टांतील जज्ज, सर जमशेटजी जीजीभाई, सर मंगळदास नथूभाई यां सारख्या थोर

हिंदू व इंग्रज गृहस्थांची सहानुभूति होती. शहरवासीयांची सभा भरवावी किंवा भरवूं नये व ती शेरीफच्या मार्फत भरवावी किंवा कसें याविषयीं वाद चालला असतां रावसाहेबांनीं स्मारकाची चळवळ आपल्या स्नेह्यांमार्फत दूरवर पोंचविली. माधवराव बर्वे ( कोल्हापूर ); विनायकराव वासुदेव; केरूनाना ( पुणें ); कृष्णाजी पंत नूलकर व कर्नल अन्डर्सन ( काठेवाड ); काजी शहाबुद्दीन; दादाभाई नवरोजी ( बडोदें ); बाळकृष्णशास्त्री बापट ( वऱ्हाड ) इ. लोकांकडून पत्रोपत्रीं रावसाहेबांनीं वर्गणी जमविली. खुद्द गव्हर्नर साहेबांबरोबर रावसाहेबांनीं चर्चा केली होती. ' मुंबईकरांत सर्वांत तेजस्वी ' असे भाऊं बद्दल बाबू ख्रिस्तोदास पॉल यांनीं मागें पेट्रिअट पत्रांत उद्गार काढले होते त्याची आठवण देऊन त्यांस भाऊ दाजींच्या स्मारकमंडळींत राजा रामनाथ टागोर, राजा हरेन्द्र कृष्ण बहादूर, बाबू राजेन्द्रलाल मित्र व स्वत: पॉल यांचीं नांवें घालविण्याची खटपट रावसाहेबांनीं केली होती.

ज. जेकब यांनीं विलायतेहून आपल्या वांट्याची रक्कम पाठविली तेव्हां त्यांनीं पत्र लिहिलें कीं भाऊंनीं बहुत कार्यांचा आरंभ एकदम करून त्यांचें उत्कृष्ट फळ मिळविण्याचा प्रयत्न केला. १४।२।७३ चें पत्र.

पारसी मित्रांची सहानुभूति होती " पुणें ग्यालरींत भाऊंची तसबीर ठेवण्यास द्रव्य पाहिजे असेल तर मी पन्नास रुपये देतों " ( मि. चिजगर याचें पत्र. )

स्मारकाच्या यादींत पुढील मोठालीं नांवें आढळतात:—नेक नामदार गव्हरनर जनरल, मुंबईचे गव्हरनर, सर सालरजंग, सर रेडीमनी, सर्व त्या वेळचे हायकोर्टांतील न्यायाधीश, रोगे, टाटा, लखमीदास खिमजी, जुनागड, लिमडी व राजकोट हीं संस्थानें.

या सर्वांच्या साहाय्यानें स्मारक तडीस गेलें व रावसाहेब मित्रकार्यांतून मोकळे झाले. यांत रावसाहेबांनीं श्रम केले, जी कळकळ दाखविली त्यांवरून रावसाहेब व भाऊ दाजी यांचें प्रेम केवढें होतें ते कळून येईल.

## डॉ. नारायण दाजी.

### जन्म १८२८.

हे डॉ. भाऊ यांचे सख्खे बंधू. हेही रावसाहेबांचे परम स्नेही होते. हेही आपल्या धंद्यांत प्रवीण होते. एल्फिन्स्टनविद्यालयांत अभ्यास करून पुढें ग्रँट मेडिकल कालेजमध्यें डाक्टरीविद्या शिकले. यांनीं येथें सोन्याचीं पदकें मिळविलीं. १८५२ मध्यें परीक्षा पास झाले. फोटोग्राफीचा यांस नाद असे. यामुळें जुन्या देवळांचे फोटो घेण्यास बन्धूंना मदत झाली. मेडिकल कॉलेजांत हे शिक्षक व प्रोफेसर होते.

यांना वनस्पतींसंबधें कांहीं शोध लावण्याचा नाद असे. " डा. नारायण दाजी हे महाबळेश्वरास आल्यापासून येथें सांपडलेल्या बहुत वनस्पतींचे अर्क काढीत आहेत. त्यांचा हेतु कांहीं शोध लावावयाचा आहे. या नादीं पडणारे हे पहिलेच हिंदीगृहस्थ दिसतात. ( गणेश जयराम वैद्य यांचें १४ एप्रिल १८७१ चें पत्र ). नानासाहेब मंडलिकांकडून गुणानें तेजस्वी अशा घंटसुरीच्या मुळ्या आणवून कांहीं प्रयोग करून पहात.

यांची प्राप्तिही मोठी होती. द्रव्यसंग्रह चांगला केला होता. डा. भाऊंची पैशाची स्थिति सुधारण्यास यानीं पुष्कळ प्रयत्न केले. नारायण दाजींचा अन्त १६-७-७५ रोजीं झाला. बन्धूंच्या स्मारकाचा व त्यांच्या ( भाऊंच्या ) विधवा सुनेचा त्यांस विसर पडला नव्हता. यांच्यामागें कौटुम्बिक आपत्ती होत्या.

" डा. नारायण दाजी यांचा दुसरा मुलगा अकरा वाजतां निवर्तला. काय छानदार मुलगा होता ! चेहरा किति प्रफुल्लित असे ! डाक्तर भाऊंना भेटलों त्यांस तर याच्या योगानें मोठा धक्का बसला आहे असें दिसलें. नारायण तर फारच शोकाकुल झाला होता व हें अगदीं स्वाभाविक आहे. नेहमींच्या शिष्टसांप्रदायाप्रमाणें ह्यांस भेटून आतांच दुःख देणें मला बरें वाटलें नाहीं. ३।६।६२ रो.

हे विपत्प्रसंगीं धैर्य बाळगणाऱ्यांपैकीं होते.नारायणदाजी यांचें कुटुंब

ता. १८।२।६४ रोजीं निवर्तलें. रावसाहेब भेटावयास गेले. डाक्टर नारायण "हा मनाचा मोठा खंबीर आहे. एवढ्या हानीबद्दल झालेलें आपलें मोठें दुःख आवरून दिवंगत स्त्रीच्या स्मारकार्थ स्त्रीशिक्षणासंबंधें कांहीं तजवीज करावयाची आहे. असें म्हणाले. मी त्यांस चार आठ दिवसांत एक योजना आणून देतों म्हणून सांगितलें." १९।२।६४ रो.

रावसाहेबांच्यावर याचा पूर्ण विश्वास होता. नारायण दाजींनीं आपल्या मागें आपल्या इष्टेटीची व्यवस्था करून ठेवली होती. त्या कामीं रावसाहेबांना त्यांनीं ट्रस्टी नेमिलें होतें. बरोबर दुसरे ट्रस्टी शामराव विठ्ठल वकील हे होते.

## दादाभाई नवरोजी.

दादाभाई, रावसाहेबांप्रमाणें एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटचेंच उत्कृष्ट फळ होते. विद्यार्थीदशेंत गणित, पदार्थविज्ञान व रसायन इत्यादि शास्त्रविषयांत त्यांची प्रख्याति झाली. तेव्हां त्यांस त्याच संस्थेंत प्रोफेसरची जागा मिळाली.

लोककल्याणाचीं कामें जीं जीं निघत त्यांत रावसाहेबांप्रमाणें हेही पडत असत. स्टूडन्ट्स लिटररि व सायन्टिफिक सोसायटी, गुजराथी ज्ञानप्रसारक सभा, नेटिव्ह जनरल लायब्ररी, फ्रामजी कावसजी इन्स्टिट्यूट, पारसी गर्लस् स्कूल मंडळ, मुंबई असोसिएशन इत्यादि संस्था उदयास आणण्यास दादाभाईनीं पुष्कळ श्रम केले.

त्यावेळच्या उत्तम विद्वान व बुद्धिमान लोकांना संस्थानांत मागणी असे. त्याप्रमाणें दादाभाईची नेमणूक बडोद्यास झाली होती. तेथें संस्थानची सुधारणा करण्याची त्यांची प्रबळ इच्छा चांगली निदर्शनास आली. ती पुरी करण्याचा रावसाहेबांचा हेतु होता. तें वृत्त प्रकरण ४६ वें वाचलें म्हणजे समजेल. त्यांच्या बुद्धीला तेथें वाव पुरेसा मिळेना म्हणून त्यांनीं बडोदें सोडून इंग्लंदला प्रयाण केलें. एकंदर देशाचें नव्हे तर इंग्लंद व हिंदुस्थानच्या दोन्हीं देशांचें हित साधण्याकरतां ईस्ट इण्डिया असोशिएशनची स्थापना त्यांनीं केली. व तिची शाखा मुंबई येथें काढली. त्या कामांत रावसाहेबांनीं

पुष्कळ श्रम घेतले तें वृत्त प्रकरण २४ वें वाचलें म्हणजे कळेल. मुंबई म्युनिसिपॅलिटींत सुद्धां यांनीं चांगलें काम केलें. इंग्लंडमध्यें यांनीं एक व्यापारी पेढी स्थापिली होती. यशस्वी झाली नाहीं. तिचे कांहीं भाग रावसाहेबांनीं घेतले होते.

यांचें आचरण इतकें चांगलें असे कीं पावित्र्य, इभ्रत, हृदयाचें औदार्य इ. गुणांशीं तें समानार्थच झालें होतें.

## केरो लक्ष्मण छत्रे.

केरोपंत एल्फिन्स्टन् इन्स्टिटयूटमध्यें असतानांच ज्ञानप्रसारक सभेच्या मासिकांत शास्त्रीय विषयांवर सतत निबंध लिहीत. एल्फिन्स्टन् इन्स्टिटयूटमधून सुटतांच अहमदनगरला इंग्रजी शाळेवर हेडमास्तर झाले. यांस तेव्हां पगार १५० रु. होता. रावसाहेबांनीं त्यांच्या अंगचे गूण ओळखिले होते ह्मणून ते काय उद्योग करीत आहेत त्याची चवकशी नीटपणें करीत व केरोपंतही त्यांचा उपदेश घेत. “ मी कबूल करतों कीं मी जरासा चुकारचट्टु आहें. माझें कर्तव्य व उद्योग यांस सोडून केंसभरही मला बाजूला न सरूं देणें हें तुमचें काम आहे. कोणत्या विषयांवर निबंध लिहावयास व पुस्तकें रचावयास घेतलीं असतां माझी लेखणी उत्तम चालेल तें मला सांगा, कारण माझ्या गुणांची उत्तम परीक्षा करण्यास माझ्या मतें तुह्मींच समर्थ आहांत ( २८–९–६० चें रावसाहेबांस पत्र. )

येथें असतांच त्यांनीं आपलें अंकगणित लिहिलें. पण आणखीं दोन वर्षे या कुग्रामांत काढून अगदीं कंटाळून गेले.

“ माझा अवतार संपला असें मला वाटतें. बाहेर अडाणी लोकांशीं प्रसंग, घरीं आल्यावर रुग्णावस्थेंत असलेल्या स्त्रीचा सहवास, शिवाय पांच मुलांची काळजी घेण्याचा त्रास व नवीन कडक नियमांप्रमाणें शाळेचें अवघड काम ! इतक्यांतून जर मी एक दोन वर्षे निभावलों तर या जीवसृष्टींत मी आपणास सर्वांत सुखी समजेन. शरीरप्रकृति चांगली ठेवन अद्यापि माझे मनाला सर्वशक्ति परमेश्वरानें विकृति होऊं दिली नाहीं म्हणून मी त्याचा आभारी आहें.

आमच्या देशाचें पाऊल दिवसानुदिवस पुढें पडत आहे. त्याबरोबर पुढें जाण्यांत माझा निभाव लागणार नाहीं अशी मला भीति वाटत आहे. हिंदुस्थान देशाला अधिकाधिक महत्व प्राप्त होत आहे. तरुण जनांस शिक्षणाचा लाभ होत आहे. धाडसी पुरुषास भाग्योदयाचे निरनिराळे मार्ग उघडे होत आहेत. परंतु बिचाऱ्या केरोपंताचें पाऊल मागें मागेंच पडत आहे ! त्याची शक्ति दिवसानुदिवस क्षीण्ण होत चालली आहे.

कुटुंबाची चिंता वाढत जात असून अधिकारी वग त्याच्या जवळून आहाराबाहेर काम घेऊं पहातात, कदाचित एक दोन वर्षांनीं माझा पेन्शनीचा अर्ज तुमच्या नजरेस पडला कीं सर्वच बाजार आटोपेल.

मि. कोक यांच्या सांगण्यावरून आम्हीं लोकांकरतां येथें आमच्या शाळेंत विविध विषयांवर पाक्षिक व्याख्यानमाला चालू केली आहे. आमचें ज्ञान अल्प आहे. तथापि गांवढ्या गावांत गाढवीसुवासिनी या म्हणीप्रमाणें आम्हीं फार शहाणे ठरून आमचें तेज पडणारच. " ( रावसाहेबांस पत्र. )

केरोपंतांनीं पुढें मराठींत पदार्थ विज्ञान शास्त्र लिहिलें.

प्रोफेसर साहेब कोणाला वेदाभ्यासजड वाटतील पण त तसे नव्हते. त्यांस पियानो वाजवितां येत होता. " केरोपंताबरोबर हिंदी पद्य कांहीं भाग पियानोवर वाजविण्यास शिकलों. " ( १९।११।१८६४ चा. रो. उ.)

यांचे बंधु गोवर्धनपंत यांनीं गीतलिपी नांवाचा संगितावर एक लहानसा ग्रंथ लिहिला होता. तो रावसाहेबांनीं नारायण शास्त्री पुराणिक यांच्या मदतीनें पुरा केल्यावर स्टूडन्टस् लिटररी सोसायटीच्या शाळांकरतां प्रस्तावना लिहून छापविला.

केरोपंतांचें प्रेम रावसाहेबांवर किति होतें तें मागील पत्रांवरून दिसून येत आहे. रावसाहेबांचें मत प्रो. केरोपंतांविषयीं किति चांगलें होतें तें पुढील पत्र सांगेल.

" मी आतांच एडिम्बरो येथील ब्रिटिश असोसिएशनच्या सभेच्या

कामाचा वृत्तांत वाचला. हिंदी ज्योतिष व गणित या दोन विषयांच्या शोधा-संबंधें तेथें आमचे प्रतिनिधि म्हणून तुम्हीं हजर असावयास पाहिजे होतेत. आपण आपल्या विषयांसंबंधानें परिश्रम करून नेमानें कां लिहीत नाहीं? एकाद्या शास्त्रीय विषयासंबंधें त्या सभेंत बोलावयास एकही हिंदी पंडित नसावा ही खेदाची गोष्ट नव्हे काय? कलकत्त्यास एक वैद्यविद्याविशारद डाक्तर या प्रकारचें शास्त्रीय मंडळ स्थापन करावयास पहात आहे. नाच तमाशांवर हजारों रुपयांचा नाश होत असूनही त्या मंडळास आश्रय इतक्या दिवसांनींही मिळत नाही!! शक्य तर एडिंबरो येथील सभेकरतां आपण हिंदुस्थानांतील शास्त्रीय प्रगतीचा संक्षिप्त इतिहास म्हणून एक लेख लिहाल काय?"

१०।१०।१८७१.

## भास्कर दामोदर पाळंदे.

यांच्या बद्दल डा. हार्कनेस यांचें मत चांगलें होतें. त्यांनीं एकदां वर्गांत असें बोलून दाखविलें कीं, हल्लीं हल्लीं जे विद्यार्थी एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट मधून तयार होऊन बाहेर पडले त्यांत भास्कर हा पहिल्या प्रतीचा होय.

रावसाहेबांचेप्रमाणें हे ज्ञानप्रसारक सभेंत निबंध वाचीत असत.

रावसाहेब जेव्हां ठाण्यास व्हिजिटर होते तेव्हां हे अहमदनगर जि-ल्ह्यांत व्हिजिटर होते. पुष्कळ शाळा काढण्यापेक्षां लोकांमध्यें ज्ञानलालसा-उत्पन्न करण्याकडे हे विशेष लक्ष देत असत. रावसाहेबांचें काम कसें चाललें आहे व त्यांचा काय अनुभव आहे हें ते विचारीत असत व आपला अनुभव कळवीत असत.

यांचें अक्षर मोठें वळणदार होतें. एकदां पत्र उभें धरून आडव्या ओळींनीं भरल्यावर तें आडवें धरून पुन्हां मजकूर लिहीत. तोही सुवाच्य असे. थोडासा विनोदही लिहिण्यांत करीत. वार्षिक रिपोर्टांत शाळेंतील मुलांच्या हजेरीची सरासरी अपूर्णांकांत देणें ( उदाहरणार्थ शेंकडा ५९$\frac{३}{५}$ मुलें हजर होतीं असें नमूद करणें ) हा प्रकार लोकांना हसूं आणण्याचा चांगला उपाय आहे असें त्यांस वाटे. ते म्हणत मुलें म्हणजे रुपये आणे पै नव्हत.

त्यांची नेमणूक ठाणें जिल्ह्यांत २४० रुपयांवर होती. पूना कालेज मध्यें यांची नेमणूक प्रोफेसरच्या जागीं होऊन पुढें मुंबईस क्युरेटरच्या जागीं नेमणूक झाली होती. तेथून ते एलिनिएशन खात्यांत कायमचे गेले. त्यावेळेस हे व कॅप्टन कौपर असे दोघे मिळून इनाम कमीशनच्या कायकारी मंडळीनें व त्यांच्या हस्तकांनीं कसें काम केलें त्याची तपासणी बारीक नजरेनें करीत होते.

पुढें मुंबई स्मालकाज कोर्टांत जज्ज होते. हे अभंग व पदें चांगलीं रचीत.

### रावबहादुर कृष्णाजीपंत नूलकर.

हे मूळचे सावंतवाडीचे. रावसाहेबांच्या जुन्या मित्रांपैकीं होते. अनंत-ऋषीच्या वाडींत रहात असतां या वाडींत राहणाऱ्या मित्रांच्या यादींत ह्यांचें नांव सांपडतें. कराची येथील आपल्या रिकाम्या झालेल्या जागेवर यांची नेमणूक रावसाहेबांनीं करून घेतली होती. तेथें सर बार्टल फ्रियर हे कमीशनर होते. त्यांची व कृष्णाजीपंत यांची गट्टी जमली होती. "फ्रियर साहेबांची करावी तेवढी स्तुति थोडीच आहे त्यांच्या हाताखालीं काम करतांना श्रम न वाटतां सुखच वाटतें." असें त्यांनीं २५-११-५७ च्या पत्रांत कळविलें होतें. नियमानें पत्रव्यवहार ठेवणाऱ्या स्नेह्यांपैकीं हे एक होते. *

यांच्या कचेरींत एक नागजी नांवाचे गृहस्थ होते. रावसाहेबांचे मित्र कृष्णाजीपंत हे इंग्रजींत पत्र रावसाहेबांस लिहीत व नागजी दोन ओळींच्या मध्यें राहिलेल्या जागेंत गुजराथींत लिहीत. पत्रव्यवहारांत नूलकरांच्या नांवाचा उल्लेख रावसाहेब पंत या नांवानें करीत.

यावेळीं कराचीस स्वस्ताई होती. पण पंतांना मात्र तशी वाटली नाहीं. " मी कहानदास यांच्या घरांत राहतों. घर चांगलें सोयीचें आहे. परंतु दरमहा आठ रुपये भाडें मात्र प्रमाणातीत आहे. " १२।८।५९ चें पत्र.

---

* रावसाहेबांवर यांचें प्रेम विशेष असे. कधीं मित्राच्या भेटीकारितां त्यांस उत्कट भरतें येई. " आमचे दिवस चांगले आले का ? परस्परांच्या सहवासाचें सौख्य आह्मांस केव्हां मिळेल ? भेटून फार दिवस होऊन गेले ! या लाभाकरतां मी कोणत्या वस्तूचा त्याग करीन याची तुह्मांस कल्पना नाहीं. "

यांची स्त्री यावेळीं लहान असल्यामुळें बरेंच दिवस यांनीं बिऱ्हाड केलें नव्हतें म्हणून भोजनाकरतां बल्लवांची आराधना यांस करावी लागे. बल्लव यावेळीं पगार ४।५ रुपये मागत. बल्लवांकरितां हे रावसाहेबांकडे मुंबईस मागणी करीत. संसारासंबंधें यांचें वर्तन टापटीपीचें व हिशेबी असे.

यांचें कुटुंब कराचीस प्रथम आलें तेव्हां मुंबईहून कराचीस जाण्यास ११४ तास लागले. यांचें कुटुंब आजारी पडलें. परंतु यांची वृद्ध जुन्या चालीची विधवा बहीण बरोबर होती तीस कांहीं झालें नाहीं. तें पाहून नूलकर ह्मणाले "अरे या वृद्ध बाया बापड्या पहा! लागोपाठ कांहीं दिवस उपोषणें करून त्यांना त्याची कांहींच दिक्कत वाटत नाहीं !"

शक्य तर संधी सांपडतांच यांचा विचार मुन्सफीची परीक्षा देण्याचा होता. "दिवाणी रेग्युलेशनांचें परीक्षे पुरतें अभ्यासानें ज्ञान प्राप्त करून घेईन. निवडक खटल्यांचें पुस्तक वाचल्यावर काम करतांना कायद्याचें व्यवहार्य स्वरूप समजेल. परंतु मला रेग्युलेशनांची व त्यांतील अंतर्भागांची अनुक्रम-संख्या मुळींच पाठ करतां यावयाची नाहीं व त्यांची आवश्यकता नाहीं असें सांगतात." ( २८-७ ५६ चें पत्र ).

यांची नोकरी फिरतीची होती ह्मणून त्यांस ती त्रासदायक वाटत असे. ते ह्मणत आपलीं माणसें व गर्चीस मुक्कामावर बारामहिन्यांतून जवळ जवळ सहा महिने ठेवावयाचीं हा प्रसंग मला अवघड जातो. असें मी ह्मणतों ह्मणून मला प्रवासच आवडत नाहीं असें मेहेरबानी करून समजूं नका. प्रवासाचें जें परतंत्र स्वरूप आहे तें मला रुचत नाहीं. दुसऱ्यानें येऊन म्हणावें "मार्च" कीं आम्हीं लागलेंच निघालें पाहिजे! "हॉल्ट" म्हणतांच थांबलें पाहिजे! व तें कोठें तरी अगदीं गैरसोयीचे जागेंत! हे सर्व प्रकार टाळून जर घरांतल्या सर्व सोयी मला प्रवासांत करून घेतां येतील व स्वातंत्र्य राहील तर मी एक-सारखाच प्रवास करावयाला खुषी आहें." २५-१०-५७ चें रावसाहेबांस पत्र.

हे सदैव नोकरीमध्यें गढलेले असत. योग्यतेप्रमाणें यांची बढती होत गेली तरी कित्येक वेळां सापमान निराशा होण्याचे प्रसंग येत

असे. तेव्हां झालेली मनांतच ठेवण्या जोगी मनाची अवस्था ते रावसाहेबांपासून चोरून ठेवीत नसत. यावरून त्यांचा व रावसाहेबांचा स्नेह किति होता तें कळतें. नोकरी व संसार संभाळीत असतां जग कुठें आहे याची चौकशी करीत असत. ती विशेषतः सहाध्यायी मंडळींची जीवनयात्रा कशी चालली या संबंधें असे. नारायणभाई यांस पगारांत वृद्धि किति झाली व संतति किति झाली याची माहिती बरोबर लिहीत. इतर चळवळ काय चालली आहे तिकडे यांचें लक्ष जसे असें नाहीं. मधून मधून पुढारी लोकांच्या कृत्यावर मत देतांना समर्पक टीका सहानुभावात्मक करीत. मुंबईकर मंडळी संस्थानिकांच्या नादीं लागलेली पाहून त्यांस तिची कींव येई. "अशा लोकांपुढें दादाभाईंची व्याख्यानें सुरू झालेलीं पाहून पोटा साठीं वेदान्त विषयाची चर्चा करणाऱ्या हरिदासांची आठवण येते. तुम्हीं मुंबईकर फारच त्वरेनें पुढें जाऊं लागलांत अथवा या तमोमय कोपऱ्यांत उजेड पाडून फाजील सुधारणा करण्याच्या प्रयत्नांत आहांत." २९–६–६९ रावसाहेबांस पत्र.

काठेवाडांत हे नेटिव्ह एजन्सींत मोठ्या पदावर चढले होते. यांचें वर्तन कडक असे. एक इंग्रज पाद्री व त्याचा आदों हिंदु व पश्चात् ख्रिस्ती झालेला साथिदार यांवर फौजदारी किरकोळ काम होतें. त्यांत कोर्टाच्या बेअदबीबद्दल त्यांनीं त्या पाद्र्यास शिक्षा करावयास मागें पाहिलें नाहीं. येथें एवढें पाद्री साहेबांच्या तर्फे नमूद केलें पाहिजे कीं त्यांनीं सरकारांत अपील केल्यावर ते दोषमुक्त ठरले.

रावसाहेबांचें मत यांच्याविषयीं चांगलें होतें. टाईम्सला यांच्याविरुद्ध आडून एकानें पत्र लिहिलें होतें. तें वाचून मि. वुड यांस रावसाहेबांनीं असें पत्र लिहिलें. "आपल्या पत्रव्यवहाराच्या सदरांत आडलपून एका काठेवाडियानें मि. कृष्णाजीवर केलेला मारा पाहून मला फार वाइट वाटलें. सरकारच्या हिंदी व युरोपियन बड्या अधिकाऱ्यांत इतके प्रामाणिक व स्वतंत्रबाण्याचे मनुष्य कृष्णाजी लक्ष्मणा शिवाय दुसरे थोडेच मला माहीत आहेत. वीस वर्षांच्या अनुभवानें दिलेली हमी जर पुरेशी असेल तर या गोष्टीवर मत

देण्यास मला अधिकार पोंचतो. तिकडे कांहीं पक्षाभिमानी लोक आहेत. त्यांना हे आवडत नाहीं. पण तेवढ्यावरून हे टाईम्स आफ् इन्डियाला आवडूं नयेत असें नाहीं. "पेनशनीचा पुष्कळ उपभोग घेऊन या रावसाहेबांच्या मित्रानें रावसाहेबांच्या बंगल्यांत महाबळेश्वर मुक्कामीं आपला देह १८९३ सालीं ठेविला तें मित्रत्वास उचितच होतें !

## डॉ. अनंत चंद्रोबा.

हे रावसाहेबांच्या फार प्रेमळ मित्रांपैकीं एक होते. कराचीस म्युनिसिपालिटींत नोकरी धरून होते.

रावसाहेब तेथें असतां हे रावसाहेबांचे कुटुंबवैद्य होते. रावसाहेबांच्या मातोश्रींची दंतपीडा यांनीं एक्या चांगल्या दांतवणाची योजना करून बरी केली होती. नंतर कराचीहून मुंबईस आल्यावर यांचा पत्रव्यवहार नेहमीं चालू असे. यांनीं एका पत्रांत ( १५।६।५९ ) लिहिलें आहे:— "विश्वनाथजी तुमच्या हातच्या दोन ओळीच्या मजकुरापासून जेवढें सुख मला होतें तेवढें दुसरें कशानें होत नाहीं. म्हणून बनेल तेव्हां आठवण ठेवून मुद्दाम चार शब्द लिहिण्याचें करीत जा." रावसाहेबांच्या सांगण्यावरून यांनीं संस्कृत भाषेचा अभ्यास नोकरी करीत असतां सुरू केला होता. त्यांत किति प्रगति झाली आहे हें दाखविण्याकरतां पहिल्या प्रथम कुटुंबांतील कांहीं प्रासंगिक अडचणीमुळें जेवणाखाणाचे हाल पराधीनता प्राप्त झाल्यानें कसे होतात हें वर्णन करून स्वहस्तानें जें कार्य होतें त्याच्या $\frac{1}{4}$ अंश दुसऱ्याचे हातून होत नाहीं या अर्थाचें संस्कृत वाक्य एका पत्रांत यांनीं लिहिलें तें, ' स्वस्य कार्यं यत्स्वेन कृतं तस्य चतुर्थांशोऽपि परहस्तात् न भवति. '

संस्कृत विद्येशिवाय यांना इच्छाशक्तीचे प्रयोग करण्याचा नाद होता.

सिंधी व्याकरण यांनीं रावसाहेबांस शिकविलें. व रावसाहेबांनीं यांस बीजगणित शिकविलें. व दोघेजण मिळून शेक्स्पीयरचीं नाटकें वाचीत असत. याशिवाय यांना मस्तिष्क विद्या ( ह्मणजे मस्तकावरच्या टेंगळांवरून स्वभावपरीक्षा व दैवपरीक्षा करण्याची विद्या ) अवगत होती.

१८७२ सालीं रावसाहेबांच्या सांगण्यावरून यांनीं कांहीं गोस्तन देवी चांगल्या कीं मनुष्याच्या देवींतून लस घेऊन टोंचलेल्या चांगल्या या विषयीं प्रयोग करून पाहिले होते. हे रावसाहेबांच्या प्रकृतीविषियीं फार काळजी वहात. प्रकृतीकरतां रावसाहेबांस वारंवार हवा पालटण्यास सांगत. यांची मैत्री आमरणांत होती.

## हरिपंत ऊर्फ तात्यासाहेब लिमये.

रावसाहेब व हरिपंत लिमये यांची ओळख १८४९ सालीं झालीं व ती शेवटपर्यंत कायम होती. भुलेश्वराजवळ ख्रिस्ती देऊळ आहे. त्यानजिक सुंदर निळाजी यांच्या वाडींत लिमये तळमजल्यावर रहात व रावसाहेब सहकुटुंब वरच्या मजल्यावर रहात. अन्यत्र गेल्यावर भेटी होत असत. हे एक वेळ १८६१ सालीं आजारी पडले. तेव्हां त्यांस लवकर आराम पडावा म्हणून आपण रहात होते तेथें वाळकेश्वराच्या बंगल्यांत रावसाहेब त्यांस घेऊन आले. घरांतील बल्लवाचार्य बाळा पांवसकर यास तें आवडलें नाहीं. त्यामुळें त्यांची सुश्रूषा रावसाहेबांनी स्वत: केली. ' बाळा रुसलेला दिसला. म्हणून हरिपंताचे सामानाची घोडेवाल्याकडून बांधाबांध करून घेतली ' ९।१।६१ ( रो. ). हरिपंताचे डोक्यास सुंठ लाविली व १२ वाजतां निजलों ( ११-१-६१ ची रो. उ. )

## नानासाहेब लिमये.

हे हरिपंतांचे पुतण्ये एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटचे विद्यार्थी होते. १८५३ सालीं यांची नेमणूक धुळें येथें इंग्रजी शिक्षक म्हणून १०० रुपयांवर झाली. तेव्हां तेथें नव्या सरकारी शाळा काढण्याचें काम जोरानें सुरू होतें. "लोकांनीं पैसा गोळा करून बोर्ड आफ् एज्युकेशनच्या स्वाधीन केला आहे. " ( १८।९।१८५३ चें नानासाहेब लिमये यांचें पत्र. ) हे गृहस्थ फार प्रामाणिक आहेत अशी यांची शिफारस दादाभाई नवरोजी बडोद्यांस असतां त्यांकडे रावसाहेबांनीं केली होती. पुढें हे शाळाखात्यांत वाढतां वाढतां

पुणें ट्रेनिंग कालेजांत मुख्याध्यापक होऊन पेनशनींत गेले. गृहस्थ फार सात्विक होते.

## करसनदास मूळजी.

हे रावसाहेबांचे समवयस्क स्नेही होते. यांचे शिक्षण कांहीं एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट मध्यें व कांहीं कॉलेज मध्यें झालें होतें. छोटेखानी निबंधवजा पुस्तकें लिहिण्याची यांना आवड असे. गोकुळदास तेजपाळ यांच्या शाळेंत हे मुख्य शिक्षकाच्या कामावर होते. गुजराथी भाषा जाणणाऱ्या लोकांकरतां यांनीं बुद्धिवर्धक सभा स्थापिली होती, तेव्हां तेथें यांच्या आवडत्या विषयावर म्हणजे परदेशगमनावर प्रथम निबंध वाचला.

१८५५ मध्यें यांनीं सत्यप्रकाश नांवाचें गुजराथींत वर्तमानपत्र सुरू केलें. त्यांतील एका लेखावरूनच महाराजांच्या प्रसिद्ध खटल्यास आरंभ झाला. त्यांच्यातर्फे रावसाहेब साक्षिदार होते. ५ वर्षे हें पत्र चालविल्यावर ते रास्त गोफ्तार पत्रांत सामील करण्यांत आलें. पुढें १८५६ मध्यें यांस डीसा इंग्रजी शाळेचे शिक्षक नेमलें तेव्हां तेथें त्यांनीं नीतिबोधक नामें एक गुजराथी मासिक सुरू केलें.

महाराजांचे कज्जांत जसे हे प्रसिद्धीस आले, तसेच पुढें परदेशगमनामुळेंही अधिकच आले. कारण त्यांनीं ज्ञातीकडून झालेला छळ धैर्यानें सोसला. यांस पंक्तिपावन करून घेण्याकरतां रावसाहेब व भाऊ दाजी यांनीं पुष्कळ खटपट केली परंतु यश आलें नाहीं. कारण महाराजांच्या खटल्यांत हे होते. यांनीं १८७१ सालीं लवकरच इहयात्रा संपवली.

## शामराव विठ्ठल.

हे प्रसिद्ध न्यायमूर्ति चंदावरकर यांचे मातुल होत. यांनीं वकिली करण्याला प्रारंभ करण्यापूर्वी रावसाहेबांची भेट घेतली. त्यावेळेसच यांच्या विषयीं रावसाहेबांच्या मनावर चांगला परिणाम झाला. "तुम्हांला पुढें आणतां येईल तर मला त्याचा अभिमान वाटेल" असें त्यांस रावसाहेबांनीं मागून कळविलें.

"तुमच्या आंगच्या गुणांनीं तुम्हांला वकिलींत यश येईल म्हणून आपली जागा तुम्हीं खुशाल सोडा " असा उपदेश रावसाहेबांनीं त्यांस केला.

१८७३ सालीं एका महत्त्वाच्या कज्जांत त्यांस रावसाहेबांनीं रत्नागिरीस पाठविलें होतें. " जर मी आलों असतों तर जी मदत आपलेकडून झाली असती ती सर्वप्रकारें यांस अडचण न पडेल, अशी मदत करावी." असें पत्र वासुकाका आठल्ये वकील यांस रावसाहेबांनीं लिहिलें होतें. याप्रमाणें यांची इतरत्र पाठविण्याची योजना रावसाहेब करीत. राजकीय चळवळींत हे राव-साहेबांचे साथिदार असत. डा. नारायण दाजींच्या इस्टेटीचे हे रावसाहेबांचे जोडीदार ट्रस्टी होते.

## जनार्दन पांडुरंग बागूल

हे रावसाहेबांचे मुरूडचे बाळमित्र होते. रावसाहेब मुरूड सोडून मुंबईस आले किंवा रोजगारावर लांब गेले तरी यांचा त्यांस विसर पडला नाहीं. दोघांचा पत्रव्यवहार साधारणत: प्रापंचिक विषयांसंबंधें असल्यामुळें त्यांत छापण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. रावसाहेब विद्वान झाले तरी एकमेकांचीं पत्रें मित्राच्या नात्यानें मोकळे मनानेंच लिहिलेलीं असत.

" आपलें पत्र संक्षिप्त असल्यामुळें आमचे समजुतींत लवकर येत नाहीं. तर आह्मांस समजेल असें लिहिण्यांत यावें. आमचें पत्र जरी आपलेकडे गेलें नाहीं तरी आपणाकडून नेहमीं येत असावें. ( ८।६।१८५७ चें बागूल यांचें पत्र. )

बागूल निवर्तल्यावर रावसाहेबांनीं गणेशपंत जोशी यांस पुढील पत्र लिहिल त्यावरून रावसाहेबांचें जनार्दनपंत बागूल यांवर किति प्रेम होतें तें दिसून येईल.

" आमच्या घराचा एक मोठा खांब गेला. कै. मित्रास लिहिलें होतें कीं देवाच्या शेताच्या तंट्यांत मेहनत तुह्मीं करा. पैशाची हमी मी घेतों. हेंच सांगतों. बागूल यांच्या वांट्याचे व इतर पैसे कळवा ह्मणजे देतों. मित्रानें

आरंभिलेलें काय मी आरंभिलें असें समजावें. व सिद्धीस देणार देव आहे. पैशाकरतां माघार घेऊं नये. " २९।७।७४.

" जी अडचण येईल ती कळवावी. परमेश्वर सर्वांचा त्राता आहे. लग्नासंबंधीं देण्याघेण्याची तारांबळ असेल तर कळवावी. "

( १४।८।८४ बागुल यांच्या मुलास पत्र. )

## जनार्दन हरि आठल्ये.

हे रावसाहेबांचे लहानपणचे स्नेही होते. यांच्या पत्रांतील मायन्याचा आरंभ "मित्रवर्य शिरोमणि व पुढें कधीं कधीं सकळ गुणाची खाणी किंवा प्रियकर व मनोहर अण्णासाहेब असा शब्दसमुच्चय असे. आंतील मजकुरांत स्नेहाचा कधीं कधीं अतिरेक दिसून येतो. २१–१०–१८५४ च्या पत्रांत ते लिहितातः— " अण्णा ! आपलें नुसतें स्मरण झालें म्हणजेंच आनंद होतो. टपालांतून पत्र येतांच लखोट्यावरील तुमचें अक्षर ओळखलें म्हणजे जो आनंद होतो तो सांगतां पुरवत नाहीं. " १२।९।१८७४ च्या पत्रांत पुढील सुंदर श्लोक करून रावसाहेबांकडे जनुकाकांनीं पाठविला होता.

। *सर्वेषां सुतरूणांच पुष्पादेव फलोद्गमः ।
॥ अस्य प्रेमतरोश्चित्रं पत्रादेव फलोद्गमः ॥ १ ॥

पत्रद्वारें केलेली सूचना रावसाहेब मान्य करणार नाहींत असा संशय आल्यास जनु काका लिहीत " अण्णा ! अण्णा ! अण्णा ! ! मी आपल्या बुद्धीप्रमाणें व विद्येप्रमाणें आपली खात्री करून देतों इ. "

जनुकाका चांगले संस्कृतज्ञ होते व त्यांस शास्त्री ह्मणत. त्यांनीं रत्नागिरीस १८५४ च्या सुमारास जगन्मित्र नांवाचें वर्तमानपत्र शिळाप्रेसवर चालू केलें होतें.

---

*सर्व तरूंना आधीं पत्र ( पान ) मग फूल व मग फल येतें म्हणजे फलोद्गम ( फलाची प्राप्ति ) फुलापासूनच होते. परंतु या ( तुमच्या आमच्या ) प्रेमतरूचा प्रकार कांहीं विलक्षण आहे. पत्रापासून फलप्राप्ति होते. त्याला पुष्पाची म्हणजे दुसऱ्या पायरीची अपेक्षा नाहीं. पत्र शब्दावर लिखित व पर्ण असा श्लेष साधल्यामुळें अर्थास बहारी आली आहे.

त्याची वर्गणी ५ रुपये होती. १७ वर्गणीदार आरंभीं मिळाले. यांतच पुण्यांतील प्रसिद्ध मि. कॅन्डी, कराचीचे मि. फ्रियर ( मागाहून मुंबईचे गव्हरनर ) व मुंबईचे मि. एलिस हे होते. तीन कारकून व चार छापखान्यांतील माणसें मिळून महिना खर्च ७५ रुपये असे. वर्षाअखेर उत्पन्न ७५० व ९०० खर्च होता. तरी हा पत्रापायीं होणारा तोटा जाऊन इतर काम छापावयास मिळाल्यामुळें कांहीं फायदा उरला. त्यामुळें " इळा मोडून खिळा केला तरी तें फायदेशीर झालें. "

कृष्णाजीपंत नूलकर या पत्राचे वर्गणीदार झाले होते. व ते कांहीं सूचना करीत. " रत्नागिरीचें वृत्तपत्र मासल्याकरतां पाठविलें ह्मणून आभारी आहें. तें चालविण्याची बुद्धिमत्ता व हिम्मत चालकाच्या अंगीं चांगलींच दिसून येत आहेत. इंग्रजी वृत्तपत्रांतून विविध विषयांवर चांगले विचार प्रगट होतात त्यांचें मराठींत भाषांतर करून ज्या वाचकांस इंग्रजी येत नाहीं त्यांच्या करतां पत्रांत छापीत जावें. ही सुधारणा मला इष्ट वाटत आहे. १४–१२–१८५४ चें नूलकर यांचें पत्र ). पत्राची भाषा नूलकरांस पसंत असे [ ७–८–१८५७ चें पत्र. ] मनोरंजनाथ या पत्रांत चमत्कारिक स्वप्नें छापलीं जात.

जगन्मित्रास रत्नागिरीचें गॅझेट ह्मणत. पुढें रत्नागिरी जिल्ह्यांत व त्यांतील जे लोक बाहेरगांवीं गेले होते त्यांच्याकडे पत्राचा खप बराच वाढला होता. छापखान्यांत मराठी कायद्याचीं पुस्तकें व धार्मिक पुस्तकें छापण्यांत येत. प्रती ५०० पासून हजारपर्यंत काढण्यांत येत. धूमकेतु व ज्ञानदर्शन हीं पत्रें अन्यत्र याच सुमारास निघालीं होतीं.

जनुकाकांस यंत्रकलेची हौस होती व ते एक स्वयंवह जलयंत्र काढण्याच्या खटपटींत होते.

यांना विद्येची हौस होती व तिचा साधारण प्रसार आपल्या गांवीं व्हावा म्हणून यांनीं एक शाळागृह बांधण्यास वर्गणी जमा केली होती. यांना वाणी वश होती. बडेबडे संस्थानिक व इंग्रजलोक यांच्या ओळखी होत्या. ग्वालेर सरकार, जमखेंडीकर, विंचूरकर वगैरे संस्थानिक व जाहागीरदार, सर

अर्स्किन पेरी, मि. लारेन्स, मि. लाईड, मि. एलिस, मि. स्पूनर व मि. टक्कर इत्यादि जज्ज व कलेक्टर अशा लोकांकडून वर्गणी जमा केली होती. यांचें सर्व आयुष्य वाचनलेखनांत गेलें.

यशवंत वासुदेव ऊर्फ बापूसाहेब आठल्ये हे यांचे पुतण्ये होत.

## यशवंत वासुदेव ऊर्फ बापूसाहेब आठल्ये.

आठल्ये व मंडलिक या दोन घराण्यांचा स्नेह जुनाच होता. रावसाहेब रत्नागिरीस इंग्रजी शिकण्यास आले तेव्हां तो स्नेह दुसऱ्या पिढींत निर्व्यूढ झाला. रावसाहेबांच्या पत्रव्यवहारांत बापूसाहेबांचा १८७५ सालापासून वृत्तांत मिळतो.

हे १८७५ त कोल्हापुरास कोल्हापुरच्या राजसाहेबांस शिक्षक म्हणून होते. त्यांचा कार्यक्रम पुढें दिल्याप्रमाणें असे.

राजे साहेबांबरोबर घोड्यावर बसून फिरावयास जाणें. परत आल्यावर ७ ते ९ महाराजांस शिकवणें. पुढ दोन तास जेवण खाणांत दवडून ११ वाजल्यापासून ३ वाजेपर्यंत राजेसाहेबांस शिकवणें. नंतर राजेसाहेब पिॲनो वाजविण्यास शिकावयास जात किंवा घोड्यावर बसून फिरावयास जात अथवा गाडींत बसून जात अथवा क्रिकेट खेळत; तितके ठिकाणीं त्यांच्या बरोबर जाणें.

नंतर एकदां कचेरींत फिरून आल्यावर जेवणखाण झाल्यावर निजाव-यास राजेसाहेबांच्या बंगल्यांत जावें लागे. यामुळें बापूसाहेबांस कायद्याच्या अभ्यासास वेळ मिळत नसे व बाणाची कादंबरी छापण्याचें काम शाळा-खान्यानें दिलें होतें तेंही सोडून द्यावें लागलें. फक्त पगार कायतो त्यांस तेथें अडकवून ठेवण्यास कारण झाला होता. अभ्यासाकरितां राजेसाहेबांनीं त्यांस चार महिने फुरसद दिली होती. तेथें असतांच त्यांची परीक्षा पास झाली. पुढें बढतीची फार आशा नसल्यामुळें मुनसफ व्हावें कीं मुंबईस येऊन वकीली करावी हा प्रश्न उभा राहिला. वकिली करण्यास मुंबईस आल्यास इतर रीतीनें ज्ञान वाढवितां येतें परंतु वकिली उत्तम चालू होण्यास कांहीं काळ जावा

लागतो. व आपल्या अंगीं उत्तम वकीलीला लागणारे गूण आहेत कीं नाहीं याविषयीं यांच्या मनांत अविश्वास उत्पन्न झाला होता. म्हणून त्यांनीं काय करावें तें रावसाहेबांस विचारलें. प्रपंचाची घरीं वडिलांनीं फार ओढ दाखविली होती. याकरतां त्यांस सद्यःफलद जो मार्ग असेल तो धरावयाचा होता.

( २४।१२।७५ बापूसाहेब आठल्ये यांचें पत्र. )

यंत्राची वाफ अधिक झाली असतां स्फोट होऊं नये म्हणून अधिक झालेली वाफ बाहेर काढून लावून यंत्राला सुरक्षित ठेवण्याचा जो वाफेच्या यंत्रांत पडदा असतो त्याची उपमा रावसाहेबांस बापूसाहेब देत व त्यांस उपदेश विचारीत असत.

प्रकरण ७६ वें पृष्ठ ९७३ येथें छापलेलें बापूसाहेबांस रावसाहेबांनीं लिहिलेलें पत्र वाचण्यासारखें आहे. मुंबईस बापूसाहेब कायद्याची परिक्षा पास होऊन वकिली करूं लागल्यावर रावसाहेबांच्या सर्व चळवळींत ते सहकारी झाले.

त्यांच्याविषयीं रावसाहेबांचा ग्रह फार उत्तम झालेला होता. न्यायमूर्ति मेलविल यांस लिहिलेल्या १।११।८५ च्या एका पत्रांत त्यांनीं म्हटलें आहे. " यशवंत वासुदेव हे माझे सहकारी मित्र आहेत. उत्तम संस्कृतज्ञ आहेत. यांचा जन्म मोठ्या कुळांत झाला आहे. यांचें वर्तन अगदीं निष्कलंक आहे. इ. " याप्रमाणेंच त्यांची तारीफ लार्ड रे यांस लिहिलेल्या एका १६।११।८५ च्या पत्रांत केली आहे.

१८८७ सालीं ते कलकत्त्यास असतां इकडे आठल्ये यांनीं बडोद्यास नोकरी धरण्याचा निश्चय रावसाहेबांस कळविला. सहकारी मित्राचा वियोग होणार म्हणून रावसाहेबांस खेद वाटला. परंतु त्यांच्या निश्चयाच्या आड रावसाहेब आले नाहींत. पण आपला मित्र कोठेंही जावो त्यानें सुखी राहावें याकरतां कोणत्या गोष्टींकडे त्यांनीं मुख्यतः लक्ष दिलें पाहिजे तें २।२।८७ च्या पत्रीं आठल्ये यांस कळविलें.

" मनुष्य एक मनांत आणतो, त्याची वाट ईश्वर दुसरीच लावतो हें खरें; पण मनुष्यानें जें कार्य करण्याचें मनांत योजावें तें भक्कम पायावर

रचलेलें असावें. प्रथमत: शरीरप्रकृतीचें मान ध्यानांत आणा. बडोद्याची तुह्मांस प्रत्यक्ष माहिती आहेच. तें तुमच्या प्रकृतीला मानवेल कीं नाहीं या संबंधें डाक्तर डि. कुना यांचा सल्ला घ्या. त्याप्रमाणेंच डॉ. नानासाहेब देशमुख यांचा विचार घ्या. नंतर तुह्मीं हायकोर्टांतून रजा मागून घ्यावी व अशाप्रसंगीं हायकोर्ट ज्या सवलती इतरांस नेहमीं देतें त्या मिळाव्या म्हणून विनंति करावी. सवलती म्हणजे तुमच्या हातांतील कज्जे आस्ते आस्ते कोर्टापुढ निकालास लावणें. ती व्यवस्था मी मागाहून कशी करावयाची तें कळवीन. तुमच्या करतां मी कामाची व्यवस्था करीन."

" आणखी असें सांगावयाचें आहे, [ व त्याचा तुह्मीं काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. ] तें असें कीं नव्या ठिकाणीं गेल्यावर नुसती जीवयात्रा चालली आहे हें नको. दिवसानुदिवस उत्कर्ष होत आहे असा अनुभव येईतों पायाखालील पूल उडवून टाकूं नका. कामाची बंदी केली आहे ही वार्ता तुमच्या कुळांस कळवूं नका. कामाची व्यवस्था दाजीसाहेब लावतील. मी स्वत: उत्तम दिसेल तें करीन, मी पुष्कळ गोष्टी करण्याची आशा बाळगून होतों, ग्रहांचा नियम निराळा होता."

" तुमचें पहिलें पत्र आलं तेव्हां वाटलें कीं मी तुमच्या कज्ज्यांची व्यवस्था तीन महिन्यापुरतीच लावावयाचा होतों व परत मुंबईस आल्यावर हेंच तुम्हांस सांगणार होतों. ही व्यवस्था केलीत तर मी नको म्हणत नाहीं. व बडोद्यासच तुम्हीं राहिलेत तर आणखी तीन महिने तीच व्यवस्था करतां आली असती व मला ती चालविणें ठीक पडलें असतें. पण तसा आतां योगायोग दिसत नाहीं. न दिसूं द्या ! तुम्हीं जाल तेथें तुमचें कुशल असो ! नमस्कार ! "

पुन्हां दुसऱ्या दिवशीं एक पत्र लिहिलें त्यांत मित्राच्या कर्तव्याची व्याख्या आहे. " नमस्कार ! या ! असें पुन: पुन: म्हणणें ग्राम्य आहे. पण आतां तसें म्हटलें पाहिजे. कालच्या पत्रांत जाण्याच्या विरुद्ध कारणें होतीं तीं बुद्ध्या दिलीं नाहींत व आजही लिहीत नाहींत. माझें मित्राचें कार्य म्हणजे माझ्या

कल्पनेप्रमाणें प्रोत्साहन देण्याचें आहे. असेल त्या स्थितींत धीर देण्याचें आहे. उत्साहभंग करण्याचें नाहीं. " १९।२।१८८७.

रावसाहेबांस आठल्ये यांचे जाण्यानें मुंबईची हानि झाली असें वाटलें. " आठल्यांचें मुंबईहून गमन हा एक दैवाचा आघात आहे तो सहन केला पाहिजे. त्यांचा फायदा होईल कीं नाहीं तें नव्या जागेच्या नित्य व आकस्मिक परिस्थितीवर अवलंबून राहील. " ३–३–१८८७ चें डॉ. डि कूना यांस पत्र.

आठल्ये बडोद्यास गेल्यावर रावसाहेब ग्रंथलेखनासंबंधें त्यांच्याशीं पत्रव्यवहार ठेवीत असत. कारण बडोदें सरकार ग्रंथलेखनास फार उत्तेजन देत आलें आहे. " आर्थर स्टील यांच्या ग्रंथाप्रमाणें ज्ञाति ज्ञातींच्या भिन्न रिवाजाचा सानुक्रम संग्रह बडोदा संस्थांतून तयार होण्याचा संभव दिसत आहे काय ? "

बापू साहेबांवर रावसाहेबांचा फार विश्वास होता. रावसाहेबांनीं आपल्यामागें व्यवस्थापत्र केलें होतें त्यांत इच्छित व्यवस्था करणाऱ्या ट्रस्टींपैकीं बापूसाहेब हे एक होते.

बापूसाहेबांस बहु श्रमांमुळें उदरव्याधि जडला. त्यांनीं आपल्या मित्राच्या ( रावसाहेबांच्या ) बंगल्यांतच देहविसर्जन केलें तें स्नेहोचितच होतें.

## आप्पा आठल्ये.

हे बापूसाहेबांचे बन्धू फार बुद्धिवान होते. मद्रासेस डाक्तरचा धंदा करीत असत. त्यांचा रावसाहेबांशीं सदोदित पत्रव्यवहार असे.

" जें जें कांहीं उदात्त व श्रेयस्कर आहे त्यांत त्यांत पित्यापेक्षां पुत्र अधिक चांगले निपजोत अशी तुम्हां तरुणांविषयीं या मित्राची प्रार्थना आहे. मागाल त्या बाबतींत उपदेश करण्यास मी सदैव सज्ज आहे. माझेवर तुमचा पित्रार्जित हक्कच आहे. " २।२।८५ चें पत्र. मद्रासेकडील चळवळीचें वृत्त आप्पा आठल्यांच्या मार्फत रावसाहेब मिळवीत असत.

## राजे रामवर्मा.

हे त्राव्हणकोरचे प्रसिद्ध राजे रावसाहेबांचे स्नेही होते. स्नेहाला आरंभ कदाचित् रावसाहेबांच्या म्हैसूर प्रकरणावरून प्रथम झाला असावा. हिंदी

संस्थानिक व दोस्त सरकार यांच्या संबंधानें त्यांनीं एक सुंदर पत्र रावसाहेबांस लिहिलें होतें. राजेसाहेब स्वतां इंग्रजी उत्तम शिकले होते. शिवाय त्यांस सर टी. माधवराव हे विद्वान गृहस्थ दिवाणगिरीच्या कामाकरतां लाधले होते. इंग्रज लोकांच्या शहाणपणाच्या व न्यायाच्या राजकारभाराच्या पद्धतीपासून व जुन्या पद्धतीपासून जे फायदे व्हावयाचे त्या दोहोंच्या संमेलनाचें सुख त्रावण-कोरच्या प्रजेस यांच्या अमलाखालीं मिळूं लागलें. यानीं संस्थानचीं मोठालीं कर्जे फेडून टाकलीं. सार्वजनिक उपयोगी खात्यांत व विद्याखात्यांत पैसा पुष्कळ खर्च केला, व दवाखाने बांधले तरी शिलक खजिन्यांत पाडली. नवीन जमिनी लागवडीस आणल्या व त्याकरतां कालवे खोदले.

रावसाहेबांस यांच्या पुस्तकालयाचा मनुस्मृतीच्या प्रकाशनाच्या कामांत फार उपयोग झाला. मुंबईकडील कांहीं हस्तलिखित पोथ्यांच्या प्रात राजे-साहेब रावसाहेबांकडून करवून घेत.

## श्रीमंत तुकोजीराव होळकर.

ह्यांचा स्नेह होण्यास प्रथम कारण म्हैसूरप्रकरणावरील रावसाहेबांचा ग्रंथ ( आवृत्ति दुसरी ) असावा. तो वाचून रावसाहेबांचा गौरव करण्यास आपल्या पदरचे गणेशशास्त्री यांस महाराजांनीं मुंबईस मुद्दाम एक पत्र देऊन पाठविलें. पत्रांत बरोबर पोषाख दिला आहे असा मजकूर आहे. परंतु त्याचा स्वीकार झाल्याचा उल्लेख नाहीं. ११।१०।६८ च्या रोजनिशींत खालील मजकूर आहे.

" महाराजांतर्फे इंदुरास येण्याकरतां आमंत्रण देऊन गणेशशास्त्री म्हणाले ' महाराज आपला म्हैसूरप्रकरणावरील ग्रंथ पाहून खूष झाले आहेत. " सन्मानार्थ पोषाख आणिला होता.

रावसाहेबांस रत्नागिरीस जावयाचें होतें. म्हणून रावसाहेब म्हणाले " रत्नागिरीहून आल्यावर सांगेन. " पुढीलवृत्त कळलें नाहीं.

श्रीमंत तुकोजीराव होळकर यांनीं फार गुणग्राहकता दाखविली हें येथें नमूद करून ठेवण्यासारखें आहे; कारण या पुस्तकाच्या प्रती पुष्कळ संस्था-निकांस नजर पाठविल्या होत्या त्यांतील एकानें त्यास पाठविलेली प्रत पोस्टां-तून घेण्याचें नाकारिलें म्हणून परत आली.

**। द्वयोरेव समं वित्तं द्वयोरेव समं बलम् ।**
**॥ तयोर्विवादो मैत्री च नोत्तमाधमयोः क्वचित् ॥**

अशी सूक्ति आहे. मैत्री व्हावयास मैत्री करणाऱ्या दोन्हीं व्यक्तींची संपत्ति तुल्यमूल्य असली पाहिजे अथवा बल समानांश असलें पाहिजे म्हणजे त्या व्यक्तींची मैत्री चांगली जमते त्याप्रमाणें वादविवादाची गोष्ट आहे. म्हणून महाराजांची व रावसाहेबांची मैत्री कशी जडली या आश्चर्यांत वाचक पडतील. दोघेही विचारी पुरुष होते. रावसाहेब हे राजकारणी होते व थोरले होळकरसरकारही आपल्या राज्यापुरते राजकारणी होते. दोघेही जुन्याचे अभिमानी होते. म्हणून, जरी वित्ताकडून या दोन्हीं व्यक्तींत समता नव्हती, तरी बुद्धीच्या बलाकडून समता होती. श्रीमंत तुकोजीराव होळकर यांच्या शहाणपणाची जाणीव रावसाहेबांस होती. दादाभाई नवरोजी बडोद्यास दिवाण असतां त्या राज्याची व्यवस्था चांगली कशी होईल या काळजींत ते होते. पुष्कळ वेळां ते रावसाहेबांचा सल्ला घेत असत. तेव्हां का गोष्टीसंबंधें रावसाहेबांनीं दादाभाईस असें पत्र लिहिलें होतें कीं प्रत्यक्ष भेटून तुम्हीं आम्हीं श्री. तुकोजीराव होळकर यांजवळ चर्चा करूं.

२४।२।७४ च्या पत्रांत त्यांनीं श्री. रा. रा. बळवंतराव पटवर्धन बडोदें यांस महाराजांविषयीं असें लिहिलें होतें.

“ महाराज होळकर माझ्या समजुतीप्रमाणें स्वतांचे डोळ्यांनीं बघणार व स्वतांच्या कानांनीं ऐकणार आहेत. आपल्या वाटोळें काय चाललें आहे, हें समजण्याइतका मोठा चाणाक्षपणा त्यांच्या अंगीं आहे, यांत शंका नाहीं. त्यांच्याविषयीं फार लिहून पुढें तें किति खरें ठरेल ह्या पंचायतींत मी पडत नाहीं; तथापि इतकें लिहून ठेवितों कीं त्यांनीं केलेल्या कांहीं सुधारणा इतर राजांनीं उचलण्या सारख्या आहेत. ”

रावसाहेबांची जशी तुकोजीरावांबद्दल पूज्यबुद्धि होती तशी उलट तुकोजीरावांची रावसाहेबांबद्दल होती. तुम्हीं मात्र इमान राखिलेंत अशी

तुकोजीरावांनीं रावसाहेबांस शाबासकी दिल्याचा रोजनिशींत उल्लेख सांपडतो.

धर्मादाय करावयाचा तो स्वतांच्या राज्याच्या सीमांनीं नियमित असलेल्या भागांतील लोकांसच करावा असा नियम करण्यासारखी ह्यांची मनःप्रवृत्ति संकुचित नव्हती. उदारचरित लोकांना समग्र वसुधा हेंच कुटुंब वाटत असतें.

रावसाहेबांनीं स्टूडन्टस् लिटररी आणि सायन्टिफिक् मंडळीमार्फत स्त्रीशिक्षणाकरतां चालविलेले प्रयत्न पाहून ५ हजार रु. त्यांच्याकडे यांनीं पाठवून दिले. त्यांतील २००० त्या संस्थेकरतां होते. व इतर दुसऱ्या लोकोपयोगी कामाकरतां होते. त्यांतच १०० बहिरे व मुके यांच्या शाळेकरतां होते.

बाकीची रकम राहिली ती गायनसमाज, शाळागृह, रात्रीचे धर्मार्थ शिक्षणाचे वर्ग; कांहीं देवालयाची रचना इ. लोकोपयोगी कामांत महाराजांच्या संमतीनें रावसाहेबांनीं खर्चून पावत्यांसह हिशोब महाराजांकडे पाठविला.

डा. भाऊ यांचें निधनवृत्त ऐकून महाराजांस भाऊंच्या अल्पवयस्क विधवा झालेल्या सुनेची दया येऊन रावसाहेबांच्या मार्फत एक हजार रुपये महाराजांनीं पोचते केले.

नंतर श्रीमंत तुकोजीराव होळकर यांनीं १८८२ सालीं फौजदारी कायदा व त्याचें काम चालविणारा कायदा यांविषयीं कांहीं काम रावसाहेबांकडे सोंपविलें होतें. त्याशिवाय कांहीं संस्थानचीं दिवाणी स्वरूपाचीं कामें पहावयास पाठविलीं होतीं. व त्याकरितां रावसाहेब इंदूरपर्यंत १५ दिवस जाऊन आले व एकदम जागा बदलण्यामुळें त्यांस प्रकृतीसंबंधें फायदा झाला. [ अं० गोडबोले यांस पत्र ]

रावसाहेब इंदुरास एकाहून अधिक वेळा कामासंबंधें गेले होते. एकदां तेथें असतां रावसाहेब लालबागेंत उतरले होते व त्यांच्या तैनातीस कांहीं हुजेर व कारकून दिले होते. त्यांस रावसाहेबांची मर्जी न बिघडूं देण्याविषयीं खबरदारी घेण्याची महाराजांची सक्त ताकीद होती. तेथून निघतेवेळेस रावसाहेब त्यांच्या सेवेंत नियुक्त असलेल्या महाराजांच्या नोकरांस कांहीं

देऊं लागले त्याचा त्यांनीं स्वीकार न करतां अशी मागणी केली कीं आम्हांस आपली बडदास्त नीट ठेवली एवढेंच सर्टीफिकेट द्या. दुसरा कशाची अपेक्षा नाहीं. हें सर्टीफिकेट मिळालें तर त्यांतच आमचें कल्याण आहे. त्याप्रमाणें रावसाहेबांनीं ३–२–८२ चीं सर्टीफिकिटें प्रथम दिलीं.

इंदुरास असतां रावसाहेबांस प्रसिद्ध अहिल्याबाई साहेब होळकरांच्याविषयीं प्रत्यक्ष माहिती मिळाली तीवरून त्यांच्या मनांतील या स्त्री राजकर्त्रीविषयीं पुष्कळ पूज्यबुद्धि वाढली. “ अहिल्याबाई साहेब होळकरीण यांचा सविस्तर इतिहास वाचावयास मिळाला. मला वाटतें त्यांचें स्मारक श्री रामाच्या मागून लागलेंच करावें अशी त्यांची योग्यता आहे.” ( दि. ब. रघुनाथराव यास पत्र. )

पुढें जनरल बापूसाहेब यांस मुद्दाम तुकोजीरावांनीं रावसाहेबांकडे पाठवून दिवाणगिरी पतकरीत असले तर देऊं करण्यास पाठविलें होतें. परंतु रावसाहेबांनीं जो पगार मागितला तो महाराजांस पतकरला नाहीं. शिवाय कृष्णराव मुळ्ये यांनीं लिहिलें कीं तुमचा स्वतंत्रेचा बाणा पाहून हें पारडें फार जड जाईल असें महाराजांस वाटतें.

अशी उभयतांची मैत्री चालू असतां कोणाच्या ध्यानीं मनीं नव्हतें तरी महाराजांस १८८६ सालीं दुर्धर व्याधीनें गांठलें व त्यांत त्यांचा अंत झाला. तेव्हां त्यांच्या निधनानें रावसाहेबांस फार दुःख झालें. त्यानीं आपल्या वतीनें “ मासाहेबांचें ” व “ युवराजांचें ” सांत्वन करण्यास रा. रा. धोंडोपंत गरुड यांस २१-६-८६ रोजीं पत्रद्वारा विनंति केली होती. त्यांत शेवटीं एक वाक्य असें होतें “ ईश्वरी संकेत घडून येणारच परंतु मानवी प्राण्यांच्या मनास महाराज तुकोजीराव होळकर यांच्या मृत्यूनें भयंकर धक्का बसला आहे. ”

## श्रीमंत पतंगशहा राजे संस्थान जव्हार.

राजेरजवाड्यांत, जहागीरदारांत रावसाहेबांचे आणखी अनेक स्नेही होते. त्यांत जव्हारचे राजे श्रीमंत पतंगशहा, हल्लींच्या राजेसाहेबांचे वडील, हे एक प्रमुख होते. राजेसाहेबांस मुक्त्यारी मिळून कारभार ते स्वतां पाहूं लागल्यावर

त्यांचें काम कसें काय चाललें आहे तें रावसाहेब तेथें स्वतां जाऊन पाहून आले. राज्यांत सुधारणा करणें ती अनुभवानें हळु हळु करावी असा उपदेश रावसाहेब त्यांस करीत. "सालमजकुरीं बजेट, ऋजु व नेमणुकींचा तक्ता तपासून पाठविला आहे. त्यावरून जसें योग्य दिसेल तशी व्यवस्था आपण ठरवितील. मला असें वाटतें तूर्त आपल्या संस्थानांत अधिकारांची व अधिकाऱ्यांची संख्या वाढवून निरानिराळया प्रकारच्या जबाबदाऱ्या उत्पन्न करणें बरोबर नाहीं". कित्येक दिवस कारभारी हा रावसाहेबांच्या स्नेह्यांपैकींच असे.

राजेसाहेबांबद्दल रावसाहेब कळकळ किति बाळगीत तीं पुढील पत्र दाखवीत आहे:—"आपली प्रकृति पुन्हां बिघडली. तिच्या कारणांबद्दल तिकडेस शोध घेऊन तीं बंद करण्यास आपण समर्थ अहांत. इतकेंच सुचवितों कीं कारखान्यांतून नीट करून गाडी आली तर पुन्हां ती खडकांतून नेत नाहींत. कारण आपण जाणत अहांतच. मी निमित्तमात्र आहें. कृपेचीवृद्धि आजच्या चंद्राप्रमाणें असावी आणि प्रकृति संभाळावी. आपण राजे असून गृहस्थ अहांत. कार्तिक शुद्ध १ गुरुवार शके १८१५

## नवरोजी फर्दुनजी.

यांचा जन्म १८१७ सालीं झाला. हे अव्वल इंग्रजींत स्वपराक्रमावर वाढलेल्यांपैकीं एक होते. यांनीं एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें विद्यार्थी असतां अनेक पदकें मिळविलीं होतीं. पुढें एल्फिन्स्टन कालेजमध्यें प्रोफेसरची जागा यांस मिळाली होती. हे धाडसी होते. अलेक्झान्डर बर्न्स यांच्याबरोबर काबूलांत जाऊन आले. नंतर सुप्रीम कोडतांत त्रान्सलेतर होते. यांनीं १८७३ सालीं बडोदें येथें मल्हारराव गायकवाडांची चवकशी चालू असतां तेथें इन्टर प्रीटरचें ( दुभाष्याचें ) काम केलें.

प्रत्येक कामांत रावसाहेबांस यांचें साहाय्य असे.

मुंबई असोशिएसनच्या जीर्णोद्धाराच्या कार्यांत यांनीं रावसाहेबांस पुष्कळ साहाय्य केलें. तींत सेक्रेटरी म्हणून पुष्कळ वर्षें काम केलें. सभासद कमी

झाल्यावर ते १८७५ सालीं आंतून निघाले. त्यांच्या जागेवर रावसाहेबांनीं बापूसाहेब आठल्ये यांची नेमणूक केली.

मुंबईच्या म्युनिसिपालिटींतसुद्धां यांनीं लोकांच्या तर्फे पुष्कळ काम केलें. काटकसर करण्यांत यावी म्हणून यांनीं रावसाहेबांबरोबर पुष्कळ खटपट केली. मि क्राफर्ड यांच्या विरुद्ध चळवळ करण्यांत रावसाहेबांस यांचें साहाय्य झालें. प्राप्तीचा कर व मीठावरचा कर उठविण्याकरतां जो प्रसिद्ध चार हजार सह्यांचा अर्ज येथून विलायतेस गेला त्याकामीं यांनीं फार मेहनत घेतली. त्यावेळेस इतक्या सह्यांचा अर्ज म्हणजे मोठाच होता म्हणावयाचा.

इंग्लंदमध्यें फायनॅन्सकमीशन पुढें साक्ष द्यावयास हे गेले होते. मागतील ती माहिती रावसाहेब पुरवीत होते. "पूर्णपणें माहितीनें भरलेली" या शब्दांत त्यांच्या साक्षीची शिफारस नामदार आयर्टन व सर टॉमस यांनीं केली. यांनीं खुद्द ग्लॅड्स्टन साहेबांच्या कानावर प्रजेचीं गाऱ्हाणीं घातलीं. त्याप्रमाणें स्टेट सेक्रेटरी ड्यूक ऑफ आर्गाईल यांच्या कानांवर येथील लोकांचें म्हणणें काय आहे तें घातलें. अन्डर सेक्रेटरी ग्रॅन्ट डफ यांची मुलाखत घेतली. लार्ड हॅलिफॅक्स, माजी अन्डर सेक्रेटरी व लार्ड लारेन्स माजी गव्हरनर जनरल, व पार्लमेंतचे प्रमुख सभासद यांची गांठ घेतली. व्यापारी ठिकाणांत प्रवास केला. हे एकंदर दोन वर्षें इंग्लंदमध्यें होते. प्राप्तीवरील कर कमी करण्याची यांनीं पुष्कळ खटपट केली. इंग्लंदमध्यें ते काय काय करीत त्याची हकीकत रावसाहेबांस नित्य लिहून कळवीत.

लेखनकला यांस साध्य होती. प्रथम न्यू कूरीयरमध्यें लेख लिहीत असत. पारसीक धर्मावर यांनीं कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

यांच्या मृत्यूनंतर यांचें स्मारक करण्याची खटपट रावसाहेब, राणिना, वरजीवनदास माधवदास व सोराबजी बंगाली यांनीं केली. यांचा अर्धाकृति संगमरवरी दगडाचा पुतळा करवून फ्रामजी कावसजी हॉल मध्यें बसविण्यांत आला. त्याचा अनाविष्करण समारंभ रावसाहेबांच्या हातून १०।१२।१८८७ रोजीं करण्यांत आला.

## सोराबजी शापरजी बेंगाली

हे रावसाहेबांच्या परम मित्रांपैकीं होते. रावसाहेबांप्रमाणें हे स्त्रीशिक्षणाचे कैवारी होते. रावसाहेबांनीं जेवढे श्रम हिंदूंमध्यें स्त्रीशिक्षणाचा प्रसार करण्याकरतां केले तेवढे श्रम बेंगालींनीं पारश्यांमध्यें स्त्रीशिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून केले.

रॉयल एशियॅटिक सोसायटींत, म्युनिसिपॅलिटींत व इतर चळवळींत हे नवरोजी फर्दुनजींप्रमाणें रावसाहेबांचे सहकारी मित्र होते. रावसाहेब, नवरोजी फर्दुनजी व सोराबजी शापूरजी बेंगाली या तिघांना " त्रिकूट " व म्हणत असत इतकी यांचीं मनें जुळत असत. मुंबईच्या काउन्सिलांत रावसाहेब असतां हे त्यांचे साथिदार होते. दोघांचे विचार अगदीं बहुतेक जुळत.

हे स्वतंत्र व्यापारी होते. ह्यांस आयात निर्गत मालाची चांगली माहिती असे. वेळ पडेल तेव्हां जी माहिती लागेल ती हे रावसाहेबांस पुरवीत असत. शेतकऱ्यांच्या पेढ्या स्थापण्याकरतां रावसाहेब व सर वेडरबर्न यांनीं जो खल चालविला होता त्यांत हे चांगला भाग घेत असत. यांचें पारसी लोकांत फार वजन असे व यांचें नांव अद्याप निघालें असतां मुंबईकरांस फार आदर वाटतो.

## अंबाईदास बेचरदास.

ह्यांची एक मोठी पेढी होती. स्वतांच्या गिरण्या होत्या. जन्मभर विविध-प्रकारचा धर्मादाय विस्तृतप्रमाणावर केल्याविषयीं यांची ख्याति आहे. हे कट्टे धर्माभिमानी होते. रावसाहेब मुंबईच्या कौन्सिलचे सभासद असतां हे त्यांचे सहकारी सभासद होते. मत द्यावयाचें तें स्वतंत्रपणें विचार करून देत असत. सभेंत भाषण करण्याची शैली यांस साध्य होती. पदव्या बहुभुक्त होण्यापूर्वींच सरकारानें रावबहादूर ही पदवी अर्पण केली. पुढें त्यांस सी. एस. आय. ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. यांचें वयोमान ७० च्या वर होतें व त्यांस पाहि-ल्याबरोबर पूज्यबुद्धि उत्पन्न होत असे. शिशिरबाबूंस ( पत्रिकेच्या चालकां-

पैकीं एका बन्धूस ) लिहिलेल्या २१–२–८६ च्या पत्रांत रावसाहेबांनीं मत असें दिलें आहे. " हे अहमदाबादचे पहिल्याप्रतीचे, सर्वमान्य, स्वधर्मनिष्ठ, दानशूर व वयोवृद्ध गृहस्थ आहेत. सी. एस. आय., या पदवीनें विभूषित आहेत. नाणें खरें आहे. "

सुरतेस लहान लहान बोळांत जवळ जवळ घरें बांधून कांहीं लोक होते. सर्व कर्जबाजारी होते. त्यामुळें त्यांस स्वच्छता ठेवतां येत नसे. बेचरदास यांनीं साऱ्यांकडून ती जागा घरांसकट विकत घेतली व सर्व घरें पाडून जागा स्वच्छ करून घरें पुनः बांधून अल्प भाड्यानें रहावयास दिलीं. त्या प्रांतांत कांहीं धर्मसमजुतींमुळें कन्या झाली तर तिचा नाश करण्याची चाल असे ती बंद करण्यांत यांनीं पुष्कळ श्रम केले. १८६६ सालीं यांनीं गरीबांकरितां धर्मार्थ दवाखाना स्थापिला होता. संस्कृत कॉलेज काढलें होतें. व संस्कृत शाळेला इमारत बांधून दिली होती. प्रवाश्यांकरितां १८७१ त धर्मशाळा बांधिली. त्यांची मुलगी लक्ष्मीबाई इच्या नांवानें १८७३ त स्त्रियांच्या ट्रेनिंग कॉलेजाची इमारत बांधली. यांचा धर्मादाय विलायतपर्यंत पोंचला होता. लिव्हरपूल येथील आंधळ्यांच्या कलाकौशल्यगृहास पांच हजार रुपये यांनीं दिले होते.

सुरत शहरास महापुरांचा उपद्रव अतिवृष्टीनें जेव्हां जेव्हां होई तेव्हा तेव्हा यांची मदत लोकांस फार होई. पुणें जिल्ह्यांत १८७६।७७ च्या दुष्काळांत धान्य विकत घेऊन पुणें मुक्कामीं नफा घेतल्याशिवाय पडल्या किंमतीला विकण्याची व्यवस्था करण्यांत यांनीं रावसाहेबांस फार मदत केली. " पदव्या मिळालेले लोक पुष्कळ आहेत. पण त्यांच्या अंगीं पदव्या मिळविण्याची जी योग्यता असते तीहून अधिक योग्यता यांच्या अंगीं आहे. " असें रावसाहेबांनीं यांच्या विषयीं आपले मित्र मि. गिब्स यांस १७–१–८० च्या पत्रीं लिहिलें होतें तें अन्वर्थक आहे यांत संशय नाहीं.

तसेंच सर थिओडोर होप यांस २५–२–८८ रोजीं असें पत्र लिहिलें होतें. ' यांची माझी मैत्री, पुष्कळ, अगदीं पुष्कळ वर्षांची आहे. हे आपला

काळ, कांचन व काय लोकहिताकरतां खर्च करावयास सदैव तत्पर असणारे पूज्य व फार विनयशील नागरिक आहेत. यांची धर्मादायपद्धति भूतदया-मूलक असून सर्वसाधारण जनतेचें हित करणारी आहे. यांच्या तोडीचे या इलाख्यांत थोडे व इतर इलाख्यांची मला माहिती आहे तीवरून पहातां त्या इलाख्यांतही फार थोडे लोक आढळण्यांत येतात.' यावरून रावसाहेबांच्या मनांत यांच्याविषयीं केवढी पूज्यबुद्धि वसत होती तें दिसून येतें.

## नारोपंत गोळे

हे हर्णै मुक्कामीं राहणारे मोठे लौकिकवान वकील होते. खोती कज्जा-पासून रावसाहेबांचा व यांचा फार स्नेह जमला होता. खालील कोडतांतलें काम रत्नागिरीचे प्रसिद्ध वकील बळवंतराव रानडे व हे मिळून करीत असत. यांना शेवटीं उदरव्याधि जडला होता. त्यांस औषधोपचार करण्याकरतां आपल्या गृहवैद्यास त्याच्या गांवाहून तारेनें बोलावून आणून रोज प्रकृति-मान पाहून औषध देण्याकरतां ८ दिवस हर्णै येथें रावसाहेबांनीं लावून दिलें होतें. परंतु कांहीं यश आलें नाहीं. यांचें निधनवृत्त ऐकून यांचे चिरं-जीव वासुदेवराव यांस थोडक्यांत सुंदर पत्र रावसाहेबांनीं लिहिलें तें:— "वडील ऐहिक कार्यें करून लौकिक संपादन करून गेले. त्यांच्या मागें सर्व प्रवाहपतित कार्यें करून सतेज रहावें आणि चिरायु व्हावें असें आम्हीं त्यांचे स्नेही इच्छितों. भगवत्कृपा संपादावी. सर्वांची काळजी त्यास आहे."

## करसेटजी नसरवानजी कामा.

हे रावसाहेबांचे सहकारी मित्र होते. फार हुशार व उद्योगी होते. सार्वज-निक कामांत मनःपूर्वक झटणारे होते. सर्व जातींच्या व धर्माच्या लोकांस प्रिय होते. स्वभावतः उदार असल्यामुळें निरनिराळ्या सत्कृत्यांस आश्रय देत असत. यांनीं व्यापारांत पैसा पुष्कळ मिळविला व घालविला. तथापि हे १८६४–१८६५ च्या संकटांतून प्रामाणिकपणें पार पडले. व्यापारधंद्याविषयीं यांच्या इतका उपदेश देण्याच्या कामांत दुसरा लायक पुरुष नव्हता. पारशी

जातींत सुधारणा करण्यांत यांनीं फार श्रम घेतले. सर्व शिक्षणसंस्थांशीं व सर्व सनदशीर राजकीय चळवळींशीं यांचा संबंध असे.

रावसाहेबांनीं राजकीय चळवळ सुरू केल्या पासून ( १८६४ सालापासून म्हणजे रेव्हिन्यू सर्व्हे बिलाच्या विरुद्ध रावसाहेबांनीं चळवळ केल्या दिवसापासून ) १८८५ पर्यंत आमरणांत ते रावसाहेबांचे साथीदार होते. मुंबई असोसिएशन, ईस्ट इंडिया असोसिएशन, मुंबई म्युनिसिपॅलिटी वगैरे संस्थांच्या कामांत रावसाहेबांस यांचें साहाय्य असे. यांची योग्यता केवढी होती तें रावसाहेबांच्या पुढील पत्रावरून दिसून येतें.

" आमच्या लहान टोळीचा मुख्य नाहींसा झाला. मी जमशेटजींस आतांच शोकमय शब्दांची तार पाठविली आहे. त्यांस जास्त लिहून याहून अधिक पीडा देऊं इच्छीत नाहीं. ते मला ओळखतात एवढें बस झालें. उणें आहे तें मानसिक विद्युत्प्रवाहानें पुरें होईल " ( मि. आर्देसर मूस यांस पत्र २९।१।१८८५ ) " कामाजी—जे आम्हांस सोडून गेले ते—राजकिय कामांत ज्यांची माझी फार गट्टी होती त्या मित्रांतले एक होते. तितक्यांतल्या तितक्यांत मी एका गोष्टीनें आपलें सांत्वन करून घेतों व ती ही कीं केवढेंही स्थित्यंतर झालें तरी आरंभापासून समग्र चरित्रग्रंथ संपेतोंपर्यंत आम्हीं एकमेकांस अंतर दिलें नाहीं. ' क्ष 'ला त्यांच्या जाग्यावर आणावें काय ! पण ते ज्या आमच्या कार्यांत कृताचें फळ मिळत नाहीं त्यांत पडतील काय ? नाहीं. तर सोराबजी पटेल यांस घ्यावें काय ? " ( एका मित्रास पत्र )

" अहह ! कामाजीच्या मृत्यूमुळें माझी फार हानि झाली आहे. वेळ पडल्यास सल्ला घेणें झाल्यास त्यांची मला जी मदत होई तिला किंमत नाहीं. राजकीय युद्धांमध्यें शिष्टाचाराप्रमाणें मागें पुढें दुसरे लोक खेदकारक रीतीनें कर्तव्यास जागले नाहींत तरी कामाजींनीं माझी पाठ सोडली नाहीं. "

( ३०।१।१८८५ सो. फ्रा. पटेल यांस पत्र )

रावसाहेबांवर मित्रविरहाचे प्रसंग अनेक आले असतील. पण वरील पत्रांत त्यांनीं कामाजींविषयीं जेवढा प्रखर शोक केलेला दिसत आहे तेवढा दुसऱ्या कोणाविषयीं केलेला एकाद दुसऱ्या अपवादा शिवाय दिसत नाहीं.

## एडवर्ड व्हियाट्सेक.

रावसाहेबांची व या महान युरोपीयन पण्डिताची ओळख १८६३ सालीं झाली. वकिलीची परीक्षा उतरल्यावर रावसाहेबांस असें वाटलें कीं कायद्याचें विशेष ज्ञान होण्यास त्यांतील जीं तत्त्वें लॅटिन भाषेंतील म्हणींत ग्रथित झालेलीं आहेत त्यांचें ज्ञान झालें पाहिजे. त्याकरतां त्यांना लॅटिन भाषेचा अभ्यास अवश्य आहे असें वाटलें. म्हणून रावसाहेबांनीं वरील पण्डितास दरमहा ३० रुपये वेतन देऊन त्यांच्याजवळ लॅटिन भाषा शिकण्यास आरंभ केला.

मि. व्हियाट्सेक हे बहुभाषाकोविद होते. यांनीं एक निबंध लिहिला होता. तो छापील कोण याविषयीं यांना थोडी काळजी पडली होती. कारण त्यांत कांहीं संस्कृत, कांहीं हिब्रू, कांहीं ग्रीक, बरेचसे आरबी व फारशी भाषेंतील शब्द होते. ते त्या त्या भाषेंतील लिपींत छापावयाचे होते. इतक्या लिपींत छापण्यास कमी अडचण पडेल म्हणूनच कीं काय यांत दोनच चिनी भाषेंतील शब्द चिनी लिपींत लिहिलेले होते.

दैव आणि दुर्दैव या फारशी भाषेंतील गोष्टींचें यांनीं इंग्रजींत सुरस भाषांतर केलें होतें.

यांचें हिंदुस्थानांत नात्याचें कोणीही नव्हतें. देशीं हवी तेवढीं नात्याचीं मनुष्यें होतीं. “मी माझ्या आई बापांचा एकुलताच मुलगा असून मला दोन बहिणी आहेत. त्यांचा माझा फार सहवास घडून येत नसे. कारण माझे सारे दिवस शाळेंत व कॉलेजांत गेले. वर्षांतून एक दोन महिनेच काय तो मी घरीं रहावयास जात असें. माझ्या अभ्यासा करतां खर्च लागे तेवढ्यानें त्यांच्याशीं माझें भांडणच लागे. ‘किती पैसा तुला लागतो’ म्हणून त्या वारंवार मला बोलून दाखवीत. बाकी आतेमामे भावंडें व चुलत भावंडें मला हवीं तेवढीं आहेत.”

( ३।६।६७ चें रावसाहेबांस पत्र. )

यांचा काळ एकसारखा वाचनांत जात असे. अभ्यासास पूर्ण शांतता मिळावी म्हणून त्यांनीं खेतवाडींत एक दुमजली स्वतंत्र घर १८६९ त घेतले होतें. हे

कधीं रागावत नसत. तरी तेथें यांचें सत्व पहावयास एक शेजारी तयार झाला त्याची हकीकत यांनीं रावसाहेबांस एका पत्रांत लिहिली तीः—

" या घरांत पहिल्या पांच महिने मला शेजाऱ्यांनीं शांतता मिळूं दिली पण सहाव्या महिन्याबरोबर गायनास आरंभ झाला. तो माझ्यानें एक दिवसही सोसत नाहींसा झाला म्हणून मी समोरच बसलेल्या रामोशाला हांक मारून कोण गातो म्हणून चौकशी केली. त्यानें मी स्वतां गातों असें कबूल केलें. तें बंद करा अशी मी विनंति करून वर आलों तों लवकरच पुढें गायन तसेंच चालू झालें. मला माझ्या घरांतून काढून लावण्याचा अथवा तें घर विकून टाकावयास लावण्याचा कांहीं लोकांचा बेत झाला असावा असें मला वाटतें. या विषयीं पुढें चवकशी करावी काय ?"

आपल्या एका नातेवाईकास गणित शिकविण्याकरितां रावसाहेबांनीं यांस खाजगी शिकवणी दिली. तेव्हा त्यांनीं विद्यार्थी कसा असावा तें रावसाहेबांस कळविलें. कारण लग्न झालेले शाळकरी विद्यार्थी ही चीज हिंदुस्थानांतच यांना पहिल्यानें बघावयास सांपडली असेल. " विद्यार्थी ज्याचा बायकोशीं सहवास झालेला आहे असा म्हटला म्हणजे एक जात्याची पेड गळ्यांत अडकवून बसलेला प्राणी आहे असा माझा अनुभव आहे. बारीकशी शिरोवेदना किंवा थंडी यांचें निमित्त सांपडतांच तो शाळेंत न जातां घरीं रहावयास संवकतो. व शाळेंत आला तरी त्याच्या डोक्यांत दुसरेच विचार भरलेले असतात. याचा परिणाम परीक्षेंत अपयश. असो. पण आमचा विद्यार्थी यांतला नाहीं अशी आशा करतों."

फार काटकसरीनें खर्च करून जी अल्प स्वल्प शिल्लक राहील ती हे रावसाहेबांच्याजवळ सुमारें १८७० सालापासून आणून देत असत. त्याचा ते व्हियाटसेक साहेबांच्या नांवानें सरकारी नोटा विकत घेऊन ठेवीत. नेटिव्ह ओपिनियनमध्यें यांचे लेख मधून मधून येत असत.

१८६० सालीं गाटिंजन शहरीं महंमद पैगंबराचें आरबींत लिहिलेलें चरित्र प्रसिद्ध झालें होतें. तें हजरत शकाच्या पहिल्या अर्धांत अबदूल मालक हक्क हुसेन यांनीं लिहिलें होतें. त्याचें भाषांतर यांनीं इंग्रजींत केलं

होतें तें छापून काढण्याकरितां लंदन येथील रॉयल एशिऍटिक सोसायटीशीं रावसाहेबांनीं पत्रव्यवहार चालविला होता. पुढें काय झालें तें समजलें नाहीं.

रावसाहेबांनीं आपला इंग्रजी नाण्यांचा संग्रह विलायतेस विकला. त्या नाण्यांची वर्णनपूर्वक यादी व्हियाट्सेक साहेबांनीं तयार केली होती. तांब्याचीं पदकें नाना तऱ्हेच्या संस्मरणीय प्रसंगीं विलायतेंत पाडण्याची चाल आहे. त्यांचाही संग्रह रावसाहेबांनीं केला होता. त्यांची यादी वर्णनासह यांनींच तयार केली होती.

यांच्या लेखांत युरोपीयन लोकांच्या लेखांत दिसून येणारा विनोद असे. त्याचा मासला पुढील तापावरील तोडगा आहे.

**तापावर तोडगा.**

रावसाहेबांस १–७–६५ च्या पत्रांत एक तापावर तोडगा यांनीं सांगितला तो असा. " पुन्हां जर ताप येऊन तुम्हांला त्रास झाला तर तुम्हीं एकाद्या मित्राच्या भेटीला ताबडतोब निघून जा आणि जाण्यापूर्वीं खालील छंदोबद्ध गाणें आपल्या दारावर खडूनें लिहून ठेवा.

**। ‡ तापा ! आगमना न करीं ।**
**॥ रा. रा. मंडलिक नाहीं घरीं ॥**

---

‡ मूळ इंग्रजी चरण असे आहेत.

Fever ! Fever ! do not come.
Mr. Mandlik not at home.

आतां एका ज्योतिर्विदानें २।८।८७ रोजीं तापावर तोडगा रावसाहेबांकडे पाठविला तो पहा.

**। वसंते सानंदं कुसुमितलताभिः परिवृते ।**
**॥ स्फुरन्नानापद्मे सरसि कलहंसालिसुभगे ॥**
**। सखीभिः खेलंतीं मलयपवनांदोलितजले ।**
**॥ स्मरेद् यस्त्वां तस्य ज्वरजनितपीडाऽपसरति ॥**

हा श्लोक आनंदलहरींत आहे. कामज्वर, जीर्ण ज्वर, चातुर्थिकज्वर किंवा संतापज्वर अथवा अतिपरिश्रमजनितज्वर दररोज १२ वेळा हा श्लोक म्हटला म्हणजे नाहिंसे होतात. तो लिहिला आहे. "

लहान मुलांची एकदां कशावर तरी श्रद्धा बसली म्हणजे त्यांचे बारीक सारीक रोग वर सांगितल्याप्रकारें खरोखर बरे होतात. परंतु काय सांगूं ! आमच्या मनाची सरळता व श्रद्धा हीं नष्ट झालीं आहेत. कारण आपण आतां लहान नसून फार वृद्ध झालों आहोंत. "

यांचा रावसाहेबांवर पूर्ण विश्वास होता. आपण सांचविलेल्या सर्व पैशाचा विनियोग यांनीं मृत्युपत्र करून प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतील मुलांस लहान लहान रकमांचीं बक्षिसें देण्याचें ठरवून रावसाहेबांस त्यांनीं ट्रस्टी नेमिलें होतें. परंतु रावसाहेब यांच्या हयातींत निवर्तल्यामुळें त्यांच्या मागें यांनीं रावसाहेबांचे चिरंजीव नारायण विश्वनाथ मंडलिक यांस ट्रस्टी नेमिलें. युरोपियन लोकांच्या और्ध्वदेहिक विधीला फार पैसा लागतो. म्हणून हिंदी तऱ्हेनेंच मृतशरीराची वाट दहन करून लावावी अशी त्यांची इच्छा होती. त्याप्रमाणें सर्व व्यवस्था तिरडी करून देह नेण्यापासून दहनविधीपर्यंत ना. वि. मंडलिक यांनीं केली. यांच्या धर्मादायाच्या व्यवस्थेचें काम हेच अद्यापि दक्षतेनें व नियमितपणानें करीत असतात.

### बाळकृष्ण सायण्णा.

हे पुणें येथें मॉर्गन बाळकृष्णा आणि कंपनी या प्रसिद्ध लिलांववाल्या कंपनीचे मालक होते. लिलांवाशिवाय गाडीघोडे व खुर्च्या कपाटें इत्यादि बंगले सजविण्याच्या सामानाची खरेदी विक्री करीत असत अथवा भाड्यानें देत असत. हे खुद्द व यांचे बन्धू शिवराम अय्या व रामय्या यांनीं हा धंदा फार प्रामाणिकपणें करून मोठें नांव व पुष्कळ पैसा कमाविला.

यांच्या कुटुंबाचा परिवार फार मोठा होता. तरी सर्व मनुष्यें एकत्र सुखासमाधानानें रहात असत. याचें द्योतक म्हणूनच कीं काय त्यांच्या भवनांगणांत कुत्रा, मांजर व पोपट हे प्राणी जातिवैर सोडून एकाकाळीं क्रीडत असतां लोकांच्या दृष्टीस पडले होते.

यांचा व रावसाहेबांचा स्नेह १८७४ च्या सुमारास झाला तो शेवट-

पर्यंत होता. हे मुंबईस कामाकाजासंबंधें आले तर रावसाहेबांच्या घरींच उतरत असत. तेव्हां यांचा मान मरातब रावसाहेब उत्तम ठेवीत.

यांची धार्मिक प्रवृत्ति वाखाणण्यासारखी होती. रावसाहेब महाबळेश्वरास गेले ह्मणजे हे रावसाहेबांच्या मोठ्या बंगल्यांत राहत असत. कधीं कधीं त्यांच्या मातोश्री बरोबर येत. हे रावसाहेबांस गुरु असें ह्मणत. रोज भगवद्गीतेचा अंशतः पाठ करीत असत. जीं त्यांतील वाक्यें व्यवहाराला उपयोगी पडतात तीं योग्य ठिकाणीं ह्मणून दाखवीत व तरुण मंडळीस उपदेश करीत. हे शिक्षणाचे पुरस्कर्ते होते व त्याकरतां पुष्कळ पैसे खर्च करीत. सरकारानें यांस रावसाहेब ही पदवी समर्पण केली होती.

### डाक्तर राजेन्द्रलाल मित्र.

पौर्वात्य व पाश्चिमात्य विद्यांत प्रवीण असे जे कांहीं हिंदी गृहस्थ इंग्रजी राज्यांत निर्माण झाले त्यांचे हे राजेच होते. यांनीं कांहीं इंग्रजी वैद्यकाचा अभ्यास केला होता. तसाच कायद्याचा केला होता परंतु यांचा सर्व भर इंग्रजी सारस्वताचा अभ्यास करण्यावर होता. यांची लेखनशक्ति दुर्निवार होती. हे बहुभाषाकोविद होते. यांचा रॉयल एशिॲटिक सोसायटी सारख्या युरोपांत ज्या विद्वानांच्या मंडळ्या होत्या त्यांच्याशीं संबंध होता. हे रावसाहेबांप्रमाणेंच म्युनिसिपॅलिटीचे कामांत ( कलकत्त्यास ) वाहिलेले होते. कलकत्त्याची ब्रिटिश इन्डियन असोशिएशन ह्मणून जी जमीनदारांची सभा आहे तिचे हे अध्यक्ष होते. बाम्बे असोसिएशनचा जीर्णोद्धार करतेवेळीं रावसाहेबांनीं जें विनंतिपत्र काढलें होतें त्यांत या ब्रिटिश इन्डियन असोशिएशनचा ( राजकीय वडील बहिणीचा ) सादर उल्लेख केला होता.

यांस सी. एस्. आय्. ही पदवी देऊन सरकारनें गौरव केला. कलकत्ता युनिव्हर्सिटीनें डाक्तर ही पदवी प्रिन्स आफ वेल्स ( नंतर एडवर्ड बादशहा) यांस प्रथम देऊन दुसऱ्यानें राजेंद्रलाल यांस दिली. मनुस्मृति रावसाहेबांनीं छापिली तीकरतां जुन्या मनुच्या प्रती मिळविण्याकरतां डाक्तर साहेबांजवळ रावसाहेबांचा पत्रव्यवहार चालू असे.

डाक्तर राजेन्द्रलाल जेव्हां आजारी पडले तेव्हां रावसाहेब मुंबईहून त्यांस कांहीं आर्य वैद्यकांतील औषधें पाठवीत असत. व जी त्यांच्या स्वास्थ्याविषयीं काळजी दाखवीत असत तीवरून परस्परांचा स्नेह किति होता तें दिसून येत आहे. ( प्रकरण ६२ पहा. )

यांशिवाय रावसाहेबांचे अनेक मित्र होते. त्यांच्या विषयींचा उल्लेख या ग्रंथांत जागोजाग आला आहे. त्यावरून रावसाहेबांचा मित्रवर्ग केवढा मोठा होता तें कळेल.

---

## प्रकरण ८३ वें.

# रावसाहेबांचें पौरुष.

। यत्स्वयं कर्मणा किंचित्फलमाप्नोति पूरुषः ॥
। प्रत्यक्षमेतल्लोकेषु तत्पौरुषमितिश्रुतम् ॥ १ ॥ (महाभारत)

मोठें डोकें, रुंद कपाळ, अत्यंत तेजस्वी डोळे, नरतरीत नाक, दृढ निश्चयदर्शक भिंवया, गंभीर वृत्ति, गौर वर्ण व मुखावर पसरलेली निरामयसूचक लाली, यांनीं रावसाहेबांचा चेहरा फार रूबाबदार दिसे. त्यावर विद्वत्तेचें तेज चढलें होतें. विचारीपणा हा जो त्यांचा विशेष गुण त्याचा ठसा चिन्हित झाला होता. त्यांचें शरीर उंचीनें बेताचें होतें; पण फार बळकट होतें.* खांदे

---

* नारायण बल्लाळ लिमये रावसाहेबांच्या शेजारीं रहात असत. त्यांस रावसाहेब म्हणाले "चला आपण डाक्तर भाऊंकडे जाऊं." लिमये जरा नाहीं होयें म्हणूं लागले; तेव्हां रावसाहेबांनीं त्यांस जवळ जवळ शरीरतः भाऊंकडे नेलें. हीच शक्ति शेवटलें दुखणें जडेतों त्यांच्या अंगीं होती. रावसाहेबांचे तरुण पुतणे बापूसाहेब मंडलिक दिवाणखान्यांतील पेटी उचलून अन्यत्र नेण्याचें पहात होते. पेटी उचलत नाहीं हें रावसाहेबांनीं पाहिलें तेव्हां ते उठले व म्हणालेः—"पहा हो ! मीं तुला दाखवितों पेटी कशी उचलावी तें !" असें म्हणून दोन हातांनीं दोन्हीं बाजूच्या कड्यांत हात घालून त्यांनीं पेटी उचलून इष्टस्थलीं ठेविली व ते म्हणाले, "अशी उचलावी !"

रुंद व मान गडद्यासारखी दिसे. अंगांत जाड्य अगदीं नव्हतें. चपळता विशेष होती. त्यांची वाणी खणखणीत होती. सत्यमार्गानें जाण्याचा त्यांचा जो निश्चय होता त्याप्रमाणें त्यांचें आचरण असल्यामुळें कोणाला केव्हांही भिण्याचें त्यांना कारण नसे म्हणून त्यांचा चेहरा निर्भय दिसे. स्वभाव तापट असल्यामुळें स्वभावतःच उग्र असलेला चेहरा अधिक उग्र दिसे.* रावसाहेबांस पाहणाऱ्या लोकांवर आरंभींच वजन पडावयास हें रूप पूर्वग्रहाप्रमाणें बलवत्तर कारण होत असे.

एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें विद्यार्थी असतां वर्गात रावसाहेब पागोटें घालून बसत असत. त्यावेळेस राष्ट्रीय पोषाख तसाच होता. आजारी असल्यास, उघड्या डोक्यानें बसण्याची परवानगी मिळे. सिंधमध्यें गेल्यावर पायांत इजार व बूट, अंगांत आंगरखा व डोक्यास तिथल्या रिवाजाचें कांहीं रेशमाचें फर्द लपेटीत असत. त्यानंतर ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत शाळाखात्यांत शिरल्यावर पोषाखांत एक दोनच फरक त्यांनीं केले. ते अंगावर उपरणें घेऊं लागले व डोक्यास तांबड्या रंगाचें पैठणी चक्रीदार पागोटें घालूं लागले. पुढें वडील निवर्तल्यावर मात्र तांबडें पैठणी पागोटें सोडून पांढरें चंदेरी वापरूं लागले. त्याची बांधणी पुणेकर प्रसिद्ध पगडबंद पंडित यांच्या हातची असे. तींत विशेष हा कीं, तिच्यांत छिचोरपणाचा अभाव असून नीटनेटकेपणा होता. मुंबईतील रजक वर्गास कपडे स्वच्छ व शुभ्र करतां येत नसल्यामुळें आपले कपडे पुण्याहून धुवून आणवीत असत. रेलवे मार्गानें नियमानें पार्सलें येत जात असत. सव वेशाचा शुभ्रवर्ण मोडावयास उपरण्याचा साधा रेशमी कांठ तेवढा एकटाच कारण होत असे. तरी साधारणतः वेश शुभ्र असल्यामुळें एकदां सार्वजनिक रीतीनें त्यांचा सन्मान लोकांनीं केला त्याप्रसंगीं एका कवीनें त्यांच्या पोषाखाचें वर्णन करतांना असें म्हटलें कीं, 'तो वेश

---

* डाक्तर नारायण दाजी रावसाहेबांस म्हणत आपण फार उग्र दिसतां. चेहरा जरा शान्त दिसेल तर इतकी भीति लोकांस वाटणार नाहीं.

**शुभ्रतर कीं, यश पांघरीलें.** ' यांचा वर्ण शुभ्र, पोषाख शुभ्र व कवीच्या उत्प्रेक्षेप्रमाणें वेशाहून शुभ्र यश यांचा संयोग फारच शोभादायक होई.

कवीच्या आदरास पात्र झालेली यशाची प्राप्ति **रावसाहेबांनीं** कोणत्या गुणांच्या आधारानें केली ती पाहूं, त्यांतील उपजत कोणते व स्वार्जित कोणते ते पाहूं.

कुलीन घराण्यांत जन्म, उत्तम बुद्धिसामर्थ्य व शरीरसामर्थ्य आणि श्रीमन्ती हे गुण **रावसाहेबांचे** वडिलार्जित होते. परंतु साधारणत: सर्व मनुष्यांस विशेषत: अशा परिस्थितींतल्या मनुष्यांस ज्या गुणांची प्राप्ति स्वकर्मयोगानें प्रत्यक्ष लोकांस करून दाखवितां येत नाहीं त्या कोणत्या गुणांची प्राप्ति *रावसाहेबांनीं करून दाखविली अथवा **रावसाहेबांनीं** कोणतें पौरुष दाखविलें तें पाहूं.

## अध्ययनलालसा.

। चोदितो गुरुणा नित्यमप्रचोदित एव वा ।
॥ कुर्यादध्ययने यत्नमाचार्यस्य हितेषु च ॥ १ ॥

( मनु. )

विद्याभ्यासाला खरा आरंभ **रावसाहेबांनीं** एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें केला. तेथें त्यांनीं गुरुसन्निध असतां अथवा घरीं असतां गुरूनें सांगितलें असो अथवा नसो अभ्यासाशिवाय कांहीं केलें नाहीं. त्यांचा अभ्यास पद्धतवार असे. अनेक विषयांत अग्रपद + मिळविणारे त्यांच्यासारखे विद्यार्थी थोडे. शाळेंत किंवा एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें त्यांनीं जें अभ्यासाचें काम केलें त खाणींत काम करणाऱ्या गुलामाप्रमाणें किंवा खोतानें वेठीस धरलेल्या कुळाप्रमाणें केलें नाहीं. * त्यांनीं जो अभ्यास नामांकित प्रोफेसरांचें अन्तेवासित्व

*यांतील कांहींची प्राप्ति कशी करावी तें संबयी आणि अभ्यास या पुस्तकांत रावसाहेबांनीं स्पष्ट करून दाखविलें आहे.

+ प्रकरण ५ वें पृष्ठ २३ पहा.

*रावसाहेब एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें विद्यार्थी असतांना त्यांनीं लिहून ठेव-

पतकरून केला त्याचा त्यांना शेवटपर्यंत अभिमान वाटे. रेव्हिन्यूज्युरिसडिक्शन बिलावरील आपलें लघ्वाकार पुस्तक सर पेरींकडे रवाना केल्याचें वृत्त आपल्या स्नेह्यास कळवितांना रावसाहेबांनीं लिहिलें, ' या कामासंबंधें एक प्रत सर इ. पेरी यांकडे पाठवीत आहें म्हणजे ज्याला त्यांनीं १८५२ सालीं कच्छला पाठवून दिलें त्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमधल्या विद्यार्थ्याची त्यांना आठवण होईल. '

---

लेल्या विविध विषयांवरील टिपणांच्या वह्या सांपडतात. त्यांवरून त्यांच्या अभ्यासपद्धतीविषयीं कांहीं अनुमान काढतां येतें. हल्लींची सुंदर बांधणीचीं, आंखलेल्या व जाड पानांचीं जसलीं आयतींच नोट बुकें मिळतात तसलें एकही त्यांच्या त्या वेळच्या संग्रहांत नाहीं. हा साधेपणा त्या वेळच्या सर्व विद्यार्थ्यांत असला पाहिजे. कारण छानछोकीच्या वह्या साधारणपणें त्याकालीं उपलब्ध नसतील. तथापि रावसाहेबांच्या वह्यांत विशेष साधेपणा होता. या सर्व वह्या अगदीं साध्या पातळ कागदांच्या केलेल्या आहेत. त्यांचे बाह्य अस्तराचें पृष्ठ मात्र इंग्रजी अक्षर वळविण्याकरतां जो जाड कागद वापरीत असतात त्या कागदाचें आहे. तें कित्त्याचें अक्षर, वही हातांत घेतांच दिसतें त्यावरून या वह्या प्राथमिक इंग्रजी शाळेंत जाणाऱ्या मुलाच्या असाव्या असें वाटतें. कालेजांतील मुलाच्या आहेत असें त्या उघडून आंतील विषयाकडे लक्ष दिल्यावर कळून येतें व मजबुतीकरतां घातलेल्या बाह्य पृष्ठावरून आपण फसलों असें वाटतें.

एकाद्या वहीवर घातलेला श्रीकार विद्यादेवीविषयीं वाटणारा वह्यांच्या मालकाचा पूज्य भाव दाखवितो. कांहीं वर स्वतांचें नांव चार पांच वेळां लिहिलेलें आढळतें. कदाचित् पहिल्यानें लिहिलेल्या नांवाचें अक्षर रावसाहेबांचें अक्षर जितकें वळणदार होतें तितकें वळणदार आलें नाहीं म्हणून तें तितकें वळणदार येई तों, अथवा त्याची सफाई साधेतों पुन्हां पुन्हां लिहिलें असेल; किंवा वारंवार नांव लिहिण्यांत मालकाच्या नांवाकडे विशेषतः वहिला हात लावणाऱ्याचें लक्ष जावें, हा हेतु कदाचित असेल; कारण एका वहीवर हें नोट बुक विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें असे. कोणी घेऊं नये अशी स्पष्ट नोटीस दिलेली आढळते.

## विद्याव्यासंग.

। शास्त्रस्य पारंगत्वातु भूयोभूयस्तदभ्यसेत् ।
। तच्छास्त्रं शबलं कुर्यान्नचाधीत्य त्यजेत् पुनः । (मनु.)

विद्यार्थी एकदां परीक्षासत्रांतून सुटले रे सुटले, ह्मणजे विद्या पुरी झाली असें समजतात व सर्व विद्याभ्यास सोडून देतात. व ज्या शिडीनें ते वर चढले तीच ते लाथडून टाकतात. विद्या पुरी झाल्यावर ती सोडूं नये. पुनः

---

हीं नोटबुकें ज्ञानाचीं भाण्डारें आहेत अशी त्यांच्या मालकाची असलेली समजूत एका वहीवर लिहिलेल्या " हें नम्र नोटबूक " ह्या शब्दांवरून दिसून येते. या सर्व वह्या तपासून पहातां असें आढळतें कीं आंतील विषयाच्या टिपणांशिवाय अन्य असंबद्ध टिपणें आढळत नाहींत, यावरून गुरूजी शिकवीत असतां रावसाहेबांचें चित्त एकाग्र होत असे व अन्य विषयाकडे लक्ष जात नसे असें अनुमान निघतें.

एखाद्या वहीच्या बाह्य पृष्ठावर " धान्य तेथें घुशी " व " निधान तेथें विवशी " " सोळाशें वनिता सुतां न गणिता भिक्षाटणा जो करी ". " तस्मात्प्राक्तन रे समर्थ बळियां ललाटरेषा खरी. " " *Omnibus rebut acquibusdaniatius* " अशा म्हणी अथवा वृद्धवाक्यें लिहिलेलीं आढळतात. या सर्व वह्यांच्या गंभीर वृत्तीच्या लक्षणांत आनंदाची लहर क्वचित् प्रसंगीं उत्पन्न होत असल्याचें दर्शक म्हणून फक्त एकाच वहीच्या बाह्य पृष्ठावर ' परमपरा संभ्रम पराई ' हा एका पदाचा चरण लिहिलेला आढळतो. बाह्यपृष्ठें उलटलीं म्हणजे आंतील पृष्ठें मात्र गुरूजींच्या मुखांतून प्रसृत झालेल्या वाक्सुधेचीं भाण्डारें आहेत असें आढळतें. सर्व तऱ्हेच्या गणितांतील उदाहरणें जेवढीं गुरूजींनीं वर्गांत सोडवून दाखविलीं असतील तेवढीं वर्गांत शिसवी पेन्सलीनें उतरून घेऊन नंतर घरीं आल्यावर अवश्य तेवढा भाग शाईनें वर गिरवून ठेवलेला दिसतो. बाकी सर्व विषयांवरील वह्या घरीं आल्यावर स्वस्थपणें पुन्हां लिहून काढलेल्या दिसतात. सर्व परीक्षांत उत्तम यश मिळविण्यास या वह्यांवर घेतलेले परिश्रम कारण झाले. परीक्षेंतील सर्व प्रश्न सोडविण्याची हांव एका राखून ठेवलेल्या उत्तरांच्या कागदांवरून दिसून येते.

" वनस्पतिशास्त्र हा विषय नुकताच घेतला असल्यामुळें शेवटल्या दोन प्रश्नांचें उत्तर मी देऊं शकलों नाहीं. " असें रावसाहेबांनीं मुद्दाम लिहून ठेवलें आहे.

पुनः तिचा अभ्यास करावा व ज्या शास्त्रांत आपण पारंगत झालों तें शास्त्र शबल करावें असें मनु सांगतो तिकडे दुर्लक्ष करतात. हें शास्त्र शबल न करण्याचें पाप सर्व पोटार्थी विद्यार्थ्यांच्या हातून घडतें. याला अपवाद जे विद्याखात्यांत विशेषतः कालेजांत अध्यापकाचें काम करूं लागतात ते होतात; कारण त्यांना पुढील अध्ययनाचें काम सुरू ठेवावें लागतें. रावसाहेबांची गोष्ट तशी नव्हती. तरी त्यांची ज्ञानार्जनाची तृष्णा शेवटपर्यंत शमन पावली नाहीं. एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाच्या इतिहासाचें मराठींत भाषांतर रावसाहेबांनीं प्रथम केलें. त्यानंतर तें गुजराथींत करावें असें मनांत येतांच त्यांनीं गुजराथी भाषेचा अभ्यास केला. व वरील इतिहासाचें गुज-

---

**अभ्यासाची पद्धत.**

रावसाहेबांना वाचनाची पद्धत चांगली लागली होती ती त्यांनीं पुढें सुद्धां चालू ठेविली होती. सार्वजनिक कामें करतांना त्यांना एकंदर देशांतील लोकमत प्रकृत विषयांवर काय आहे तें कळण्याची अवश्यकता होती. म्हणून ते ठिकठिकाणच्या निरनिराळ्या वर्तमानपत्रांचे वर्गणीदार झाले होते. त्या पत्राचा अंक हातांत पडतांच त्यांतील सार्वजनिक विषयांसंबंधें जे लेख आले असतील ते कापून संगृहीत करून ठेवीत व त्या संग्रहास एक अनुक्रमणिका लावून ठेवीत. नेटिव्ह ओपिनियनमध्यें जे लेख येत त्याचीही अनुक्रमणिका कधीं कधीं केलेली आढळते. हायकोर्टांत निकाल झालेल्या कज्जांचे रिपोर्ट रावसाहेब प्रसिद्ध करीत. त्यांची तारीखवार यादी करून ठेवलेली सांपडते. चांगले चांगले ग्रंथ वाचीत असतां त्यांत वक्त्यांनीं, मुत्सद्यांनीं व उत्तम लेखकांनीं कांहीं सुंदर विचार प्रगट केले असतील त्यांची टांचणें करून ठेवीत. तीं फार मनोरंजक आहेत. उदाहरणार्थ. फ्रान्स देशांतील पहिली लोकांची सभा ( असेम्ब्ली ) स्थापित झाली तेव्हां एक सभासद म्हणाला, “ एक ईश्वर, एक फ्रान्स व एक राजा. ” प्रसिद्ध इंग्रज कादंबरीकार वाल्टर स्कॉट यांनीं या भाषणास एक टीका जोडून दिली तीः—एक तोंड, एक नाक, एक कान व एक डोळा !

मनुष्याच्या अनेक व्यवहारांस एकत्व आणण्याची व सर्व मनुष्यांस एका व्यक्तीचें छंदानुवर्तन करण्यास लावण्याची जी प्रवृत्ति आहे तीवर ही सुंदर टीका आहे.

राथींत भाषांतर छापून प्रसिद्ध केलें. या भाषेचें मिळवलेलें ज्ञान त्यांना ज्ञानदीपका सारख्या गुजराथी मासिकांत निबंध लिहावयास उपयोगी पडलें. सिंधमध्यें असतां **रावसाहेबांनीं** सिंधी भाषा शिकून तिचें लघुव्याकरण लिहिलें. बीजगणित ( भाषान्तर रूपानें ) छापलें. त्यांस पुढें त्या भाषेंत युनिव्हर्सिटीच्या परीक्षांत परीक्षक नेमण्यांत येई.

शाळा खात्यांत व्हिजिटर असतां पार्शिअन भाषा ज्या शाळांत शिकविली जात असे त्यांची तपासणी करतां यावी म्हणून पार्शिअन भाषेचा **रावसाहेबांनीं** अभ्यास केला. कायद्याचें ज्ञान चांगलें व्हावें म्हणून ल्याटिन भाषेचा अभ्यास केला, कारण कायद्याचीं सूत्रमय तत्त्वें ल्याटिन भाषेंत रचलेलीं आहेत. या भाषेचा अभ्यास करीत असतां लिहून घेतलेले धडे कांहीं वह्यांत सांपडतात.

कलकत्त्यांस काउन्सिलच्या कामाला गेले असतां सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांजवळ वंग मूळाक्षरांचा **रावसाहेब** अभ्यास करीत होते.

याचें इंगित **रावसाहेबांच्या** एका पत्रांत सांपडतें. मेघमाला नांवाचा एक जुना ग्रंथ एका जवळ त्यांनीं मागितला तेव्हां त्यांनीं लिहिलें:—" मी कांहीं जोशी नाहीं, परंतु थोडी माहिती आहे ती बसल्या बसल्या वाढवावी; कारण **जीवस्य तत्त्वजिज्ञासा, नार्थो यश्चेह कर्मणि** असें जें वचन आहे तें सर्व शास्त्रांस लागू पडतें. " अर्थात् तत्त्व जाणण्याची इच्छा हा जीवाचा धर्म आहे. त्याला वयाचा निर्बन्ध असूं शकत नाहीं.*

एक पृष्ठ, एक श्लोक, एक चरण, निदान एक अक्षर तरी नवीन वाचल्याशिवाय दिवस सुना जाऊं देऊं नये. अशी म्हण आहे तीप्रमाणें ज्ञानार्ज-

---

* **रावसाहेबांस** जशी अध्ययनाची लालसा होती तशी अध्यापनाची होती. आपल्या आप्तेष्टांस तर विद्या शिकवीत असत ( पृष्ट ९४ प्रकरण १३ पहा ) परंतु नोकरांसही शिकवीत असत. " मि. अर्स्किन यांच्या सूचना साभार ऐकून घेऊन मी माझ्या कुणबी नोकरास लिहावयास व वाचावयास कसें शिकविलें व एकाला शिवणकाम कसें शिकविलें तें सांगितलें. " ( १३।५।६९ चा रो. )

नाची रावसाहेबांस अत्यन्त हौस असल्यामुळें ज्ञानाचें भाण्डार जे ग्रंथ त्यांचा संग्रह त्यांनीं चांगला केला. त्याकरतां पुष्कळ द्रव्य वेचलें. द्रव्याचा उपयोग याहून चांगला करतां येणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. स्वतःस त्यांनीं रुपयांबरोबर तोलिलें पण पुस्तकांस तोलण्यांस त्यांना सोनेंही पुरें पडलें नाहीं म्हणून त्यांचा ग्रंथसंग्रह नामांकित झाला. (प्रकरण ५६ पृष्ठ ७०३ पहा.)

## कालनिष्ठा.

॥ आयुः क्षणलवमात्रं न लभ्यते हेमकोटिभिः क्वापि ॥

वेळाचें चित्र काढावयाचें झालें म्हणजे विलायती चित्रकार एका वृद्ध मनुष्याचें चित्र काढतात. परंतु त्याच्या डोक्यावर अग्रभागीं टक्कल पडलें आहे असें न दाखवितां तेथें एक अल्पप्रमाणावर झुलुपाप्रमाणें केसांचा पुंज दाखवितात व मागल्या भागावर शुद्ध टक्कल पडलें आहे असें दाखवितात. यांत समर्पकपणा फार आहे. कारण काळ येऊन आपल्या अंगावरून गेला नाहीं तोंच त्याच्यापुढें उभें राहून त्याचें झुलूप हस्तानें घट्ट धरिलें तरच कार्य होतें, नाहीं तर तो एकदां निघून गेल्यावर मागाहून धरूं गेलें असतां हाताला टक्कलाचा गुळगुळीत भाग लागल्यानें त्यास पकडतां येत नाहीं व तेणेंकरून कार्यनाश होतो.

यांतील तत्त्वाची ओळख रावसाहेबांस पूर्ण झाली होती. यांच्या इतकी वेळाची किंमत दुसऱ्या हिंदी गृहस्थास एकालाही कळून आली नव्हती व अद्याप नाहीं. सभेस किंवा इतर प्रसंगीं जेथें नेमल्या वेळेवर कार्यारंभ व्हावयाचा असतो तेथें रावसाहेब आले कीं वेळ झाली असें समजावें. अशी त्यांची ख्याति होती. अशा नेमक्या साधलेल्या वेळास ‘ मंडलिकी टाइम ’ अशी संज्ञा लोकांत प्राप्त झालेली आहे. या त्यांच्या गुणाची प्रशंसा मराठी क्रमिक पुस्तकांत घातलेल्या ‘ वक्तशीरपणा व नियमितपणा ’ या धड्यांत आली आहे ती अशी. ‘ मुंबई हायकोर्टाचे प्रख्यात वकील विश्वनाथ नारायण मंडलिक ह्यांचा वक्तशीरपणाबद्दल लौकिक होता. ते इतके वक्तशीर वागत असत कीं त्यांच्या जाण्यायेण्यावरून घड्याळ लावून घ्यावें असें लोक

म्हणत असत. ' * इतका वक्तशीरपणा त्यांस अगदीं पहिल्यापासून साधला होता. डाक्तर हेन्स साहेब व रावसाहेब मिळून दोघेजण वरळी येथील शाळा तपासण्यास जावयाचे होते. रावसाहेब, डाक्तर हेन्स यांच्या बंगल्याच्या गल्लीशीं जातात तोंच डाक्तरसाहेब बंगल्यांत गाडींत बसून निघण्यास तयार होते. २६।८।५७ रो.

वेळांत वेळ काढणें हा तर त्यांचा मुख्य स्वभाव असे. "ने. ज. लायब्ररींत गेलों. आरदेसर व गंगादास यांची वाट पहात बसावें लागलें. बरोबर शास्त्रि-बुवा होते. त्यांजवळ संस्कृत व्याकरणाचा एक धडा घेतला." २२।६।६१ रो.

भोजनसमारंभास रावसाहेबांस आमंत्रण देणें व त्यांचा वेळ संभाळणें हें लोकांस कठीण जाई. " नाना गानु यांकडे जेवावयास जाण्याचें कबूल केलें व उशीर होऊं नये म्हणून सांगितलें. त्यांनीं १०½ होतील म्हणून सांगितलें. १०½ वाजले तेव्हां दुसरा= भात करवून जेवलों." (१७।२।२१रो.)

एकदां एका कामाची वेळ त्यांनीं नेमून टाकिली कीं त्यांत फरक ( मग तो फरक यःकश्चित् मनुष्याकरतां असो किंवा बड्या अमीर उमरावाकरतां असो ) होणें शक्य नसे.

एकदां नामदार गव्हर्नर साहेबांनीं एक वेळ सांगून त्यावेळेवर भेटावयास बोलाविलें असतां त्यावेळेवर करावयाचें म्हणून ठरविलेलें दुसरें काम संपवून भेटावयास संधि मिळेल कीं नाहीं याची खात्री नसल्यामुळें त्यांनीं गव्हर्नर साहेबांच्या खासगी कारभाऱ्यास कळविलें. " आतांच पोंचलेल्या तुमच्या

---

* याप्रमाणें वेळेवर काम करण्याची संवय रावसाहेबांच्या घरच्या माणसांस लागली होती. एक दिवस दुपारीं सुटीचे दिवशीं भोजनाकरतां नेमल्या वेळेच्या अगोदर ४।५ मिनिटें रावसाहेब भोजनगृहांत आले. त्यांस पहातांच आचारी गोविंदराव सातारकर यांनीं घड्याळाकडे बोट दाखविलें. रावसाहेबांस मान्य झालें.

= पंक्तीच्या भातांतील भात एकालाच आधीं वाढूं नये असें शास्त्र आहे.

त्रांत विनंति केल्याप्रमाणें मी नामदार गव्हर्नर साहेबांस भेटावयास येण्याचें झालें तर पाहीन. मला बराचवेळ आधीं कळविलें असतें तर बरें झालें असतें. ”

२१।१०।७१

“मी येथें पुण्यास आज व उद्यां दुपारीं, १ वाजेतों आहें. काउन्सिलचें काम संपतांच जाणार आहें. तेव्हां आज संध्याकाळ व उद्यां दुपार यांचे मध्यें जी वेळ नामदार गव्हर्नर साहेब नेमतील ती मला सवडीची होईल. ”

( मि. लीवार्नर यांस पत्र. )

“तुमचें पत्र रात्रौ उशीरां पोंचलें. माझा सर्व वेळ आगाऊच अन्य कामाला नेमला गेल्यामुळें आज सकाळीं ९ वाजतां नामदार गव्हर्नर साहेबांस भेटतां यावयाचें नाहीं. मधल्या वेळीं पाहिजे तर आनंदानें भेटेन. कारण त्यावेळीं हायकोर्टांतलि माझीं कामें संपतील अशी आशा आहे. ” ( ८।११।७१ )

या प्रमाणें उत्तर ज्यांच्या पुढें नेहमीं काम करावें लागे त्या हायकोर्टाच्या न्यायाधीशांस सुद्धां रावसाहेब पाठवीत असत.

“ आज मला इतकीं कामें आहेत कीं मधल्यावेळीं ४॥ वाजतां मला येतां यावयाचें नाहीं असें लिहावयास मला फार वाईट वाटत आहे. उद्यां दुपारनंतर १ ते ४ च्या दरम्यान एकादी वेळ नामदार साहेब नेमण्याची मेहरबानी करतील तर माझ्यानें होण्यासारखी मदत असेल ती आनंदानें करीन. ”

“ तुम्हीं दिलेल्या वेळेवर तर येणें नाहींच पण या दिवशीं अमूक वेळीं सवड होईल. नाहीं तर नाहीं. ६।१२।७२ ” असें रावसाहेब स्पष्ट लिहीत. याची किंमत फक्त वेळेला त्यांच्या इतकाच बहुमान देणाऱ्या इंग्रज लोकां शिवाय इतरांस समजणार नाहीं. इंग्रज लोकांस याबद्दल मुळींच राग यावयाचा नाहीं.

“ पूर्व संकेत असेल तर चुकामूक होत नाहीं; नाहींपेक्षां इतर व्यवधानें असल्यामुळें एकावेळीं दोन गोष्टी होऊं शकत नाहींत, यामुळें एक सहजींच राहून जाते. हें विचार केल्यास ध्यानांत येईल.” असें त्यांनीं त्यांस नेहमीं वंद्य

असलेल्या विनायकशास्त्री आगाशे यांस २५।९।७४ रोजीं पत्रीं कळविलें; कारण भेट न झाल्यामुळें विनाकारण खेप पडली अशी तक्रार शास्त्रीबुवांनीं केली होती.

रोजचीं लिहावयाचींच पत्रें फार असत. तेव्हां तीं पुरीं करतांना कधीं कधीं म्हणत " डांक पकडण्याकरितां हें पत्र मीं पुरें करीत आहे. " " कोर्टांत जावयाची वेळ झाली हें पत्र सोपविलेंच पाहिजे. "

एका संस्थानिकाशीं त्याच्या आप्तवर्गापैकीं एका स्त्रीच्या कांहीं स्त्रीधना-संबंधें वांधा आला होता. तें काम वेळ आल्यास हिंदुस्थानसरकारापर्यंत पोंचवावयाचें होतें. मेहनताना मोठा मिळावयाचा होता. काम घेऊन येणाऱ्या संस्थानच्या मंडळीस दुसऱ्या दिवशीं काम पाहण्याकरितां सकाळीं अमूक पासून अमूक अशी वळा रावसाहेबांनीं नेमून दिली व तिच्या पुढील वेळ दुसऱ्या अशीलास नेमून दिली. संस्थानच्या मंडळीचा संस्थानी बेत ! ती नेमून दिलेल्या वेळेवर आली नाहीं. नेमलेली वेळ सरेतों रावसाहेब बोलले नाहींत. वेळ सर-तांच रावसाहेबांनीं दुसऱ्या अशीलास हांक मारली. संस्थानची मंडळी मागा-हून येतांच ' तुमच्याशीं व्यवहार करण्यास मला वेळ नाहीं. तुम्हांस वेळाची किंमत कळत नाहीं ' असें सांगून तिला विन्मुख दवडिलें.

' काम स्त्रीधनाचें होतें. अवघड नव्हतें. पूर्ण अपयश येणारेंही नव्हतें. दुसरा कोणी कमी पैशानें पतकरील. तेव्हां आज नाहीं तर उद्यां वेळ नेमा ' अशी विनंति स्नेह्यांमार्फत रावसाहेबांस करण्यांत आली. पण रावसाहेबांनीं मुळींच ऐकिलें नाहीं. व तेंच बरोबर आहे. कारण द्रव्याकरतां जर ढिलेपणा दाखविण्याची संवय रावसाहेबांस लागली असती तर त्यांनीं वेळाची हांती धरलेली शेंडी त्यांच्या हातांतून निसटून गेली असती.

श्रीमंत होळकर सरकार यांचे नोकर गणेशशास्त्री हे हरिश्चंद्र फोटोग्राफर यांस घेऊन बंगल्यावर रावसाहेबांचा फोटो काढून घेण्यास १०½ वाजतां यावयाचे होते. ते उशीरां आले. " फोटो काढावयास बसण्याचा वेळ मला उरला नाहीं म्हणून कामाला निघून गेलों " असा रोजनिशींत उल्लेख आहे.

रावसाहेब एकदां इंदुरास गेले होते. तेव्हां आपली मुख्य तजवीज काय ठेवावयाची तीसंबंधें धोंडो शामराव गरुड यांस जी एक सूचना रावसाहेबांनीं केली होती ती वेळेसंबधाचींच होती. " मी ठरविलेल्या वेळा न चुकविण्याची खबरदारी घ्यावी. "

शेवटीं शेवटीं तर रावसाहेबांना वेळ हा किति अमोलिक वाटत होता त्याची कल्पना पुढील वाक्य देईल. " प्रत्येक दिडकीच्या कामाबद्दल मोहोरेची वेळ दवडण्यापुरतें आतां आयुष्य उरलें नाहीं. " ( बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

## उद्योगनिष्ठा.

। उद्यमेनाहि सिद्ध्यंति कार्याणि न मनोरथैः ।
॥ नहि सुप्तस्य सिंहस्य प्रविशंति मुखे मृगाः ॥ १॥

काळाचा महिमा समजल्यावर मनुष्य उद्योगशील होतोच. रावसाहेबांच्या अंगचा फार मोठा गुण ह्मटला म्हणजे ते केवळ उद्योगाची राशि होते. विद्यार्थिदशेंत असतां रावसाहेबांनीं उद्योगाला आरंभ केला तो नोकरींत * असतां व नोकरी सोडल्यावर जन्मभर चालू ठेवला होता. अविश्रांतपणें उद्योग करण्याची संवय त्यांनीं अभ्यासानें जडवून घेतली होती. उद्योगाला ते अत्यंत महत्व देत असत. आमच्या लोकांची स्थिति केव्हां व कशानें सुधारेल या

*नोकरीवर असतां रावसाहेब वेळ आल्यास घराचीही कचेरी बनवीत. कामाची शिल्लक त्यांना केव्हांही आवडत नसे. एकदां रात्रौ भोजन झाल्यावर रावसाहेब काम करीत दिव्याशीं बसले. उशाशीं त्यांचा नोकर बाळा पांवसकर निजला. त्याला उजेडांत झोंप नीट येईना. जेव्हां जेव्हां जागा होऊन पाही तेव्हां तेव्हां रावसाहेब कामच करीत आहेत असें त्यास आढळलें. रावसाहेब इतके कामांत गढून गेले होते कीं त्यांस रात्र कशी सरली तें समजलें नाहीं. उजाडल्यावर आईस्ली सलाम करावयास आला तेव्हां काम सरलें ह्मणून उठून दुसऱ्या कामाला लागले. ही गोष्ट त्यांच्या उद्योगी स्वभावाइतकीच त्यांची कर्तव्यनिष्ठा व्यक्त करीत आहे.

प्रश्नाचें उत्तर त्यांनीं देऊन ठेविलें आहे त्यांत त्यांनीं उद्योगालाच प्राधान्य दिलें आहे. ( प्रकरण ७७ वें पृष्ठ ९९२ पहा. )

" माझ्या मनांत नेहमीं असा विचार आहे व दिवसानुदिवस तो अधिकाधिक कायम होत चालला आहे, तो हा कीं आम्हीं अजून कांहीं पिढ्या जाईं तों एक सारखें काम-काम-काम करीत रहावयास शिकलें पाहिजे. म्हणजे मग लोकांची स्थिति साधारणमानानें सुधारेल. स्वयंदासास्तपास्विनः अशी म्हण आहे. "

" कार्यासक्ति कोठेंच नाहीं. मी सर्वतः पाहिलें तर विषयासक्ति दृष्टीस पडत आहे. ही इष्ट आहे; पण ती प्रमाणातीत झाल्यास नाशकारक आहे. "

( मुनशी हनुमानप्रसाद यांस इंग्रजींत पत्र १०।३।८५ )

उद्योगसातत्याचा रावसाहेबांस मोहच पडत असे. "होईल तितकें करून, आपण सदयपणें दाखवून दिलेल्या दिशेनें जाण्याचें करीत आहे. पण हल्लींच्या पद्धतीनें कामाचा बोजा फार पडतो, अति काम करून मेंदूला शीण देण्याचा मोह कधीं कधीं इतका पडतो कीं तो आवरतां येत नाहीं, इतक्यांतच मला दिवसाच्या शेवटल्या अवसरांत चष्मा वापरावा लागत आहे. ३९ वें वर्ष अजून पुरें झालें नाहीं तोंच उत्तमांग देशांतील ( मस्तकांतील ) स्थिति बिघडली आहे असें समजलें पाहिजे. मला मजा वाटते म्हणून असलें बोलणें बोलून तुम्हांस त्रास देत असलों तर त्याची माफी असावी. * " सतत परिश्रम करण्याची संवय लावून घेण्याचा उपदेश पुढील पिढीच्या मुलांस रावसाहेब करीत. मी चवथींतून पांचवींत गेलों असें रावसाहेबांस पत्रीं कळविणाऱ्या आपल्या लहान पुतण्यास त्यांनीं उत्तर लिहिलें तें:—" चार किंवा पांच यत्ता एवढें शिक्षण कांहीं नाहीं. एक क्षणहि व्यर्थ जाऊं न देणें आणि परिश्रम करणें ही पहिली व शेवटची यत्ता होय. "

हा उद्योग ते सतत नियमानें करीत व तसें दुसऱ्याकडून करवून घेत. न. ओपिनिअनचे शेवटीं शेवटींचे एडिटर दा. कृ. करंदीकर बी. ए. एल्. एल्. बी. यांस रावसाहेबांनीं हायकोर्टातील महत्वाच्या निकालाची नोंद ज्या

* ज जेकब यांस पत्र.

कायद्याप्रमाणें ते निकाल झाले असतील त्या त्या कायद्याच्या पुस्तकांत प्रस्तुत कलमाशीं नियमानें करून ठेवण्यास सांगितली होती. त्याची चौकशी करतांना रावसाहेबांनीं दामोदरपंत यांस लिहिलें "माझा न्यायसंग्रह तुम्हीं सूर्यचंद्र यांचा नियमितपणा दाखवून करीत असालच. हें आजचें काम आणखी दहा वर्षांनीं पुस्तकारक होईल." १३-२-८६. यावर दामोदरपंतांनीं नुसतें 'होकारार्थी' उत्तर पाठविलें. तेवढ्यानें समाधान न होऊन रावसाहेबांनीं पुन्हां लिहिलें.

"× × × सूचीचें काम पुढ चालू आहे, हें लिहिलेंत तें ध्यानांत ठेविलें आहे. पण काम नुसतें चालू आहे हा मुद्दा नाहीं. तुम्हीं नियमानें नेमलेल्या वेळांत क्षणहि मागें पुढें होऊं न देतां घड्याळाबरोबर काम चालविलें आहे काय ?" ( २४।२।८६ चें दा. कृ. करंदीकर यांस पत्र )

घरीं नातेवाईक अथवा स्नेही यांनीं रिकामें बसण्याचें मनांत आणल्यास त्याला स्वस्थानीं जावयास रावसाहेब सांगत. "निरुद्योगानें कोणाचें हित झालें नाहीं." "क्ष"ला परत घरीं लावून द्यावा. ( बाळकृष्ण सायण्णा यांस पत्र )

सतत श्रम करण्याचें सामर्थ्य रावसाहेबांनीं संवयीनें अंगांत आणलें होतें तें त्यांस ईश्वराची एक देणगीच वाटे. व त्या सामर्थ्याचा उपयोग करून घेण्यांत अगदीं अगदीं शेवटपर्यंत न्यून नाहीं म्हणून त्यांचें त्यांनाच गूढ वाटे. ( प्रकरण २३ पृष्ठ २४९ पहा. )

ही सतत श्रम करण्याची हिम्मत फक्त इंग्रज गृहस्थांत आढळते. अविश्रांत उद्योगानें त्यांच्या प्रकृतीवर परिणाम होईल अशी काळजी रावसाहेबांच्या मित्रांस वाटूं लागली तेव्हां त्यांचे स्नेही डॉ. कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनीं त्यांस विश्रांति घ्यावयास सांगितली. तेव्हां रावसाहेब म्हणाले. "मनुष्याचा आयुष्यक्रम म्हणजे दीर्घकालीन संवयीच होत. मला अशी संवय लागून गेली आहे कीं मी काम करीन व माझें शरीर झिजवीन पण स्वस्थ बसून त्यास तांब लागूं देणार नाहीं."

रोजनिश्या तपासतां असें आढळतें कीं पहांटे ४।५ वाजल्यापासून रात्रौ ९ १० वाजेतों सारखा उद्योग त्यांचा चालत असे. निरुद्योगी मनुष्य त्यांना

आवडत नसे. सारखी चळवळ करीत मनुष्यानें राहिलें पाहिजे असें जें त्यांचें मत होतें तें त्यांनीं सार्वजनिक संस्थांस सुद्धां लाविलें होतें. "मी मुंबईला महाबळेश्वराहून आल्यापासून तरी सुस्ती आली आहे. म्हणून तिनें ( मुंबईनें ) केलेल्या पण तुम्हांला अद्यापि न कळविलेल्या अशा कामाची मोठीशी बाकी मजजवळ लिहिण्यास शिल्लक नाहीं."

"आमच्या संस्था डुलक्या देत बसल्या आहेत. वल्हीं पाडून त्यांवर डोकें टेंकून झोंपा काढीत आहेत असेंच केवळ माझ्यानें म्हणवत नाहीं. कोणी कांहीं म्हटलें तरी त्यांच्या हातून झालेलें काम अगदींच थोडें आहे. फलाची अपेक्षा न करतां सतत अविश्रांतपणें सारखें काम करीत आम्हीं राहिलें पाहिजे. सारांश आम्हीं सृष्टीचें अनुकरण केलें पाहिजे. आकाशांत सूर्य व चंद्र यांचा प्रकाश विद्युत्प्रकाशाप्रमाणें क्षणध्वंसी नसतो." (२४।५।८६ चे कलकत्त्याचे रुस्तमजी मेथा यांस पत्र. )

## कर्तव्यनिष्ठा.

**जायमानो वै ब्राम्हणस्त्रिभिर्ऋण वा जायते ।**
**ब्रम्हचर्येण ऋषिभ्यः यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः ।**
**एषवा अनृणो यः पुत्री ।** ( तैत्तिरीय कृष्णयजुः )

मनुष्य जन्मास आला कीं वर दिलेलीं देवर्षिपितृविषयक तीन ऋणें फेडण्याची जबाबदारी तो आपणाबरोबर घेऊन येतो. हींच ऋणें मनु आपल्या काळांत पांच आहेत असें म्हणूं लागला, त्यानें भूतांचें ऋण चवथें घालून अनिथींचें पांचवें घातलें आहे व त्याच्या फेडीला टीकाकार रामचंद्रानीं नृयज्ञ म्हटलें आहे.

त्या वेळेस या नृयज्ञाचा अतिथिपूजनांत शेवट झाला होता. पण हल्लींच्या काळाला त्याला विस्तृत अर्थ प्राप्त होऊन पांचवें ऋण फार व्यापक झालें आहे. व त्याची व्याप्ति लोककल्याणापर्यंत झाली आहे. या व्यापक अर्थी रावसाहेबांनीं आपलें कर्तव्य कसें केलें त्याचा विचार या विवेचनांत केला

आहे. रावसाहेबांनीं आपल्या पत्नीस लिहिलेल्या कर्तव्यविषयक पत्रांत यालाच मनुष्यां मनुष्यांतील कर्तव्य असें नांव दिलें आहे. पहा पृष्ठ ७८. या लोक-कल्याणास आरंभ आप्तेष्टांच्या कल्याणांत होतो व सार्वजनिक कल्याणांत तें पर्याप्त होतें. हें द्विविध कल्याण रावसाहेबांनीं अहर्निश केलें आहे व तें अहेतुक केलें आहे.

प्रसिद्ध विद्वान पुरुष मि. एडवर्ड व्हियाटसेक म्हणे " तुम्हीं लोककल्याण त्वरित करितां, तुम्हीं मोठे जादूगार आहांत. " शिक्षण देणें, नोकरी लावणें बढती देववणें, व बदली करणें व वेळेस रजाही देववणें या सर्व गोष्टी शक्य तेथें योग्यता पाहून आनंदानें रावसाहेब करीत.

या नोकरी लावून देण्याच्या कामास, त्यांनीं कच्छला असतां आपले मित्र कृष्णाजीपंत नूलकर यांस आपले जागेवर नेमवून प्रारंभ केला* व तेथून निघाल्यावर मुंबईहूनही तें काम केल्याचीं उदाहरणें आहेत. दुसऱ्या कांहीं मित्रांच्या पत्रांत शेवटला मजकूर नेहमीं नोकरीचा किंवा बढतीचा असे. हीं कामें करण्यांत रावसाहेब फार विवेक वापरीत असत. एका गृहस्थाला योग्यते-प्रमाणें एका ठिकाणीं अगदीं शेवटली म्हणजे वीस रुपये महिना पगाराची जागा देववली होती. त्याचप्रमाणें वीस या संख्येच्या बऱ्याच पटीनें पगार असलेल्या जागा यांच्या शिफारशीनें मिळाल्याचे दाखले आहेत, म्हणजे त्या त्या जागा मिळालेल्या स्नेह्यांचीं कृतज्ञतापूर्वक लिहिलेलीं पत्रें आहेत.

" बापूदादा मोडक यांचा मुलगा बाळा मोडक माझा शेजारी व बाळ-मित्र, याला उपयोगी पडण्याची संधि आली म्हणून मला आनंद होत आहे.

---

* ही कर्तव्यनिष्ठा कित्येक अधिकाऱ्यांस आवडली नाहीं. सिंधमध्येंच यानंतर रावसाहेबांच्या एका स्नेह्यानें तेथील एका जागेविषयीं बोलणें काढलें तेव्हां त्यांस उत्तर मिळालें कीं मि. मंडलिक हे ही जागा भरण्यांत डा. हार्कनेस यांस मदत करतील. हें उत्तर औपरोधिक असून नूलकरांची नेमणूक रावसाहेबांनीं करून घेतली या गोष्टीशीं त्याचा संदर्भ असावा अशी शंका घेऊन ही हकीकत त्या मित्रानें रावसाहेबांस कळविली.

कृष्णराव यांनीं आपल्या पेट्यांत जागा देण्याचें कबूल केलें आहे. माझ्या जीवाला तेणें करून किति स्वास्थ्य वाटत आहे ! पोराला कोठें तरी लावून देण्याविषयीं आतुर होतों." ( १।२।५७ रो. इं. उ. )

" ही जागा सोडून जातांना राघोपंत यास फार वाईट वाटलें. तो मुलाप्रमाणें अश्रु गाळूं लागला. माझें मन द्रवलें. यापेक्षां दोन शिव्या देऊन तो गेला असता तर तें पतकरिलें असतें. दया ही आत्म्यास पाझर आणते. इतकें झाल्यावर तो गेला. ईश्वर त्यास यश देवो. " ( १६।८।५८ रो. इं उ. )

पुढें रावसाहेब स्वस्थ बसले नाहींत. " भाई यांस भेटलों. त्यांनीं राघोपंतास जागा देण्याचें कबूल केलें व मग मी घरीं आलों. "

( १२।९।५८ रो. इं. उ. )

महामहोपाध्याय या पदवी* सारख्या मोठ्या पदवीकरतां रावसाहेबांनीं लोकांची शिफारस केलेली आढळते. परंतु त्या सर्व शिफारसी ज्या एका तत्त्वावर ते करीत असत, त्याचा उल्लेख पुढील पत्रीं त्यांनीं केला आहे. " पदव्यांचें दान अशा प्रकारें करावें कीं, तेणें करून साम्राज्यास बळकटी येईल. "

( एका इंग्रज मित्रास पत्र )

या व्यक्तिविषयक कर्तव्या शिवाय नागरिक या दृष्टीनें रावसाहेबांनीं कर्तव्य निष्ठा कशी दाखविली तें पाहूं. हें कर्तव्य बजावण्यास लोक सर्वदा सतत पुढें येतात असें नाहीं. कारण त्यांत धोका आहे. उद्योगानें यशाची प्राप्ति होते. नाहीं असें नाहीं. परंतु जीं कामें व्यक्तिविषयक असतात त्यांत यशःप्राप्ति झाली नाहीं, नफा नुकसान वेळेनुसार झालें तरी चालण्यासारखें असतें; परंतु सार्वजनिक कामाची गोष्ट नीराळी असते. अंगावर घेऊन एकादी गोष्ट केली तर तींत यशःप्राप्ति करून दाखवावी लागते. नाहींतर निंदकांचें फावतें. ही भीति सार्वजनिक कामांत पडणाऱ्या लोकांस नडते. या भीतीनें कार्याचा अनारंभ, आरब्धकर्मत्याग इत्यादि दोष त्यांच्याकडून घडतात. या दोषांस राव-

* प्रकरण ६७ वें, पृष्ठ ८२५ पहा,

साहेब पात्र झाले नाहींत. " आम्हीं चमत्कारिक परिस्थितींत येऊन पडलों आहोंत. तथापि कार्याभिलाषी मनुष्यानें कार्यें केलींच पाहिजेत. मला तर नुसत्या कार्यारंभांत सुद्धां सुख वाटतें. "

( सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांस १९।६।८४ चें पत्र. )

कार्यारंभांत जेवढें सुख रावसाहेब मानीत तेवढेंच सुख तद्विषयक उद्योग चालू ठेवण्यांत मानीत. कारण रावसाहेब हे कर्मवीर होते. रावसाहेब फळाची आशाच ठेवीत नसत. फळाचा हेतु ठेवूं नको. व अकर्मप्रवृत्तीचा अंगिकार करूं नको. याविषयीं रावसाहेबांनीं एक निबंध ' मा कर्मफलहेतुर्भूः माते संगोऽस्त्वकर्मणि ' या गीतावाक्यावर लिहिला होता. प्रकरण १८ पृष्ठ १५३ पहा.

" ज्या आमच्या कामांत फलाची प्राप्ति होत नाहीं. त्यां आमच्या कामांत पडतो कोण ? " अशी त्यांचे सहकारी मित्र कामा यांच्या निधनाविषयीं एका लिहिलेल्या दुखवट्याच्या पत्रांत रावसाहेबांनीं पृच्छा केली आहे. पृष्ठ १११ पहा.

कार्याचा उत्तम मोबदला म्हणजे कर्म केल्याबद्दलचें समाधान होय. असें रावसाहेब म्हणत. प्रकरण ६६ पृष्ठ ८१ पहा.

या शिवाय सार्वजनिक काम करतांना त्यांचा भरंवसा एका मोठ्या उच्च तत्त्वावर होता. ते म्हणत " माझ्या मनोदेवतेचा कौल घेऊन मी कार्यास आरंभ केला आहे. व पुढील काम परमेश्वरावर भरंवसा ठेऊन करीत राहणार, त्याला साऱ्याची चाड आहे. "

* " माझ्यासारखे पुरुष जे गांवकाकूला धाब्यावर बसवितात त्यांस अंगीकृत कार्यांत साहाय्य मिळणें तें आपल्या अंतःकरणाचेंच होय. "

---

* Fellows like myself who set Mrs. Grundy at defiance must turn inward for support. मिसेस ग्रन्डी ही एक कविसांप्रदायिक व्यक्ति आहे. समाजांतील कांहीं भाग, ज्याच्या मताला क्वचित् मान असतो, त्याचा वाचक मिसेस ग्रन्डी हा शब्द आहे. या बाईंना गांवकाकू म्हणतां येईल.

याच उच्च तत्त्वावर सार्वजनिक महत्वाच्या कामांत त्यांची भिस्त होती अशाविषयीं बरेच उल्लेख त्यांच्या पत्रीं सांपडतात. त्यांतील कांहीं दिले आहेत.

"आतां लोकांतर झालें आहे. उच्च लोकाच्या प्राप्तीची आशा नसती, तर आमची स्थिति फार दुःखावह झाली असती."

( बाळकृष्ण सायण्णा यांस पत्र. ५।३।८५ )

"जितकें कर्तव्य आहे तितकें केल्यावर सर्व लोक कांहींही म्हणोत मी तें सर्व सर्वांचा जो पहाणारा त्याचेवर ठेवतों" असेंही ते आपल्या स्नेह्यांस वारंवार म्हणत.

"मला एक परम उच्च शक्तीला जाब द्यावा लागेल अशा भरंवशानें मी वागत आहें. तीच महाशक्ति मला प्रसंगीं साहाय्य करील."

( २९।२।१८८५ चें गणपतराव भास्कर कोठारे यांस पत्र )

"या अशुद्ध विषयावर नजर ठेवा. हें चालविलेलें युद्ध लांबेल व निकरावर येईल. मला मदत चांगली मिळेल असा भरंवसा आहे. परिणाम होणें तो त्या उच्च महाशक्तीच्या हातांत आहे" ( संयोगजन्य रोगाच्या कायद्याविरुद्ध चळवळ करतांना लिहिलेलें पत्र. )

"आमच्या शहरचें होकायंत्र काय दाखवितें तेंच कधीं कधीं समजत नाहीं. तथापि काम करतांना माझा एक असा भरवंसा आहे कीं आम्हां सर्वांचें नियमन करणारी उच्चतम शक्ति आहे व त्या शक्तीवर मी पूर्णपणें विसंबून असतों. तीच शक्ति आपल्या हृदयांत उजेड पाडून मार्ग दाखविते. त्या मार्गानें सरळ जाणें एवढेंच आपण काय तें करावयाचें असतें."

२१–२–८५ हरकिसनदास यांस पत्र.

त्यामुळें अंगावर घेतलेलें काम तडीस न्यावयाचा त्यांचा निश्चय मध्येंच ढांसळत नसे व '**आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः**' या उक्तीस रावसाहेबांनीं चांगलाच हरताळ लावून ठेवला होता.

हें कर्तव्य करीत असतां कामाच्या ओरडीवर त्यांनीं प्रेम ठेवलें नाहीं. तें तसें ठेवलें म्हणजे ओरडीच्या व्यस्त प्रमाणांतच हातून कृति होते, हें उघड

आहे. "लोकांस भपका पाहिजे, डांगोरा पिटावयास पाहिजे. सूर्य, चंद्र, तारे व समुद्र आपल्या नांवाचे जाहीरनामे लावीत असतात काय ?"

( बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

खोती कज्जांस रावसाहेबांनीं आपल्याला वाहून घेतलें होतें. स्वतांच्या फायद्यावर सुद्धां त्यांनीं त्या कज्ज्यांस पद देऊन ठेविलें होतें. असें पुढील वृत्त सांगतें.

१८७३ च्या सुमारास बडोदा संस्थानांत कांहीं हुद्याची जागा मिळण्याविषयीं वाटाघाट चालली होती. ती रावसाहेबांनीं पतकरली असती तर ते ज्या कांहीं अटी घालणार होते त्यांत मुख्य अट ही होती कीं, खोती कज्ज्यांचा निकाल करून घेते वेळीं त्यांना मुंबईस हजर राहण्याची सदर परवानगी असली पाहिजे. ( १५।८।१८७३ चें एका स्नेह्यास पत्र. )

अशा रीतीनें परम उच्च शक्तीवर भरंवसा ठेऊन, मनाच्या समाधाना व्यतिरिक्त अन्य मोबदल्याची आशा केल्याशिवाय, डांगोरा न पिटतां सार्वजनिक काम कर्तव्य म्हणून केलें असतां यशस्वी कां होणार नाहीं ? रावसाहेबांनीं सार्वजनिक कल्याणाची कामें अप्रतिम कर्तव्यनिष्ठेच्या जोरावर करून केवढें यश संपादन केलें तें म्युनिसिपॅलिटी, मुंबईचें काउन्सिल, कलकत्ता काउन्सिल, खोती कज्जा, वकिली, इत्यादि प्रकरणें वाचलीं म्हणजे कळेल.

पुण्य करावें इतकें म्हटलें म्हणजे पापाचरण करूं नये असें ध्वनित होतें, त्याचप्रमाणें कर्तव्य करावें असें म्हटलें म्हणजे अकर्तव्य तें करतां कामा नये. कर्तव्य करण्याच्या निष्ठेइतकीच अकर्तव्य न करण्याची निष्ठा पाहिजे. ती ही दाखविण्याची रावसाहेब खबरदारी घेत.

" मीं सांगणार आहें तें आपण कराल का ?" असा प्रश्न आगाऊ वचन घेण्याकरतां त्यांच्या मातोश्रीनें पत्र लिहविलें त्याला उत्तर रावसाहेबांनीं लिहिलें तें:—"असद्‌वादाशिवाय दुसऱ्या कोणत्याही भीतीनें कर्तव्य न केलें व अकर्तव्य तें केलें असें बुद्धिपुरःसर झाल्याचें अजूनपर्यंत आठवत नाहीं. जसें लिहून येईल तसें त्यांतून होण्याजोगें असेल तें करण्याचा प्रयत्न करीन."

## आशावादित्व.

कर्तव्यनिष्ठा अंगांत अशी बाणल्यामुळें रावसाहेबांची कर्तृत्वशक्ति वाढली. क्रियेचें फळ हें अल्प स्वल्प मिळावयाचेंच असा सृष्टीचा नियम असल्यामुळें रावसाहेब हे पक्के आशावादी झाले. अथवा असेंही म्हणा कीं, रावसाहेब आशावादी होते म्हणूनही ते कर्तृत्ववान पुरुष झाले. म्हणजे त्यांच्यांतील आशावादित्व व कर्तृत्वशक्ति हे दोन गुण परस्पर पोषक झाले. कसेंही असो. तेणेंकरून त्यांच्याहातून अनेक देशहिताचीं कार्यें झालीं तीं नुसत्या विचारी पण निष्क्रिय माणसाच्या हातून होत नाहींत. तो निराशावादी बनून "कसले आम्हीं !" असा आपला आपणच तिरस्कार करूं लागतो व स्वतां बुद्धिकूप असून लवाणाम्बु झाल्याप्रमाणें लोकांस निरुपयोगी होतो. आशावादी मनुष्याची गोष्ट निराळी.

"मी आशावादी आहें. तरी मला एवढें कबूल केलें पाहिजे कीं माझी श्रद्धा कसोटीला चांगली लावून घेण्यांत येत आहे." (७।११।७५ चें ज. जेकब यांस पत्र.)

"मी आशावादी आहें. म्हणून या क्षुद्रबुद्धिजनक लहानशा झगड्यास न जुमानतां काम करूं शकतों." (१३।३।७६ कित्ता.)

"तुमच्या शिवाय कोणांत सजीवता दिसून येत नाहीं. तुम्हींच लत्ताप्रहारानें चेंडू सर्व मैदानाभर फिरत ठेविला आहे. दुसरे सर्व हताश होऊन स्वस्थ बसले आहेत. तुम्हांला आशेनें जन्म दिला आहे. तुमच्या सारख्या प्लवनशील मनुष्यांची हिंदुस्थानाला गरज आहे." (मुत्तुकुमार स्वामी यांचें २९।१।१८६५ चें पत्र)

मात्र त्यांचें आशावादित्व म्हणजे तळ्याच्या कांठीं गळ टाकून संध्याकाळ पर्यंत एकाही मत्स्यानें उत्तेजन दिलें नसतां स्वस्थपणें तिष्ठत बसणाऱ्या मत्स्यमाऱ्याप्रमाणें नव्हतें. उद्योगावर त्यांची भिस्त होती.

## सुखदुःखाविषयीं औदासिन्य.

**। सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखं ।**
**॥ द्वयं एतद्धि जंतूनामलध्यं दिनरात्रिवत् ॥ १ ॥**
**। सुखमध्ये स्थितं दुःखं दुःखमध्ये स्थितं सुखं ।**
**॥ द्वयमन्योन्यसंयुक्तमुच्यते जलपंकवत् । ॥ २ ॥**
**। तस्मात् धैर्येण विद्वांस इष्टानिष्टोपपत्तिषु ।**
**॥ न द्रवंति न मुह्यंति सर्वं मायेति भावतः ॥ ३ ॥**

कर्तव्यनिष्ठ पुरुषाच्या अंगांत आणखी एक गुण अवश्य असतो तो हा कीं सुखदुःखाविषयीं उदासीनता. तो **रावसाहेबांमध्यें** होता. एकाच पत्रांत जितका सौख्यप्रदर्शक मजकूर असे तितकाच दुःखप्रदर्शक असे. सुख झालें म्हणून तेवढ्याच भावनेंत **रावसाहेब** दंग होऊन जात नसत किंवा दुःख झालें म्हणून त्याच्याखालीं चेंगरून जात नसत. अत्यन्त प्रेमाचें व सुखाचें कारण जी त्यांची प्रिय पत्नी तिच्या निधनानें प्रवाहपतित कार्यांचा त्याग त्यांनीं केला नाहीं. प्रिय पत्नीचें निधनवृत्त प्रसंगोचित शोकमय शब्दांत पहिल्या वाक्यखण्डांत कथन करणाऱ्या, मित्रांस लिहिलेल्या पत्रांत दुसऱ्या वाक्यखण्डांत इतर वृत्त लिहिलेलें सांपडतें; कारण **रावसाहेब** सुखदुःखाचें जें तत्त्व आहे तें जाणून होते. तें त्यांनीं एका पत्रीं एका स्नेह्यास लिहिलें होतें. “ आघात आणि प्रत्याघात हे सारखेच असतात; हा शुद्ध बेरीज आणि वजाबाकीचा प्रकारविशेष आहे म्हणून सुखा इतकें तरी दुःख झाल्याशिवाय रहात नाहीं. ” हें ज्ञान झालें कीं विद्वान पुरुष सुखदुखाविषयीं उदासीन होतात.

## विघ्नविरोधिता.

**॥ विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ॥**
**॥ प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥** ( भर्तृहरि )

कर्तव्यनिष्ठेच्या जोरावर **रावसाहेबांच्या** अंगांत विघ्नांशीं सामना देण्याची प्रवृत्ति उत्पन्न झाली होती. तिच्यामुळें आरब्धकार्यांचा त्याग त्यांनीं विघ्नांना

भिऊन कधीं केला नाहीं. किंबहुना विघ्नें आलीं तर त्यांस स्फुरणच चढत असे. याचें प्रत्यंतर रेव्हिन्यू सर्व्हेचा कायदा, रेव्हिन्यू जुरिस्डिक्शन बिल यांविषयींचीं प्रकरणें २२ व ४३ वीं अनुक्रमें वाचलीं म्हणजे समजेल.

याच गुणाचें अवलंबन रावसाहेब शेवटपर्यंत करीत आले.

" सर्वभर प्रतिकार स्वरूपाची चळवळ चालू आहे. उद्योगसातत्य व धैर्य या गुणांनीं त्यांशीं सामना केला पाहिजे. मार्गांत विघ्नें फार येत आहेत; परंतु मी त्यांस गुरूप्रमाणें मान देतों. ( दि. ब. रघुनाथराव यांस पत्र १६।८।१८८४ )

## स्वावलंबन.

### स्वयंदासास्तपस्विनः

ऐश्वर्यवान लोकांत स्वावलंबन कमी असतें व त्यामानानें ते परावलंबी असतात. रावसाहेब ही गोष्ट कबूल करीत. कोणाला कांहीं झालें म्हणजे ते आपल्या नोकरांना जपत. ते म्हणत "बाबांनों ! तुमच्या पायांनीं मी चालतों म्हणून ते मजबूत असले पाहिजेत. " परंतु वेळ आली तर वाटेल तें काम करण्याची त्यांची तयारी असे व ते तें लागलेंच करावयास लागून म्हणत " स्वयंदासास्तपस्विनः " एकवेळ जेवण करून भोजन करण्याचा प्रसंग आला तो त्यांनीं स्वावलंबनाचरणानें साजरा केला. " माझा मेव्हणा रामकृष्ण * व मी दोघांनीं जेवण करून जेवलों. " (रो. उ. १९।३।१८६५).

## सत्वनिष्ठा.

**। सुलभेष्वर्थलाभेषु परसंवेदने जने ।**
**॥ क इदं दुष्करं कुर्यादिदानीं शिबिना विना ॥ १ ॥**

( मुद्राराक्षस )

" पृथ्वी फिरली तरी सत्त्व जाऊं नये " असें रावसाहेब नेहमीं म्हणत. सत्व राखण्याचें व्रत फार कठीण आहे. तें सत्व म्हणजे काय त्याची कल्पना

* प्रस्तुत ग्रंथकाराचे परम पूज्य वडील.

स्वप्नींचें राज्यदान जागृतावस्थेंत ज्या सत्वधीर नृपतीनें पुरें केलें त्या हरिश्चंद्र राजाची कथा आदरानें वाचणाऱ्या, अतिथि विन्मुख जाईल म्हणून पोटच्या मुलाचें उखळांत ओंव्या म्हणत कांडण करणाऱ्या चांगुणादेवीचें चरित्र प्रेमानें ऐकणाऱ्या, किंवा श्येनपक्षापासून त्याचें खाद्य जो कपोतपक्षी त्याचें संरक्षण करण्याकरतां आपल्या मांडीचें मांस काढून श्येनपक्ष्यास देणाऱ्या शिबी राजाची गोष्ट कौतुकानें मनन करणाऱ्या, एकट्या हिंदूसच होईल. असलें कठीण सत्व रावसाहेबानीं पाळिलें असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येईल. आकस्मिक कारणावरून गाडी चुकली असतां आपल्या खर्चानें स्पेशल ट्रेन काढून कोर्टांत वेळेवर कसे हजर राहिले व फौजदारी कज्जांतून आपल्या अशीलास दोषमुक्त कसें केलें तें प्रकरण १९ वें पृष्ठ १७९ वाचलें असतां कळेल. खोती कज्जाकरतां स्पेशल बोट केल्याचें वृत्त प्र. ४२ पृ. ५४२ येथें दिलें आहे.

## स्पष्टोक्ति.

**। अपृष्टेनाऽपि वक्तव्यं सचिवेनात्र किंचन ।**
**॥ पृष्टेन तु स्फुटं वाक्यं ऋतं पथ्यं प्रियाऽप्रियम् ॥**

( भट्ट नीलकंठकृत नीतिमयुख )

स्पष्टोक्ति करण्याचा गुण रावसाहेबांनीं आपलासा करून ठेविला होता. तो वाटेल त्याला साध्य नाहीं. जी उक्ति स्पष्टपणें करावयाची असते ती सत्य असली पाहिजे. नाहींतर खोटेपणा पदरांत येतो. हितकारक असली पाहिजे. नसेल तर कोणाचा फायदा न होतां दुसऱ्यांचीं मनें दुखविलीं जातात. शिवाय प्रसंग पाहूनच स्पष्ट बोललें पाहिजे, नाहींतर अनौचित्य दोष अंगास लागतो. आणखी शेवटची शर्थ अशी आहे कीं, स्पष्ट बोलणाऱ्याकडे तसा अधिकार पाहिजे नाहींतर औधत्याचा आरोप येतो. परंतु वरील तिन्ही अटी संभाळल्यावर जें स्पष्ट बोलावयाचें तें प्रिय वाटो अथवा अप्रिय वाटो तिकडे पाहण्याचें कारण नाहीं. अशी स्पष्टोक्ति रावसाहेबांनीं केलेली जागोजाग या ग्रंथांत दिलीच आहे. तिची द्विरुक्ति करण्याची अवश्यकता नाहीं.

परंतु तें काम किति कठीण आहे व कित्येक ठिकाणीं तिचा सन्मान कसा ठेवला जातो तें रावसाहेब पूर्ण जाणून होते.

" आतां कोणी गाऱ्हाणें करतां कामा नये. टीका करणारा पाखांडी व त्यानें केलेली टीका म्हणजे ईश्वराची निंदाच होय. ! "

( ख्रिस्तोदास पॉल यांस पत्र. )

" स्वताचें असें कांहीं मत बाळगणें गुन्हा गणला जातो व तें उघडपणें बोलून दाखविल्यास मुंबईचें दैनिक वृत्तपत्र व त्याचे अनुयायी यांनीं व्याख्या केल्या आहेत त्यांप्रमाणें तें राजद्रोहांत येईल. "

" जर आपण तोंडें वांकडीं करून ' महाराज आपण म्हणतां तें तसेंच ! ' असें रडत म्हणालांत तर ' वा ! वा ! ' अशी सर्वत्र गर्जना होईल. परंतु जर आपलें असें कांहीं मत चुकून बोललांत तर तुमच्यावर सडकण्यास अद्यापपर्यंत कोणीही न वापरलेली अशी शिवी उरणार नाहीं. "

( १८।११।७९ चें सर वेडरबर्न यांस पत्र )

८१७ पानावर अशीच स्पष्टोक्ति सांपडेल. हा स्पष्टोक्तीचा गुण सोडून दिला तर काय करावें लागेल त्याचें वर्णन त्यांनीं पुढील पत्रांत केलें आहे. "आपलीं पुस्तकें घेऊन कोठडींत स्वस्थ विश्रांति घेत पडण्यापलिकडे कोणाला कांहीं करतां यावयाचें नाहीं ! " ( ५।९।७९ ज. जेकब यांस पत्र. )

अशी विश्रान्ति रावसाहेबांनीं कधीं घेतली नाहीं. "शेतकऱ्यांची पत कमी करून त्यांस कर्ज काढणें कठीण केलें तर काय होईल असा प्रश्न सरकारी बंगल्यांत निघाला असतां मीं स्पष्ट सांगितलें कीं, हा प्रश्न फार व्यापक व नाजूक आहे व काय करणें तें विचारपूर्वक केलें पाहिजे; शिवाय याचा विचार करणें हें कायदेकानू करणाऱ्या आपल्या सभेच्या अधिकारांतलें आहे कीं नाहीं याबद्दल माझी खात्री नाहीं. " ( रो. )

स्पष्टोक्ति करतांना त्यांची भावना काय होती तें त्यांनीं ज. जेकब यांस

एका पत्रीं कळविलें होतें. “सनदशीर* इंग्रज गृहस्थ गुंतागुंतीच्या सरकारी कारभारास मदत करण्याची जशी खटपट करील तशी मी करीत आहें व गेल्या पंधरा वर्षांपासून करीत आहे.” (५।९।७९) पुढेंही वीस वर्षें म्हणजे यावज्जीव अशी खटपट त्यांनीं केली हें वाचकांस कळून आलें असेलच.

## सत्यनिष्ठा

### नहि सत्यात्परोधर्मः

या स्पष्टोक्तीच्या मुळाशीं सत्यनिष्ठा असते. तोही गुण रावसाहेबांनीं आपलासा केला होता. सत्याचा महिमा रावसाहेबांनीं म्हैसूरसंबंधाच्या पुस्तकांत गाईला आहे. पृष्ठ ३५० पहा.

असत्य बोलल्याबद्दल रावसाहेबांनीं व्हिजिटर असतां एका शिपायास बडतर्फ केलें होतें. पृष्ठ ५९. पहा.

सत्या विरुद्ध मी कोणतीही गोष्ट ऐकून घेणार नाहीं असा त्यांचा निश्चय होता. पृष्ठ ९६ पहा.

एका पत्रांत त्यांनीं आपल्या एका मित्रास लिहिलें कीं आमच्या लोकांचें शिक्षण सम्यक् व साद्यन्त झालें पाहिजे. सत्याची पूजा जनकाच्या वेळीं, भीष्माच्या वेळीं, व श्रीरामाच्या वेळीं जशी करीत होते तशी त्यांनीं केली पाहिजे.

नहि सत्यात्परोधर्मः हें वाक्य त्यांच्या मुखांत नेहमीं असे. “व्यवहार मयुख” हा ग्रन्थ त्यांनीं फार परिश्रमानें छापून प्रसिद्ध केला तो सत्यान्वेषणा करतां ह्मणजे खरें खरें हिंदुधर्मशास्त्र कसें आहे त्याचा शोध करून तें दाखवून देण्याकरतां, त्या ग्रंथाच्या पहिल्या पृष्ठावर वरील म्हण त्यांनीं छापली आहे.

## स्वार्थत्याग.

ही सत्यनिष्ठा, ही सत्यप्रीति पुष्कळ उत्तम मंगलदायक गुणांची जनयित्री आहे. या सत्यप्रीतीपासून मनुष्याच्या हातून स्वार्थत्याग घडत असतो. स्वार्थ-

* Constitutionalist.

त्यागाच्या आड फक्त आत्मप्रीतिच येत असते या आत्मप्रीतीमुळेंच मनुष्य आपली होडी वादळांतून वांचवण्याकरतां सार्वजनिक हिताची मोठी नौका बुडवावयास उद्युक्त होतो. परंतु जशी जशी सत्यप्रीति वाढते तशी तशी आत्मप्रीति नष्ट होत जाते. व जसजसा आत्मप्रीतीचा विनाश होतो तसतसा स्वार्थत्याग मनुष्याच्या हातून घडतो. ज्या तत्त्वाकरतां स्वार्थत्याग करावयाचा त्याची सत्यता पटली पाहिजे. सार्वजनिक हित स्वार्थापेक्षां अधिक मूल्यवान आहे. या तत्त्वाची सत्यता पटली कीं आत्मप्रीति त्या मानानें नष्ट होते व मनुष्य आपली स्वार्थाची होडी सार्वजनिक हिताची मोठी नौका वांचविण्याकरितां बुडविण्यास तयार होतो. हा साधारण मनुष्याच्या हातून न घडून येणारा स्वार्थत्याग तीन प्रकारचा आहे. लोकांकरतां आपली काया झिजविणें, काळ खर्च करणें अथवा कांचन वेचणें. हा त्रिप्रकारचा स्वार्थत्याग फार मोठ्या प्रमाणांत रावसाहेबांनीं दाखविला आहे. तो कसा तें मुख्यतः नेटिव्ह ओपिनियन, म्युनिसिपॅलिटी, मुंबई व कलकत्ता येथील काउन्सिलें, व विश्वाविद्यालय इत्यादि प्रकरणें पाहिलीं म्हणजे कळून येईल.

## तक्रारीपणा.

They have rights who dare maintain them.

(Lowell)

। तैरेवभुज्यते स्वांशोयैर्धृष्टैः सोऽभिरक्ष्यते ॥

(वरील इंग्रजी ओळींचें भाषांतर स्वकृत)

रावसाहेबांचे स्वभावांत आणखी एक विशेष होता तो हा कीं, कोणी नियमाविरूद्ध वर्तन केल्यानें अथवा आपलें कर्तव्य न केल्यानें रावसाहेबांना त्रास झाला, तर ते ‘जाऊंद्या हो बाब क्षुल्लक आहे. कोण पंचाईत करतो! वेळ कोणाला आहे!’ इत्यादि सबबी आपण आपणांसच सांगून

स्वस्थ बसण्याची जी आमच्यांत पुष्कळांमध्यें दौर्बल्यदर्शक पुरातन प्रवृत्ति दिसते,* तिला ते थारा देत नसत.

एका पत्त्यावर पाठविलेलें पत्र मालक तेथून अन्य ठिकाणीं गेला म्हणून नव्या पत्त्यावर परत पाठविण्याकरतां अधिक हांशील आकारलेलीं तीन कव्हरें पोष्टखात्याकडे ३।६।१८५३ रोजीं पाठवून तक्रार केली.

१८६४ सालीं सिंधमध्यें असतांना दापोलीच्या पत्त्याच्या पावतोळा वजनाच्या पत्राला ५ आणे हांशील पोस्टांत घेण्यांत आलें. पुन्हां दुसऱ्या आठवड्यांत तेवढ्याच वजनाच्या पत्रास ६ आणे हांशील घेण्यांत आलें. रावसाहेबांनीं तक्रार करून १ आणा परत देववला. व पोस्ट खात्यांत तक्रार करतांना पत्रांत त्यांनीं लिहिलें " मीं एक आण्याच्या क्षुल्लक फायद्याकरतां तक्रार केली नाहीं तर अन्याय झालेला दूर करून घेण्याकरतां केली. "

सिंध मध्यें असतां दादा काळे मुंबईहून त्यांस उत्तम तांदूळ पाठवीत असत. कांहीं पोतीं ज्या बंदरांत तीं उतरून घेतलीं होतीं, त्या बंदरावरील मनुष्यांनीं मालकाचा तपास केल्याशिवाय विकून टाकिलीं. त्या विषयीं तक्रार करून अपराध्यास १८५५ सालीं शासन करविलें.

" मि. डनबार यांना भेटलों. कज्जाचे केलेले रिपोर्ट त्यांच्या कचेरींतच होते. २।४ मिनिटांतच काम झालें व निघालों; पण निघण्यापूर्वीं सांगितलें कीं, ' रावसाहेब ' ही पदवी मला सरकारनें दिली आहे. तिचा मान ' एस्क्वायर ' या पदवीसारखा आहे. माझ्या स्वतांबद्दल मी कांहीं म्हणत नाहीं; पण, ती सरकारनें दिली असल्यामुळें तिचा उपयोग केलाच पाहिजे." मि. डनबार म्हणाले " मला याविषयीं माहिती नव्हती. मी आतां पुढें ती तुमच्या नांवामागें लावीत जाईन. " ( ४।४।१८६४ )

* हरीभाऊ गोडबोले ( एक पोलिस अधिकारी ) म्हणाले " आमच्यापर्यंत बारीक सारीक चोऱ्या येतच नाहींत. आल्यास त्यांचा मागमूस लागत नाहीं व आपलें काम सोडून मामलेदार कचेरींत हेलपाटे घालण्यास लोक खुषी नाहींत. २४।२।५६ रो.

महाबळेश्वरास यांच्या जागेंतील झाडें फारेस्ट रेंजरनें तोडिलीं. असें तेथील माळ्याचें लिहून आल्यावर रावसाहेबांनीं योग्य अधिकाऱ्यांकडे तक्रार करून १८- नुकसानी म्हणून भरून घेतली. ७।१०।७९

मत देण्याच्या हक्कास पुष्कळ लोक महत्व देत नाहींत पण लोकल-बोर्डाच्या निवडणुकींतसुद्धां रावसाहेब आदरेखून मत देत असत.

स्वतांची कोणी आगळिक केली असतां तक्रार करणें हा एक गोष्ट आहे; पण दुसऱ्याची कोणी आगळिक केल्यास तक्रार करणें ही गोष्ट निराळी आहे. दुसऱ्याचा कांहीं नाश अथवा त्यास कांहीं इजा कोणी करीत असतां तटस्थ राहण्याची प्रवृत्ति म्हणजे उदासीनता लोकांत दिसून येते. कारण मध्यें पडणाऱ्यास तुम्हांला तसें करण्याची काय गरज आहे असें म्हणून त्या मनुष्याचें वर्तन सदोष ठरविण्याकडे कित्येकांचा कल असतो. परंतु रावसाहेब त्यांपैकीं नव्हते. दुसऱ्याचा नाश होत असेल किंवा त्यास इजा पोंचत असेल तर मध्यें पडण्याची प्रवृत्ति रावसाहेबांच्या अंगीं उपजत होती. ती अंगीं असणें हा मनुष्यधर्म आहे. त्याविषयीं दृष्टान्त रावसाहेबांच्या एका पत्रांत आढळतो तो असा:—शेजाऱ्याच्या द्राक्षी जरी रासभानें खाल्ल्या तरी आपलें कांहीं जात नाहीं हें खरें; तथापि चित्तास खेद होतो हा मनुष्याचा धर्म आहे.

" पुण्याचे स्टेशनवर आलों. तेथें कांहीं उतारूंस सेकन्ड क्लासचें टिकीट घेतलेंत तरच गाडींत बसूं देऊं नाहीं तर मागें रहावें लागेल. या गाडीला तिसऱ्या क्लासचे डबे नाहींत. असें सांगण्यांत आल्यावरून एकानें दोन टीकिटा घेतल्या. बरोबर एक स्त्री ( त्याची पत्नी अथवा बहीण होती. ) परंतु कारकून, त्यांस एकत्र बसूं देईना. मी पुढें होऊन तक्रार केली. व वरिष्ठांकडून दाद लावविली. " ( १९।११।१८६४ रो. )

"आपण जी मासलेदार गोष्ट लिहिली ती हलकी नाहीं. अशा गोष्टी ऐकण्यास व मजकडून होण्याजोगी चाकरी करण्यास मी सिद्ध आहें. जर या गरीबाचें काम येथें येईल तर मी फुकट चालवीन. आतां भगवत्सत्तेनें सत्यास उत्तमच होईल " ( मित्रास पत्र. )

वकीली करीत असतां सार्वजनिक हिताचे प्रश्न आंत असलेलीं कामें रावसाहेब फुकट चालवीत.

## करारीपणा.

ज्याला आपण करारीपणा म्हणतों व जो धंदेवाइकांस अवश्य असतो, तो आमच्या लोकांत नाहीं अशी रावसाहेबांची नेहमीं तक्रार असे. या इष्ट करारीपणाप्रमाणें रावसाहेब नेहमीं वर्तन ठेवीत. कलकत्त्यास असतां त्यांनीं एक मजकूर छापावयास टाकला होता. त्याचीं प्रुफें तपासावयास रावसाहेबांस कांहीं दिवस वेळ मिळावयाचा नव्हता. तेव्हां प्रुफें तपासून लवकर पाठवा असा तगादा करण्याची संधि रावसाहेबांनीं छापखानेवाल्यास दिली नाहीं. त्यांनीं त्यांस लिहिलें कीं प्रुफें अधिक दिवस ठेवण्याबद्दल तुम्हीं जें रोकड घेत असाल तें कळवा, मी देईन. २।३।१८८५

हा गुण अजून आमच्या लोकांत शिरला नाहीं. नेहमीं सवलती मागण्याकडे पुष्कळांची प्रवृत्ति असते. सवलत घेतली म्हणजे अर्थात द्यावी लागते, व सर्व कारभार ढिला होतो. काय होईल याचा भरंवसा रहात नाहीं. व्यवहार पक्का होतांना पुष्कळ काळ जातो.

व्हॅल्यू पेएबल म्हणून जी एक टपालमार्फत पुस्तकें वगैरे माल मागविण्याची पद्धती आहे, ती विरुद्ध रावसाहेब होते. त्यांनीं सक्त ताकीद कारकून मंडळीस देऊन ठेवलेली होती कीं, रोखीशिवाय खरेदी करावयाची नाहीं.

एकानें यांस एक पुस्तक मागणीशिवाय टपालाचे पैसे भरून पाठविलें. व त्याची किंमत पाठवून देण्याची विनंति केली. त्याची व्यवस्था काय केली तें पुढील पत्रावरून दिसत आहे.

बाबू कालीप्रसन्न देव यांस—

महाराज,

तुम्हांस मी विनंतिपूर्वक कळवितों कीं, अमुक देशाचे एनव्हॉय, सर अमके तमके यांचें चरित्र मला नको आहे. टपालखर्चाचे पैसे तुमच्याकडून येतां;

क्षणींच परत करण्यांत येईल. मागणी आल्याशिवाय पुस्तक पाठवून तुम्हीं फार नियमाबाहेर वर्तन केलेंत. अशानें वेळाचा व द्रव्याचा नाश होतो.

आपला आज्ञाधारक सेवक,

**वि. ना. मंडलिक.**

असें पत्र लिहिण्याचे प्रसंग मधून मधून **रावसाहेबां**वर येत. या करण्यांत शिस्त आहे.

वर्तमानपत्रें ज्या त्या प्रांतातील **रावसाहेब** घेत असत, परंतु वर्गणी आगाऊ भरीत असत.

त्याप्रमाणें रोजखर्चाकरितां **रावसाहेब** कोणासही दुसऱ्याचे पैसे उसने आणूं देत नसत " यापुढें एक पैही उसनवार घेतल्यास मी देणार नाहीं. " ( विष्णूपंत जोगळेकर यास पत्र २।११।८६ )

**रावसाहेबांच्या** हातांत जेवढे पैसे खासगी व सार्वजनिक आले तेवढ्याचा पैन् पै हिशोब दाखलेसूद टिपलेला असे. काम झालें कीं, खातें बाकी पूज्य करण्याची व्यवस्था करीत. राहिलेली बाकी अल्प आहे म्हणून ती तशीच ठेवीत नसत. " आपली बाकी सहा आणे एक पै यांतून टपाल कापून बाकी तीन आण्याचीं पोष्टाचीं तिकिटें, एक कार्ड व एक पै अशीं या पत्रासोबत पाठविलीं आहेत. पोंचल्याचें उत्तर यावें. आतां आम्हांकडे कांहीं बाकी राहिली नाहीं. " ( ८।६।८७ चें श्रीकृष्ण पाध्ये गुर्जर यांस पत्र ) हें एक पत्र असंख्य पत्रांतून घेतलें आहे.

त्याचप्रमाणें दुष्काळाच्या प्रसंगीं किंवा जेव्हां जेव्हां **रावसाहेबांनीं** सार्वजनिक रीतीनें पैसा गोळा केला तेव्हां त्याचा विनियोग करून बाकी पूज्य होईतों पैन् पै हिशोब ठेवल्याचे दाखले दप्तरीं शेंकडों आहेत.

अशा हिशेबी वर्तनामुळें **रावसाहेबांच्या** स्वाधीन पैसे करण्यास कोणी कचरत नसे. एका मित्रावर उपकार करण्याकरतां दुसऱ्या एका मित्राजवळ **रावसाहेबांनीं** पैसे मागितले. ते त्यांनीं लागलेच दिले व मला नांव प्रसिद्ध

करून मिळणारा मोठेपणा नको म्हणून सांगितलें. तेव्हां रावसाहेबांनीं त्या दात्यास विचारिलें:—" लोकांत दात्याचें नांव कळावयास नको पण ज्याला आपण साहाय्य केलें त्याला आपल्या उपकर्त्याचें नांव विदित व्हावयास नको काय? " तरी त्यानें नकोच म्हटलें. इतका रावसाहेबांवर लोकांचा विश्वास असे.

## स्वाभिमान.

। पादाहतं यदुत्थाय मूर्धानमभिरोहति ।
॥ स्वस्थादेवापमानेऽपि देहिनस्तद्वरं रजः ॥ १ ॥

( माघकृत शिशुपालवध )

रावसाहेबांचा स्वाभिमान हा एक गुण फार मोठ्या गुणापैकीं होता. त्यांस अपमान अगदीं सोसत नसे. ही संवय त्यांस उपजतच होती. अगदीं लहान असतां वडिलांच्याबरोबर एका ठिकाणीं भोजनसमारंभास गेले होते. पाटावर बसल्यावर यजमान आपल्या मतें त्यांचें कौतुक करण्या करतां ' हा रे कोण आगंतुक ? ' असें त्यांस म्हणाले मात्र तों त्यांनीं घरचा रस्ता धरला व पुष्कळांनीं केलीली समजूत व्यर्थ गेली. *

आपली कोणी थट्टा केली असा नुसता संशय जर आला तर लागलेच थट्टा करणाऱ्यास रावसाहेब ताळ्यावर आणून ठेवीत. एक दिवस "क्ष" हे "ज्ञ" विषयीं एक गोष्ट दृष्टांताला घेऊन बोलूं लागले. मला वाटलें दृष्टांताचा झोंक माझेकडे आहे. क्षनें लागलेंच तशी गोष्ट नाहीं, असें स्पष्ट सांगितलें व गैरसमज झाल्याबद्दल वाईट वाटतें असें म्हणाले. मला फार राग आला होता तो मग शांत झाला. ( १२।९।६४ रो. )

---

* स्वतांच्या उदाहरणावरून मानापमानाची कल्पना लहान मुलांस असते हें ध्यानांत ठेऊन रावसाहेबांकडे वरच्या सारख्या प्रसंगीं वडील माणसांबरोबर लहान मुलें येत तेव्हां त्यांचा अपमान न होऊं देण्याची खबरदारी रावसाहेब घेत व ही गोष्ट सांगत.

लहानापासून मोठ्या दर्जाच्या बहुविध व बहुसंख्य इंग्रजांशीं संभाषण करण्याचे प्रसंग ज्या हिंदी जनांस आले असतील त्यांत रावसाहेबांचे इतके प्रसंग आलेला क्वचितच आढळेल, व त्यांच्या इतका स्वाभिमान ज्यांनीं दाखविला असेल असा तर एकादाच आढळेल कीं नाहीं याची वानवा आहे.

" आज ले. हॉब्सनकडे गेलों तेव्हां तेथें रेलवे खात्यांतील मि. एच्xx हे भेटले. हिंदी लोकांची निंदा करण्याच्या भरांत 'ते सरसकट खोटें भाषण करणारे आहेत' असें त्यांनीं त्यांस दूषण दिलें. मी म्हटलें 'बेअदबी माफ असावी,असलीं सरसकट निंदात्मक विधानें करण्याचे भानगडींत पुन्हां पडूं नका.' माझ्या मताप्रमाणेंच ले. हॉब्सन यांचें मत पडलें; परंतु मि. एच् यांचा पूर्वग्रह बदलण्यासारखा दिसला नाहीं. वाद पुढें बंद पडावा म्हणून ले. हॉब्सन माझ्याकडे बोट दाखवून म्हणाले 'तुमच्या नजरेस शिकलेले हिंदी पडले नाहींत असें दिसतें;' मग मि. एच् म्हणाले 'ते अपवादात्मक असले पाहिजेत.' अशा रीतीनें भाषणास रंग आल्यानंतर मी म्हटलें:—हा खोटें भाषण करतो असें जर कोणी मला म्हणेल तर त्यानें माझा सर्वांत मोठा अपराध केला असें मानीन व मी त्यास सहसा गोळी घालूनच ठार करीन" १२।९।५८. रो.

एका संस्थानच्या राजधानीस जाण्याचा प्रसंग रावसाहेबांस आला होता. त्यावेळीं रावसाहेब तेथील रेसिडेंन्टास भेटावयास गेले. रावसाहेब होते वकील व वकीलास एखाद्या कज्जांत रेसिडेन्टाच्यापुढें कामाच्या सुनावणीचे वेळीं हजर असण्याचा हक्क नाहीं. रावसाहेब भेटावयास येत आहेत असें समजतांच त्यांनीं निरोप पाठविला कीं जर आपण कज्जासंबधें येत असाल तर भेटतां यावयाचें नाहीं. मित्र म्हणून आल्यास आनंदानें भेटेन. नुसतें प्रथम भेटण्याच्या प्रसंगावरून दिलेल्या वरील जबाबाचा रावसाहेबांस राग आला व परत त्यांनीं निरोप पाठविला कीं, जर भेटेन तर कामासंबधेंच भेटेन. पुढें रावसाहेबानीं वरिष्ठ सरकारापर्यंत प्रकरण नेऊन परवानगी आणविली. व रेसिडेन्टास वकील या नात्यानें ते भेटले.

मुंबईस एकदां युनिव्हर्सिटींत पदवीदानाचा समारंभ होता. रावसाहेबांची गाडी अगदीं वेळेवर आली. आवारांत गाडी नेतांना आंतून कान्स्टेबलनें मज्जाव केला व घोड्याचा लगाम धरला. घोडेवाल्यानें अशी गोष्ट झाल्याचें रावसाहेबांस सांगतांच लगाम सोडीत नसेल तर चाबूक मारावयाचा हुकूम रावसाहेबांनीं केला. तेव्हां कान्स्टेबल जास्त तक्रार करावयास गाडीच्या दाराशीं येतांच रावसाहेबांनीं सांगितलें कीं युनिव्हर्सिटीच्या बागेंत अम्मल आमचा आहे. पोलिसचा अम्मल बाहेर आहे. हें उत्तर कान्स्टेबलला पुरलें.

आगगाडीमध्यें युरोपियन व हिंदी उतारूंची कधीं कधीं तक्रार होते. तसला प्रसंग रावसाहेबांवर कधीं येत नसे कारण ते नेहमीं डबा राखून ठेवीत परंतु एकदां तशी व्यवस्था रावसाहेब करूं शकले नाहींत आणि जो प्रसंग आला त्यांचें वर्णन दामोदर कृष्ण करंदीकर बी ए. एल् बी.* यांनीं 'सह विचार' मासिकांत प्रसिद्ध केलें तें जसेंच्या तसेंच दिलें आहे. "काशीहून प्रयागाला जाण्यासाठीं आम्हीं मोगलसराई स्टेशनावर आलों. आगगाडी येऊन उभी राहिली. रावसाहेब पहिल्या वर्गाच्या डब्याशीं गेले. तों आंत एकच युरोपियन निजलेला होता, व आंत कोणी येऊं नये म्हणून दाराच्या आड ट्रंका वगैरे सामान अडकवून ठेवलेलें होतें. तें पहातांच रावसाहेब संतापले व दरवाजावर लाथ मारून तें उघडून अस्तन्या सारून आंत जाऊन बसले. तें

---

*हे प्रस्तुत ग्रंथकाराचे आतेबन्धू त्यावेळेस रावसाहेबांच्या बरोबर होते. दुसरे त्यावेळेस बरोबर असलेले गृहस्थ म्हणतात कीं तो युरोपियन गृहस्थ रावसाहेबांस आंत शिरतांच ठोंसे उगारून म्हणाला "I shall turn you out" (मी तुम्हांस बाहेर हांकून देईन) म्हणून रावसाहेबांना अस्तन्या सारण्याचा प्रसंग आला. रावसाहेबांनीं अस्तन्या सारतां सारतांच त्यास लागलेंच सांगितलें "I will see how you do it! I do not come from Bengal. I am a Maratha!" ("पहातों कसें बाहेर घालवितां तें! मी बंगालचा बंगाली नाहीं. मी मराठा आहे!")

ऐकून युरोपियन जागा झाला. रावसाहेबांचा आविर्भाव पाहून त्यांना कांहीं न बोलतां रागानें बाहेर पडला, व स्टेशन मास्तराकडे पाय आपटीत गेला. स्टेशन मास्तरनें रावसाहेबांस ओळखलें व त्या युरोपियनला दुसरीकडे बसविलें."

अपमान सोसावयाचा नाहीं असा हा जो रावसाहेबांचा बाणा होता त्याचें वर्णन रावसाहेबांनीं एका स्नेह्यास लिहिलेल्या पत्रांत फार खुबीनें केलें आहे. "आम्हीं अज्ञानावस्थेंत असल्यामुळें मान व अपमान ह्यांची केव्हां केव्हां बाधा होते. तथापि त्या विषयींचेही धडे मिळतात. केव्हां तरी परीक्षा पास होऊं अशी आशा आहे."

जो मनुष्य स्वतांचा अपमान होऊं देत नाहीं तोच दुसऱ्याचा मान ठेवतो. आपला अपमान कोणी करूं नये ही जशी रावसाहेबांची इच्छा होती त्या प्रमाणें दुसऱ्याचाही मान ठेवावा अशी त्यांची इच्छा होती, व त्याप्रमाणें ते वागत असत. सरकारवाड्यांत 'पार्टीला' गेले होते. वेळ झाला म्हणून घरीं जाण्याच्या घाईत असतां गर्दीतून एकानें दुरून नमस्कार केला पण तो कोणाला हें त्यांचे ध्यानांत आलें नाहीं, त्याचा सत्कार केल्याशिवाय घाईनें घरीं निघून आले. त्यानंतर विचारकरतां त्यानें तो नमस्कार आपणांस केला असें ध्यानांत आलें. त्याबरोबर त्यास रावसाहेबांनीं पत्र लिहून दिलगिरी प्रदर्शित केली.

## देशाभिमान.

। यस्यां समुद्र उत सिन्धुरापो ।
॥ यस्यामन्नं कृष्टयः संबभूवुः ॥
। यस्यामिदं जिन्वति प्राणदेजत् ।
॥ सा नो भूमिः पूर्वपेये दधातु ॥

(अथर्व वेद)

देशाभिमान ही वस्तु आमच्या देशांत नवीन आहे असें म्हटलें तर पुष्कळांना आश्चर्य वाटेल. इंग्रज गृहस्थाच्या किंबहुना युरोपियन गृहस्थाच्या अंगांत तो पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही गेला तरी देशाभिमान जसा असतो तसा आमच्या लोकांत नाहीं. देशाभिमान हा परदेशसापेक्ष आहे. ट्रोजन युद्धाहून परत येतांना वाटेंमध्यें यक्षिणीच्या तावडींत सांपडून निर्जन बेटांत येऊन पडलेला इथाकाधिपति युलिसीस यास स्वदेशांतून आकाशांत उंच प्रसृत झालेली धूमधाराही प्रिय वाटली व तो तिच्या दर्शनास उत्सुक झाला असें होमरकृत ऑदेसीनामक काव्यांत वर्णन आहे. धूमधारेच्या दर्शनांत मनुष्याला उत्सुक करणारा कोणता गुण आहे ? कोणताही नाहीं. ही धूमधारा युलिसीस याच्या स्वदेशाशीं संबन्ध होती एवढीच गोष्ट औत्सुक्यजनक झाली म्हणजे औत्सुक्य उत्पन्न करणारा हा गुण त्या धूमधारेचा नसून युलिसीसच्या देशाचा होय व तो तरी युलिसीस परक्यादेशांत जाऊन पडला होता म्हणून. तसा प्रसंग हिंदी लोकांवर बरींच वर्षे आला नसल्यामुळें हिंदी लोकांत देशाभिमान हा गुण प्रादुर्भूत झाला नाहीं. या भावनेंत सकारणता नसते. कोणत्याही वस्तूचा अभिमान बाळगण्यास ती स्वदेशाशीं संबन्ध आहे एवढेंच कारण पुरेसें असतें. म्हणून ही भावना त्याज्य कोटींतली नसून श्लाध्य कोटींतली आहे यास्तव तिला अकारण म्हणण्यापेक्षां कारणातीत आहे असें म्हणावें.

धर्माभिमान हिंदू लोकांत पुष्कळ आहे. कारण त्यांच्या समाजाची रचना धर्माच्या पायावर केलेली आहे. धर्माकरतां काय काय करावें त्याचें वर्णन ऋषींनीं पुष्कळ केलें आहे पण देशाकरतां काय काय करावें त्याचा उल्लेख नाहीं. हिंदी लोकांत देशाभिमान कमी आहे. जो देशाभिमान आहे तो देशाच्या गुणमाहात्म्यानेंच उत्पन्न झालेला आहे. त्यालाच मि. स्माइल्स या इंग्रज ग्रंथकारानें खरा देशाभिमान म्हटला आहे. असा देशाभिमान रावसाहेबांच्या अंगीं असलेला आढळून येतो. व तो त्यांनीं आपल्या लेखांत व उक्तींत उचित प्रसंगीं व्यक्त केलेला आहे.

त्यांच्या नेटिव्ह ओपिनियनमध्यें मराठ्यांच्या खंदकाचा उल्लेख अभिमानानें केलेला आढळतो. परंतु त्या खंदकानें बंगालीबाबूंविषयीं केव्हांही त्यांच्या मनांत द्वेष उत्पन्न केला नाहीं. तसा प्रश्न लार्ड डफरिन यांनीं एका भेटीचे प्रसंगीं विचारला असतां तसा प्रकार नाहीं व त्या खंदकाची स्मृति आतां नाहीं. धाकट्या बोटींतून फिरतांना मला माझ्या मित्रांनीं त्याच्या अवशिष्ट पुसटपुसट खुणा दाखविल्या असें म्हणाले. आणखी उदाहरणें आढळतात, • तीं:—गोपाळ कृष्णाच्या या भूमींत इंग्रजांचें दहीं दुधावर व्याख्यान, पृष्ठ ७३९; हिंदुस्थानचें अतर्क्य ऐतिहासिक पुरातनत्व, प्रकरण ४४ पृष्ठ ६२९; कीर्तिमान पूर्वजांची स्मृति, प्रकरण ६८ पृष्ठ ८४२, ८४४. पहा; पुष्कळ लोकांनीं—इंग्रज गृहस्थांनीं सुद्धां—रावसाहेबांची गणना देशाभिमानी पुरुषांत केली आहे.

## निरभिमान.

॥ **कार्याभिमान नसता करगत परमार्थ हा कसा क्षरता** ॥

( मोरोपंत. )

रावसाहेबांनीं मोठमोठालीं कामें केलीं. त्याचा ते अभिमान मुळींच वाहत नसत. त्यांनीं जर मोठें काम केलें तर हातून झालें असें म्हणत. काळानें घडवून आणलें असें म्हणत. " एवंच त्यांची त्यांची वेळ आली म्हणजे कामें होऊन जाणारीं आहेत. त्याविषयीं आम्हीं अभिमान तो काय धरावा ! शक्तीप्रमाणें जो तो जीव हालचाल करतो. त्याचा सुमार परमात्मा जाणतो. एवंच कालाय तस्मै नमः " ( एका शास्त्रिमित्रास पत्र. ) " ज्या कारणास्तव सामान्यतः अभिमान व्यर्थ त्याच कारणास्तव कार्याभिमान व्यर्थ व त्याच कारणास्तव ज्ञानाभिमान व्यर्थ " ( दुसरें पत्र. )

आपल्या अंगांतील गुणांनीं जे लोक प्रसिद्धीस येतात त्यांचा फोटो अथवा चित्र काढून त्यांनीं आपले दिवाणखाने सुशोभित करण्याची हौस

पुष्कळांना असते. अशी हौस मुळींच वावगी नाहीं. कारण अशा मनुष्यांचें चित्र पाहिल्याबरोबर त्यांच्या अंगांतील गुणांची एकदम आठवण होते. व पहाणाऱ्यांच्या मनावर थोडक्यांत परिणाम होतो. या करतां प्रसिद्ध पुरुषांचे फोटो काढून घेण्याची खटपट बरेच लोक करतात. ही खटपट यशस्वी होते परंतु असें यश रावसाहेबांच्या बाबतींत कोणालाही पुष्कळ वर्षे आलें नाहीं.

मि. क्राफर्ड हे मुंबईस म्युनिसिपिल कमीशनर असतां म्युनिसिपॅलिटीच्या कारभारांत सुधारणा करण्याचा ४१ वे प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं प्रयत्न केला त्यांचे त्यांचे फोटो काढून वांटण्याकरितां एका गृहस्थानें रावसाहेबांस फोटो पाठवून देण्याची विनंति केली ती त्यांनीं मान्य केली नाहीं. असेंच एकानें रावसाहेबांचा फोटो मुंबईइलाख्यांतील पुढाऱ्यांच्या चरित्रसंग्रहांत छापण्याकरतां मागितला होता. हें पुस्तक विलायतेस छापावयाचें हात. रावसाहेबांनीं फोटो दिला नाहीं.

कलकत्त्याच्या प्रसिद्ध अमृतबझार पत्रिकेचे आधिपति शिशिर बाबू यांनीं १८८६ सालीं त्यांच्याजवळ एक फोटोची प्रत मागितली तेव्हां त्यांनीं १८।२।८६ रोजा उत्तर दिलें तः—“ माझेजवळ तुम्हांस द्यावयास फोटो नाहीं म्हणून वाईट वाटतें. माझ्या प्रियकर मृत पत्नीच्या आग्रहावरून काढलेल्या फोटोची एक जुनी प्रत मुंबईस माझ्या घरीं आहे, परंतु तिची प्रसिद्धि माझ्या हयातींत होऊं नये अशी माझी दृढ इच्छा आहे व तुम्हीं माझे मित्र आहांत म्हणून ती इच्छा सफल होऊं देण्यास साहाय्य कराल तर मी आभारी होईन. ”

“फोटो छापून प्रसिद्धकरणें मला मूळांतच आवडत नाहीं. उच्चस्थानावरून मानवी पूजेच्या निंच स्थानावर येण्याप्रमाणें आहे. यांत मला अवनति दिसत आहे. राम, तुकाराम, चैतन्य आणि कुबर यांचीं चित्रें अलबत छापा. ”

( शिशिर बाबूंस पत्र. )

परंतु वयाच्या अगदीं शेवटल्यावर्षीं रावसाहेबांचे मित्र + डॉक्टर कीर्तिकर यांचे आग्रहास्तव रावसाहेबांनीं एकदां फोटो काढूं दिले. ते डॉक्तरसाहेबांनीं बंगल्यावर जाऊन स्वतः काढले.

रावसाहेबांच्या अंगी कार्याभिमान नव्हता असें जरी सिद्ध आहे तरी त्यांच्या लेखणींतून दोन गर्वोक्तिप्रचुर वाक्यें निघालीं. पहिल्याला प्रसंग नाणीझचा कज्जा कारण झाला. १८१८ सालीं मंडालिक यांनीं आपल्या निसबत कारकून यांजकडून नाणीझ गांवच्या सनदा मेहरबान रीड साहेब यांकडे रुजू करविल्या दिवसापासून ( प्रकरण १९ पहा ) या कज्जाचा पाया रचला गेला. त्याच्यावर नानासाहिब मंडलिकांनीं तीन्हीं कोडतें भांडून गांव परत मिळावावयाची रचना केली. व नंतर दरखास्तींत मागील उत्पन्नासह गांव ताब्यांत देण्याच्या ऐनवेळेवर सरकारानें गांव जप्त केला; त्या जप्तींतून जेव्हां रावसाहेबांनीं गांव परत मिळवून नानांच्या इमारतीवर कळस बसविला, तेव्हां रावसाहेबांनीं मित्र जेकब यांस लिहिलें "नैतिक दृष्टच्या हा जय इंग्लंदच्या राजांनीं एजिन कोर्टच्या लढाईत अथवा क्रेसीच्या लढाईत मिळविलेल्या जयाहून अधिक आहे." प्र. १९ पृष्ठ १९१ पहा.

दुसरी गर्वोक्ति पुढें निर्दिष्ट केलेल्या प्रसंगीं निघाली. प्रसिद्ध वंगनिवासी सुरेन्द्रनाथ बॅनर्जी व रावसाहेब यांचा कांहीं एका वेळच्या परिस्थितीविषयीं पत्रव्यवहार सुरू होता. लार्ड रिपन साहेबांची कारकीर्द सुरू होती. त्यांनीं अंगीकृत केलेल्या एक एक सत्कृत्यांच्या समर्थनार्थ येथें व विलायतेस चळवळ करणें इष्ट होतें. पण तें साधतें कसें ! "पक्षभेदानें या हतभाग्य देशाच्या

---

+ रावसाहेबांचे प्रसिद्ध गुरु राम बाळकृष्ण यांचे डाक्तर कीर्तिकर हे जामात होते. यांचा स्नेह जुना होता हें दाखविणारें एक पत्र पुरे आहे.

"आपण जाण्यापूर्वी न भेटल्याबद्दल माफी असावी. भेटणें औपचारिक नव्हतें ज्या कुटुंबांत मी बरेच दिवस केवळच परका समजला जात नसें, त्या कुटुंबास भेटणें होतें." ( ३।४।८१ )

चिंधडद्या उडून गेल्या आहेत. इतक्या कठोरपणानें कलह चालला आहे कीं कल्याणाची आशा दिसत नाहीं. तथापि त्यांतच उद्योग करून फलाची वाट बघत बसण्याचा माझा निश्चय आहे" ३१।१०।८३ चें रावसाहेबांस पत्र.

५।११।८३ चे पत्रांत त्यावर रावसाहेबांनीं उत्तर दिलें " मी तर पक्का आशावादी आहें. ही बिकट स्थिति आमचें सत्व पहात आहे व आमच्या कल्याणार्थच ती उत्पन्न झाली आहे असें समजतों. आम्हांला मुख्य जरूर म्हणाल तर ईश्वराला भिऊन वागणाऱ्या, सतत प्रयत्न करणाऱ्या मनुष्यांची आहे. नुसत्या लक्ष्मीपूजकांचें येथें काम नाहीं. तुमच्यापुढें वित्ताच्या राशी ओतण्यास मी कांहीं संपत्तिमान राजा नाहीं. पण माझी लेखणी व सहानुभूति तुम्हांकरतां जागृत आहे."

कांहीं लोक गर्वोक्तीचा घोटाळा षड्रिपूंत गणला जाणाऱ्या मदाशीं ( गर्वातिशयाशीं ) करतील पण तें चुकीचें आहे. पौरुषसंपन्न लोक आपल्या पौरुषाचें यथार्थ ज्ञान जेव्हां इतरांस करून देतात तेव्हां प्रबल भावना प्रेरित होत्साते आपल्या पराक्रमाचें वर्णन उपमारूपकादि अलंकारांनीं करतात तें औचित्याला धरूनच असतें. पराक्रमी मनुष्याचें कर्तृत्वप्राबल्य त्याच्या उक्तीच्या द्वाराबाहेर आलें तर तें कौतुकास्पदच असतें.

हीच खोडी कवींना लागली आहे. जगन्नाथराय तर एक गर्वोक्तिपंडितच होते. साधूही गर्वोक्तीच्या मोहांतून सुटले नाहींत. तुकाराम बुवांनीं म्हटलें आहे:—

**सन्त कृपा झाली । इमारत फळा आली ।**
**ज्ञानदेवें रचिला पाया । बांधियलें देवालया ।**
**नामा तयाचा किंकर । म्हणे केला हा विस्तार ।**
**जनार्दन एकनाथें । ध्वज केला भागवतें ।**
**भजन करा सावकाश । तुका झालासे कळश ॥**

अशी गर्वोक्ति करून भागवत धर्माच्या मंदिराचा पाया ज्ञानदेवें घातला तें सांगून, वर कोणी इमारत रचिली तें सांगून, आपण स्वतां कसा कळस झालों तें तुकाराम बुवांनीं सर्वांस सांगितलें आहे. पण तुकारामबुवा प्रबळ क्रियावान

पुरुष असल्यामुळें त्यांची गर्वोक्ति कोणत्या मत्सरी मनुष्याला सहन होत नाहींशी झाली आहे सांगा पाहूं !

अशा गर्वोक्तीला भगवंतही अपवाद झाले नाहींत. भगवत्गीतेच्या दहाव्या अध्यायांत आपल्या विभूतींचें वर्णन करतांना सर्व श्रेष्ठांत मी श्रेष्ठ आहें असें अनेक विभूतींचें नांव घेऊन श्री कृष्णांनीं म्हटलें आहे.

नाणीझ गांव परत मिळविल्यावरची उक्ति खाजगी कार्य संपादन केल्यावरची आहे म्हणून खासगी स्वरूपाची आहे. तरी प्रयत्नानें इष्ट वस्तु साध्य करतां येते असें सिद्ध करणारी आहे म्हणून तिचा उपयोग सार्वजनिकच आहे. दुसरी मात्र सार्वजनिक स्वरूपाची आहे. तिचें भाषांतर संस्कृत श्लोकांत करून ग्रंथकर्त्यानें रावसाहेबांच्या लेखणीचा प्रभाव दाखविणारें जें नेटिव्ह ओपिनियन पत्र त्याचें वर्णन करतांना विसाव्या प्रकरणाच्या मथळ्यावर दिलें आहे. त्यांत वर्णिलेली रावसाहेबांची उक्ति अंशतः तरी

**अग्रतश्चतुरो वेदाः पार्श्वतः सशरं धनुः ।**
**इदं ब्राह्ममिदं क्षात्रं चापादपि शरादपि ॥ १ ॥**

या श्लोकांत वर्णन केलेल्या परशुरामोक्तीची आठवण करून देत आहे.

म्हैसूर प्रकरणांत, रावसाहेबांस इंग्लंदांत आलेलें यश, एलिस बिलाला विलायतेंत मिळालेलें अर्धचंद्रप्रदान, खोती कज्जांत यांच्या निबंधांनीं व लेखांनीं मिळविलेला जय इ० स्वतांच्या सहानुभूति पूर्वक लेखनसामर्थ्याचा अनुभव मनांत येऊन प्रसंग आला असतां ही माझी सहानुभूति व माझी लेखणी तुमच्या सेवेला हजर आहे अशी गर्वोक्ति रावसाहेबांनीं केली तर ती त्यांना सजण्यासारखी आहे व काम करणाऱ्यांना उत्तेजक आहे यांत संशय नाहीं.

## लोकसंग्रह

**अमंत्रमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधम् ।**
**अयोग्यः पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभः ॥**

(सुभाषित)

रावसाहेबांना लोकसंग्रह करण्याची हातोटी चांगली साधली होती, त्यामुळ त्यांना सार्वजनिक काम करणें सुलभ गेलें. " ज्यांना आपलें डोकें खर्चून मदत करावयाची नसेल त्यांनीं हृदयसंभव सहानुभूति दाखवून खिशांत हात घालून तरी मदत केली पाहिजे." ( ७।१।१८८२ चें मि. वेडरबर्न यांस पत्र. )

गरीबीमुळें त्यांनीं कोणाच्या त्याग केला नाहीं. अथवा नुसत्या श्रीमंती-मुळें कोणाला जवळ केलें नाहीं, केवळ गुणांकरतां रावसाहेब विविध लोकांचा संग्रह करून ठेवीत. व लोह ज्याप्रमाणें आपले सानिध्यानें चुंबकाची शक्ति वाढवितो, त्याप्रमाणें गुणी लोकही यांची संग्रहशक्ति वाढवीत. मि. मलबारी हे सामाजिक बाबतींत अगदीं भिन्न मताचे होते पण भारतध्वनि नांवाचें पत्र त्यांनीं काढावयाचें ठरविलें तेव्हां त्यांस साहाय्य करावयाचें रावसाहेबांनीं कबूल केलें.

नारायण परमानंद हे प्रार्थनासमाजवाले; परंतु नेटिव्ह ओपिनियनच्या लेखकाचें काम त्यांच्याकडे सोपविलें होतें. अशीं अनेक उदाहरणें आहेत. प्रकरण २६ पृष्ठें ३१७ ते ३१९ पहा.

" मीं कोणाचा द्वेष करीत नाहीं त्यांतून चांगल्या माणसाचा तर नाहींच." ( विनायकराव भागवत यांस पत्र. ) यामुळें त्यांस हरएक कामाला माणसें मिळत. या गुणाच्या योगानें विधायक संघटनात्मक कार्यें रावसाहेबांच्या हातून पुष्कळ झालीं.

## न्याय्य प्रवृत्ति.

Do unto others as you would be done by them.

लोकांशीं आपलें आचरण कसें असावें हा एक जगापुढें उपषाय्य विषय आहे, त्याचें समर्पक उत्तर देतां येणें कठीण आहे. कारण सर्वदा सर्व प्रसंगीं लागू पडणारा असा व्यापक स्वरूपाचा एकच नियम करणें मोठमोठ्या नीतिवेत्त्यांस जड जाईल. परंतु त्याचें जें उत्तर येशू ख्रिस्तानें देऊन ठेवलें

आहे, तें मथळ्यावर दिलें आहे व तें उत्तर सुन्दर आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं दुसऱ्यानें आपणाशीं जसें वागावें असें आपणांस वाटतें तसें आपण दुसऱ्याशीं वागलें पाहिजे. ही येसू ख्रिस्ताच्या दहा आज्ञांपैकीं एक आज्ञा आपल्या राजकारण विषयक लेखांत व भाषणांत रावसाहेब उपयोगांत आणीत असत. रावसाहेब कोणाशीं गैर विश्वासानें वागत नसत. अमूक एक कार्य प्रतिपक्षी अमूक वाईट हेतूनें करीत आहे असें केव्हांही म्हणाले नाहींत. त्यांचा वाद व्यक्तीविषयीं नसे. व्यक्तिविषयक गोष्टींनीं खाजगी द्वेष उपजतो व वादाचा मुख्य मुद्दाही बाजूस राहतो. म्हणून वादाचे प्रसंगीं व्यक्तीला रावसाहेब अलग ठेऊन व्यक्तीच्या लेखांतील अथवा उक्तींतील जें त्यांच्या मतें आक्षेपार्ह तत्त्व असेल त्याशींच झगडा करीत, त्यामुळें कितीही मतभेद झाला तरी खाजगी नातें रावसाहेब कधीं विसरले नाहींत. त्यामुळ त्यांनीं शत्रू उत्पन्न केले नाहींत. अकारण तीव्रता लेखांत नसावी असा उपदेश नेटिव्ह ओपिनियनमधील लेखकांस रावसाहेब करीत असत. ( पृष्ठ २०२ पहा. ) होतां होईतों अर्ज करतांना कडक भाषा टाळावी असा उपदेश नवरोजी फर्दुनजींस केला होता. ( पृष्ठ २४२ पहा ) तरी शक्य तितकी कडक भाषा कारणपरत्वें वापरावीं लागे. तेव्हां शिष्ट संप्रदाय सोडीत नसत. कर्णकटुतेचा आश्रय करीत नसत, व गर्ह्य प्रकार निश्चयेंकरून टाळीत.

हिंदुसमाजसुधारणेविषयीं कांहीं सूचना मि. मलबारी यांनीं सरकारास केल्या होत्या. त्यांवर आपलें मत सरकारकडे रावसाहेबांस पाठवावयाचें होतें. तें पाठविण्यापूर्वीं आपल्या एका इंग्रज मित्रास रावसाहेबांनीं पहावयास पाठवून त्यास अशी विनंति केली कीं, यांत शिष्ट सांप्रदायाविरुद्ध कांहीं असेल तर मेहेरबानगी करून नीट पहाव. आमच्या समाजाविषयीं मि. मलबारी यांच्या लेखानें गैरसमज हरकत घेण्यासारख्या प्रकारानें होणार आहे. माझ्या लेखांत कांहीं कर्णकटू आहे कीं काय तें तुम्हीं त्रयस्थ निःपक्षपाती इंग्रज मित्र या

नाल्यानें पहा. शक्य असेल तितकें कडक मला लिहावयाचें आहे. परंतु त्यांत कांहीं गर्ह्य प्रकार यावयास नको आहे. ३।२।८५

## उत्पथगुरुजनांशीं विरोध करण्याची प्रवृत्ति.

। गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
॥ उत्पथप्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ १ ॥

( वाल्मीकि रामायण )

संसार करीत असतां संसारी पुरुषास, समाजास वळण लावतांना समाजधुरीणास, राजकीय शंकट हांकतांना राजकार्यधुरंधरास, आपलें कर्तव्य करीत असतां प्रत्येकास गुरुजनांशीं विरोध करण्याचा प्रसंग येतो. तेव्हां काय करावें हें पुष्कळांना सुचत नाहीं. व हृदयदौर्बल्य प्राप्त होतें व ते किंकर्तव्यतामूढ होतात. अशा अर्जुनाच्या स्थितींत सांपडलेल्या पुरुषांपुढें रावसाहेब गीतेचे १८ अध्याय वाचीत बसत नसत. आपल्या एका स्नेह्यावर असा गुरुजनाशीं विरोध करण्याचा प्रसंग आला असतां तरुणस्त्रीलंपट वृद्ध दशरथ राजा, कैकेयीप्रोत्साहित होत्साता रामविवासनोद्यत झाला असतां, वडील मनुष्य विपथगामी होऊन कार्याकार्य जाणावयास असमर्थ झाला असतां त्याचें शासन करणें अवश्य आहे असा लक्ष्मणानें जो मार्ग स्पष्ट दाखविला तोच मार्ग त्याच्याच उक्तीचा आधार घेऊन रावसाहेबांनीं आपल्या स्नेह्यास दाखविला. लक्ष्मणाची ही उक्ति * दांडगी आहे ती रावसाहेबांस रुचली. हें रावसाहेबांच्या दांडग्या स्वभावास उचितच आहे. परंतु लक्ष्मणोक्तीची न्याय्यता दाखवून देतांना रावसाहेबांनीं एक स्पष्टीकरण त्या पत्रांत जोडलें आहे. त्यावरून त्यांच्या अंगीं साधुपुरुषांच्या अंगांत आढळून येणारा जसा सडेतोडपणा दिसून येतो तशी त्यांच्या अंगची मृदुताही दिसून येते. रावसाहेबांनीं स्पष्टीकरणांत लिहिलें आहेः—कृतज्ञतेसारखे मनाचे उच्च भाव झाडून टाकावे असें माझें म्हणणें नाहीं परंतु सर्वांपेक्षां वृद्ध व पूज्य

---

* मथळ्यावर दिलेला श्लोक पहा.

अशा श्री वाल्मीकिसारख्या पुरुषांच्या मुखांतून सत्याक्षरागी ( वाणी ) स्रवते तेव्हां त्यांचें आम्हीं ऐकलेंच पाहिजे. ”

या मताचा अंगिकार केल्यामुळें रावसाहेब सार्वजनिक कामें निर्भीडपणें करूं शकले हें उघड आहे.

## स्वाभाविक तापटपणा व मार्दव.

। वज्रादपि कठोराणि मृदूनिकुसुमादपि ।
॥ लोकोत्तराणां चेतांसि कोऽनुविज्ञातुमर्हति ॥ १ ॥

( उत्तरराम चरित्र. )

रावसाहेबांचा स्वभाव फार तापट होता. कोणावर संतापले म्हणजे लाल होऊन जात तेव्हां पुढें होऊन उत्तर प्रत्युत्तर करण्याची कोणाची छाती होत नसे. कोणी तक्षकाला आश्रय देणारा इन्द्र निघाल्यास इन्द्राय तक्षकाय स्वाहा होण्यास चुकत नसे. हा राग मात्र खरा राग; नाहीं तर पुष्कळ लोक रागाच्या भरांत एका व्यक्तीवर कुपित शब्दांचा भडिमार इकडे करीत असतां तिकडे दुसऱ्यानें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें अगदीं संथपणें देत असतात. असलें कोपकार्य प्रामाणिक मनुष्याला करतां येणें शक्य नाहीं. रावसाहेबांच्या रागाचें त्वरित शमन करण्यास प्रिय पत्नीनें भीत भीत उच्चारलेला एकादा मृदु शब्द मात्र समर्थ होत असे.

रावसाहेबांना आलेला राग जरी इतका तीव्र असे तरी तो लवकर शमन पावत असे. व क्षमाशीलपणा हा जो त्यांचा विशेष गुण होता तो दृश्य होत असे.

“ माझी अवज्ञा केली व त्यापासून काय अपकृति झाली तें विसरलों. मी आनंदानें क्षमा केली असें समजावें. अनुतापाइतकें मोठें प्रायश्चित्त नाहीं.”

( शि. पु. यांस १२।२।१८८१ चें पत्र. )

रावसाहेबांस केवढाही राग आला तरी त्यांनीं वाग्बाण सोडून मर्मभेद

केला नाहीं व जिव्हेला अनावर होऊं दिली नाहीं. ते म्हणत " शब्दबाण फार कठीण. " " जिव्हेनें विषापेक्षां अधिक कार्य होतें. " " या जगांत पुष्कळ शस्त्रें आहेत; परंतु जिव्हे इतकें मर्मभेदक शस्त्र अद्यापि आढळून आलें नाहीं. " "तरवारीपेक्षां जिव्हा फार अनर्थ करते." " तरवारीला कठीण जातें तेंहीं जिभेनें तुटतें आणि तीं जखम कोणत्याही औषधानें बरी होत नाहीं. " त्याचप्रमाणें त्यांनीं आपली पवित्र वाचा अमंगल शब्दांनीं भ्रष्ट होऊं दिली नाहीं. अपराधी मनुष्याला लावण्यास 'बेवकूब,' 'मूर्ख' व 'जंगली' यांशिवाय त्यांच्या गालीप्रदानकोशांत दुसरे शब्द नव्हते. अतिशय लुच्चा मनुष्यास ते अप्रामाणिक म्हणत. " हें वर्तन अशुद्ध आहे. अशानें साक कशी राहील?" " हा मनुष्य फार अपक्क दिसतो." " अथवा विनाशकाले विपरीत बुद्धिः " अशा म्हणी वापरण्याची उच्च पद्धति दुसऱ्यास दूषण देतांना स्वीकारीत. हें त्यांस फार भूषणावह होतें.

## अग्रपदप्राप्ति.

। नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा ।
॥ मूर्ध्नि स्थितिर्नचरणैरवताडनानि ॥ १ ॥

( भर्तृहरि )

असें आढळतें कीं पुष्कळ लोक बुद्धिमान असतात, आपल्यामतें उद्योग करतात, परंतु यशाची प्राप्ति पूर्णपणें त्यांस होत नाहीं. याचें कारण ते आत्मसंतुष्ट असतात. महत्वाकांक्षेचा त्यांच्या अंगीं अभाव असतो. पुष्कळ विद्यार्थी इतर विद्यार्थ्यांच्या गुणांची प्रशंसा करीत बसतात. अमका विद्यार्थी परीक्षेंत पहिला आला. तमक्यानें सुवर्ण पदक मिळविलें. फलाण्यानें शिष्यवृत्ति पटकाविली. परंतु स्वतांविषयीं पुसाल तर वर्गांत ज्या जागेवर त्यांना अभ्यासाच्या योग्यते प्रमाणें बसावें लागतें ती सोडून वर सरकत जाण्याची त्यांना इच्छा सुद्धां नसते. रावसाहेब आत्मसंतुष्ट नव्हते. पुष्कळांस आपल्या अंगांत काय गूण आहेत त्याची परीक्षा नसते. आपल्या अंगांत किति धमक आहे तें

रावसाहेब जाणून होते. आपण किति उंच उडी मारूं शकूं त्याचा अंदाज त्यांस पूर्णपणें होता. " माझें चारित्र म्हटलें म्हणजे एक उत्तम कादंबरीचा विषय होईल" असें त्यांनीं रोजनिशींत नमूद करून ठेवलें होतें. पृष्ठ ७८ पहा.

पुष्कळ मनुष्यांच्या पुढें ध्येयच नसतें; असतें तें उंच नसतें; उंच असलें तर निश्चित नसतें; जसा वेळ येईल, जशी परिस्थिति बदलेल तसें तें बदलून जाणारें असतें; तें कालवश व परिस्थितिवश असतें. याचें कारण त्यांच्या संकल्पांत दृढपणा नसतो. त्यामुळें अशा लोकांचे भाविचरित्र अनिश्चितच राहतें व त्यांच्या अंगच्या गुणांचें पूर्ण फळ त्यांस प्राप्त होत नाहीं. त्यांची प्रगति व सुकाणूं शिवाय नौकेची महासागरांत प्रगति हीं सारखींच समजावीं. रावसाहेबांनीं आपल्यापुढें ध्येय ठेवलें होतें व तें अगदीं निश्चित स्वरूपाचें होतें. प्रामाणिकपणें उद्योग करून साठ हजार रुपये मिळवून स्वतंत्रपणें राहण्याचें ध्येय त्यांनीं आपले पुढें ठेविलें होतें. प्रकरण १४ वें पृष्ठ १०९ पहा. परंतु त्यांच्या सर्व यशाची किल्ली आपण कोणत्या धंद्याला लायक आहोंत तें त्यांनीं शोधून पाहिलें, ही होय. सरकारी नोकरी झाली; व्यापार झाला; पण त्यांतून आपली सुटका करून घेऊन आपल्या अंगच्या गुणांस योग्य अशी वकिली पतकरली व ती मुंबई हायकोर्टाच्या ठिकाणीं. तेथें त्यांस अनुकूल, अनुगुण, शीलानुरूप स्थळ मिळालें. हायकोर्ट त्यांना आवडत असे. ( पृष्ठ १५४ १५५ पहा. ) तात्पर्य आपली स्थिति कशी सुधारावी व आपल्या योग्यतेनुसार कार्यक्षेत्र कसें हस्तगत करावें तें नेमकें जाणून त्याची प्राप्ति करून त्यांनीं घेतली. वकिलीच्या किंवा कोणत्याही धंद्यांत ' लोक फार झाले ' अशी कोणी ओरड केल्यास रावसाहेब त्यांस सांगत "सर्वांत वरची जागा रिकामी आहे " * म्हणजे त्यांची दृष्टि अग्रपदाकडे असे. त्यांनीं कोणतें अग्रपद आपल्या गुणांनीं प्राप्त करून घेतलें तें पहा.

कालेजांत उच्चमान ( प्रकरण ५ वें पृष्ठ २३–२४ पहा. )

---

* There is room at the top.

वकिलींत अग्रेसरत्व.*

मुंबई म्युनिसीपॅलिटीच्या कारपोरेशनचें अध्यक्षपद.

विश्वविद्यालयांत डीनची नेमणूक + ( हिंदी मनुष्याची ही पहिल्यानेंच होती. )

बाम्बे असोसिएशन, नेटिव्ह जनरल लायब्ररी, ईस्टइण्डियन असोसिएशन इ. संस्थांचें उपाध्यक्षपद व अध्यक्षपद.

रावसाहेबांना दोन मान मिळाले नाहींत. १ हायकोर्ट जज्जाचा व २ युनिव्हर्सिटीच्या व्हाइस चॅन्सेलरचा. पैकीं पहिल्या पदावर हिंदी जनांची नेमणूक होऊं लागली होती. व एक दोन प्रसंगीं रावसाहेबांची शिफारस झाली होती. व तो मान त्यास मिळावयास पाहिजे असून आयुष्य कमी झाल्यानें मिळाला नाहीं.

दुसरा मान रावसाहेबांच्या वेळीं हिंदी जनांस मिळूं लागला नव्हता. परंतु त्यांस तो मिळावा अशी वर्तमान पत्रांतन सूचना येऊं लागली होती. २१।७।१८।८८ चा ऍडव्होकेट व मुंबई गॅझेट पहा.

देशांत जे सहकारी पुरुष असतात त्यांस मान देण्याचें ठरवून, देशोन्नताला वाहलेले, सद्विषयक संग्रामांत पुढें असलेले, विद्वत्तेबद्दल प्रसिद्ध असलेले, वर्तमान पत्राचें काम ४० वर्षें युक्त मनानें केलेले व काउन्सिलांत

---

* सर मंगळदास नथुभाई यांनीं आपल्या स्नेह्यास एका कामीं असा सल्ला दिला. " रावसाहेबांस वकील पत्र द्यावें; कारण रावसाहेब हे सर्वांत बुद्धिमान, उत्तम व कायद्यांत निष्णात असे वकील आहेत. "

+ या पदवीच्या खालचा म्हणजे सिन्डिक होण्याचा मान रावसाहेबांस मिळाला तेव्हांच शंकर पांडुरंग पंडित यांनीं त्यांची पुढें दिल्याप्रमाणें प्रशंसा केली. " तुम्हांस सिन्डिक निवडून विश्वविद्यालयानें तुमचा मोठा गौरव केला आहे. निरपेक्ष बुद्धीनें तुम्हीं केलेली मोठी लोकसेवा अशा रीतीनें मान्य झालेली पाहून मला आनंद होत आहे. मुंबई इलाख्यांतील विद्वान लोकांच्या संस्थेनें दिलेला हा मान इतर हांजी हांजी करून मिळविलेल्या मानापेक्षां पुष्कळ बरा. "

अचल देशाभिमान सर्व तऱ्हेनें प्रकट करणारे म्हणून कलकत्याच्या ब्रिटिश इन्डियन असोसिएशननें रावसाहेबांस १८८८ सालीं आपले सभासद नेमिलें.

जो जो मान मिळेल तो तो घेण्यास रावसाहेब कबूल नसत. इलारव्यांतील क्रमिक पुस्तकांत फेरफार करण्याकरितां जी कमिटी कलकत्त्यास बसली होती तिचे तुम्हीं सभासद होण्यास कबूल अहांत काय म्हणून हिंदुस्थान सरकारनें विचारलें होतें. रावसाहेब गेले नाहींत.

त्याचप्रमाणें रावबहादुर ही पदवी मिळत असतां त्यांनीं नको म्हणून सांगितलें. प्र. ७४ पृष्ठ ९७४ पहा.

उगाच एका सभेचे अकार्यकर्ते अध्यक्ष व दुसरीचे शोभेचे चिटणीस होणें रावसाहेबांस आवडत नसे. ( महाबळेश्वरच्या ) म्युनिसिपॅलिटीच्या सभासदाची जागा मी आनंदानें पतकरीन व होईल तें काम करीन. वर्षांतून कांहीं वेळाच मी सभेस हजर राहूं शकेन. पण त्यानें महाबळेश्वरच्या लोकांचें किति हित साधेल त्याचा विचार म्युनिसिपॅलिटीनें आपणच करावा.

( डाक्तर जी. सी. बेल सुपरिन्टेन्डन्ट
महाबळेश्वर यांस २६।११।७३ चें पत्र )

रत्नागिरीच्या सार्वजनिक सभेचे अध्यक्ष होण्याबद्दल रावसाहेबांस तेथील प्रसिद्ध वकील बळवंतराव रानडे यांनीं रावसाहेबांस विनंति केली. त्यांस त्यांनीं उत्तर लिहिलें कीं, " अशी सभा असणें फार जरूरीचें आहे. रत्नागिरी येथील व बाहेरच्या तालुक्यांतील लोक एकोप्यानें निस्पृहपणानें मदत करतील तर या सभेपासून सरकारास व रयतेस फार उपयोग आहे. यास्तव सर्व मंडळी या कामास झटेल अशी उमेद बाळगतों. माझेंहि नांव सभासदांत दाखल करण्यास सभेच्या नियमांची हरकत नसेल तर करावें. जी वर्गणी द्यावयाची ती रा. रा. वासुदेव हरी आठल्ये देतील. त्यांस द्यावयास सांगितली आहे. सभेचा अध्यक्ष रत्नागिरी येथें असावा हें अवश्य आहे. यास्तव आणि अशा सभांचें काम ज्या रीतीनें चालविणें अवश्य आहे

त्या रीतीनें माझ्या नेहमींच्या रहाण्याच्या ठिकाणाहून चालवितां येणार नाहीं म्हणून मी आपल्या सभेचा अध्यक्ष होण्यास कबूल नाहीं. परंतु जरी मी अध्यक्ष नसलों तरी करण्या जोगी मदत असेल तितकी करण्यास माझ्या कडून अनमान होणार नाहीं. ( ११।४।७३ )

मित्रामित्रांमध्यें सहकारी मित्रांची निवड करण्याकडे रावसाहेब विशेष लक्ष देत. व तशी जोड मिळाल्याशिवाय कोणत्याही सार्वजनिक सन्मान्य कामांत पडत नसत. याचें कारण उघड आहे. नानाभाई राणिना हे राव-साहेबांस एका मोठ्या धर्मादाय कृत्याचे ट्रस्टी नेमणार होते. तर त्यांस रावसाहेबांनीं लागलेंच सांगितलें " मला जर निश्चित धर्मादाय आवडला व माझे सहकारी मित्र पसंत पडले तर मी एक ट्रस्टी व्हावयाचें कबूल करीन. " त्याचप्रमाणें जॅफरसन पेन व मंडळीनें तुम्हीं एका धर्मादायाच्या कृत्यांत ट्रस्टी होण्यास कबूल आहांत काय म्हणून विचारिलें. त्यांस १०।५।७५ च्या पत्रानें रावसाहेबांनीं परत पुढील उत्तर लिहिलें " दुसरे सहकारी ट्रस्टी कोण आहेत त्यांचीं नांवें कळवा. धर्मादायाच्या व्यवस्थापत्राची नक्कल मेहरबानी करून पाठवा. "

मोठमोठ्या शहरांत जितकीं व्याख्यानें होतात तितके अध्यक्ष मिळवावे लागतात. अध्यक्ष नेमिलें जाणें हा मान आहे. तो रावसाहेब मिळेल तेव्हां घेत नसत. आपण अध्यक्ष झाल्यानें कोणाचा आपल्या मतांविषयीं गैरसमज होण्याचा संभव असेल तर तो मान स्वीकारीत नसत. एकदां मि. लेक रिव्हिं-ग्टन हे फ्रामजी कावसजी हॉलमध्यें ' आमची नैतिक वृद्धि ' या विषयावर व्याख्यान देणार होते. त्यांनीं आपण अध्यक्ष होतां काय म्हणून रावसाहेबांस विचारलें. सभा नुसत्या धार्मिक विषयासंबंधें होती व हिंदु व पारशी या धर्मांत जीं सामान्य तत्त्वें आहेत त्यावर कांहीं विचार प्रगट व्हावयाचे होते. रावसाहेबांनीं तशावेळीं अध्यक्ष होण्याचें नाकारलें. त्यांचे मित्र हा मान समजत होते. जी जी टूम सार्वजनिक कल्याणाच्या नांवाखालीं निघे, तींत तींत रावसाहेब भाग

घेत नसत. एक विलायतेस दर आठवड्यास हिंदुस्थानविषयक इतर लोकांनीं पाठविलेल्या तारांनीं होणारा वाईट परिणाम पुसून टाकण्याकरितां दर आठवड्यास येथून विलायतच्या पत्रकारांस तारा पाठविण्याकरितां नॅशनल यूनियन म्हणून एक सभा स्थापन झाली होती तिचे रावसाहेब एकदम सभासद झाले नाहींत याचें मि. मूस यांस मोठें आश्चर्य वाटलें कारण साऱ्या सार्वजानिक चळवळींत हे पुढें असावयाचेच. ( १८।२।८५ मि. मूस यांचें पत्र )

## धर्मनिष्ठा.

। न जातु कामान्न भयान्न लोभात् ।
॥ धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ॥
। नित्यो धर्मः सुखदुःखे त्वनित्ये ।
॥ जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥ १ ॥

( महाभारत. )

अकबराच्या वेळीं देशांत शांतता नांदत होती. धार्मिक सहिष्णुता वसत होती. हिंदू व महमदी धर्म या दोन मोठ्या धर्मांचें सान्निध्य घडून आलें होतें. त्याचा परिणाम पंडितांत झालेला मतिभ्रम होय.

एका काळीं हिंदुस्थानांतील लोकांस धड हिंदू नाहीं, धड यवन नाहीं अशा प्राप्त झालेल्या स्थितीचें वर्णन खालील टीपेंत दिलेला * श्लोक करीत आहे.

हा श्लोक नक्की कोणाचा आहे हें निश्चित नाहीं, पण ‘ कलयति ’ या शब्द प्रयोगावरून व वृत्ताच्या धाटणीवरून तो जगन्नाथरायांचा असावा व तसा असला म्हणजे कदाचित् जगन्नाथरायांनीं ही स्थिति स्वतांच्या

* । न संध्यां संधत्ते, क्षणमपि निमाजान्नपठते ।
॥ न वा मौजीबंधं कलयति नवा सून्तनविधिम् ॥
। न रोजान् जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते ।
॥ न काशी मक्का वा ! शिव ! शिव ! न हिन्दुर्न यवनः ॥ १ ॥

अनुभवावरून तेव्हांच्या शिकलेल्या लोकांचीच म्हणून वर्णन केली आहे कीं सव साधारण लोकांची म्हणून वर्णन केली आहे तें तर्क्यच आहे. परंतु ही स्थिति औरंगजेब राज्यपदावर येतांच नष्ट झाली. त्याच्या जुलमामुळें हिंदू लोकांनीं आपलें औदासिन्य सोडलें. व ते पुनः स्वधर्मनिष्ठ झाले. ती स्थिति पेशवाई अखेर टिकली. इंग्रजांचें राज्य झाल्यावर पुन्हां हिंदूधर्म व ख्रिस्तीधर्म या दोन प्रबळ धर्मांचें सान्निध्य घडून आलें. शांतता प्राप्त झाली. परधर्मसहिष्णुता नांदू लागली. लोकांस इंग्रजी शिक्षण मिळालें त्याचा परिणाम काय झाला तो **रावसाहेबांनीं क० जेकब** यांस एका पत्रीं निवेदन केला होता. ( पृष्ठ २७० पहा. ) मात्र तसा कांहीं परिणाम **राव-साहेबांच्या** मनावर झाला नाहीं. नित्यकर्मांपैकीं अगदीं अल्प जी संध्या तिला केव्हाही, संक्षेप सुद्धां त्यांनीं दिला नाहीं. एवढेंच नव्हे पण एक-निष्ठेनें एकाग्र मनानें संध्या करण्याची त्यांची लहानपणापासून जी संवय होती ती कशी निराबाध चालेल त्याची काळजी ते वहात असत. " संध्या करीत असतां त्रिंबकपंत मोडक आले होते. त्यांजवळ मध्येंच बोललों. संध्या म्हणजे ईश्वराचें आराधन तें करीत असतां मध्यें बोलूं नये असा माझा अभिप्राय असून तसा चालविण्यास जरी यत्न थोडे दिवस करीत आहें तरी अशा लोकांजवळ बोललें पाहिजे; कारण उगाच लोकांत नाना तर्क निघा-वयाचे." ( ३।९।५७ रो. म. उ. )

पुढें पुढें जशी त्यांची पदवी बरोबरच्या सर्व लोकांपेक्षां वाढत गेली तशी लोकांत निघावयाच्या तर्कांची भीति त्यांस मुळींच उरली नाहीं. **राव-साहेब** संध्येला बसले आहेत म्हणजे संध्या व देवपूजा यांचीं उपकरणें देणाऱ्या नोकर माणसांशिवाय जवळ जाण्याची सुद्धां इतरांस भीति वाटूं लागली.

नियमानें संध्या करण्याचा निश्चय **रावसाहेबांनीं** प्रवासांत सुद्धां सोडला नाहीं. कलकत्त्याच्या १८८७ च्या सफरींत अस्तमानवेला आगगाडींत बसले

असतां पातली. त्यावेळेस संध्या न केल्यास पुढल्या मुक्कामाला मध्यरात्र उलटून जात होती. डब्यामध्यें संध्या करणें अप्रशस्त असें जाणून वेळापत्रक पाहतां एका स्टेशनवर संध्येला पुरेल इतका वेळ गाडी अस्तमानसमयीं थांबावयाची होती; म्हणून त्यांनीं ब्राह्मणास सर्व तयारी अगोदर करायास सांगून ठेवली होती. रावसाहेब कपडे काढून व उपरणें अंगावर पांघरून तयार होते. गाडी थांबतांच स्टेशनच्या फुलबागेंत उघडी जागा पाहून ब्राह्मणानें आसन मांडलें व अंगास भस्मलेपन करून रावसाहेबांनीं झारी हातांत घेतली व ते संध्या करण्यास आरंभ करणार तों असिस्टंट स्टेशन मास्तर पुढ आले व अदबीनें म्हणाले " बाबू यहां बैठनेकी जगा नहीं ! " रावसाहेबांनीं इंग्रजीत त्यांस मोठ्यानें सांगितलें " मला मध्येंच त्रास देऊं नका. मी परमेश्वराची उपासना करीत आहें ! " रावसाहेबांची रागीट व भव्य मुद्रा पाहून असिस्टन्ट स्टेशन मास्तर तेथून चालते झाले.

घरीं देवपुजेला जरी ब्राम्हण ठेवलेला होता तरी रावसाहेब स्वतः पंचायतनाची पूजा करीत व विष्णुसहस्रनामाचा पाठ म्हणत. कोट तुळशी वाहण्याचा बेत अर्धा राहिला. वेळ असल्यास एकादे दिवशीं वैश्वदेवाची पूजा करीत. श्रावणीचे मंत्र स्वतां म्हणत त्या वेळेस उपकरणीं उंबराच्या लांकडाचीं वापरीत. श्री गणपतीची पूजा व आर्ति स्वतां करीत. देव वगैरे सर्व मंत्र निमंत्रित ब्राम्हणांबरोबर म्हणत. एकादशी, शिवरात्र, श्रावणे सोमवार हे उपोषणाचे दिवस पाळीत. श्रावणे सोमवारीं लवकर घरीं कोडताच्या परवानगीनें येत. श्राद्धादि कर्मे यथासांग करीत. सणवार होळीच्या सणाशिवाय नित्य पाळीत, व तसें करण्यांत त्यांस अभिमान वाटे.

एकदां रेव्हेन्यू कोड बिलावरील निवडक कमिटी भरावयाची होती; परंतु तो दिवस सणाचा असल्यामुळें रावसाहेब येतील कीं न येतील अशी शंका होती; म्हणून त्यांस पत्रीं विचारल्यावर त्यांनीं नाहीं म्हणून सांगितलें.

हिंदूंनीं धर्मबाह्य वर्तन केल्यास रावसाहेबांस खेद होई. " मिस फर्ग्युसनच्या पार्टीला गेलों होतों तथें जाणाऱ्या लोकांकडे पाठ करून उपहाराच्या टेब-

त्याशीं ‘ क्ष ’ उभे होते. अशा स्थितींत ‘ क्षं ’स पाहून आश्चर्य वाटलें. त्यांचे पुरस्कर्ते ‘ ज्ञ ’ यांस हे आवडेल अशी आशा करतों.” (३।१।८४ रो. सारांश)

चिरंजीवांच्या लग्नानिमित्त हिंदू व इंग्रज, पार्शी व मुसलमान यांस रावसाहेबांनीं पार्टी दिली पण मंदिरेला मज्जाव होता.

हर्मिटेज नांवाच्या त्यांच्या बंगल्यांत पूर्वी मांसाहारी लोक राहत होते. म्हणून देवां करतां व भोजना करतां निराळी कुडा मेढींची जागा बांधविली व नंतर मोठें घर बांधविलें. त्यांत कांहीं दिवस अग्निपूजा करीत असत. रावसाहेबांचा हा शुचिर्भूतपणा सर्वत्र विदित झाला होता. वेनसलराव मध्वपंथी हे यवनांचा स्पर्श झालेल्या ठिकाणांत भोजन करीत नसत. त्यांस काशीयात्रा करावयाची होती ती वरील अट संभाळून पाडण्याची व्यवस्था करण्यास रावसाहेबांस मद्रासकर मित्रांनीं केली होती. त्याप्रमाणें मुंबईपासून काशीपर्यंत रावसाहेबांनीं पत्रोपत्रीं केली. ( १८।१२।८३ ) रावसाहेबांचा धर्मादाय किति शास्त्रोक्त असे तें धर्मादाय प्रकरण पृष्ठ ६७९ पाहिलें म्हणजे कळेल.

असें असामान्य पवित्र आचरण जों जों लक्षांत आणावें तों तों असें वाटतें कीं मनुष्याच्या देहांत परमेश्वराचें वास्तव्य आहे हा जो समज आहे त्याप्रमाणें परमेश्वराला इतका पवित्र देह बऱ्याच काळांत वास्तव्य करावयास इंग्रजी शिकलेल्या हिंदी लोकांत मिळाला नसेल. रावसाहेब नीं विद्येंत, धंद्यांत, लोकांत, सरकार दरबारांत जो श्रेष्ठपणा मिळविला, त्याच्या आड स्वधर्मनिष्ठा आली नाहीं. इतकी कडक स्वधर्म निष्ठा असून परधर्मीयांविषयीं पूर्ण सहिष्णुता रावसाहेबांच्या अंगीं वसत असे. याचीं उदाहरणें प्रकरण २५ पृष्ठ २७५ येथें दिलीं आहेत. ही त्यांची वृत्ति वाखाणण्यासारखी आहे.

## आश्रमपालन.

। ब्रह्मचारी गृहस्थश्च वानप्रस्थोयतिस्तथा ।
॥ एते गृहस्थप्रभवाश्चत्वारः पृथगाश्रमाः ॥ १ ॥
। सर्वेऽपिक्रमशस्त्वेते यथाशास्त्रं निषेविताः ।
॥ यथोक्तकारिणो विप्रान्नयन्ति परमां गतिम् ॥ २ ॥ ( मनु )

आमच्या पुरातन हिंदुधर्मात विहित असलेल्या चार प्राचीन आश्रमांचें स्वरूप फार वाखाणण्यासारखें आहे. त्याचा उद्देश मनुष्यमात्रास ऐहिक (संसारिक) व पारमार्थिक कल्याणाची प्राप्ति व्हावी हा आहे. रावसाहेबांस जरी पाश्चात्य संस्कृतीचा लाभ विपुलपणें झाला होता तरी संस्कृत विद्येचा त्यांनीं विशेष अभ्यास केल्यामुळें व धर्मग्रंथांचें पुरें आलोचन केल्यामुळें आर्य संस्कृतीची व त्यांची फारकत झाली नव्हती. चारी आश्रमांपैकीं तीन आश्रमांचे धर्म त्यांच्या हातून पाळून झाले व चवथ्याची दीक्षा घेण्यास आयुष्य उरलें नाहीं; नाहींतर तोही त्यांनीं पाळला असता असें दिसतें. शास्त्राज्ञेप्रमाणें (उपनयनविधीचें) गुरूच्या घरीं विद्या पढण्यास जाण्याचें वयोमान आठवें वर्ष धरलेलें आहे. त्याच्या अगोदर दोन वर्षें त्यांच्या विद्येला आरंभ झाला. तो आणखी १०।१२ वर्षें म्हणजे वयाच्या १८ वर्षां पर्यंत चालला, तेव्हां त्यांना शिक्षण देणारे गुरुजी ऋषितुल्य मिळाले. त्यांनीं रावसाहेबांस अवाप्तविद्य करून त्यांचें शील बनविलें. ज्ञानाभिरुचि वाढविली. शेवटीं अध्यापकाची जागा देऊन विद्यादानाची पूर्तता केली.

अशा रीतीनें पहिला आश्रम जो ब्रह्मचर्याश्रम तो अविप्लुत प्रकारें पार पडला. परंतु तो कालमानानें वयाच्या २५ वर्षां नंतर पार न पडतां १८।१९ वर्षांतच पार पडला पुढें नोकरी लागतांच भुजेस बिऱ्हाड केल्यावर नियमित गृहस्थाश्रमाला आरंभ झाला. ब्राह्मण गृहस्थानें वेदपठण करावें ही जी शास्त्राज्ञा आहे ती पाळण्याकरतां १८६४ सालीं दसऱ्याच्या मूहूर्तानें ऋग्वेदाची संथा रावसाहेबांनीं घेतली. (रो. उ.) संहितेचें पढणें कधीं कधीं वे० नारायणभट्ट गाडगीळ यांच्या बरोबर होत असे.

या आश्रमांत असतां अगदीं या चरित्राच्या प्रारंभीं दिलेल्या श्लोकांत जें गृहस्थाश्रमाचें वर्णन आहे त्याप्रमाणें त्यांचें आचरण होतें. हें मागील चरित्रावरून दिसून येईलच. द्वितीय आश्रमाची मर्यादा पत्नीच्या हयातीपर्यंत सांगितलेली आहे. त्याप्रमाणें त्यांचा हा आश्रम त्यांची प्रिय पत्नी १८७९ सालीं निवर्तल्यावर संपला. नंतर ते मुलाचें लग्न १२ व्या वर्षीं करून

देऊन आपण वानप्रस्थाश्रमांत शिरले. "चिरंजीवास ११ वें सरून १२ वें वर्ष लागलें आहे. आतां त्याचा विवाह करून आपण मध्यस्थ असावें असा विचार आहे." ( वे॥ वामनराव जोशी बुवांस पत्र. ) मध्यस्थ हा वानप्रस्थाश्रमविषयक शब्द आहे.

**। महर्षि पितृदेवानां गत्वाऽनृण्यं यथाविधि ।**
**॥ पुत्रे सर्वं समासज्य वसेन्माध्यस्थमाश्रितः ॥ १ ॥ ( मनु )**

रावसाहेब वानप्रस्थाश्रमांत शिरले म्हणजे वनांत जाऊन राहिले नव्हते. परंतु यांची जी जागा राहण्याची होती ती विविक्त स्थलीं महालक्ष्मीच्या वाटेवर होती. त्यावेळेस आसपास वसति नव्हती. यांच्या बंगल्याचें पहिल्या मालकानें दिलेलें नांव " आश्रम " असेंच होतें. तें आतां हे वानप्रस्थाश्रमाप्रमाणें आंत राहूं लागल्यावर सार्थ झालें. वानप्रस्थानें वन्य पदार्थांचें सेवन करावें असें शास्त्र सांगतें. पत्नी निवर्तल्यावर कांहीं दिवस लिंबाचा पाला वांटून एक गोळा सकाळीं भक्षण करीत असत. परंतु रावसाहेबांचें खाणें दिवसांतून दोन वेळां पुष्कळ दूध घातलेली काफी व दोन वेळां शाल्योदन व रात्रो शिळी दशमी याहून अधिक पौष्टिक नव्हतें. अनेक ऋतुसंभव भाज्या सेवन करण्याचा त्यांचा नेम असे. "भाजी पाठविणें ती कांटलीं, चंवईचे कांदे, भारंग कुड्यांच्या शेंगा, तेरें अळूं, ' बाबलीची भाजी ' इ. " अशीं पत्रें गांवच्या कारकुनांस जात. भोजनोत्तर चांगल्या प्रकारें केलेला विडा व मध्यंतरीं चिकणी सुपारी सेवन करीत. मधल्या वेळीं थोडे बदाम व खडीसाखर खात असत.

१८८१ सालांत त्यांच्या चिरंजीवांचें लग्न झाल्यावर, १८८३ सालापासून मुक्त होण्याची इच्छा† त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. अथवा जी स्वाभाविकपणें

† १८७१ सालीं रावसाहेबांनीं एका ज्योतिषास कांहीं प्रश्न विचारले होते त्यांत पहिला प्रश्न होता तो " मनोजय आणि वासनाक्षय होण्याचा संभव आहे कीं नाहीं ? "

होती ती प्रबल झाली. बाळकृष्ण शास्त्रीबुवा फडके+ मु॥ वांई यांस त्यांनीं लिहिलें:—"प्राणिमात्र प्रकृतिवश दिसतो त्याचें उदाहरण हें पत्र. आपण मानितात तसें अद्यापि कांहीं नाहीं. **त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः।** तीं सर्व अद्यापि उघडीं दिसतात. बंद करण्याचा मार्गही दुस्तर दिसतो. अशा स्थलीं व्यवसाय विपरीत असल्यामुळें साधुसमागम दुर्लभ. मुक्त असून बद्ध व बद्ध असून मुक्त. त्यांतून काय नारायण तड लावील ती खरी. भा. स्कं. ११ अ. १४ श्लोक २५ टीका:—मासादर्वाक् जितानि लोभवति असें सिद्ध म्हणतात, याची ओळख कशी व्हावी !" ३।११।८१

"श्री *विशुद्धानंद स्वामींस शिरसाष्टांग नमस्कार सांगावे उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः या न्यायानें आमची आसुरी संपत्ति, शांति व सौख्य विस्तारीत नाहीं, तेणें करून सुखदुःखाचे तरंग उद्भवतात ते तत्तत् प्रारब्धसंक्षयात् च्छिन्न व्हावे म्हणून अनुग्रह मागतों."

( ३०।५।८३ चें देवनाथ शास्त्री यांस पत्र. )

"कथा करण्याचें मनांत येतें परंतु अद्यापि विणा उचलण्याची माझी योग्यता नाहीं." ( बळवंतराव जोशी यांस पत्र )

चिरंजीवांचें लग्न केल्यावर त्यांस जरा मोकळें वाटूं लागलें. "कांहीं कालपर्यंत कांहीं अंशीं वचनांत बद्ध होतों तो आतां भगवत्सत्तेनें मुक्त झालों ही आनंदाची गोष्ट आहे. आतां मी आपला मुक्त हितेच्छु असून

---

+ यांच्या विषयीं आलोपीदीन डोमई, नेपाळ सरकारचे धर्माधिकारी, यांस रावसाहेबांनीं पत्र लिहिलें कीं "हे यात्रेकरतां येत आहेत यांचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. यांची निरपेक्ष सेवा आपण होईल ती करावी. असे हे योग्य आहेत."

* या सत्पुरुषाची आवड रावसाहेबांस फार होती. प्रकरण ६० पृष्ठ ७२७ पहा. तेथें गंगेचे घांट स्वतां फिरून त्यांचें वर्णन रावसाहेबांनीं रोजनिशींत लिहून ठेवलेलें दिलें आहे. त्यांत अहिल्याबाई घांटाचे वर्णन करतांना रावसाहेबांनीं मुद्दाम नोंदून ठेवलें आहे कीं येथें श्रीविशुद्धानंद स्वामी रहातात.

सर्वांचें कल्याण इच्छितों. ही स्थिति ईश्वराच्या अनुग्रहानें प्राप्त झाल्यामुळें आतां दग्धहस्त, दग्धाजिव्ह होण्याचा विशेष संभव नाहीं म्हणून ईश्वराचा धन्यवाद गाऊन हें पत्र पुरें करतों. " ( बडोद्याचे रा. रा. सदाशिवराव बापट यांस ५।४।८४ चें पत्र. )

" संचित व क्रियमाण ह्याविषयीं बाळकृष्ण शास्त्री बुवा यांचा सिद्धांत काय होता हें समजण्याची इच्छा आहे. सांप्रतच्या श्ववृत्तीचा कंटाळा आला आहे. तथापि प्रवाहपतित कार्य चाललें आहे. ' माते संगोऽस्त्वकर्मणि ' हें अद्यापि साध्य नाहीं. सुख दुःख हें दिनरात्रिवत् अलंघ्य आहे. म्हणून सर्वथा अभिमान तुटणें हा उत्तम पक्ष. तो तुटण्यास आत्मानात्मस्वरूपाचा निदिध्यास पाहिजे. तो अनाश्रम्यांस, परसेवेंत काल घालविणाऱ्यांस दुःसाध्य दिसतो. आपण आणखी नरसिंह शास्त्रीबुवांनीं एकचित्त होऊन उपाय योजावा. देहप्रारब्ध सुटत नाहीं परंतु आणखी बराच अभ्यास कर्तव्य आहे इत्यलं. ( २९।७।८३ चे वासुकाका आठले यांस पत्र. )

या आश्रमांत ७।८ वर्षे काढल्यावर रावसाहेबांचें लक्ष चतुर्थाश्रमाकडे गेलें होतें. " मला आतां संन्यास घ्यावा असें वाटतें. लोक म्हणतात विश्रान्ति घ्या. विश्रान्ति आणखी कशी असते? "

( ३०।१।१८८५ चें बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

कलकत्त्यास जातांना अथवा येतांना काशीस जाण्याचा रावसाहेबांनीं प्रघात ठेविला होता. त्यांस पुढें वाटूं लागलें कीं तेथें एक वाडा आपण विकत घ्यावा अथवा बांधवावा. प्रसिद्ध बारामतिकर यांच्या वाड्याची समग्र जागा विकावयास निघाल्यामुळें ती घेण्या करतां मुन्सी माधवप्रसाद यांस १६।६।८४ रोजीं लिहिलें होतें तो बेत जुळून आला नाहीं. पुढें ८७ च्या मार्च महिन्यांत दुर्गाघाट अथवा ब्रह्मघाट इ. महाराष्ट्र ब्राह्मण लोकांच्या वस्तींत एकादें घर मिळेल तर विकत घेण्यास मि. वाजपेयी यांस विनंति केली होती. हाही संकल्प तडीस गेला नाहीं.

"मी अत्यंत गरीब मनुष्य तथापि अद्यापि शीतोष्ण सुखदुःखेषु इ. द्वंद्वाचीं व्यथा होते त्या विवंचनेंत आहें. असो आपली कृपा आहे तर त्यापासून सुटेन." (७।५।८८ चें गुरुजी स्वामी हरिहर शास्त्री द्रवीड यांस पत्र.) काशीस जाऊन राहिल्यानें तेथें संन्यस्त वृत्तीचीं दुर्मिळ माणसें त्या वेळेस होतीं त्यांपैकीं श्री विशुद्धानंद स्वामी होते. त्यांच्या कृपेनें संन्यस्त वृत्ति प्राप्त व्हावी अशी रावसाहेबांची इच्छा होती परंतु परमेश्वराची नव्हती म्हणून आयुष्य आटलें.

## लाङ्गूलचालनाचा तिटकारा.

। लाङ्गूलचालनमधश्चरणावपातम् ।
॥ भूमौ निपत्य वदनोदरदर्शनंच ॥
। श्वापिण्डदस्य कुरुते गजपुंगवस्तु ।
॥ धीरं विलोकयति चाटुशतैश्च भुंक्त ॥ १ ॥

(भर्तृहरि.)

इतक्या गुणांचें वास्तव्य अंगांत असल्यावर रावसाहेबांस सहजींच लांगूलचालनाची नावड होती.

ज्याच्या अंगांत चांगले गूण नाहींत त्यालाच कार्य साधून घेण्याकरतां लांगूलचालन करावें लागतें. लांगूलचालन हें कोणताही कमीपणा भरून आणण्याकरतां दिलेली लांच होय. तिचा तिटकारा तेजस्वी पुरुषाला असलाच पाहिजे.

## समाजांत वजन.

। नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते वने ।
॥ विक्रमार्जितसत्वस्य स्वयमेव मृगेन्द्रता ॥ १ ॥

आपलें लोक ऐकतील इतकें समाजांत वजन वाढावें हें एक रावसाहेबांच्या ध्येयां पैकीं ध्येय होतें (पृष्ठ १२१ पहा). तें ध्येय या सर्व गुणांनीं रावसाहेबांनीं साध्य केलें होतें. याविषयींचा दाखला १८६३ सालापासून मिळतो.

त्यासालीं १० मार्च रोजीं वामन आबाजी मोडक ( जे शेवटीं

एल्फिस्टन् हायस्कूलचे प्रिन्सिपॉल झाले होते ते ) यांनीं पुढें दिल्याप्रमाणें रावसाहेबांस पत्र लिहिलें:—

" मुंबई सिव्हिलसर्व्हिसमधल्या कांहीं मोठ्या वजनदार लोकांतही तुमचें वजन चांगलेंच.आहे व त्याप्रमाणें मुंबईच्या कुबेरपुत्रांत आहे." मुत्तुकुमार स्वामी सिलोनचे प्रसिद्ध बॅरिस्टर हे रावसाहेबांच्या गुणांचे एक प्रशंसक होते. त्यांनीं रावसाहेबांस लिहिलें:—" आपल्या असंख्यात देशबांधवांची स्थिति सुधारण्याच्या कार्याहून दुसरें उन्नतिकारक कार्य कोणतें आहे ! तुमचा हेवा करणारे पुष्कळ असतील. पण तुम्हीं हार्कनेस, पॅटन व रीड यांचे कच्चे चेले नाहीं. त्यांनीं सोदाहरण व सोपपत्तिक शिक्षण तुम्हांस दिलें आहे."

" सार्वजनिक कामांत तन, मन व धन अर्पण करून प्रामाणिकपणें वागणार तुम्हीं या खलोचित, स्वार्थनिष्ठा व शाठ्य यांनीं विशिष्ट, वालुकामय, निर्जल, निर्वृक्ष अशा मरुप्रदेशांत मध्येंच आढळणारी हरिततृणाच्छादित, नयनानंदकारिणी, जलमय वनस्थली आहांत. तुमची विचारसरणी व ज्ञान यांची कल्पना तुम्हीं ज्या लोकांत दैवयोगानें येऊन पडलां आहांत त्यांस स्वप्नांतही व्हावयाची नाहीं. तुमच्याबद्दल पूज्य बुद्धि त्यांनीं कृतीनें नाहीं दाखविली तरी चिंता नाहीं पण मनांत तरी बाळगण्यास त्यांस तुम्हीं भाग पाडाल. इतकी लोककल्याणाची सामग्री तुमच्या जवळ आहे. लोक–कल्याणाचे नवे मार्ग शोधण्याची अवश्यकता तुम्हांस नाहीं किंवा तुम्हीं तें करूं शकाल असा विश्वास उत्पन्न करण्यास कोठून प्रमाणपत्रें आणावयास नकोत. इंग्रज लोकांनीं अन्यत्र जें जें केलें आहे त्याची त्याची नक्कल येथील परिस्थितीप्रमाणें थोडाबहुत फरक करून तुम्हांस करणें आहे." अशीच प्रशंसा करणारे दुसरे लोक होते.

"तुमचें नागरिक या दृष्टीनें स्वतंत्र बाण्याचें वर्तन पाहून व सार्वजनिक हिताकरतां तुम्हीं तन, मन, धन अर्पण करीत आहांत तें पाहून मी तुमचा एक जबर प्रशंसक बनलों आहे. मला तुमच्या सारख्या लोकांचे फोटो त्या

करतां केलेल्या बुकांत ठेवावयाचे आहेत म्हणून मिळेल तितक्या लवकर मला एक प्रत पाठवून द्यावी."

( **नवरोजी फर्दुनजी** यांचें २५।८।७७ चें पत्र. )

"तुमचें नांव ऐकिलें कीं बाहेरगांवच्या लोकांना धास्ती भरते. * ( २२।७।१८७७ चें **आर्देसर** फ्रामजी **मूस** यांचें पत्र ) असा धाक मुंबईच्या लोकांसही वाटे. "तुम्हीं आमचा कड घेऊन आमच्या पक्षाचें समर्थन करण्यास उभे राहिलेत म्हणजे जें काम होईल, तें मोठ्या सेनेच्या हातून होणार नाहीं असें डॉ. **ब्लेनी** यांनीं **रावसाहेबांस** कळविलें होतें. ( प्रकरण ४१ पृष्ठ ४९७ पहा. )

एकदां थोरले श्रीमंत तुकोजीराव होळकर सरकार यांची सार्वजनिक रीतीनें समारंभ करून संभावना करावयाची होती. त्यांत **रावसाहेब** प्रमुख होते. या समारंभाच्या विरुद्ध कांहीं मंडळी होती. तिनें एक दोन हूड पोरें हाताशीं धरून या समारंभांत कांहीं बखेडा करून त्यास गालबोट लावण्याचा बेत केला होता. ती गोष्ट **रावसाहेबांच्या** कांनीं वेळेवर आली. त्या दोहोंपैकीं एक तर श्रीमंत होळकर सरकार यांचा ओशाळा होता. हें जाणून **रावसाहेबांस** थोडा विस्मय वाटला व किंचित् दुःख झालें. सभेची वेळ होतांच **रावसाहेब** सभेंत शिरत आहेत तोंच वरील दोहोंतील एक त्यांच्या नजरेस पडला. त्यानें **रावसाहेबांची** रागीट मुद्रा पाहतांच बाहेरून पळ काढला व **रावसाहेब** सभेंत शिरतांच दुसरा इसम कोठें आहे तें पाहूं लागतांच तो सभेंतून उठून आपल्या मित्राच्या वाटेनें दूर निघून गेला.

मुंबईत एक प्रसिद्ध पारशी सुशिक्षित गृहस्थ एका गुजराथी पत्राचे एडिटर होते. त्यांच्या विरुद्ध दुसऱ्या एका पारशी व गुजराथी वर्तमानपत्रांत कांहीं बेअब्रूचे लेख वर्षभर येत गेले. त्यांनीं त्या पत्राच्या मालकावर फिर्याद केली. त्या कामीं चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट यांच्या कोडतांत तो गुन्हेगार ठरून

---

* Your name is a terror to the mofussil people.

त्यास १००० रु. दण्डाची शिक्षा १८८२ त झाली. बर्वे यांच्या खटल्यांत केसरी व मराठा यांच्या अधिपतींस झालेली शिक्षा पाहिली म्हणजे मॅजिस्ट्रेटनें गुन्हेगारावर फार दया केली, अशी टीका पुष्कळ वर्तमानपत्रांत आली. परंतु केसरी व मराठा यांच्या अननुभविक, तरुण व विद्यालयांतून नुकतेच बाहेर पडलेल्या राजकीय लेखकांस, प्रतिवादी हा लोकांत सन्मान्य असल्या-मुळें त्याची बे अब्रू करून फार नुकसान न करणाऱ्यांस, स्पष्टार्थ, कडक पण सभ्य भाषा वापरणाऱ्यांस, अत्यल्प मात्सर्य दाखविणाऱ्यांस सुद्धां कैदेची शिक्षा झाली; पण या पत्राच्या वृद्ध, अनुभविक, धार्मिक लेखकास, आपल्या सहकारी बंधूची प्रच्छन्नार्य शब्दांत बेअब्रू करून कायमचें नुकसान करणारी ग्राम्य भाषा वापरणाऱ्यास, मात्सर्यानें भरलेल्या पुरुषास नुसत्या दण्डाची शिक्षा होते ! यास्तव येथेंच न सोडतां लायब्ररींतून या वृत्तपत्राला अर्धचंद्र द्यावा असें म्हणून त्या खटल्यांतील निकालावर दिलेल्या सर्व वृत्तपत्रकारांच्या मतासह एका पार्शी गृहस्थानें रावसाहेबांच्या कडे व नेटिव्ह जनरल लायब्ररीच्या * व्यव-स्थापकांकडे कागद पत्र पाठवून दिले. पुढें असें आढळून आलें कीं, त्या पत्रावर अशा खासगी संस्थेंत बहिष्कार घालण्याचें कारण नाहीं, असें राव-

* हल्लीं कापाचे मैदाना नजीक धोबीतलावाच्या जागेवर जिच्याकरतां नवी इमारत बांधली आहे व जिला वाड्या लायब्ररी असें नांव देण्यांत आलें आहे. ती लायब्ररी १८४५ च्या अगोदर अस्तित्वांत आलेली होती. तिची स्थापना कांहीं साध्या परंतु सुज्ञ व परोपकारी मुंबईच्या शहरवासी जनांनीं केली. तीस धनिकांनीं व राजेरजवाड्यांनीं पैशाचा पुरवठा केला तेव्हां तिच्या कामाची व्यवस्था १८४५ त चांगली झाली. पुढें १८६२ सालीं ती लोकांस अर्पण करण्यांत आली. म्हणजे तिला सार्वजनिक स्वरूप देण्यांत आलें. मुंबईस कायमचे रहावयास आल्यावर १८६५ सालीं रावसाहेब तिचे तहाहयात सभासद झाले. व पुढें १८६६ सालापासून तिच्या-व्यवस्थापक मंडळीचे सभासद झाले. त्यावेळीं डा. भाऊ दाजी, नारायण दिना-नाथजी, डोसाभाई फ्रामजी, हारमसजी दादाभाई, बाळ मंगेश वागळे, हे इतर व्यवस्थापक होते, व भाऊ दाजी अध्यक्ष होते.

साहेबांनीं मत दिलें. तेव्हां त्या पार्शी मित्रानें रावसाहेबांस एका पत्रीं विनंति केली कीं, तुम्हीं मला पाठिंबा दिल्याशिवाय मला या भानगडींत यश येणार नाहीं, तुह्मी म्हणाल तसें होईल.

## थाटाची पण व्यवस्थित राहणी.

॥ जनाकीर्णं मन्ये हुतवहपरीतं गृहमिव ॥

(शाकुन्तल)

**रावसाहेबांची** राहणी मोठ्या थाटाची असे. मोठा * बंगला, गाडीघोडे, गाई, म्हशी, हरिणें, कुतरे इ० पशू; मोरें, खबूतरें, पोपट, चिमण्या इ० पक्षी; तबेले, गोठे, पिंजरे व बागबगीच्या व कारंजीं इ० आरामस्थलें; यांची व्यवस्था ठेवणारे घोडेवाले, गोंवारी, गडी, माळी; गृहकृत्यें चालविणारे चाकर नोकर; गांवांचीं, वकिलीचीं वगैरे कामें चालविणारे कारकून, व आप्त इष्ट यांचा मोठा परिवार **रावसाहेब** एकाद्या संस्थानिकाप्रमाणें अथवा बड्या जहागीरदाराप्रमाणें जवळ बाळगीत असत. त्या वेळच्या संस्थानिकांचें अथवा जहागीरदारांचें वर्णन करावयाचें म्हणजे असें कीं वा! त्यांचा केवढा परिवार! कोण अंदाधुंदी! यजमान कोठें आहेत असें एकानें विचारलें तर त्याचा जबाब काय मिळावयाचा तें पुढील श्लोक बरोबर वर्णन करीत आहे.

। ‡ केचिन्निद्रागताः केचित कथयंति बहिर्गताः ।
॥ केचिदन्तर्गताः केचिन्नो जाने क्वगता इति ॥ १ ॥

या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें अगदीं बरहुकूम एकाची दाद दुसऱ्याला नसावयाची. परंतु **रावसाहेबांनीं** पहिल्या म्हणजे जुन्या थाटाचें वैभव सांभाळलें होतें व त्याबरोबर इंग्रजी राज्यांत दिसून येणारी वक्तशीर व्यवस्था संभाळली होती.

---

* प्रकरण ५१ वें पृष्ठ ६७५ पहा. प्र. ४५ पृष्ठ ६४१ पहा.

‡ **अर्थः**–कांहींजण सांगतील यजमान निजले आहेत; कांहींजण सांगतील बाहेर गेले आहेत; कांहींजण सांगतील आंत गेले आहेत; व कांहींजण सांगतील कोठें गेले आहेत काय कीं आम्हांला माहीत नाहीं!! हो! उगाच खोटें कशाला बोलावें!!!

कोणी आल्यास एक मनुष्य पुढें येऊन त्यास कचेरींत बसवी. रावसाहेबांकडे काम असल्यास त्याचें नांव व काम काय आहे तें दिवाणजी एका लांब डायरींत लिहून रावसाहेब घरीं असल्यास लागलेंच नाहींतर आल्यावर त्यांच्याकडे पाठवून देण्यांत येई व वेळ नेमून भेट होत असे. बहुशः ते मुख्य लायब्ररींत अगदीं सकाळीं स्नानसंध्या आटपून बसत असत. त्यांत प्रविष्ट होतांच उजव्या बाजूला मोठ्या छापील अक्षरांनीं इंग्रजींत लिहिलेल्या ३ नियमांची फळी टांगलेली दिसे.

* १ वेळ हा वित्ताहून अधिक मूल्यवान आहे.

× २ जें आज तुमच्या हातून होण्यासारखें आहे तें उद्यांवर ढकलूं नका.

३ प्रत्येक वस्तु ठेवण्याला निराळी जागा राखून ठेवा व त्या जागेवर ती वस्तु ठेवा.

ही एकंदर व्यवस्था पहातांच आधींच लोक चपापून जात व ठाकठीकपणाचा धडा प्रत्यक्ष दर्शनानें शिकत. तो अनेक व्याख्यानांहून व लेखांहून परिणामकारक होई.

---

* 1. Time is more valuable than money,
2. Never put off till tomorrow what you can do to day.
3. A place for every thing and every thing in its proper place.

× । नकश्चिदपि जानाति किंकस्यश्वोभविष्यति ।
अतःश्वः करणीयानि कुर्यादद्यैव बुद्धिवान् ॥ १ ॥

या म्हणींची देणगी रावसाहेबांना ज. जेकब यांनीं केली असावी असें एका पत्रावरून दिसतें. " बुकडेपोचें काम माझेकडे असून मी मुंबई शहरांतील शाळेचा डेप्युटी इन्स्पेक्टर आहें; व माझ्या बुद्धीप्रमाणें मी तें काम आपल्या शाळेंत शिकलेल्या सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यास योग्य अशा तीन नियमांप्रमाणें करीत असतों." ६।८।५७

आंत शिरल्यावर त्याच्या कामाची चवकशी होऊन पुढची व्यवस्था लागे व तो परत जाई व परत जातांना पाही तों दुसरा मनुष्य रावसाहेबांची भेट घेण्यास नेमल्यावेळीं तयार असलेला आहे. कोणाची दाद लागली नाहीं असें केव्हांही झालें नाहीं. सर्व खासगी व सार्वजनिक कामें वेळेवर होत असत.

## सेवकप्रेम.

रावसाहेबांचें सेवकांवर प्रेम फार असे. श्रीमन्त लोकांस सेवकांची जरूरी त्यांच्या परावलंबनाच्या मानानें असते. व त्या जरूरीच्या मानानें श्रीमन्तांचें प्रेम सेवकांवर असतें. जास्त प्रमाणांत नसतें. परंतु रावसाहेब जें सेवकांवर प्रेम करीत तें ते आपल्या कुटुंबांतील एक आहेत असें समजून करीत. परकेपणाला जागा त्यांच्या मनांत मिळत नसे. लवकर उठण्याच्या, लवकर निजण्याच्या, मिताहाराच्या* वगैरे चांगल्या संवयी त्यांस रावसाहेबांबरोबरच जडल्या असल्यामुळें त्यांची प्रकृति वारंवार अथवा फार बिघडत नसे. बिघडल्यास डाक्तर किंवा वैद्य यांचें येणें रोज असल्यामुळें व रावसाहेब त्यांच्या करवीं योग्य उपाय वेळेवर करीत असत त्यामुळें व्याधिनिरसन लवकर होत असे. जे कारकून व नोकर येथें जवळ असत त्यांची व्यवस्था रावसाहेबांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं होत असे. तशी गांवावरच्या सेवकांचीही होत असे. " तुमच्या पायांनीं आम्हीं चालतों. ते मजबूत असले पाहिजेत. " ( विष्णुपंत जोगळेकर यांस पत्र. ) कित्येकांच्या गृहस्थितीकडे रावसाहेब लक्ष पुरवीत. " आपल्या येथें दुभतें नाहीं तर हाल होत असतील म्हणून एक

* भिन्न ऋतुसंभव फलमूलादि वस्तूंचें सेवन करण्याची लालसा पुष्कळांस असते. ती तर तृप्त झाली पाहिजे या करतां मनुष्य स्वभावाकडे लक्ष देऊन नियमानें वर्षांतून दोन वेळां सर्व माणसांस आतृप्ति उंसाच्या रसाचें पान करवीत त्या करतां त्यांनीं मुद्दाम चरक एका खोलींत बसवून ठेविला होता. त्याप्रमाणें कांकड्या झाल्या म्हणजे खमंग काकड्या करवीत. तसाच उंची आंब्यांचा आम्ररस करवीत व शिजविलेल्या भुइमुगाच्या शेंगा वांटीत अशा गोष्टीचे उल्लेख ३।३।५९ पासून आहेत.

गाय विकत घ्यावी व खर्च गांवखातीं घालावा." ( माधवराव दिवाडकर यांस पत्र. ) असें प्रेम सेवकांवर केल्यामुळें रावसाहेबांकडील कांहीं नोकर पिढीजात सेवक होते.

## जनावरांचें प्रेम.

रावसाहेबांचें जनांवरांवर सुद्धां प्रेम असे. रावसाहेबांची सेवा बरीच वर्षें इमानानें करून त्यांचा हरण्या नांवाचा एक घोडा १८७० सालीं मरण पावला. त्याची नोंद त्यांनीं रोजनिशींत स्मरणार्थ करून ठेविली आहे. त्याचें मृत शरीर त्यांच्या मनांतून कोकणांत आपल्या इनामी गांवीं नेऊन पुरावयाचें होतें. परंतु दिवस होते पावसाळ्याचे म्हणून तसें करतां येईना. या करतां रावसाहेबांनीं एक जस्ताच्या पत्र्याची पेटी करविली. व आंत खालीं वर मीठ घालून मध्यें घोडा ठेवून आंत आणखी अबीर बुक्का व कापूर घालविला. त्यावर एक शाल पांघरूण घालविली. वरतीं फुलांच्या माळा घालून ती पेटी बंद करविली. दुसऱ्या एक लांकडाच्या पेटींत ती पेटी घालविली व मुंबई म्युनिसिपॅलिटीच्या आरोग्यखात्यांतील वरिष्ठ अम्मलदारांची परवानगी आणून मुंबईतच त्यांनीं दाखवून दिलेल्या एका जागीं पुरून टाकविलें.

याचप्रमाणें रावसाहेबांनीं आपलें आवडतें हरिण मृत झाल्यावर राहत्या बंगल्याच्या आवारांत एका वटवृक्षाच्या छायेखालीं वर शाल घालून पुरून टाकविलें.

मुंबई सोडून महाबळेश्वरीं किंवा इतर ठिकाणीं बरेच दिवस रहावयास गेल्यास " माझ्या मोरांकडे लक्ष द्या " म्हणून घरीं असलेल्या व्यवस्थापकास मुद्दाम लिहून जात असे.

एकदां एक रसायण रावसाहेबांनीं घरीं तयार करविलें होतें. त्याची भट्टी उडदाच्या भाकऱ्यांत लागत असे त्या भाकऱ्या चंद्र्या नांवाचा एक पाडा खात असे. त्या त्यास फार मानवून तो मस्त झाला होता. त्यास कोंकणांत पाठविण्यांत आलें तेथें त्याला साखळदंडानें बांधावें लागे. रावसाहेब नंतर

एकदां कोंकणांत गेले होते. चरतांना वप्रक्रीडा करून आल्यावर त्याचीं शिंगें मातीनें भरलेलीं पाहून सांखळदण्डही तोडून टाकण्याच्या त्याच्या गोष्टी ऐकून रावसाहेबांस फार कौतुक वाटलें.

हर्मिटेज बंगल्यांत ' टॉमी ' नांवाचा एक बोका रावसाहेबांचा आवडता असे. नुसता दुग्धाहार करून व्रतस्थ असे. म्हणजे उंदराची हिंसा केव्हांही करीत नसे. थोडा अधाशी असे. अजीर्ण झाल्यास दुर्वांकुरांचें भक्षण करण्याची जी उपजत बुद्धि सर्व मार्जारांत असते ती त्याच्या कामीं येई. परंतु एका अधिक भक्षणाचे प्रसंगीं ती निरुपयोगी ठरली. व त्यास आसन्नमरण स्थिति प्राप्त झाली. रावसाहेब घरीं नव्हते. रात्रौ घरीं आल्यावर त्यानें विव्हळत आपल्या यजमानास वृत्त कळविलें. रावसाहेबांनीं त्यास सुईच्या अग्रावर राहील येवढें ताम्र भस्म स्वतां दिलें तेवढ्यानें त्यास ओकारी येऊन दरदरून घाम सुटला व तो सावध झाला व लवकरच पूर्ववत् निरामय झाला.

कोकणच्या गांवीं भाताची ने आण करण्याकरतां बैलांच्या जोड्या ठेवलेल्या असत. उन्हाळे दिवसांत बैल जरा थकतात म्हणून त्या दिवसांत काम लागल्यास तत्रस्थ कारभाऱ्यांस रावसाहेब लिहीत:—" खेड किंवा काप येथील परतभाड्याच्या गाड्या मिळतात, त्या घरीं पोंचवावयास भाड्यानें करून खर्च माझे खाजगी खात्यांत लिहावा कारण आमचीं गुरें अलिकडे बरींच थकलीं आहेत. त्यांस दोन खेपा इतक्या चालीच्या कमा झाल्यानें आमचें हित आहे. " " रेडे वळण्यास ( आडगांवास ) पोंचवावे ते फार थकले आहेत. "

" नागरकीचे वेळीं गुरांस पेंड किंवा उडीद द्यावे. " २०।१।८४

वरकस गांवांतील गुरें उन्हाळ्यांत थकल्यास त्यांस पेंडींतून किंवा दाण्यांतून मीठ घालावयास सांगत. व पंधरा दिवशीं २ शेर कांदे घालावयास सांगत. आपल्या येथील वृद्ध जनावरें पांजरा पोळांत न पाठवितां त्यांस गांवीं पाठवून त्यांची निगा चांगली होईल अशी व्यवस्था करवीत.

## संसारांत दक्षता.

### न भयंचास्ति जाग्रतः

बहुशः जे विद्वान असतात ते व्यवहारदक्ष नसतात. कदाचित वेळाच्या अभावीं त्यांस व्यवहाराकडे लक्ष द्यावयास वेळ नसतो. त्यामुळें व्यवहारदक्षता त्यांस प्राप्त होत नाहीं. परंतु **रावसाहेब** हे फार विद्वान व फार व्यवहारदक्ष होते. विद्याव्यासंग, सरकारी व खासगी इतर सार्वजनिक कामें करून दक्षतेनें संसार करण्या येवढी त्यांची नजर बारीक होती. हा एक रावसाहेबांच्या स्वभावाचा विशेष आहे. घरचीं नित्याची कामें कोण बरोबर करीत आहे, कोण करीत नाहीं तें माडीवरून खालीं भोजनास येतां जातां लांबवर नजर टाकून तेव्हांच **रावसाहेब** बघत असत. त्यामुळें त्यांच्या हुकमाबाहेर अथवा निष्काळजीपणें कोणी कोणतीही गोष्ट करील हें शक्य नव्हतें.

" गडी घर झाडतील तेव्हां कपाटें झाडतांना ग्लास म्हणजे कांचेचें सामान त्यास जपावें नाहींतर फोडून टाकतील " ( ३०।१।८६ चें विष्णुपंत जोगळेकर यांस कलकत्त्याहून पत्र. )

"आजरोजीं प्रयागाहून एक मण आंवळे गेले आहेत त्यांतून २०० पर्यंत बरणींत मुरवून ठेवावे. चिनी मातीची बरणी मोठ्या तोंडाची आंतून ग्लेज म्हणजे चकाकीदार असते ती घ्यावी; या प्रकारच्या बरण्या आपल्या घरांत पुष्कळ आहेत, त्यांतून एकादी मोकळी असल्यास नवी घेण्याचें कारण नाहीं. " ( **वामनराव मंडलिक**, रावसाहेबांचे पुतण्ये यांस १७।२।८५ चें पत्र. )

" या पुढें जें तूप पाठवावयाचें तें प्रथम तपेली भरल्यावर चांगलें घट्ट थिजे पर्यंत ठेवावें, नंतर वर केळीचें ओलें पान घालून बांधलें होतें तसें न करतां चांगलीं दोन सुकवतें लावून बांधावें व मेणकापड चांगलें मजबूत बांधावें व घट्ट बांधावें म्हणजे तूप बाहेर येणार नाहीं. पूर्वींचें किंचित् पातळ होऊन बाहेर तपेलीस लागलें होतें. " कलकत्त्यास असतां घरचें तूप मुंबईहून रावसाहेब आणवीत असत.

शेतांचा अथवा गांवचा मालक दूर असला म्हणजे नीट व्यवस्था त्या शेतांची अथवा गांवाची होत नाहीं असा अनुभव आहे. परंतु रावसाहेबांची बुद्धि सर्वगामी असल्यामुळें ते आपल्या जमीन जुमल्याची व्यवस्था दुरून पत्रोपत्रीं करूं शकत, असें त्यांच्या गांवांवरील कारकुनांशीं पत्रव्यवहार आहे त्यावरून दिसतें. नवी शेती पाडणें, जंगलावर नजर ठेवणें, नोकर ठेवून घरीं शेती करणें, त्याकरतां बैल व रेडे बाळगणें हीं सर्व कामें कारकुनांकडून रावसाहेब करून घेत. त्यांस वेळ कसा मिळे ह्याच आश्चर्य वाटतें.

यजमानाची समजूत कारकूनमंडळी कशी घालतात तेंही त्यांस विदित होतें.

" पाऊस तेथें जसा पडत आहे असें लिहितां तसा येथेंही पडत आहे. ही भगवंताची सत्ता. भिणें किंवा ओरडणें हें अगदीं अयोग्य आहे. होणार तें होत आहे. सर्व इस्टेटीच्या मागें सर्व नफे व नुकसानें होत आहेतच. तुम्हीं कुळांच्या तर्फेनें येकच बाजू धरून चालतां याचा अर्थ मला समजत नाहीं. उलट त्यांना असा प्रश्न करा कीं ज्याणीं करारनामे लिहून दिले त्यांच्या अनुमानाच्या बाहेर जर दुप्पट उत्पन्न होतें तर ते मला एक दाणा जास्त देते काय ? अथवा मला तरी मागतां येतें काय ? जर असें असेल तर ते म्हणतात असाच इनसाफ आहे. तुम्हीं धीर धरून काम चालवावें. "

( २५।६।८६ )

" कुळांबद्दल सालमजकुरीं नुकसानी आहे म्हणून ते अर्धेली घेण्याविषयीं सांगतात. पेस्तर नफा झाल्यावर त्याची अर्धेल देण्यास राजी असतील तर तसेही ठराव कबूल करतां येतील. परंतु नफा तेवढा दुसऱ्याचा व नुकसान मी एकट्यानें सोसावें ही रीत मला पसंत नाहीं. " २२।८।८६.

दुसऱ्यावर विसंबणाऱ्या कारकुनास रावसाहेब लिहीत:—लावी पक्षीण आणि तिचीं पिलें ही गोष्ट २५०० वर्षें तरी अनुभवशीर ठरली आहे.

आमचे यजमान मोठे आहेत, उत्तम वकील आहेत या घमेंडीवर जाऊन

गांवावरील कारकुनांस गैर फायदा वर्तन केव्हांही न करण्याची रावसाहेबांची सक्त ताकीद असे. " वैद्याचा मुलगा बचनाग उगाळून यथास्थित प्याला तर बचनाग अपकार करणारच. वकील घरचा म्हणून वकीलाच्या घरच्या मंडळीनें कायदा सांडून वर्तन करूम उपयोग नाहीं. "

( गांवच्या कारकुनास पत्र. )

" जे आंबे फळ्यांकरतां तोडावयाचे त्यांचे बुंधे रुंद असल्यास त्याचीं तुंबजोडें चांगलीं होतात. म्हणून बुंधे जमीनीचे खालीं एक हातभर मोकळे करावे आणि तुंबजोड अरकसून पाडावें. " २७।१।८४

" खालीं लिहिलेली गोष्ट हमेश ध्यानांत ठेवावी ' तुम्हीं लिहितां आंब्याचीं लाकडें करावीं किंवा कसें त्याबद्दल हुकूम व्हावा, खर्चाचें मान मागाहून कळवीन ' हें धोरण बरोबर नाहीं. " ( घरच्या कारकुनास पत्र )

आपल्या हुकुमाशिवाय रावसाहेब एक पानही हालूं देत नसत. एकां कारकुनानें एक आंब्याचें झाड तोडण्याची परवानगी मागितली तेव्हां त्यास १४।११।८५ रोजीं असें पत्र लिहिलें:—

१ मुरूड येथें आंब्याच झाड आहे जर लागत असेल ( वर फळें येत असतील ) तर तोडावयाचें नाहीं.

२ मुरूड येथील आंबा तोडण्याची परवानगी मागितली परंतु मागील वर्षांत आंब्याचीं नवीं झाडें किती लावलींत तें लिहिलें नाहीं.

३ वळणें येथील कोणतें झाड तोडण्याजोगें आहे तें कळवावें मग मागाहून उत्तर पाठवावयाचें तें पाठवीन.

हरडे, बेहेडे, आईन, बिब्वे इत्यादि झाडांस पाणी लावावें लागत नाहीं. तर आमच्या गांवांत जो १२०० हात लांब बांध आहे त्याच्या बाजूनें तीं लावावीं व कुळांसही आपल्या जमिनींत लावण्यास उत्तेजन द्यावें.

प्रत्येक गांवांतील कारकुनास वार्षिक खर्चाच्या बाबी आंखून दिलेल्या असत. त्याप्रमाणें कामें होतात कीं नाहीं त्यावर रावसाहेब अशीच सदैव नजर

ठेवीत. " माझ्या माहितींत आमच्या घरीं सत्यनारायणाची पूजा ४७ वर्षांत पाहिली नाहीं ती या महिन्यांत कोणी चालू केली तें कळवावें. "

एकदां नैमित्तिक धर्मादायास घरचे कारकून वार्षिक स्वरूप देऊं लागले. त्याबरोबर पुढील पत्र रावसाहेबांनीं लिहिलें. " वर्षासन हा शब्द आपण कोणत्या आधारानें लावला ? आपणाजवळ खचित आधार नाहीं असें समजतों. म्हणून ज्यांनीं आपणांजवळ येण्याचें धाडस केलें, त्यांनीं काय दाखविलें त्याचा विचार करावा. जेथें कांहीं पाया नाहीं तेथें जर असें सोंग माझ्या दृष्टी समोर येऊं लागलें तर पुढें मुलास किति बाधेल ! याहून जास्त लिहीत नाहीं. ××× हल्लींचें चरित्र जें आपल्या देशाच्या नाशाचीं कारणें आहेत त्यांतील एक आहे. "

" मी येथें आल्यापासून भांडीं १५ दिवसांत फुटलीं किंवा काय तें लिहावें. हल्लीं भांडीं घरांत किती आहेत त्यांची यादी पाठवावी. गुदस्तां किती करविलीं त्यांची यादी पाठवावी. जितकीं तेथें लागतील तितकीं करून देण्यास मी तयार आहें. गेल्या चैत्रीमध्यें ( चैत्र महिन्यांतलि गांवच्या उत्सवांत ) देवीकडे देण्याच्या तांदुळांची व्यवस्था कशी करावी, याजबद्दल मी विष्णुपंताकडून तुम्हांस लिहिलें होतें. त्याप्रमाणें व्यवस्था करून तुम्हीं मला लिहिलें नाहीं. आणि असें समजतें कीं त्या वेळीं जास्त तांदूळ घरांतून खर्च झाले आहेत तरी जास्त तांदूळ किती खर्च झाले व ते तुम्हीं कोणत्या हिशेबांत लिहिलेत तें लिहावें. आणि जर ते तांदूळ आमच्या हुकुमाबाहेर खर्च झाले असतील तर ते तुम्हीं आपल्या पगारांतून कां न भरावे या सर्वांचें उत्तर बाजूवर लिहून पाठवावें."

वरील पत्रांत हुकमाशिवाय केलेला फाजील खर्च तुमच्या पगारांतून तुम्हीं कां भरूं नये असा प्रश्न कडक दिसतो पण तशी जरब ठेवल्याशिवाय ग्रामस्थांच्या थोड्या आर्जवानें म्हणजे " तुमच्या पदरचें काय जातें; तुमच्या हातीं सारें आहे " अशा चढवणुकीनें दूरदेशीं राहणाऱ्या यजमानाच्या कारभाऱ्यांस जी उदार होण्याची बुद्धि सुचते तिला आळा बसत नाहीं.

त्याचप्रमाणें दूरदेशीं राहणाऱ्या यजमानाच्या कुळाकडून वसूलही नीट होत नाहीं. म्हणून एका पत्रीं कारभाऱ्यास ९।४।८४ च्या पत्रांत रावसाहेबांनीं लिहिलें. " म्हार लोकांकडून बाकीच्या पोटीं जितकें काम होईल. तितकें करून घ्यावें. पेंढे शेत—याची भाजावण आमची आहे तर मक्ता जास्त पाहिजे. "

कारभारी लोकांस उत्पन्न व खर्च याविषयींची शिस्त कशी लावावी याबद्दलचें एक रावसाहेबांचें पत्र पुढें दिलें आहे.

" अमुक गांव येथील हिशेब येतात त्यांजवरून पहातां तेथें गड्यांचे अडशेरीस, कामगतीचे माणसांस, बिऱ्हाड खर्चास वगैरे मिळोन एकंदर जितका गल्ला खर्चास लागतो *तितकासुद्धां घरचे खासगी खर्चास लागत नाहीं असें दिसोन येतें. त्यांस कवळ, गवत, नागर, गुरेंढोरें, घरचे गडी वगैरे सरंजाम पाहिजे तितका आपणापाशीं असतां तेथील खर्चास गल्ला लागतो तितका तरी निदान पिकला पाहिजे. तरच गडी माणसें ठेवण्याचा उपयोग आहे. तुम्हीं जुने माहीतगार आणि आमच्या भरंवशाचे म्हणून तुमचेवर सर्व सोंपविलें आहे. हें तुम्हीं समजत आहां; सबब तुम्हांस सूचना केली आहे. याच्यापुढें तरी जितकें धान्य खर्चास लागेल तितकें हरजिनसी घरचें पिकविण्याची तजवीज ठेवावी. तुम्हांस नड पडेल ती इकडे लिहून कळवावी. " इतकी व्यवहारदक्षता म्हणजे व्यवहारनिष्ठुरपणा वाचकांस वाटेल. पण त्याच्यामध्यें दयेचें प्रमाण वाखाणण्यासारखें होतें अशीं पुढील आज्ञोत्तरें दाखवितात. " वळण्यास राहणाऱ्या कुणब्यांवर केव्हांही मदतीचा अर्ज करूं नये. ( गणेशपंत जोशी यांस पत्र ).

कोणासही दुखवून मला एक कणही नको. वजन वाढण्याकरतां फिर्याद करणें हें मला पसंत नाहीं. ( विष्णुपंत फगरे यांस १।३।८६ चें पत्र. )

---

* मुरूड येथें मातोश्री व त्यांच्या निगेकरतां माणसें असत त्यांचा सर्व खर्च रावसाहेब चालवीत.

" माझ्या संबंधें जे नोकर असतील त्यांस स्पष्ट कळवावें कीं दुसऱ्यास बेकायदा उपद्रव किंवा जुलूम करून अधिक लाभ करून घेण्याची इच्छा नाहीं, व तसें कोणी केल्यास तो माझें अनहित करणार असें समजतों. आत्माराम नाखूश झाला तर मग त्राताच राहिला नाहीं. बाहेर उग्रता असली तर हृदयांत दया पाहिजे. ( **बाबासाहेब कान्हेरे, रावसाहेबांचे भाचे यांस पत्र** )

कोणत्याही कारकुनास अव्यवहारिक गोष्ट करूं देत नसत:—"चाळ्यास पन्नास रुपये देऊन पंचवीस पंचवीस रुपयांचे दोन कागद म्हणजे एकाच मितीचीं दोन खतें लिहून घेतलींत ही देशी चाल मला आवडत नाहीं. पुन्हां असें न करण्याविषयीं बंदोबस्त करावा. एका दिवसाचा व्यवहार एकाच कागदांत आला पाहिजे." २९।५।८७

" गांव हें मोठें कुटुंब आहे. केवळ सरकारी अधिकाऱ्याप्रमाणें आम्हांस वागतां यावयाचें नाहीं. त्यांत जो वडील असेल त्याचें ऐकून अधिकार चालविण्याकरतां हातभार लावला पाहिजे " ( ३०।७।८३ )

या प्रमाणें **रावसाहेबांच्या** अनेक सद्गुणमय पौरुषाचें वर्णन केलें आहे. त्यावरून असें आढळून येईल कीं त्यापैकीं एक एक गुण एक एक व्यक्तींत आढळतील पण हे सर्व गुण एका व्यक्तींत एकसमवायच्छेदें करून आढळणें अशक्य आहे असें म्हटलें तर चालेल पण अतिशयोक्तीचा दोष टाळण्याकरतां दुर्मिळ आहे असें म्हटलें पाहिजे. *

वरील **रावसाहेबांच्या** पौरुषाच्या वर्णनापासून एक बोध घेण्यासारखा आहे. कांहींना परस्तुति आवडते. कांहींना आत्मनिंदा आवडते. आमच्यांत दुसऱ्यावर्गापैकीं पुष्कळ लोक आहेत. त्यांच्यामतें हिंदी लोक हे जन्मतः युरोपियनांपेक्षां नालायक आहेत, जसें काहीं कोणी म्हणेल युरोपियन म्हटला म्हणजे तो आपल्या आईचें अथवा दाईचें स्तन्य चाखीत असतांनाच नीतीचें

---

* म्हणून प्रसिद्ध कवि **गंगाधरपंत मोगरे** यांनीं **रावसाहेबांस** गुणकरण्डक हें विशेषण दिलें आहे पहा प्र. ७५ पृष्ठ ९३९.

व सद्गुणांचें शोषण करून घेतो. आम्हीं हिंदी मात्र अनीतीचें व दुर्गुणांचें शोषण करून घेतों. नीतीचे व अनीतीचे आणि सद्गुणांचे व दुर्गुणांचे जन्तू अनुक्रमें युरोपियन व हिंदी आयांच्या स्तन्यांत भरलेले आहेत ! परंतु जो कोणी शांतपणें जगाकडे व त्यांत असलेल्या मनुष्यमात्राकडे लक्ष देईल त्यास असें आढळून येईल कीं सद्गुणांची देणगी सृष्टिदेवता सर्वांस समतेनेंच देत असते. म्हणजे सद्गुणांची उपज कोठल्याही देशांत होऊं शकते. परंतु या सर्व गोष्टी ज्याच्या त्यानेंच केल्या पाहिजेत. ज्याच्या त्यानेंच करून घेतलेल्या सद्गुणांच्या प्राप्तीलाच पौरुष म्हणतात. तें रावसाहेबांप्रमाणेंच प्रत्येकानें मिळविलें पाहिजे. न मिळविल्यास दोष ज्याचा त्याच्यावर हें उघड आहे. जें पौरुष युरोपियन गृहस्थांत आढळल्यास तो तुस्तीस पात्र होतो तें पौरुष हिंदी गृहस्थांत आढळल्यास तो दोषत्वाला पात्र होणार नाहीं हें उघड आहे.

---

## प्रकरण ८४ वें.

# उपसंहार.



॥ झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु; परंतु या सम हा ॥
( मोरोपंत )

श्रीमंत कुलांत जन्म पावून सरस्वतीच्या प्राप्तीकरतां अगदीं अल्पवयांत जन्मग्राम सोडून प्रथम रत्नागिरीस व मागाहून त्या वेळेच्या प्रवासाच्या सोयींकडे अथवा गैरसोयींकडे पाहिलें म्हणजे मुंबईसारख्या फार दूर ठिकाणीं वास करण्याचें धाडस पंधराव्यावर्षी रावसाहेबांनीं केलें. क्षणही वांया जाऊं दिल्याशिवाय विद्यार्थिदशेस उचित असे श्रम करून ज्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटनामक संस्थेंत त्यांनीं अध्ययन केलें त्याच संस्थेंत अध्यापकाची पदवी प्राप्त करून घेतली. आणि डाक्तर भांडारकर म्हणाले त्याप्रमाणें सरस्वतीचा दुर्ग

हस्तगत करावयास मागाहून येणाऱ्या इतर रत्नागिरी जिल्ह्यांतील विद्यार्थ्यांच्या सैन्यास वाटेंतील काष्ठतरूंचा छेद करून मार्ग शुद्ध करून देणारे त्या काळचे अग्रेसरच* झाले. प्र. ४ पृष्ठ २० पहा.

त्या काळीं उपलब्ध असलेल्या सर्व शिष्यवृत्त्या रावसाहेबांनीं मिळविल्या; दर परीक्षेंत इतरांहून आपल्या बुद्धीची तीव्रता सिद्ध केली. शेवटल्या परीक्षेंत तर सर्वांत उत्तम विद्यार्थी असा शेरा मिळविला. ही आद्यपद मिळविण्याची ईर्षा हल्लींच्या काळांत—जीवनयात्रेला शर्यतीची उपमा मिळत असतां—प्रत्येक विद्यार्थ्यांत रावसाहेबांचें चरित्र वाचून उत्पन्न झाली पाहिजे. परंतु आतां असे विद्यार्थी कां निपजत नाहींत हा प्रश्न उभा राहतो. केवळ शिक्षणाला वाहून घेतलेल्या शिक्षणसंस्थांचें व त्यांच्या आजन्म सेवकांचें हें युग असतां डा. हार्कनेस, प्रो. पॅटन व ग्रीन यां सारखे ऋषितुल्य अध्यापक अगदींच मिळत नसतील हें कसें संभवेल ? या बोर्डिंगांच्या कालांत अभ्यासाला विविक्त स्थलें आश्रमासारखीं मिळत नाहींत असें म्हणणें विश्वास्य कसें ठरेल ? रावसाहेबांसारखे विद्यार्थी कां निपजत नाहींत या प्रश्नाला उत्तर एकच आहे

* बहुशः रावसाहेबांच्या काळीं जहागीरदार, इनामदार व वतनदार यां सारख्या श्रीमंत लोकांचीं मुलें इंग्रजी विद्या शिकण्याच्या भरीस पडलीं नाहींत. पंधरा सोळा वर्षांचीं झाल्यावर ज्या मुलांचें पोषण करण्यास त्यांचे आईबाप गरीबीमुळें असमर्थ असत, तींच मुलें इंग्रजी शिकावयास घर सोडून पुढें येत. त्यांस उत्तेजन म्हणून पुष्कळ शिष्यवृत्त्या ठेवलेल्या असत. ज्यांस शिष्यवृत्त्या मिळत नसत तीं मुलें मध्येंच गरीबीमुळें शिक्षण सोडून जात. रावसाहेबांचा एक मित्र रावसाहेब सिंधमध्यें गेल्यावर मागें इन्स्टिटयूट मध्यें विद्यार्थी होता. तो नियमानें रावसाहेबांस पत्र लिहीत असे. परंतु एकदा कांहीं लिहिल्याशिवाय बराच काळ त्यानें जाऊं दिला. त्याचें कारण त्यानें असें दिलें:— "माझेजवळ टपाल हांशील देण्यास पुरेसे पैसे नव्हते." दुसऱ्या एका खालच्या वर्गांतील मित्रास रावसाहेबांनीं आपलीं क्रमिक पुस्तकें वरच्या वर्गांत गेल्यावर दिलीं. त्यानें रावसाहेबांना आभार मानतांना लिहिलें:—"माझ्या हातांत इतका संच पडण्याचा संभव नव्हता. तुम्हीं मला पित्यासारखे—नव्हे देवा सारखे वाटतां!"

तें हें कीं, हल्लीं विद्यार्थ्यांना चांगल्या संवयी लागत नाहींत. रावसाहेबांनीं विद्यार्थिदशेंत असतांच चांगल्या संवयी लावून घेतल्या व त्या इतक्या उत्तम होत्या कीं, त्यांनीं जो आयुष्यांत श्रेष्ठपणा मिळविला तो त्या संवयींच्या जोरावर मिळविला यांत संशय नाहीं. त्या संवयी कोणत्या व कशा मिळवाव्या तें त्यांनीं " संवयी आणि अभ्यास " या लघ्वाकार पुस्तकांत ग्रथित केल्या आहेत. प्र. १७ पृष्ठ १२७.

यानंतर रावसाहेबांच्या चरित्रांतील दुसऱ्या भागास म्हणजे पोटाच्या धंद्यास आरंभ झाला. हा धंदा म्हणजे सरकारी नोकरी होता. रावसाहेबांसारख्या तेजस्वी विद्वान पुरुषानें योग्यांसही अगम्य व परम गहन असा सेवाधर्म कसा पतकरिला याचें कित्येक लोक आश्चर्य प्रकट करतात. उत्तम शेती, मध्यम व्यापार व कनिष्ठ सेवा* अशी धंद्यांची लागलेली प्रतबंदी दाखविणारी म्हण प्रचारांत आहे.

तथापि हुद्याची राजसेवा इष्टच वाटत होती व अजून वाटत आहे. अधिकाराची प्राप्ति ही लोकांत केव्हांही प्रतिष्ठा प्राप्त करून देत असते. जहागिरी, इनामें, तनखे हीं सर्व कर्तव्यदक्ष पहिल्या राजसेवेचींच फळें होतीं. राजमान्य होण्याची प्रत्येकाची इष्टता " राजमान्य राजेश्री " हा मायना दाखवितो.

' चाकरी लौकिकाकरतां ' असा नाना मंडलिकांसारख्या लोकांचा समज होता ( प्र. ११ पृष्ठ ८७ पहा. )

रावसाहेबांनीं प्रथम नोकरी पतकरिली तेव्हां " तुम्हीं सरकारी वरिष्ठ जागेवर काम करून आपली उपयुक्तता दाखवाल व एलिफन्स्टन इन्स्टिट्यूटला भूषण व्हाल " अशी आपली झालेली दृढ समजूत डाक्तर हार्कनेस यांनीं

---

* धंद्याकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें असतां ' कृषिमत्कृषस्व ' या वेदवचनावरून वेदकालीं शेतीला मान होता. त्यानंतर बराच काळ लोटल्यावर ' कृषिगोरक्षवाणिज्यमिह लोकस्य जीवनम् " हें महाभारतांतील वनपर्वांतील वचन सांगतें कीं शेतीबरोबर व्यापाराला महाभारताच्या कालीं महत्व प्राप्त झालें असावें.

व्यक्त केली होती. ( प्र. ६ पृष्ठ ३० पहा. ) तीप्रमाणें ८–९ महिन्यांतच सरकारी काम करण्याची उपयुक्तता रावसाहेबांनीं दाखविली, व जसे ते वयानें मोठे होत जातील तसे सरकारच्या न्यायखात्यांत, मुलकी खात्यांत किंवा इतर खात्यांत वाटेल ती नोकरी करण्यास नैतिक व मानासिक गुणांनीं योग्य ठरतील अशी त्यांची प्रशंसा झाली. ( प्र. ६ पृष्ठ ३२ पहा. ) याचप्रमाणें पुढें बुद्धिमत्ता, दृढ व अखण्ड प्रामाणिकपणा इ० नैतिक गुणांबद्दल रावसाहेबांनीं दुसरी प्रशंसापत्रें मिळविलीं. ( प्र. ६ पृष्ठें ३९ व ४४ पहा. पृ. ६८ मि. हावर्ड यांचें प्रशंसा पत्र. )

मुनसफीची नोकरी करीत असतां न्यायाचा तराजु भिडेभाडेनें झुकेल म्हणून जनसंपर्कापासून निदान दुर्जनसंपर्कापासून रावसाहेब अगदीं अलिप्त राहिले. प्राप्तीवरील कराच्या कचेरींत रावसाहेबांनीं आपणांस विश्रंभपात्र म्हणवून घेतलें. ( पहा पृष्ठ ९९ ) ही असाधारण कर्तव्यनिष्ठा रावसाहेबांनीं राजसेवेंत दाखविली. तशीच अनुकरणीय दुसरी गोष्ट राजसेवेंत असतां दाखविली ती ही कीं, रावसाहेबांनीं आपला रिकामा वेळ शुष्कपणें जाऊं दिला नाहीं. पर्श्यन, संस्कृत इत्यादि भाषांचें ज्ञान मिळविलें. ज्ञानाची वृद्धि करण्यास प्रसिद्ध ग्रंथकारांच्या ग्रंथाचें वाचन चालू ठेविलें. ऐतिहासिक स्थलांचें निरीक्षण करण्यांत, ऐतिहासिक शोध लावण्यांत, ग्रंथलेखनांत व विद्वद्गोष्टींत रिकामा वेळ खर्च केला, म्हणजे शक्य तेवढी मानसिक उन्नति करून घेतली. ही गोष्ट असाधारणच म्हटली पाहिजे. राजसेवेंत असलेले बरेच इंग्रज हें कार्य करूं शकतात. पण तसें हिंदी गृहस्थ करूं शकत नाहींत. प्रत्येक विद्यार्थ्याच्या नव्हे मनुष्याच्या हातांतून एक वेळा तरी जावा अशा योग्यतेचा त्यांचा लघुग्रंथ ‘संवयी आणि अभ्यास’ एल्फिन्स्टनकृत इतिहासाचें भाषांतर, इत्यादि त्यांनीं ग्रंथ लिहिले. ( प्र. १७ पृष्ठ १२५ पहा. ) उमरकोट येथील सोद राजांविषयीं ऐतिहासिक निबंध नोकरींत असतांच लिहिला व मुंबईच्या रॉयल एशियॅटिक सोसायटीपुढें वाचावयास पाठविला. ही

पुरातन वस्तुसंशोधनाची आवड नोकरींत असतां जडलेली नोकरी सोडल्या-वर तशीच चालू ठेवली. *

"मला श्रीगणपतीची साक्ष व श्री देवीची साक्ष, वर असलेले रोखे पाहिजे होते. एक 'श्री बाळासाहेब+' असा सुमारवट आहे."

( गुलाबचंद लक्ष्मणदास मु. नगर यांस २१।१।८१ चें पत्र. )

नोकरींत असतां रावसाहेब आजारी पडले तेव्हां एक रात्र उशाशीं जागून काढणारे ज. जेकब, व पुन्हां तशाच प्रसंगीं प्रवासांत असतां स्वतांची गाडी बसावयास देणारे मि. गिब्स् व मोठे हितेच्छु गृहस्थ नामदार फ्रियर यांच्या सारख्या सज्जनांची गांठ पडून त्यांनीं रावसाहेबांना उत्तम प्रकारें वागविल्या मुळें कांहीं दिवस सेवेचा जांच रावसाहेबांस झाला नाहीं. ते जाऊन इतरांशी प्रसंग पडतांच रावसाहेबांच्या अंगचा खरा गुण जो स्वातंत्र्यप्रियता तो धुमसूं लागला. सेवकाला स्वतंत्र अस्तित्व नसणें, मानासिक गुलाम-गिरीचा जांच होणें, आपल्या हुद्यापासून लोकांचें विशेष हित करण्याचें सामर्थ्य नसणें, अपमान सोसण्याचे प्रसंग येणें, इ० कारणांनीं स्वातंत्र्य-

*रावसाहेब प्रथम कांहीं दिवस जुनीं नाणीं गोळा करीत असत. त्या संग्रहांत कांहीं युरोप देशांतील होतीं. १०६६ सालापासून १८२० पर्यंत जे इंग्लंदांत राजे होऊन गेले त्यांच्या काळांतलीं, सर्व जातीचीं सानुक्रम असून सर्व अगदीं चांगल्या स्थितींत होतीं. त्यापूर्वींच्या ॲंग्लो सॅक्सन राजांचीं म्हणजे एकबर्ट, एथल्रेड इत्यादिकांचीं होतीं, थोडीं ग्रीक व रोमन लोकांचीं होतीं. त्यांत कांहीं बोनापार्टाच्या राजकु-लांतील होतीं. पुढें रावसाहेबांच्या मनांत तीं विकून टाकावीं असें आलें. डाक्तर राजेन्द्रलाल मित्र यांच्या मार्फत कोणी लक्ष्मीपुत्र बंगाल्यांत मिळाला तर पाहत होते. येथें गिराईक नाहीं म्हणून तीं विलायतेस पाठवून दिल्यावर तेथें गिराईक मिळालें. त्याचप्रमाणें विशेष प्रसंगीं तांब्यांचीं किंवा कांशाचीं पदकें पाडून वांटण्याची चाल युरोपांत आहे. तसलीं जुनीं जुनीं पदकें जमविलीं होतीं. त्यांसही फार किंमत येईना तेव्हां रावसाहेब म्हणाले "मी ड्यूक नसल्यामुळें या संग्रहाची किंमत येत नाहीं."

+ असले रोखे जुन्या काळीं देवावरची भक्ति दाखवितात.

ज्योतीनें पेट घेतला. कारण दुसऱ्याकरतां झिजण्याचें कार्य करणारें चंदन सुद्धां अति निर्मन्थनानें पेट घेतें. पुढें सदाशांकिनी सेवेचा पाश तोडून राव-साहेब कसे मोकळे झाले तें प्र० १४ विशेषतः पृ. ११३ येथें सांगितलेल आहे. येथें रावसाहेबांनीं दूरवर विचार करण्याचें सामर्थ्य दाखविलें. सेवेंत राहून रावसाहेबांना कामाची शिस्त लागली व इतर फायदे झाले. प्र. १४ पृ. ११४ पहा.

पुढें रावसाहेबांनीं व्यापाराकडे लक्ष दिलें होतें. नोटांची, अफूची, कापसाची व शेअरांची खरेदी विक्री हे व्यापाराचे प्रकार रावसाहेबांनीं करून पाहिले. त्यांना गोविंदाप्पा गुळव्यांसारखे, व लखमीदास खिमजीं सारखे मित्र मदत करावयास तयार होते. लखमीदास खिमजींची व त्यांची अल्प भागीही होती. प्र. १६ पहा. करसनदास माधवदास तर " सर्व शिकलेल्या लोकांनीं व्यापारांत पडावें व सव सुधारा सोडावा " असें सांगत होते. राव-साहेबांनीं त्याप्रमाणें पुष्कळ प्रयत्न केला पण सर्व अयशस्वी झाला. त्याचीं पूर्ण कारणें रावसाहेबांनीं दिलेलीं आढळत नाहींत. हिशोब नीट न ठेवणारा मेथाजी एकदां नुकसानीस कारण झाला. ( प्र. १६ पृ. १२३ पहा. ) इंग्लंदांत लंदन बँक नांवाची एक पेढी यांच्या मित्रांनीं काढली होती. तींत यांचे पुष्कळ पैसे बुडाले. त्या बँकेचें दिवाळें वाजलें तेव्हां हे त्या ब्यांकेचे भागीदार असल्यामुळें भागांपैकीं राहिलेले हप्त्याचे पैसे यांना भरावे लागले. ते भरतांना रावसाहेब म्हणाले " हे पैसे भरावयास पडण्याचें पाहिलें कारण माझा मूर्खपणा व दुसरें कारण दुसऱ्यावर टाकलेला विश्वास हीं होत. " परंतु हीं कांहीं पुरीं कारणें नव्हत. तीं सर्व शोध करून दिलीं असतीं तर बरें झालें असतें. कारण हल्लीं पदवीधर विद्वान लोक भराभर विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेले दिसतात त्यांस व्यापारांत शिरावयाची इच्छा झाल्यास रावसा-हेबांच्या अनुभवाचा फायदा मिळाला असता व अंशतः बेकारी टळली असती.

व्यापार जर साधता तर रावसाहेबांनीं पुष्कळ पैसा त्यांच्या इच्छेच्या

बाहेर मिळविला असता. व्यापाऱ्याजवळ पैसा असतो म्हणून केला तर ते धर्मादाय करतात, तसा मोठ्या प्रमाणावर केला असता. परंतु यांच्या हातून सार्वजनिक कार्य किति झालें असतें तें सांगतां येत नाहीं. व्यापाऱ्यांचें दैवतही " लक्ष्मी नारायण " असतें या दैवताच्या सेवकालाही लक्ष्मीच्या अर्जना व्यतिरिक्त अस्तित्व नसतें. कदाचित् द्रव्यसंचय केल्यावर स्वतंत्रपणें राहिले असते, परंतु वकिली करूं लागल्यामुळें रावसाहेब मोठमोठीं लोकहिताचीं कार्यें करूं शकले.

वास्तविक वकिली हा पोटाचा धंदा आहे तो एकाद्यानें चांगला केला तर त्यांत सार्वजनिक महत्व कोणतें आहे, असा प्रश्न कोणी विचारील. त्याला उत्तर असें आहे कीं नुसता पोटाचा धंदा या दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्याला विशेष किंमत नाहीं, कारण पशुपक्ष्यांसही पोट भरतां येतें. पुष्कळ धंदे प्रामाणिकपणानें कले असतांही त्यांस प्रतिष्ठा प्राप्त होत नाहीं. उदाहरणार्थ मेणबत्त्याकरण्याचा धंदा करणारा मनुष्य प्रामाणिक असेल, द्रव्यार्जन करील पण त्याला प्रतिष्ठा नाहीं. ज्या धंद्याच्या योगानें मनुष्याची नैतिक उन्नति होते त्या धंद्यासच प्रतिष्ठितपणा आहे. वकिलीचा धंदा या वर्गांत येतो. वकिलीचा धंदा करीत असतां वकिलीचा संबंध एका बाजूला आपल्या हक्कासाठीं आपसांत भांडणाऱ्या जनतेशीं येतो व दुसऱ्या बाजूला न्याय देणारे राजप्रतिनिधी जे न्यायाधीश त्यांच्याशीं येतो. आपल्या कुळाचे हक्क काय आहेत ते नीटपणें पाहून त्यांचें रक्षण करणारा कायदा काय आहे तें दाखवून बिनचूक न्याय देण्याच्या कामीं न्यायाधीशांस साहाय्य करणें हें वकिलाचें काम आहे. हें फार पवित्र आहे. पक्षकाराजवळ पैसे आहेत. तो वकिलाची भर करावयास राजी आहे. म्हणून रावसाहेबांनीं कोणत्याही पक्षकारास फिर्यादीच्या किंवा अपीलाच्या भानगडींत घातलें नाहीं. पक्षकारास सल्ला देणें तो त्याचे कागदपत्र पाहूनच देत असत. यामुळें त्यांनीं पक्षकारांचा विश्वास संपादन केला होता. या उच्च नीतिदर्शक आचरणाची प्रशंसा न्यायाधीशांनीं केली आहे. ( प्र. १९ पृष्ठ

१७१ पहा. ) अशा उच्च नैतिक आचरणानें वकीलांचा दर्जा वाढतो. व तो वाढविण्याकडे **रावसाहेबांचें** लक्ष फार असे. त्यांच्याकडे कज्जे दलालांस मज्जाव असे.

एका मनुष्याचें वर्तन सदोष होतें. त्यास वकिली करूं देणें **रावसाहेबांस** अनिष्ट वाटलें. त्यानें सनदेचा अर्ज केला असें कळतांच **रावसाहेबांनीं** त्या मनुष्याचा अर्ज कसा नामंजूर करविला तें प्रकरण १९ पृष्ठ १७६ वाचलें म्हणजे कळेल.

या शिवाय **रावसाहेबांचें** असें मत होतें कीं, हायकोर्टांत मूळ शाखेला काम चालविणारे बॅरिस्टर व अपील शाखेंत काम करणारे वकील या दोघांचा दर्जा एकच असावा; बॅरिस्टरांस दोन्हीं शाखांकडे काम चालविता येतें तसें वकिलांसही करतां यावें; या विषयीं **रावसाहेबांनीं** पुष्कळ श्रम केले. व जवळ जवळ त्यांच्या स्वतां पुरतें किंवा त्यांच्या सारख्या एकदोन अपवादभूत व्यक्तीं पुरतें त्यांस यश येण्याचा बेत आला होता. परंतु तत्त्वाकरतां माझें भांडण आहे व्यक्तिविषयक मेहरबानी करतां नाहीं असें सांगून त्यांनीं ही अर्धवट मिळत असलेली सवलत नाकारली. *

**रावसाहेबांच्या** वेळीं ज्या उज्ज्वल पुरुषांनीं न्यायासन मंडित केलें होतें त्यांचें **रावसाहेबांविषयीं** व **रावसाहेबांचें** त्यांच्याविषयीं परस्पर चांगलें मत असे.

## न्या० फोर्ब्स.

न्यायमूर्ति **फोर्ब्स** आसन्नमरणस्थितींत असतां "आमच्या करतां परमेश्वर त्यांस दीर्घायु करो अशी **रावसाहेबांनीं** प्रार्थना केली. ( पृष्ठ २६८ पहा. )

---

* पहा **दामोदर गणेश पाध्येकृत** मंडलिकांचे लेख व भाषणें या **ना. वि. मंडलिक** यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केलेल्या पुस्तकास जोडलेलें **रावसाहेबांचें** प्रास्ताविक चरित्र.

## सर क्लॉडियस आर्स्किन पेरी. *

हे १८६२ सालीं मुंबई हायकोर्टाचे जज्ज असतां मध्यें गव्हर्नरच्या काउन्सिलचे सभासद नेमले गेले. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें १८६७ त पेनशन घेऊन गेले तेव्हां लोकांनीं त्यांचा साधुवाद केला. 'सर जमशेटजी, डा. भाऊ, विनायक जगन्नाथ शंकरशेट, डोसाभाई फ्रामजी, नारायण दिनानाथ, विश्वनाथ नारायण मंडलिक यांनीं न्यायमूर्तींना एक मान पत्र दिलें. उत्तरांत त्यांनीं भाऊ दाजी, मंडलिक, शांताराम नारायण, व नुकतेच नेमलेले हायकोर्ट जज्ज वासुदेवजी यांची त्यांच्या धंद्यांतील नैपुण्याबद्दल तारीफ केली.'

## नामदार जस्टिस वेस्ट.

हे रावसाहेबांचे चांगले मित्र होते. १८८२ सालीं न्यायाधीशाचे जागेवरून काउन्सिलांत कार्यकारी सभासद म्हणून गेले. त्यावेळेस वकीलांच्या सभेनें त्यांस मानपत्र दिलें. त्यांत त्यांच्या सभ्य वर्तनाची व वकीलांचा दर्जा वाढविण्याकरतां केलेल्या प्रयत्नांची, अंगच्या बुद्धिसामर्थ्याची व जाड्या-विद्वत्तेची व व्यवहारज्ञानाची तारीफ केलेली होती.

---

* हे १८४० त हिंदुस्थानांत आले. इंग्रजी शिकलेल्या विद्वानांचे पुरस्कर्ते होते. यांस सुरतेस असिस्टंट कलेक्टर व असिस्टंट जज्ज नेमण्यांत आलें. नंतर मुंबई सरकारचे डेप्युटी सेक्रेटरी होते, शिक्षण खात्याच्या बोर्डाचे मंत्री व अध्यक्ष होते व पुढें १८५४ नंतर शिक्षण खात्याचे डायरेक्टर झाले. १८५२ मध्यें लोकांनीं फंड जमवून पेरी प्रोफेसरशिप स्थापन केली. व त्यांनीं जो क्रम आखून दिला आहे तो चिरकालीन महत्वाचा आहे. पुढें हे कोंकण प्रांताचे ठाणें मुक्कामीं जज्ज होते. तेथून १८६० सालीं हे गव्हर्नरजनरलच्या काउन्सिलाचे मेंबर झाले. त्यावेळेस पीनल कोड घाटत होतें. हें कोड फारच सशास्त्र व कायमच्या स्वरूपाचें आहे. तें तयार करण्याच्या कामीं यांची फार मदत झाली आहे. फटक्यांची शिक्षा देणें सुधारलेल्या काळास शोभत नाहीं असें त्यांचें मत होतें. यांस त्यांच्या विद्वत्तेची चीज करण्यासाठीं कलकत्ता युनिव्हर्सिटीचे व्हाइसचेन्सलर नेमिलें. हे स्टेट सेक्रेटरी यांच्या इंडिया कौन्सिलचे मेंबर होते. पुढें पार्लमेंटचे सभासद झाले. २४।४।१८८२ मध्यें हे मृत झाले.

यांची शिस्त फार कडक असे. यांनीं मानपत्राचा स्वीकार केला खरा पण त्या मानपत्राबरोबर रौप्यकरंडक घेतला नाहीं. साधा चर्मकरंडक पुष्कळ झाला असें म्हणाले. सरकारी नोकराला अधिक घेतां येत नाहीं. असें त्यांचें मत होतें.

" तुम्ही कोठेंही जा तुमच्या कामगिरीबद्दल हिंदुस्थान सदैव कृतज्ञच राहील. उलट तुम्हीं आपल्या हृदयमंदिरांत अल्पसें स्थल कोपऱ्यांत तरी हिंदुस्थानास सदैव द्याल अशी माझी खातरी आहे. " असें रावसाहेबांनीं त्यांस १०।३।८२ च्या खासगीपत्रानें कळविलें होतें. यानंतर सहा वर्षांनीं रावसाहेबांच्या स्मारकाच्या पैशांतून रावसाहेबांच्या नांवाचें पदक ठेवण्यांत आलें तेव्हां नामदारांनीं रावसाहेबांची फार प्रशंसा केली. ( प्रकरण ३३ वें पृष्ठ ३८० पहा. )

## नामदार वेडरबर्न *

नामदार वेडरबन यांच्या बद्दल रावसाहेबांची फार पूज्य बुद्धि होती. त्यांनीं ४।१।७४ च्या जेकब यांस लिहिलेल्या पत्रांत असें म्हटलें आहे कीं, मि. वेडरबर्न हा सच्चा मनुष्य आहे. या प्रकारचे आणखी लोक आम्हांला मिळतील तर फार बरें होईल. न्याय खात्यांमध्यें कांहीं नवीन तरुण लोक असे आहेत कीं त्यांस मनुष्य जातीचें भूषण मानिलें पाहिजे.

नवे नवे कायदे राज्यकारभाराच्या व्यवस्थेकरतां करण्यांत आले. त्यांच्या कलमांचा अर्थ निश्चित करतांना रावसाहेबांनीं पुष्कळ बुद्धिकौशल्य दाखविलें. त्याचप्रमाणें विशेषतः जेव्हां हिंदुधर्मशास्त्रविषयक फार महत्वाचे

* हिंदुस्तानावरचें यांचें प्रम पिढीजात होतें यांचे वडील सर जॉन हे सिव्हिलियन होते. कांहीं दिवस अकाउन्टन्ट जनरल होते. नामदार वेडरबर्न प्रथम डिस्ट्रक्ट जज्ज व मग हायकोर्ट जज्ज होते. गव्हर्नरचे प्रायव्हेट सेक्रेटरी होते. स्त्रीशिक्षण व शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरतां पेढ्या स्थापणें या विषयीं त्यांनीं खटपट पुष्कळ केली.

प्रश्न कोडतां पुढें येत गेले तेव्हां रावसाहेबांनी हिंदुधर्मशास्त्रविषयक ज्ञान पुष्कळ दाखविलें.

वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारानें रावसाहेबांनीं वकिली केली. व अप्रत्यक्ष रीतीनें सार्वजनिक हित केलें. त्याहून पुष्कळ हित प्रत्यक्ष रीतीनें रावसाहेबांनीं केलें. तें लोकांच्या हक्कांचें संरक्षण होय. व तें काम चांगलें साधलें याचें कारण ते वकील होते. संस्थानिक, जहागीरदार, इनामदार, यांच्या हक्कांचें रक्षण करण्या करतां रावसाहेबांनीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केलें. अवर्णनीय चिकाटी, असाधारण धैर्य, व असामान्य कळकळ व अनुपमेय स्वार्थनिरपेक्षता दाखविली. यांत त्यांचा वेळ, वित्त व वपु हीं वेंचावीं लागलीं आहेत. कसें तें म्हैसूर प्रकरण, सातारकर यांचें काम, वकिलीच्या प्रकरणांत दिलें आहे तें वाचलें असतां समजेल. या करतांच त्यांस लोकांनीं अर्जुनाची उपमा दिली आहे. ( प्र. १९ पृ. १७९ पहा. ) खोती कज्जांत रावसाहेब न पडते तर खोत कोठें असते तें सांगतां येत नाहीं. १८८७ च्या खोती कज्जांत रावसाहेबांस जे श्रम पडले ते त्यांस शेवटला दुर्धर व्याधि जडावयास कारण झाले असें कित्येक म्हणतात.

रेव्हिन्यू सर्व्हे बिल, रेव्हिन्यू ज्युरिडिक्शन बिल ( दिवाणी कोडतांचे अधिकार, संकुचित करणारा कायदा. ) या कामांत त्यांनीं पुष्कळ चिकाटी दाखविली. पण या वकिलीपेक्षां रावसाहेबांचें कार्यक्षेत्र विपुल होतें. तेथें त्यांनीं वाङ्मयविषयक, सामाजिक, राजकीय, म्युनिसिपलविषयक, सार्वजनिक कामगिरी केली आहे. सार्वजनिक कामागिरी करण्याची इच्छा रावसाहेबांस उपजतच होती. ती कोणी त्यांच्यावर लादली नव्हती.

त्यांनीं नोकरी सोडण्याचा बेत केला तेव्हां आपल्या हुद्यापासून लोकांस विशेष उपयोग होत नाहीं असें त्यांस वाटलें. प्रकरण १४ पृष्ठ २१० पहा.

हिंदु लोकांच्या मध्यंतरीय स्थितीविषयीं विचार या निबंधांत त्यांनीं, ‘सर्वांनीं

सावध होऊन द्रव्यद्वारा व शरीरद्वारा स्वदेश कल्याणार्थ प्रयत्न करावा असें म्हटलें आहे. प्रकरण १७ पृष्ठ १३८ पहा. ही इच्छा त्यांच्या वेळच्या पुष्कळांची नव्हती. रावसाहेबांनीं एका आपल्या मित्रास पत्रीं विनंति केली कीं तुम्हीं माझ्या नेटिव्ह ओपिनियनकरतां लेख लिहावा; त्यावर त्यांनीं असा जबाब दिला कीं तुमच्या नेटिव्ह ओपिनियनशीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. हें उत्तर मनुष्याच्या एका उपजत प्रवृत्तीला धरूनच आहे. तशी ज्यांची प्रवृत्ति आहे त्यांच्या हातून स्वार्थनिरपेक्ष सार्वजनिक हिताचीं कामें होत नाहींत. सार्वजनिक कल्याण हें स्वार्थत्यागाशिवाय होत नाहीं. त्यामुळें बहुतेक लोक सार्वजनिक कल्याण करण्याच्या भानगडींत पडत नाहींत. स्वार्थ साधेल तरच परमार्थ करावयाचें लोक पहातात. इतका परमार्थ केला असतां इतका स्वार्थ साधतो असें त्रैराशिक सम प्रमाणानें सिद्ध झाल्याशिवाय सार्वजनिक कामांत सहसा लोक पडत नाहींत. परंतु हेच लोक निरपेक्ष लोककल्याण करणाऱ्यांची किंमत वाढवतात.

रावसाहेबांनीं केलेल्या अशा निरपेक्ष लोकसेवेची साक्ष म्हैसूरप्रकरण देत आहे. कांहीं संबंध नसतां, म्हैसूरच्या महाराजांनीं विनविलें नसतां, केवळ दत्तकाच्या अधिकाराचें संरक्षण करण्याकरतां, आपला वेळ, वित्त व बुद्धि खर्च करून लंदनच्या दूरक्षेत्रावर रावसाहेबांनीं कार्य करून दाखविलें. आपल्या पुस्तकावर दुसऱ्याचें नांव घातलें असतां कार्य सुलभ होईल तर तसें होऊं देऊन कीर्तीच्या प्राप्तीवर पाणी सोडावयाची तयारी दाखविली ! पहा. प्र. ३१ पृष्ठ४४वें.

रावसाहेबांच्या सार्वजनिक कामगिरीचें स्थूल मानानें वर्णन करण्यापूर्वीं आतांपर्यंत जो काळ गेला त्या काळची व पुढें कांहीं काळ गेला त्या काळची एक विशेष गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी होती तिचा निर्देश केला पाहिजे. ही विशेष गोष्ट कोणती ? तर

## इंग्रज व हिंदी लोक यांचें साहचर्य.

**। पयसा कमलं कमलेन पयः ।**

**॥ पयसा कमलेन विभाति सरः ॥**

। शशिना च निशा निशयाच शशी ।
॥ शशिना निशयाच विभाति सरः ॥ १ ॥

वाङ्मयविषयक, सामाजिक विषयक, स्थानिकस्वराज्यविषयक, ( म्युनिसिपल ) व राजकीयविषयक चळवळींत इंग्रजलोक व हिंदीलोक हातांत हात घालुन काम करीत असत. इंग्रजांचें परकीयत्व आड आलें नाहीं. “ **यूयं वयं, वयं यूयम्** ” अशी त्यांची मति होती.

वाङ्मयविषयक चळवळींत असें साहचर्य डेक्कन व्हर्नॅक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीची स्थापना झाली तेव्हां चांगलें दिसून आलें. ( प्र. २९ पृ. ३३० पहा. )

सामाजिक विषयक चळवळींत असें साहचर्य स्टूडन्डस् लिटररि आणि सायन्टिफिक सोसायटीची रचना स्त्रीशिक्षणाकरतां झाली तेव्हां दिसून आलें. ( प्र. २७ पृष्ठ ३२४ पहा. ) पहिल्या पुनर्विवाहास हजर राहण्याची विनंति **रावसाहेबांचे** मित्र मि. गिब्स् यांनीं **रावसाहेबांस** केली होती. मुंबईतील दुसऱ्या पुनर्विवाहाच्या टोलेजंगी समारंभास पुष्कळ इंग्रज मंडळी हजर होती. ( प्र. २६ पृष्ठ ३०५–३०६ पहा. ) १८७६–७७च्या दुष्काळांत हें साहचर्य दिसून आलें. प्र. ६१ पहा.

मुंबई म्युनिसिपॅलिटीच्या कायद्यांत जी क्रांति घडवून आणण्यांत आली तींत **रावसाहेब** व त्यांचे हिंदी स्नेही गुंतले असतां नेतृपद मि. **फोर्ब्स** या इंग्रज गृहस्थाकडेच होतें. व त्यांनीं जें स्वतः साहाय्य केलें तें चिरस्मरणीय आहे.

“ आमच्या शहराच्या म्युनिसिपॅलिटीची व्यवस्था आमच्या हातांत द्यावयाची आहे. आणि मला असें सिद्ध करावयाचें आहे कीं मुंबईच्या शहरवासीयांत म्युनिसिपॅलिटीचा कारभार करण्याची योग्यता आहे. ” ( **फोर्ब्स यांचें रावसाहेबांस** पत्र. )

ईस्ट इन्डियन असोसिएशनची लंडन येथें स्थापना व तिच्या शाखेची मुंबईंत स्थापना ( प्र. २४ पृष्ठ २५२ पहा ) या दोन कामांत राजकीय

गोष्टींविषयीं साहचर्य दिसून आलें. इंग्लंद व हिंदुस्थान यांचा एकजीव व्हावा अशी ज. जेकब यांची इच्छा होती. ( ७।७।१८६७ चें पत्र. )

शेवटीं शेवटीं ईस्ट इन्डिया असोसिएशन कांहीं लोकांना नकोशी झाली, तें रावसाहेबांस रुचलें नाहीं. ( प्रकरण २४ पृष्ठ २६३ पहा. ) कारण कांहीं इंग्रजांची कर्तबगारी व हिंदी जनांविषयीं त्यांची असलेली सहानुभूति हीं दोन्हीं रावसाहेबांस पूर्ण अवगत होतीं व त्यांतील योग्य पुरुषांस रावसाहेब मान देत असत.

" डाक्तर वुइल्सन मृत झाले. आमचें सर्वांचें येथें नुकसान झालें. कारण डाक्तर वुइल्सन हे युरोपियन व हिंदी लोक यांच्या मधलें अंतर नाहींसें करणारा एक नैतिक व सामाजिक प्रकाराचा पूलच होते.* " ( ज. जेकब यांस पत्र १६।७।१८७६. ) "आम्हांला जेकबांची व एल्फिन्स्टनांची जरूर आहे. " ( १८७५ चें ज. जेकब यांस पत्र. )

" आपली व माझे मित्र जेकब साहेब यांची त्यांच्या देशीं गांठ पडली नाहीं म्हणून वाईट वाटतें. ते माझे पुरस्कर्ते व चिरकालीन मित्र आहेत. आणखी लॉ. ग्रॅन्ड जेकब आम्हांला लाभते तर बरें झालें असतें. " ( महंमदअली रोगे यांस ते इंग्लंदमध्यें गेले असतां पत्र ).

" गरीब बिचारा हॅवलाक ! यांच्या मरणानें फार नुकसान झालें आहे. त्यांतून मुख्यतः या वेळेस मृत्यु आल्यानें रेव्हिन्यू खात्यांत त्यांच्यासारखा आम्हांला नजरेस पडावयाला बराच अवकाश लागेल. " ( ७।११।७६ मि. गिब्स् यांस पत्र )

हिंदुस्थान सरकार आतां व्हिग असो अथवा टोरी पक्षांतील असो. त्यांनीं एल्फिनस्टनचा अनुयायी असलें पाहिजे.

( ९।६।८० चें नामदार गिब्स यांस पत्र )

---

* दुसऱ्या एका मित्रास रावसाहेबांनीं लिहिलें कीं, " वृद्ध डा. वुइल्सन हे इत उप्पर नाहींत आमच्या सर्वांचें येथील लोकांचें नुकसान झालें. युरोपियन व नेटिव्ह लोकांमध्य जी मोठी खाडी आहे तिच्या वरचा संगमात्मक नीतिमूलक हा एक पूलच होता. "

म्हैसूर प्रकरणावरील आपलें राजकारणाचें पुस्तक सर जार्ज क्लार्क यांस रावसाहेबांनीं अर्पण केलें व त्यांची पूर्ण सहानुभूति मिळविली ती इंग्लंदमध्यें कामीं आली.

रावसाहेब इकडे कलकत्त्यास गुंतले असतां त्यांची मुंबईतलीं स्वतांचीं कामें–उदाहरणार्थ म्युनिसिपॅलिटींत व युनिव्हर्सिटींत निवडून येणें हीं—पडून रहात नसत. तीं कामें त्यांच्या करतां मित्रवर्ग कळकळीनें करी. युनिव्हर्सिटींत त्यांची भिस्त युरोपियन मंडळीवर असे. "तुम्हांला किती झगडावें लागलें त्याची हकीकत पाठविण्याबद्दल व तार करण्याबद्दल आभारी आहें. शेवटीं युरोपियन मित्रांवरच व कांहीं थोर अनुयायी गृहस्थांवरच अवलंबून रहावें लागलें!" ( २।२।८५ गणपतराव भास्कर कोठारे यांस पत्र. )

अशा सहानुभूतिपूर्वक साहचर्याची किंमत रावसाहेब जाणून होते. "आतां तूर्त चांगल्या चांगल्या इंग्रजांचीं आम्हांविषयीं सहानुभूति आहे. जरूर लागेल तेव्हां ( व तिची आम्हांला सदैव जरूर लागणार ) तिचा आम्हांला फायदा देण्यांत येईल. मात्र तो असा कीं, उजव्या हाताचें करणें डाव्यास समजणार नाहीं." ( शिशिर बाबूंस लिहिलेल्या इंग्रजी पत्राचा उतारा. )

या पद्धतीची पूर्वींची अँग्लो इन्डियन मंडळी काम फार करी व तिची प्राप्ति आम्हांस कमी होत जाणें रावसाहेबांस अनिष्ट वाटे. "एकंदरीनें पाहतां अँग्लो इन्डियन कम्युनिटी जुन्या काळीं जसें काम करीत असे तसें आतां करीत नाहीं असें दिसतें. कामच वाढलें आहे असें ते म्हणतात तें फोल आहे. जेथें इच्छा आहे तेथें वाट निघते. वीस वर्षांपूर्वीं जेवढ्या कामाच्या सोयी होत्या त्याहून आतां अधिक नाहींत काय ? या जातीची इतर जातींबरोबर अवनति होत आहे काय ? मला तर तसें म्हणतां येत नाहीं. कदाचित् आम्हांस चांगले लोक मिळत नसतील असें असेल तर राजकीय विराट पुरुषाला धोका आहे.. ( २३।३।७५ ज. जेकब यांस पत्र. )

हिंदी व इंग्रज हे एकच राष्ट्रीय विराट पुरुषाचे दोन भाग आहेत असें मानणाऱ्या रावसाहेबांस हिंदी लोकांत व युरोपियन लोकांत आलेला विस्तुष्टपणा

आवडत नसे.* असा वितुष्टपणा मुंबईंत आला नव्हता. कलकत्त्याकडे आलेला रावसाहेबांच्या नजरेस १८८५ सालीं आला तेव्हां त्यांस खेद झाला.

कलकत्त्यास भरलेल्या ख्रिस्तोदास पॉल यांच्या स्मारकसभेविषयीं रावसाहेबांनीं असे उद्गार काढले. “ख्रिस्तोदास यांच्या स्मारकाची सभा कलकत्तेकरांच्या मताप्रमाणें यशस्वी झाली. या पुरुषानें जन्मभर ज्या लोकांकरतां श्रम केले ते आतां कुठे आहेत! त्यांना आळीमिळी घालून चूप बसवून कोणी तरी ठेविलें होतें असें दिसलें. डाक्तर महेन्द्रलाल सरकार यांनीं आपलें भाषण लिहून आणलें होतें. त्याच्या वाचनानें युरोपियन लोकांस मधून मधून धक्के बसत होते. या दोन्हीं लोकांत पृथक्पणा आलेला दिसला.”

( १६।१।८५ चे बापूसाहेब आठल्ये यांस पत्र. )

याप्रमाणें क्रमाक्रमानें १८८५ सालापर्यंत लुप्तप्राय होणारें इंग्रज व हिंदी यांचें साहचर्य १८६३ सालीं म्हणजे रावसाहेबांस पहिल्यानें जे. पी. नेमण्यांत आलें तेव्हां जोमांत होतें. त्याचा फायदा घेऊन नागरिकांचीं कर्तव्यें काय आहेत तीं ओळखून म्युनिसिपॅलिटीचें काम रावसाहेबांनीं किति उत्तम केलें तें प्र. ४१ वाचलें म्हणजे समजेल.

म्युनिसीपॅलिटीचा कारभार जे. पी. पहात असत. प्रथम रावसाहेबांस आढळलें कीं युरोपियनांच्या शहरवासी जनांची संख्या व हिंदी शहरवासी जनांची-संख्या यांचें प्रमाण पाहिलें असतां युरोपियन जे. पीं. ची संख्या हिंदी जे. पीं. च्या संख्येपेक्षां अधिक होती. तेव्हां युरोपियन जे. पी. फक्त क्वीन्स रोडनेंच आपल्या गाड्या नेत असल्यामुळें त्याच रस्त्याच्या स्वच्छतेकडे बघतील व गांवांतील रस्त्याच्या स्वच्छतेकडे पहाणार नाहींत. या साहजिक परिणामाकडे लक्ष देऊन हिंदी जे. पीं. ची संख्या वाढविण्याची ओरड ने. ओ. मध्यें रावसाहेब करूं लागले. पुढें असें आढळलें कीं ही संख्या वाढूनही

* युरोपीयन व हिंदी लोक यांच्या मधील गैर समज दूर करणें हा एक नेटिव्ह ओपिनियन पत्र काढण्याच्या बऱ्याच हेतूंपैकीं एक होता. प्र. २० पृष्ठ १९६ पहा.

भागणार नाहीं. म्युनिसिपॅलिटीच्या कारभाराच्या कायद्याची रचनाच बदलली पाहिजे. कारण जे. पीं. च्या कडे जरी म्युनिसीपॅलिटीचा कारभार होता, तरी विधायक सत्ता म्युनिसिपल कमीशनरकडे होती. मि. क्राफर्ड त्या जागेवर आल्या दिवसापासून रावसाहेबांस त्यांच्यावर नजर ठेवावी लागली. मि. क्राफर्ड यांनीं सुधारणा केल्या ही गोष्ट खरी; कारण मि. क्राफर्ड हे उमदेच होते. परंतु म्युनिसिपॅलिटीचा गाडा हांकतांना उधळत असत, त्यामुळें त्यांच्या गळ्यांत काटकसरीची लगाम घालावी लागे. म्युनिसिपल कारभारांत आदिमध्यावसानांत काट कसर ! काट कसर ! काट कसर पाहिजे ! अशी सारखी ओरड रावसाहेबांनीं चालविली होती. " हे जे. पी. हव्या त्या खर्चास मंजूरी देतात व मि. मंडलिक काय करीत आहेत ! " अशी टीका करून रावसाहेबांचेंच ने. ओ. पत्र काटकसरीचा उपदेश करतांना रावसाहेबांवर ताण करी. क्राफर्डशाहीचा अंत करून रावसाहेबांनीं नवा कायदा घडवून आणण्यांत केवढा खटाटोप केला व प्रातिनिधिक पद्धतीचा हक्क कसा मिळविला तो इतिहास चिरस्मरणीय झाला आहे. लोकांच्या हातांत नव्या कायद्यानें जी सत्ता आली आहे ती कमीशनर नेमण्याचा अधिकार ज्या दिवशीं मिळेल त्या दिवशीं पुरी होईल, अशी महत्वाकांक्षा रावसाहेबांनीं प्रदर्शित करून ठेविली आहे. पृष्ठ ४९४ पहा. कारपोरेशनच्या दोन तृतीयांश सभासदांचीं मतें पडल्यास सरकारनें नेमलेल्या कमीशनरास दूर करतां येईल एवढ्या म्युनिसिपॅलिटीस प्राप्त झालेल्या अधिकारानें रावसाहेबांची तृप्ति झाली नव्हती. मनुष्याला परिस्थिति उत्पन्न करतां येत नाहीं असें ह्मणतात तें सामान्य दृष्टीच्या सामान्य जनांस लागू आहे. रावसाहेबांसारखे असाधारण लोक पुढें आपल्याला काय मिळविलें पाहिजे तें दिव्य दृष्टीनें आज जाणून तें ध्येय लोकांच्यापुढें ठेऊन त्याच्या प्राप्त्यर्थ प्रयत्न करवतात व अनुकूल परिस्थिति उत्पन्न करवतात. या वेळेस रावसाहेबांची लोकप्रियता इतकी वाढली कीं शहराच्या तीन तीन भागांतून उमेदवार म्हणून रावसाहेबांस पसंत करण्यांत आलें. दोन वेळां कारपोरेशनच्या अध्यक्षपदाचा मान दिला. त्या वेळेचें रा. ब. म. गो. रानडे यांचें पत्र वाचनीय आहे.

प्र. ४१ पृष्ठ ४९५ पहा. संयोगजन्य रोगांच्या इस्पितळांत वेश्यांची तपासणी करण्याच्या कामीं म्युनिसिपॅलिटीनें मदत करणें म्हणजे लोकांच्या पैशाचा दुरुपयोग करणें आहे, म्हणून त्यांनीं केवढी खटपट केली व यश मिळविलें तें संस्मरणीय आहे.

पोलीसाच्या खर्चाचे पैसे सरकारनें घेऊं नये असा जे. पीं. चा ठराव असतां, म्युनिसिपिल विधायक अधिकाऱ्यांनीं त्या खर्चाच्या रकमेचा भरणा सरकारांत केला म्हणून निंदाव्यंजक ठराव जे. पींच्या सभेंत आला असतां रावसाहेबांनीं ठराव असा आणला कीं म्युनिसिपल कायद्याचा भंग सरकारच्या हातून होणार नाहीं व जे. पींच्या हक्कांचें संरक्षण होईल असा जो कायदेशीर इलाज असेल तो कायदे पंडितांचा सल्ला घेऊन करावा. कारण, कारपोरेशनचा सभासद म्हणजे सार्वजानिक पैशाचा ट्रस्टी आहे अशी त्यांची भावना होती. पृ. ४९९ पहा. (सर) वाच्छा यांनीं आपल्या म्युनिसिपल विषयक ग्रंथांत रावसाहेबांस सार्वजनिक पैशाचे 'संरक्षक' म्हटलें आहे. मुंबईच्या गटारांचीं त्यांनीं स्वतां तपासणी केली, व मलमूत्र वाहून नेण्याकरतां बंद गटारें बांधण्याच्या नव्या राक्षसी योजनेच्या विरुद्ध लेख लिहून सभांतून व्याख्यानें देऊन लोकमत जागृत केलें. मलबार हिलवरील तुळसी तलावाच्या कामांतील खोड्या उघडकीस आणल्या, व लोक कोठें खाड्यांत पडत आहेत तें दाखवून दिलें. आरोग्यरक्षणाच्या नांवाखालीं ज्या ज्या अवाढव्य योजना पुढें आणण्यांत येतील त्या खरोखर आरोग्यावह आहेत, किंवा प्राणहारक आहेत किंवा नुसत्या भपक्याच्या पण द्रव्यापहारक आहेत तें नीट तपासण्याची जबाबदारी कारपोरेशनच्या सभासदांवर केवढी आहे तें दाखवून दिलें आहे.

चितायंत्रें उभारण्यांत लोकांच्या धर्म समजुती कशा दुखवतात तें स्पष्ट करून असली सुधारणा करण्यास म्युनिसिपॅलिटी उद्युक्त झाली असतां तिला रावसाहेबांनीं तसें करूं दिलें नाहीं.

म्युनिसिपॅलिट्यांचे अधिकार म्हणजे खरे स्वराज्याचे अधिकार आहेत. कर बसवून तो वसूल करण्याचा व खर्च करण्याचा जो अधिकार खुद्द सरकारला

आहे तो म्युनीसिपॅलिट्यांस दिलेला आहे. निरनिराळ्या खात्यां मार्फत सरकारनें चालविलेल्या देशाच्या कारभाराशीं विरोध केल्याशिवाय आपलीं अन्तर्गत कार्यें आपणच स्वेच्छेनें करण्यांत आपलें नैतिक व बौद्धिक सामर्थ्य चालविण्याची लोकांची सत्ता म्हणजे ‘ स्थानिक स्वराज्य ’ असें रावसाहेबांनीं सांगितलें आहे. पृष्ठ ६२० पहा. याच भावनेनें रावसाहेबांनीं म्युनीसिपॅलिटीचें काम केलें व तीच भावना धरून तालुक्यांच्या, जिल्ह्यांच्या, इलाख्यांच्या मुख्य ठिकाणीं वरील स्थानिक स्वराज्य संधि मिळाल्यास ज्यानें त्यानें आपआपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें करावें व नागरिकाच्या कर्तव्यांतून दक्षपणें कसें पार पडावें, तें रावसाहेबांनीं उत्तम प्रकारें दाखविलें आहे.

आतां रावसाहेबांच्या राजकीय चळवळीकडे वळूं. आपला देश सुधारण्याकरितां कर्ते पुरुष औद्योगिक, सामाजिक व राजकीय या तीन प्रकारच्या मुख्य चळवळी अंशतः अथवा समग्रतः करितात. कोणी परिस्थितीच्या मानानें केवळ समाजसुधारक, कोणी केवळ राजकीय सुधारक, कोणी केवळ औद्योगिक सुधारक व कोणी दोन्ही तिन्ही प्रकारचे सुधारक बनतात. रावसाहेब तिन्हीप्रकारच सुधारक होते. परंत या त्रिप्रकार सुधारणांपैकीं सर्वांत मोठा भाग त्यांनीं राजकीय सुधारणेचा उचलला असल्यामुळें ते राजकीय सुधारक होते असें विशेषेंकरून म्हणतां येईल. रावसाहेब राजकारणकुशल होणार असें भविष्य त्यांचे गुरु सर ली ग्रॅन्ड जेकब यांनीं आधींच करून ठेवलें होतें.

राजकीय सुधारणेंतच त्यांचें सर्व बळ होतें अशी खुद्द त्यांची समजूत होती. “ तुमचे सभेचे सेक्रेटरी चक्रवर्ती येऊन मला म्हणाले उद्यांच्या क्रिस्तोदास पॉल यांच्या स्मारकाविषयक सभेंत तुम्हीं कांहीं भाषण कराल त्यांत राजकीय विषयाचा संबंध येऊं नये. बोलतेवेळेस माझे दांतच काढून ठेवावयास सांगत आहेत म्हणावयाचें !” ( राजेंद्रलाल यांस पत्र ९।१।८५ ) व कांहीं लोकांचीही तशीच समजूत होती. एके ठिकाणीं रावसाहेबांचे चार स्नेही त्यांच्या चरित्र लेखनाविषयीं चर्चा करीत होते त्यांत असें निष्पन्न झालें कीं

रावसाहेबांचें चरित्र म्हणजे मुंबई इलाख्याचा त्यावेळचा राजकीय इतिहास होय.

रावसाहेबांचा पहिला* सार्वजनिक चळवळ करणारा वर्तमानपत्रांतील म्हणून १७।११।१८५९ तारखेचा जो लेख उपलब्ध आहे तो राजकीय विषयावरचाच आहे. तो लायसेन्स बिलावरील होय. या सालीं खजिन्यांत थोडी तूट आली होती. ती भरून काढण्यास नवा कर बसविण्याची वेळ आली होती. तेव्हां ती तूट कशी भरून काढावी या विषयीं सम्यक् सूचना करण्यास वरील लेख रावसाहेबांनीं लिहिला. धंदेवाल्या लोकांवर कर बसविण्याचें घांटत आहे. तसें न करता दारूवर ( जिच्यापायीं भयंकर गुन्हे होतात ) तीवर कर बसवावा अशी शिफारस त्या पत्रांत रावसाहेबांनीं केली होती. " ऐष आरामाच्या जिनसांवर कर जरूर बसवावा. पण गरीब व श्रीमंत यांच्या ऐष आरामांत फरक केला पाहिजे. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे घोंगडी व काश्मीरी शाल, धनगरी धोतरें व डाका येथील मलमल यांत फरक केला पाहिजे. मला खरें लिहितां येत नाहीं; कारण या धनवत्तेच्या युगांत गुणांनीं दुर्गुणांच्या पायीं लागलें पाहिजे."

एवढें सांगून त्या काळच्या राजकारणाचें साधारण स्वरूप काय होतें तें पाहूं. इंग्रजी तऱ्हेच्या राजकीय चळवळीला आरंभ इंग्रजी शिक्षणा बरोबर झाला. सार्वजनिक राजकीय चळवळ करण्याकरतां संघटित आरंभ मुंबईकरांनीं १८४५ सालीं, मुंबई असोसिएशनची स्थापना करून केला. तिचे अध्यक्ष प्रसिद्ध जगन्नाथ शंकरशेट होते. ‡

---

* हा लेख वास्तविक दुसरा आहे. कारण ज्या वर्तमानपत्रांत त्यांनीं हा लेख छापावयास दिला त्याच्या अधिपतीस उद्देशून त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, माझ्या मागील लेखांत वचन दिल्याप्रमाणें मीं सुचवितों इ.

‡ हे वयांत आल्यापासून म्हणजे १८२२ सालापासून वयाच्या ६३ व्या वर्षापर्यंत अंतकालपर्यंत (१८६५ सालापर्यंत) सार्वजनिक कामांत पुढारीपण घेत. एका कमिटीचे सभासद, दुसरीचे अध्यक्ष असे नेहमीं असत. पैशाच्या पीशवीच्या

कंपनी सरकारला दिलेल्या सनदेची मुदत वाढविण्याची वेळ आली. तेव्हां प्रत्येक प्रजेचें म्हणणें काय तें कळविणारे कांहीं अर्ज+ पार्लमेंन्ट पर्यंत मुंबई असोसिएशन कडून गेले होते. तेव्हां राजकीय चळवळीची मुहूर्तमेढ बसविण्यांत आली. पुढें कंपनी सरकारचें राज्य महाराणीसरकारकडे आलें. व १८५८ सालीं महाराणी सरकारनीं जो जाहीरनामा काढला तो सर्व हिन्दी प्रजेस गजेरजवाड्यांस व इतर जनांस फार पसन्त पडला. तेव्हां पासून तो सर्व राजकीय चळवळीचा आधार होऊन बसला. " १८५८ च्या जाहीरनाम्यावर आमची भिस्त आहे. व तोच इंग्लंदच्या हिंदुस्थानरूपी राज्यनौकेचा नांगर आहे. तो नीट राखा म्हणजे इंग्लंदचें व हिंदुस्थानचें हित होईल. " असें दादाभाईचें मत होतें. §

---

दोन्या धर्मार्थ सैल करीत. मुंबईस मि. मालकम व मि. एलफिन्स्टन् यांचा अम्मल होता तेव्हां राज्यकर्ते व प्रजाजन यांचे हे खरे दुभाषी होते. बोर्ड ऑफ् एज्युकेशन स्थापन झालें; एल्फिन्स्टन इंस्टिटयूट निघालें व त्याचें रूपांतर एल्फिन्स्टन कॉलेज-मध्यें झालें; विश्वविद्यालयाची स्थापना झाली; जे. पींची रचना झाली; या सर्वांत शंकरशेट होते. सरकारनें यांची नेमणूक काउन्सिलांत केली होती. पेटी सेशन कोर्टातील स्पेशल ज्यूरींत असत. कामापुरतें इंग्रजी चांगलें जाणत असत. हे सरकारची मर्जी संभाळून लोकांचा विश्वास संपादन करीत. " यांची मूर्ति भव्य व अवयव घवघवीत होते व पहाणाऱ्याच्या मनावर ठसा बसे. " ( डा. ब्डेवुड यांचें रावसाहेबांस पत्र २८।९।७४) शंकरशेटविषयीं रावसाहेबांचं मत चांगले होतें.

" लोकांनीं जगन्नाथ शंकरशेट यांचें नांव राहील असें कांहीं तरी स्मारक करावें अशी शंकरशेट यांची योग्यता आहे हें जाणून त्यांच्या स्मारक कमिटींत दादा भाईच्या सांगण्यावरून माझें नांव घालूं दिलें. ( रो. उ. ).

+ असे अर्ज पुढें पुढें वेळ पडे तेव्हां जाऊं लागले "मुंबईहून इंग्लदास एक अर्ज जात आहे. पार्लमेन्तावर सर्व दिशांनीं विज्ञप्ति पत्रांचा वर्षाव होईल. (१२।१०।१८५९ चें. क० जेकब यांस पत्र. )

§ १८६७ सालीं ईस्ट इंडियन असोसिएशन लंडन मध्यें स्थापन झाली. तेव्हां दादाभाई नवरोजी यांनीं जें भाषण केलें त्यांतील हा उतारा आहे. दादाभाईनीं आपलें समग्र भाषण रावसाहेबांकडे पाठवून दिलें होतें.

यावेळेच्या राजकारणाचें दुसरें एक स्वरूप असें होतें कीं, ज्या पुढाऱ्यांना पोटाचें साधन होतें तेच राजकारणांत पडत. म्हणजे त्यांच्या राजकारणाचा झरा उगमापासून निर्मल होता. तो कसल्याही स्वार्थी हेतूंनीं कलुषित झाला नव्हता. अवगाहरम्य व सरलगामी होता. त्यास वक्रगति प्राप्त झाली नव्हती. पोटाकरतां राजकारणांत पडणारे पुरुष निर्माण झाले नव्हते. राजकारण चालविण्यास इतरांच्या आश्रयाची अवश्यकता त्यांस पडली नव्हती. म्हणून त्यांचे आश्रयदाते सांगतील त्याप्रमाणें राजकारणास रंग भरावा लागला नाहीं. कोणाला कसलें सोंग आणावें लागलें नाहीं. व लोकाभिरुचीप्रमाणें तें बहुरूप्यासारखें नित्य बदलावें लागलें नाहीं. कारण लोकच्छंदानुवर्तन फक्त पोटार्थी राजकारणी पुरुषांस करावें लागतें.त्यांच्या राजकारणास जी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती ती पोटाकरतां राजकारणाचा धंदा करणाऱ्या पुरुषास केव्हांही प्राप्त होणारी नसते. पारावर उभे राहून उच्चस्थानावरून रावसाहेबांनीं आपलें वक्तृत्व प्राकृत जनांस दाखविलें नाहीं हें मत रावसाहेबांच्या विषयीं जें रीस अँन्ड रयत पत्रानें दिलें तें विचार करण्यासारखें आहे. पृष्ठ ९२९ पहा.

राजकारणांत धोरण संभाळणें तें कांहीं विचारी व्यक्तीच स्वतांच्या जबाबदारीवर संभाळीत असत.

याप्रमाणें रावसाहेबांच्या वेळच्या लोकांचें साधारण स्वरूप दिल्यावर रावसाहेबांच्या राजकारणाच्या स्वरूपाकडे वळूं व तें साधारणपणें कसें होतें तें पाहूं. गतगोष्टींचा शोक करीत बसणें हा वास्तविक स्त्रियांचा हक्क आहे. तो त्यांपासून कित्येक मुत्सद्दी पुरुष हिरावूं पहातात. रावसाहेब गेल्याचा शोक केव्हांही करीत बसले नाहींत. आज स्थिति अशी आहे. तिची सुधारणा कशी होईल एवढाच विचार त्यांच्या मनांत असे. रावसाहेबांच्या काळीं, हिंदुस्थानावर कंपनी सरकारचें राज्य चालू होतें. रावसाहेबांस कंपनी सरकारची राज्यपद्धति पसंत होती. “ कंपनीच्या राज्यांत सुधारणा करण्याची इच्छा आहे” असा रावसाहेबांचा भरंवसा होता. (प्र. ९ पृष्ठ७४पहा.)

महाराणी सरकारचा जो जाहीरनामा प्रसिद्ध झाला त्यास तर रावसाहेब हिंदुस्थानांतील लोकांच्या हक्काची सनद म्हणत. ( प्र. ९ पृष्ठ ७५ पहा. )

" आम्हीं, राज्याचा कारभार आमच्या सर्व प्रजेचें कल्याण होईल असा करूं. आमच्या प्रजेची भरभराट म्हणजेच आमचें बळ व त्यांचा संतोष, यांतच आमची सुरक्षितता. " एवढ्याचें बक्षिस काय तर " कृतज्ञता " असें महाराणी साहेबांच्या जाहीरनाम्यांत वचन आहे. त्याप्रमाणें ' कृतज्ञ ' रहाणें हें रावसाहेब कर्तव्य मानीत.

" माउन्ट स्टयूअर्ट एलफिन्स्टनच्या द्वारें जें आम्हांला मिळालें आहे, तें आम्हीं परत केलें पाहिजे. निदान दसपटीनें तरी व अजून आम्हीं देऊं असा मला भरंवसा वाटत आहे. " ( कर्नल जेकब यांस पत्र. )

ज्ञानप्रसारक सभेंत राजकीय विषयावर बोलावयाचें नाहीं असा सभेचा नियम होता. तरी प्रसंग आणून रावसाहेबांनीं प्रथम सांगितलें कीं, अलिकडे दोन हजार वर्षेपर्यंत या देशाचा सर्व प्रकारें अपकर्ष होतां होतां पाणी संथ होऊन भरती लागण्याचा समय आला आहे. या देशाच्या नशीबाचें तारूं आजवर इकडून तिकडे अडखळत होतें. तें सांप्रत ज्या देशास लागलें आहे तो देश विद्येचें व स्वतंत्रतेचें आद्यस्थान आहे. म्हणून आतां तरी भरती येईल. तेव्हां विद्या, कलाकुशलता, शौर्य इतक्या जिनसांनीं तें तिकडून भरून येईल अशी आशा आहे. सर्वांनीं कायद्यास मान द्यावा; आपआपलीं विवक्षित कामें इतरांच्या हक्कावर पाय न देतां बजावावीं; जे जे अधिकार सरकार आपणास देईल ते ते इमानानें व धैर्यानें बजावून त्यांहून अधिकांचा उपभोग घेण्यास योग्य व्हावें. ( प्र. १७ वें पृष्ठ १३७ ).

यांत खुद्द रावसाहेबांचें वळण दिसून येत आहे. पहिली गोष्ट रावसाहेबांनीं सांगितली आहे कीं, कायद्यास मान द्यावा. त्याचें कारण उघड आहे. " कायदा लोकांस अडचण करणारा दिसतो. जर सर्व लोक एकोप्यानें वागतील व एकमेकांच्या हक्कास मान देऊन राहतील तर कायद्याची कांहीं जरूर नाहीं. " ( ७।८।१८८६ चें रावसाहेबांचे भाचे, बाबा कान्हेरे यांस पत्र. )

परंतु जोंपर्यंत दुसऱ्याचे हक्क काय आहेत, आपले काय आहेत, हें लोकांस समजत नाहीं व दुसऱ्याच्या हक्कास बाध आणल्याशिवाय आपल्या हक्कांचा उपभोग लोकांस घेतां येत नाहीं, म्हणजे दुसऱ्याच्या हक्कास मान देण्याचा नियम सर्व लोक पाळीत नाहींत, तों पर्यंत कायद्याची आवश्यकता राहील.

वरील सभेंत आणखी जो उपदेश रावसाहेबांनीं केला तो असा कीं, अधिकांची योग्यता आणा. हा उपदेश हळदीच्या गुणाची त्वरित अपेक्षा करणाऱ्या पुष्कळ मुत्सद्यांस रुचणार नाहीं. अंगीं योग्यता आल्याशिवाय दिलेला अधिकार तो अधिकारच नव्हे. ती एक देहनगीच समजावी त्या देहनगीची किंमत तीची प्राप्ति करून घेण्यास श्रम पडले नसल्यामुळें काडी येवढी समजली जाते. जशी मिळाली तशी घालविण्यांत येते अथवा तीच आपोआप विनाश पावते. जी प्रगति अविश्रान्त कष्ट केल्याशिवाय होते ती प्रगतिच नव्हे. असें आपलें मत मि. एम. जे. शा स्टयूअर्ट यांस रावसाहेबांनीं एकवेळा स्पष्ट कळविलें होतें. “ मला मिळालेल्या शिक्षणानें व परंपरेनें मी धीरेधीरे प्रगति व्हावी या मताचा आहें. ”

कायद्यास मान द्या, अधिकार सरकार देईल ते ते इमानानें बजावा व अधिकाची योग्यता आणा असा उपदेश रावसाहेबांनीं जो आपल्या प्रथम वयांत करून ठेविला होता तो ते वार्धक्य येई तों करीत असत. “ मिळत आहे तें घेतलें पाहिजे ” असा उपदेश शिशिरबाबूंना केलेला प्र. ६४ पृष्ठ ७६४ येथें आढळेल.

नेटिव्ह ओपीनियन मध्यें रावसाहेब लिहीत कीं, ब्रिटिशांचा सूर्य हिंदुस्थानच्या राज्यावर प्रकाशित राहो म्हणजे ब्रिटिशांची आम्हांस गरज आहे; असें दाखवीत. पृष्ठ २०५ पहा. ब्रिटिश राज्याशीं आमचा संबंध जुळून आला आहे. त्यांत मोठें राष्ट्रीय कार्य आहे. त्याचीं चिन्हें बघणाऱ्यास स्पष्ट दिसत आहेत. त्यांची राजव्यवस्था प्रागतिक आहे व तिची वाढ उत्तरोत्तर होणारी आहे. त्यामुळें आम्हीं स्वतः ब्रिटिश राज्य अधिक चहातों. ( पृष्ठ २०९ पहा. )

" जें कार्य करून घ्यावयाचें आहे त्याचें समर्थन यथान्याय व समर्याद असें ब्रिटिशजनतेपुढें केलें × × × व तिचे लक्षांत आपलें कार्य सत्प्रमाण सिद्ध आहे असें एकदां आलें कीं मग तिच्याहून अधिक निःपक्षपाती न्यायाधीश कोणाला मिळावयाचे नाहींत. × × × × इंग्रजांचें राज्य हें व्यवस्थित व सनदशीर आहे. × × × राज्यकारभार करतांना जे प्रश्न उभे राहले असतील त्यांतील मुद्यांवर योग्य निकाल सरकारास देतां यावा म्हणून बहु प्रयत्नानें अवश्य ती माहिती गोळा करून त्यास पुरविण्याकडे लक्ष दिलें पाहिजे अशी सूचना रावसाहेबांनीं सर्व राजकीय संस्थांस म्हैसूर प्रकरणाच्या अनुभवावरून करून ठेवली आहे " पृष्ठ ३५५ पहा.

" ना विष्णुः पृथिवीपतिः " ही म्हण रावसाहेबांच्या एका पत्रीं आढळते. (पृष्ठ ६५३ पहा.) प्रिन्स ऑफ वेल्स यांचें आगमन, दिल्ली दरबार, ड्यूक ऑफ कॅनाट* यांचें आगमन व त्यांचें रावसाहेबांनीं केलेलें स्वागत व महाराणी व्हिक्टोरिया हीं या ग्रंथांतील प्रकरणें वाचलीं म्हणजे असें आढळून येईल कीं

* रावसाहेबांनीं या द्वितीय राज्ञीपुत्राचें स्वागत केलें तें यथायोग्य होतें. या राजपुत्रांच्या अंगांत त्यांच्या घराण्यांत असलेला थोरपणा होता. व शिवाय इंग्रज लोकांत दिसून येणारी शिस्त व कर्तव्यनिष्ठा होती. येथें ते पहिल्यानें पाहुणे म्हणून आले पण नंतर मुंबईइलाख्याचे सैन्याधिकारी म्हणून आले. त्यावेळेस त्यांचें वागणें आपण मोठे राजपुत्र या डौलाच्या कल्पनेनें भरलेलें नव्हतें. आपण एक ब्रिटिश साम्राज्याचे नोकर आहोंत. लोकांशीं आपलें नातें निराळें आहे या भावनेनें प्रेरित होऊन जसें वागलें पाहिजे तसे ते वागत असत. त्याचा अनुभव खुद्द रावसाहेबांना आला होता असें सांगतात.

रावसाहेबांस पुण्यास जावयाचें होतें. नियमांप्रमाणें वेळेवर त्यांनीं पहिल्या वर्गाचा सलून डबा ( म्हणजे ज्यांत स्नान व चाकर नोकर यांच्या सर्व सोयी असतात तो ) राखून ठेविला होता. त्यानंतर त्या डब्यावर ड्यूक ऑफ् कॅनाट यांची मागणी आली. दोघांच्या वेळेंत अंतर फार थोडें असल्यामुळें दोघांच्या मागण्या पुरवणें शक्य नव्हतें, म्हणून ट्रॅफिक मॅनेजरनें रावसाहेबांस कळविलें कीं आपणांकरता दुसरा सोय दुसरा एखादा शक्य तितक्या चांगल्या सोयींचा डबा

रावसाहेबांची राजनिष्ठा शेवटपर्यंत अचल राहिली ही गोष्ट अनुकरणीय व प्रशंसनीय आहे. रावसाहेबांचा सरकारनेंही चांगला सन्मान केला. मुंबईतील प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या मिरवणूकींत इतर तीन हिंदी गृहस्थांबरोबर त्यांस गाडींत बसून भाग घेण्याचा मान मिळाला होता. पृष्ठ ६५४ पहा. पुढें दिल्ली दरबारांत त्यांस एक पदक व सी. एस्. आय्. ही बहुमानदर्शक पदवी मिळाली.

गव्हर्नर साहेबांच्या बंगल्यावर वार्षिक धूळभेटीच्या प्रसंगीं राजभक्तिपूर्वक सादरपणें रावसाहेब हजर असत व तेथील समारंभास रावसाहेबांस आमंत्रण असे.

वर निर्दिष्ट केलेल्या तत्त्वांवर राजकीय चळवळीला रावसाहेबांनीं प्रारंभ केला व ती चळवळ यशस्वी करून दाखविली. कोणत्याही चळवळींचे उपाय पायरीपायरीनें तीन आहेत. अगदीं चळवळ नवीन असते तेव्हां साध्य हेतूविषयीं लोकांस चांगलें ज्ञान करून द्यावें लागतें. लोकांस ज्ञान झालें म्हणजे लोकमत उत्पन्न होतें. लोकमत उत्पन्न झालें कीं चळवळीला जोर येण्यास संघटित रचना करण्यास लोकांची सार्वजनिक संस्था निर्माण करावी लागते. त्याप्रमाणें रावसाहेबांनीं नेटिव्ह ओपिनियन पत्र काढलें, व मुंबई असोसिएशनचा जीर्णोद्धार केला.

रेव्हिन्यू ज्युरिस्डिक्शन बिलाचें व खोती कज्जाचें अशीं प्रकरणें वाचलीं ह्मणजे त्यांच्या चळवळीचें स्वरूप दिसून येईल. सभा, * अर्ज्या, भाषणें,

---

देऊन आपली मान्यता असेल तर करतों नसेल तर राज्ञीपुत्रांस तसें कळवितों. शिष्ट संप्रदाय म्हणून रावसाहेबांनीं दुसरी सोय मान्य केली. परंतु कशी तरी ही गोष्ट राज्ञीपुत्रांच्या कानावर गेली. तेही थोर उदार मनाचे, त्यांनीं ताबडतोब ट्रॅफिक मॅनेजर यांस कळविलें कीं रावसाहेबांच्या काय अडचणी आहेत त्या मला माहीत आहे. त्यांच्या करतां राखलेला डबा आम्हांला नको. रावसाहेबांची गैरसोय करण्याची माझी इच्छा नाहीं.

* रावसाहेबांनीं केलेल्या अर्जांतील भाषा मनांत भरण्याजोगी असे. तींत जसा उद्धटपणा नसे, तसा दीनवाणीनें काढलेल्या निराश्रितपणाच्या उद्गारांसही थारा नसे. ( प्र. २१ पृष्ठ २२१ पहा. )

लघ्वाकार पुस्तकें, कायद्याच्या कोडतांत फिर्यादी इत्यादि इत्यादि कायदेशीर उपाय ते योजीत असत व आपली दाद लावून घेण्याकरतां पार्लमेन्त पर्यंत वेळ पडल्यास धांव घेत असत. ब्रिटिश जनतेच्या उदारवृत्तीवर त्यांची भिस्त असे. ( पृष्ठ २५१ )

" प्रथम ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें व्हाइसरायांकडे अर्ज पाठवीन. अवश्य पडल्यास स्टेट सेक्रेटरींकडे पाठवीन. दोन्हीं ठिकाणीं फसल्यास प्रत्यक्ष पार्लमेन्त सभेकडे धांव घेईन." इत्यादि कायदेशीर उपायांत एक विशिष्ट उपाय रावसाहेब योजीत असत तो हा कीं, सरकारी अधिकारी व आपण स्वतां असे एके ठिकाणीं समुरासमूर बसून वादविवादाच्या मुद्याचा खल करीत. लोक-मत समजाऊन सांगत व कार्य साधून घेत. यालाच " राउन्ड टेबल कान-फरन्स " म्हणतात. याला उदाहरण म्युनिसिपॅलिटी प्रकरण ११ पृष्ठ ४५३ पहा; खोती कज्जा प्रकरण ४२ पृष्ठ ५५२ पहा.

या शिवाय पुष्कळ सार्वजनिक कल्याणाच्या गोष्टींविषयींचा उहापोह सरकारी साधारण बड्या कामगारापासून तों खुद्द गव्हर्नरसाहेबांपर्यंत, जे स्नेही असत, त्यांजवळ रावसाहेबांनीं केलेला आढळतो. " भाऊदाजींचें स्मारक, रयतेचें दारिद्र्य, त्यांच्यावरील दिवाणी दावे यां विषयीं चर्चा सरकार-वाड्यांत झाली. " ( रो० उ० ) जंगल खात्यासंबंधें आपलें काय म्हणणें होतें तें लार्ड रिपन यांच्या कानावर एका भेटीचे प्रसंगीं रावसाहेबांनीं घातलें. प्रकरण ६४ पृष्ठ ७६४ पहा. व मागाहून एक मोठें पत्र लिहून आपल्या सर्व तक्रारी कळविल्या. यामुळें त्यांची राजकीय चळवळ सलोख्यानें चाले.

## रावसाहेबांच्या राजकीय चळवळीचें विशेष स्वरूप.

**। नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके ।**
**॥ जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ॥**
**। इति महति विरोधे विद्यमाने समाने ।**
**नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ १ ॥**—( भर्तृहरि. )

आपण एवढी सर्व खटाटोप जी करतों तींतील इंगित काय आहे तें रावसाहेबांनीं एका मित्रास लिहिलें होतें. "आतां कलकत्त्यास जाण्याचा निश्चय आहे काय होईल तें पहावें, कारण जोखमाचें काम आहे. 'नरपतिहितकर्ता' हें सर्वांशीं लागू आहे." (१९।७।१८८२ चें भाऊसाहेब बापट यांस पत्र) आणि हेंच खरें आहे. समाजाच्या समृद्धीकरतांच राजसंस्था निर्माण झाली आहे, व राजा अथवा प्रजा या शब्दांचा उच्चार झाल्याबरोबर प्रजा अथवा राजा हे शब्द उच्चारले गेले नाहींत तरी संयुक्त संबंधानें ध्वनित होतात. राजा व प्रजा या दोघांना हक्क आहेत. दोघांचीं कर्तव्य कर्में निश्चित आहेत. असें असतां दोन्हीं संस्थांमध्यें इतका मोठा विरोध दिसून येतो कीं भर्तृहरीनें वर म्हटल्याप्रमाणें राजाचें हित करणारा मनुष्य लोकांच्या द्वेषास पात्र होतो व प्रजेचें हित करणाऱ्या मनुष्याचा राजा त्याग करतो. म्हणून राजा व प्रजा या उभयतांचें हित करणारा असा (उभयतांसही प्रिय असणारा) मनुष्य फार दुर्लभ असतो. अशा दुर्लभ मनुष्यांत रावसाहेबांची प्रमुखत्वानें गणना होते यांत शंका नाहीं. रावसाहेबांनीं सरकारी नोकरी केली तींतच सरकारचें व प्रजेचें हित केलें. सरकारचें हित केलें तें त्यांची त्वरित बढती होत गेली व प्रशंसा झाली तीवरून सिद्ध होत आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं प्रजेचें हित केलें तें गोविंद नारायण यांच्या सारख्यांच्या पत्रावरून सिद्ध होत आहे. प्र. ८ वें पृष्ठ ६० पहा.

शिवाय सरकारी नोकरींत असतां राज्यकारभारांत काय काय अडचणी उत्पन्न होतात, व त्या दूर करण्यास कसे व कोणते उपाय योजावे लागतात तें त्यांच्या ध्यानांत आलें. म्हणजे सरकारी नोकरीच्या अनुभवामुळें सरकारच्या दृष्टिकोनानें त्यांना कोणत्याही होऊं घातलेल्या कायद्याकडे पहाण्याची संवय झाली, व वकिली करीत असतांना जनतेशीं नित्य निकट संयोग घडत असे त्याच्या योगानें लोकांच्या दृष्टीनेंही प्रत्येक कायद्याकडे पहातां येत असे. यामुळें राज्यकर्ते व प्रजाजन या दोहोंचे रावसाहेब योग्य मध्यस्थ होऊं शकले.

१८७३ सालीं काटकसरीची कमिटी इग्लंदमध्यें बसली होती. तिच्या पुढें आपल्यावतीनें साक्ष देण्याकरतां रावसाहेबांस पुण्याच्या सार्वजनिक सभेनें आमंत्रण दिलें होतें व रावसाहेबांनीं जावें असें त्यांच्या स्नेह्यांच्या मनांत होतें. "साक्षी म्हणून जाण्याची योग्यता येथील थोड्याच लोकांत आहे. तुमच्याहून अधिक योग्यतेचा मनुष्य बहुतेक नाहींच." ( १९।६।७३ चें नारायण परमानंद यांचें पत्र. ) पुढील पत्र सरकारी निमंत्रणाचें उत्तर असावें. "निमंत्रण केल्याबद्दल मी फार आभारी आहें. हल्लींची माझी स्थिति मला इंग्लंदला जाऊं देणार नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. परंतु सरकारला किंवा फिॅनन्स कमिटीला एकाद्या मुद्यावर साक्ष घ्यावयाची असेल तर पुरावा देण्याची व्यवस्था मला सांगितल्यापासून होईल तितक्या लवकर करीन." मिळून सरकार व प्रजा या दोघांची इच्छा रावसाहेबांनीं साक्ष द्यावी अशी होती.

रावसाहेब, नृपति व जनपद या दोघांचे हितकर्ते होते असें लोकांचें मत होतें. "त (रावसाहेब) जन्मभर सरकारच्या व लोकांच्या विश्वासास पात्र झाले". ( सर दिनशा माणकजी पेटिट यांचें रावसाहेबांच्या स्मारकार्थ भरलेल्या मुंबईच्या सभेंतील भाषण पृष्ठ ३७९ पहा. )

हें नृपतिजनपदांचें हित करण्याचें रावसाहेबांचें धोरण कायदे कौन्सिलांत चांगलेंच दिसून आलें. त्याचा सारांश प्रकरण ४४ पृष्ठें ६३४ ते ६४० येथें दिला आहे. त्याची पुनरुक्ति करण्याची जरूर नाहीं. तथापि त्यांच्या काउन्सिलांतील उत्तम कामगिरीचें रहस्य, त्यांची काउन्सिलांत नेमणूक झाली, ही सुवार्ता ऐकून ज. जेकब यांनीं जें त्यांस पुढील अभिनंदनपर पत्र लिहिलें तें कथन करीत आहे.

" तुमची काउन्सिलांत झालेली नेमणूक मला पसंत आहे. असें मी म्हणतों म्हणजे तुमचीं सर्व मतें मला पसंत आहेत असें नाहीं. परंतु त्याचें कारण असें आहे कीं जे ठराव अपायकारक आहेत असे तुम्हांला वाटतात त्यांच्या विरुद्ध सबळ कारणें देण्याची तुमच्या अंगांत योग्यता आहे. विरुद्ध पक्षाचे लोक काय हरकती आणतात तें पाहिल्याशिवाय व त्यांच्यावर पूर्ण

वादविवाद झाल्याशिवाय कोणताही नवा कायदा पसार होतां कामा नये.* ज्या सरकारचे सभासद मुखस्तंभ ( निर्जीव पुतळ्याप्रमाणें ) बसतात त्याला सुरक्षितता कोठें आहे! तुम्हीं असे मुखस्तंभ पुतळे नाहीं हें तुम्हीं आजपर्यंत चांगलें सिद्ध करून दाखविलें आहे+. जेथें पक्षाभिमानाचें वारें लागत नाहीं इतक्या उंच वातावरणामध्यें तुमचें मन वावरूं शकतें. पक्षपाताच्या भोंवऱ्यामध्यें तुम्हीं आपल्याला कोणासही ओढून नेऊं देणार नाहीं."

"एका बाजूला लोकप्रियतेचा मोह जितका असतो तितकाच राज्यकर्त्यांची हांजी हांजी करून काळाप्रमाणें वर्त्तन करण्याचा मोह दुसऱ्या बाजूला सहजींच असतो. बहुजनसमाजानानें केलेल्या प्रशंसावादाचा आस्वाद पुष्कळांस मादक होतो. व एकवार भोंवऱ्यांत भ्रमण सुरू झालें कीं त्यांतून निसटणें जड काम आहे."

कलकत्त्याच्या काउन्सिलांत बेंगाल टेनन्सी बिलावरील वादविवादांत ही त्रयस्थ बुद्धि फार विशेष रीतीनें दिसून आली.

"या विषयावर मी जितका प्रकाश पाडूं शकेन तितका पाडून मी सरकारास साहाय्य करण्यास बांधलेला आहें" असें या बिलावर केलेल्या वादाच्या आरंभीं रावसाहेबांनीं सांगितलें. तेव्हां त्यांस असें आढळून आलें:—"या प्रकरणांत भांडणाला प्रारंभ व्हावयास किती तरी मूलभूत कारणें आहेत. हिंदू, मुसलमान, कुळें, जमीनदार, मळेवाले व वायदे करणारे आपल्या शेजाऱ्या विरुद्ध तंटा करावयास सादर आहेत." म्हणून सर्वांस मान्य होतील अशा उपसूचना एका मित्राला सांगितल्याप्रमाणें रावसाहेब तयार करीत होते.

* उदाहरणार्थ. नेटिव्ह फार्मसी बिलाच्या वेळीं निवडक कमिटींत रावसाहेब होते. त्यांस सर्व कागद पत्र वेळेवर मिळाले नव्हते. म्हणून त्यांनीं तिच्या बैठकीस जाण्याचें नाकारिलें. ४।१।१८८३ चें मित्रास पत्र.

+ मुखस्तंभ न राहण्यावर म्हणजे बोलण्यावरच रावसाहेबांची निष्ठा होती. "लोकांचीं तोंडें म्हणजे राज्ययंत्राचा स्फोट होऊन तें उडून जाऊं नये म्हणून अधिक झालेली वाफ बाहेर निर्गत होण्याकरतां वेळींच उघडीं ठेवलेलीं द्वारेंच आहेत. ( क. जेकब यांस १३।७।१८७६ चें पत्र. )

## समाज सुधारणा आणि रावसाहेब.

। कस्यापि कोऽप्यतिशयोऽस्ति स तेन लोके ।
॥ ख्यातिं प्रयाति नहि सर्वविदस्तु सर्वे ॥
। किं केतकी फलति किं पनसः सुपुष्पः ।
॥ किं नागवल्ल्यपि च पुष्पफलैरुपेता ॥ १ ॥

रावसाहेब सामाजिक सुधारक होते असें प्र. २६ वें वाचलें म्हणजे समजेल. चर्चेच्या सोयीकरतां समाजसुधारकांचे मुख्य तीन वर्ग करण्यांत येतात. पृष्ठ ३१३ पहा. त्यांपैकीं कोणत्या वर्गांत रावसाहेब येतात असा प्रश्न कित्येकांपुढें उभा राहतो. त्याचा जबाब त्याच पृष्ठांत दिला आहे. पण कित्येकांपुढें रावसाहेब समाजसुधारक होते कीं नाहीं हाच प्रश्न उभा राहतो. यास उत्तर देण्याचें अवजड काम मागें एकदां रावसाहेबांचे जन्माचे स्नेही रावबहादुर कृष्णाजी पंत नूलकर, व खुद्द " सुधारकाचे " कर्ते प्रो. आगरकर व प्रसिद्ध वक्ते महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं करून ठेवलें आहे. त्यांनीं जें उत्तर दिलें आहे त्यांत काडीचा फरक न करतां जसेंच्या तसें दिलें म्हणजे झालें. रावसाहेबांचें स्मारक त्यांच्या हयातींत मुंबई व पुणें येथील लोकांनीं केलें. त्यावेळीं पुण्यास ८ जानेवारी १८८८ रोजीं मोठी सभा भरली होती. * तेव्हां प्रथम

* निमंत्रणपत्रिकेवरतीं ३० पुढाऱ्यांच्या सह्या होत्या. सभा सर दिनशा पेटिट यांच्या बंगल्यांत भरली होती. पुणें शहर व कॅन्टोन्मेन्ट या हद्दींतील हिंदु, पारसी, मुसलमान या धर्मांचे लोक हजर होते. पारशांतील मुख्य धर्माधिकारी सरदार खानबहादुर होसंगजी जमास्पजी, महमद शिदिक, महादेव बल्लाळ नाम जोशी, बाळकृष्ण सायन्ना, जाफर जुसफ, राम नारायण, डाक्तर विश्राम रामजी घोले, डा. भिकाजी अमृत चोबे, सरदार विजयरंगम् मुदलियार, सरदार दाजीसाहेब पटवर्धन, रा. ब. नारायणभाई दांडेकर, दाजी नीळकंठ नगरकर, हरि रावजी चिपळूणकर, नारायण भिकाजी जोगळेकर, वासुदेव बापुजी कानिटकर, प्रो. गोविंद विठ्ठल करकरे, भाऊ मनसाराम नाईक, बैरामजी पदमजी, अबदुल वहब, बाळ गंगाधर टिळक, राजन्ना लिंगू, महामहोपाध्याय रामशास्त्री आपटे, मुनशी सैयद याकूबखान, इ. इ. हजर होते.

श्रीमंत सरदार गणपतराव विनायक ऊर्फ बाबासाहेब सांगलीकर यांचें अध्यक्ष या नात्यानें भाषण झाल्यावर पहिला ठराव आणतांना महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं अस्कलित इंग्रजींत भाषण केलें त्याचें भाषांतरः--

" पंचवीस वर्षांपूर्वी वल्लभ महाराजांच्या कज्जांत रावसाहेबांनीं हायकोर्टांत दिलेली जबानी वाचल्याचें मला स्मरतें. ते म्हणाले ' मी हिंदू आहें. मी सुधारक आहें. ' हे शब्द त्यांनीं जबानींत उच्चारिले कीं नाहीं तें खरें कीं खोटें हें पहाण्याकरितां त्या कज्जाची हकीकत मिळविण्याची खटपट करून मिळाली नाहीं. पण आतां कांहीं लोक म्हणतात मंडलिक सुधारक नाहींत; परंतु मीं सांगतों कीं जर कोणाचें विचारांशीं सुसंगत असें आचरण असेल तर तें रावसाहेबांचें आहे. असें दाखविण्याकरितां सुधारणा म्हणजे काय हें मला स्पष्ट करून सांगितलें पाहिजे. अंतःप्रवृत्त कल्पनांच्या जोरावर लोकांत प्ररूढ असलेल्या आचारांत, चालीरीतींत फरक करणें म्हणजे सुधारणा. आचारांत फरक होण्यापूर्वी अंतःप्रवृत्त कल्पनांत फरक झाला पाहिजे. असा फरक व्यवहार्य केव्हां होतो ? प्रचलित कल्पनांच्या अनुरोधानें नव्या कल्पनांचा अर्थ करून दाखविण्यांत येतो तेव्हां. म्हणून हा व्यवहार्य अर्थ करून दाखविणें हें सर्व सुधारणेचा जीव आहे. या सुधारणेच्या व्याख्येला धरून रावसाहेब आहेत व तीपासून ते महाराजांच्या खटल्यापासून तों माधव बागेच्या सभेपर्यंत विलग्न झाले नाहींत. मी माझ्या स्मृतिपटावरील मि. बकल यांची प्रमाणोक्ति सांगतों ती अशी आहेः---' बहुजन समाज व त्याचे पुढारी यांत अंतर पाडणारी खाडी मध्यें येतां कामा नये. पुढारी काय म्हणतात तें बहुजनसमाजास समजलें पाहिजे. ही जी पुढाऱ्याची स्थिति आहे तिच्या विषयीं उच्चप्रकारचें सम्यक्ज्ञान असल्यामुळें-यास पाहिजे तर तुम्हीं साधारण प्रकारचें शिक्षण म्हणा; पण समाजाच्या बौद्धिक स्थितीचें सम्यक्ज्ञान असल्यामुळें-जो पुढारी असतो तो जेव्हां समाजाशीं कालानुवृत्त जुळतें घेतो तेव्हांच यशस्वी होतो.' याच बाबतींत रावसाहेब यशस्वी झाले. याप्रमाणें ते व्यावहारिक सुधारक होते व त्यांस लोकांचा पाठिंबा होता."

नंतर ५०।६० असामींची स्मारक कमिटी नेमण्यांत आली. तिला अनुमोदन देतांना व पेटिट यांचे जागा दिल्याबद्दल आभार मानतांना कृष्णाजीपंत नूलकर इंग्रजींत म्हणाले:—"मी रावसाहेबांच्या राज्यकारभाराविषयींच्या कामागिरीचें वर्णन करीत बसत नाहीं. मीं फक्त त्यांच्या सामाजिक कार्याविषयीं बोलणार आहें. त्यांच्याशीं माझा संबंध जुनाच आहे. त्यांनीं स्त्रीशिक्षणाचे कामीं फार परिश्रम घेतले आहेत. त्यांनीं स्टूडन्टस् लिटररी ॲन्ड सायन्टिफिक सोसायटी संबंधें स्त्रियांच्या शाळा घालून मोठें कार्य केलें आहे. त्या सभेचे ते आतां अध्यक्ष आहेत* "

" ते विधवापुनर्विवाहास अनुकूल आहेत खरे. परंतु ते विधवा पुनर्विवाहोत्तेजक एकाद्या समाजाचा सभासद होण्याचा रस्ता × शोधून काढावयास असमर्थ आहेत. एक १० बारा वर्षांची त्यांच्या नात्याची मुलगी दुर्दैवानें विधवा झाली. तिला क्षेत्रीं नेऊन कांहीं तिची विटंबना करण्यांत येईल अशी शंका रावसाहेबांस येतांच ते तेथें कसे धांवत गेले व ज्यांचें मन न दुखविणें हें त्यांचें कर्तव्य आहे त्यांच्यामध्यें ते कसे पडले व जें करणें तें ती मुलगी सज्ञान झाल्यावर तिला वाटेल तसें करावें अशी व्यवस्था कशी केली तें वृत्त मला ठाऊक आहे."

"त्याचप्रमाणें त्यांच्या पत्नी रुग्णाइत झाल्यावर दुसरें लग्न करण्याविषयीं नातेवाईक आग्रह करीत असतां दुसरी स्त्री करून घेण्याचें नाकारतांना उलट त्यासच

* रावसाहेबांचा या सभेशीं संबंध एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें गेल्यापासून जो जडला तो शेवटपर्यंत होता. १८६२ त वकिलीच्या अभ्यासा करतां त्यांनीं सर्व कामें सोडिलीं परंतु या मंडळीचें काम सोडलें नाहीं इतकी आस्था त्यांच्या मनांत या मंडळीच्या कामांविषयीं वसत असे. पृष्ठ ३२६.

× विधवा पुनर्विवाहास शास्त्राधार नसतां शास्त्राधार आहे असा हट्ट धरण्यांत रावसाहेबांस मतलब वाटला नाहीं. ते म्हणत. " भिन्नभिन्नकाळीं नव्याचालींचा हिंदुसमाजांत प्रवेश झाला आहे त्यांतील ही एक समजावी पृष्ठ ३०२. "

'अहो तुम्हीं रुग्णाईत झालेत तर आपल्या पत्नीला तुम्हीं तशी कांहीं परवानगी द्याल काय?' असा प्रश्न विचारला, तो मला माहीत आहे.* यावरून स्त्रियांची स्थिति सुधारण्याविषयीं त्यांचा मुख्य हेतु कळून येतच आहे."

"शंकराचार्यांकडून नौका गमन करणाऱ्यास पंक्ति पावन करून घेतल्याची हकीकत तुम्हांस विदितच आहे. म्हणून रावसाहेबांची मूलतः सुधारणा घडवून आणणाऱ्या सुधारकांत गणना केली पाहिजे."

नंतर एकदोघांचीं भाषणें झाल्यावर प्रो. आगरकर इंग्रजींत म्हणाले:—राव-साहेब शेवटीं शेवटीं नवविद्वेषी आणि पुरातनस्थितिपालक झाले असें म्हणतात. वृद्धपणाबरोबर स्थितिसंरक्षकता प्राप्त होते. आजपर्यंत काळजीवाहून ज्या स्थितींची जोपासना केली तींत कांहीं फरक होऊं नये अशी त्यांची सभय इच्छा असते. त्या परिस्थितीवर उद्धत व उतावीळ तरुणांनीं हल्ला केलेला त्यांस पाहवत नाहीं. त्यांची मूलतः सुधारणा करण्याची प्रवृत्ति त्यांस मानवत नाहीं. हे सर्व खरें आहे. परंतु पुरातनमतवाद व उदार मतवाद हे सापेक्ष शब्द आहेत. हल्लीं ज्यांची फार प्रगति झाली आहे व जे मूलतः सुधारणा व्हावी अशी इच्छा करतात त्यांचीं मतें पाहिलीं व त्या मतांची मंडलिकांच्या मतांशीं तुलना केली म्हणजे मंडलिकांचीं मतें अगदीं पुरातन-स्थितिसंरक्षक दिसतात; परंतु मंडलिकांच्या मतांची तुलना तुम्हीं त्यांच्या मागच्या पिढीच्या लोकांच्या मतांशीं केली म्हणजे मंडलिकांचीं मतें मूलतः सुधारणा व्हावी असें म्हणणाऱ्या उदार मतवादी लोकांच्या मतांशीं जुळतात. या कारणांचा विचार माझे मनांत आल्यामुळें मी येथें आलों आहें. व असाच विचार आमच्या आतांच्या अत्यंत तीव्र उदार मतवाल्यांनीं केला तर तेही आमच्या कार्याला यावत् शक्य हात भार लावतील."

रावसाहेब हे समाज सुधारक होते या सिद्धान्ताचें समर्थन वरील तीन

* रावसाहेबांनीं रुग्णाईत स्त्रीची सेवा किति एक निष्ठपणें व कशी केली तें प्रकरण ४० पृष्ट ४५२ व प्रकरण ५३ पृष्ट ६८५ येथें दिलें आहे.

व्यक्तींनीं शक्य तितक्या प्रबल व निर्दोष तर्क पद्धतीनें केलें आहे. तिघांचें सार काढलें तर रावसाहेब व्यावहारिक सुधारक होते असें निघतें. त्याच्या पलिकडे जाण्याचा त्यांचा विचार नव्हता म्हणून त्यांनीं केलेल्या समाज सेवेची किंमत कमी नाहीं. आपल्या सुवासानें लोकांस उद्भ्रान्त करणाऱ्या केतकीला फळें येत नाहींत म्हणून अथवा सर्वभर मधुर फळें धारण करणाऱ्या पनसाच्या वृक्षास सुवासिक फुलें येत नाहींत म्हणून, अथवा नागवल्लीला फळें व फुलें हीं दोन्हीं येत नाहींत म्हणून केतकी, पनस व नागवल्ली यांची किंमत कोणी कमी करीत नाहींत; कारण ज्या ज्या बाबतींत ज्याच्या अंगीं एकादा गुण अतिशयानें वसत असतो तो त्या त्या बाबतींत त्या गुणानें प्रख्यात होतो. नाहींतर नाना फडणीस तरवार बहादुर नव्हते म्हणून व शिवाजी महाराज कलम बहादुर नव्हते म्हणून व तुकाराम बुवा राजनीतिकुशल अथवा रणकुशल नव्हते म्हणून तिघेही अल्पार्ह ठरतील !

रावसाहेबांच्या राजकीय कामगिरीविषयीं क्वचित् व सामाजिक कामगिरीविषयीं कांहीं लोकांत मतभेद दिसून येतो. परंतु त्यांच्या व्यवहारमयूख व मनुस्मृति या हिंदुधर्मशास्त्रविषयक ग्रंथांविषयीं कोणांतही मतभेद दिसून येत नाहीं. मुत्सद्दी किंवा सुधारक म्हणून मिळालेल्या कीर्तीहून ग्रंथकार या नात्यानें मिळालेली कीर्ति अधिक वर्षें राहील. कारण राजकारण व समाजधोरण हीं जितक्या लवकर फिरतात तितक्या लवकर ग्रंथांतील विचार फिरत नाहींत. त्या वेळेस प्रचारांत असलेलें आणि सर्व आर्य व त्यांत सामील असलेल्या अनार्य जनांस लागू असलेलें धर्मशास्त्र ( कायदे ) मनुनें विलक्षण बुद्धि खर्च करून संघटित केलें. त्यांतील वचनांचा अथ बिनचूक लावण्यास रावसाहेबांच्या सटीकांचा उपयोग उत्तम होत आहे. अनेक मनुस्मृतीच्या प्रतींवरून क्षेपक भाग कोणता तें रावसाहेबांनीं निश्चित केलें. न्यायाधीशांस खऱ्या हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें न्याय देण्यास सुलभ केलें. रावसाहेबांनीं मनुस्मृतीच्या इतिहासांतील नवयुगासच आरंभ केला. त्यांच्या हिंदुधर्मशास्त्रविषयक ग्रंथांचे उपयोग अनेक

आहेत. त्यांतला पहिला एक असा कीं, हिंदुस्थान व युरोप यांमध्यें बौद्धिक दळण वळण ( गमनागमन ) सुरू झालें. *

हा त्यांचा इष्ट हेतु प्रथमपासूनच इष्ट प्रकारानें साधत गेला होता. युरो-

---

* हें बौद्धिक गमनागमन रावसाहेबांनीं आपल्या भाषणांमध्यें एक दोन प्रसंगीं स्पष्ट करून दाखविलें आहे.

प्रोफेसर मॉनियर वुइल्यम्स हे संस्कृतज्ञ इंग्रज विद्वान पंडित मुंबईस आले होते. त्यांच्या मनांत ऑक्सफर्ड येथें एक " आक्सफर्ड इन्स्टिटयूट " नांवाची संस्था काढावयाची होती. मोठें पदार्थसंग्रहालय बांधावयाचा होतें व हिंदी विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देण्याची सोय करावयाची होती. त्यांच्या सन्मानार्थ टाउनहॉल मध्यें ४।३। १८७६ त सभा झाली त्यावेळेस रावसाहेबांनीं भाषण केलें. त्यांत प्रोफेसर मजकुरांची रावसाहेबांनीं जी प्रशंसा केली तींत मुख्य मुद्दा हाच होता कीं युरोपांतील व हिंदुस्थानांतील लोकांत बौद्धिक दळणवळण ( गमनागमन ) सुरू होईल. एवढ्याच करतां वरील संस्था स्थापन व्हावी.

त्याचप्रमाणें इताली देशांतील काउन्ट गिबर्नेटीज या संस्कृत पंडितास मुंबई रॉयल एशिऍटिक सोसायटीचे मानाचे सभासद करावे अशी तिच्या एका सभेंत सूचना आली असतां अध्यक्ष या नात्यानें रावसाहेबांनीं केलेल्या भाषणांत हाच मुद्दा होता. रावसाहेब म्हणाले:—" अशा विद्वान पंडितास आमच्या सोसायटीचा सभासद केल्यानें आमच्या देशाचें, त्यांतील सारस्वताचें व हजारों वर्षे टिकलेल्या अशा चमत्कारिक पौर्वात्य संस्थांचें खरें ज्ञान युरोपांत पसरेल व असें होणें फार अवश्य आहे. × × × × यांनीं वाचलेला निबंध नवीनच आहे; पण आनंदकारक आहे. १८६४।६५ पासून इंग्रजी उताऱ्यां समवेत असा लहानच कां होईना पण संस्कृत निबंध येथें वाचला असतां हजर असण्याचा योग मला आला नाहीं. आज नवीन युगासच आरंभ झाला असें समजतों. याच्या योगानें या मंडळीच्या सभासदांत बराच उत्साह भरून येईल व त्याचें परावर्तन युरोपमध्यें होईल. ज्ञानवृद्धि होईल व युरोप व हिंदुस्थान यांच्या परस्पर साहाय्यानें दोघांची प्रगति होईल. "

पियन पंडित रावसाहेबांची ओळख करून घेण्यास त्यांस भेटावयास येत. ब्रिटिश म्युझियमचे मि. क्लार्क हे डॉ. बर्डवुड यांचें पत्र घेऊन आले होते. यांस हिंदु धर्माचें गहन ज्ञान मिळवावयाचें होतें. तेवढ्याकरतां त्यांनीं हिंदुस्थानचा प्रवास केला होता. त्याचप्रमाणें लॉबरन मॅक्स हे गृहस्थ भेटून गेले.

"आस्ट्रियन नोबलमन व रिशटॅकचा सभासद हा मुंबईस येत आहे. त्याला कांहीं हिंदुस्थानांतील लोकांच्या रीतीभाती पहावयाच्या आहेत त्याकामीं मेहेरबानी करून मदत करा." डब्ल्यू. जी. पेडर, यांचें पत्र २१।११।७९.

अमेरिकन प्रोफेसर लामन हे प्रोफेसर पिटरसन ( एल्फिन्स्टन कालेज ) यांचे पत्र घेऊन भेटावयास आले होते. सर वेडरबर्नें यांचें पत्र घेऊन "लाईट आफ् एशिया" चे कर्ते मि. एडविन आर्नोल्ड हे भेटून गेले.

रावसाहेबांचा ग्रंथ युरोपियन पंडितास हिंदुधर्मशास्त्राचा अभ्यास करावयास लावील असें आर. रोस्ट या इंडिया ऑफिस मधील विद्वान गृहस्थानें मत दिलें. प्रोफेसर मॅक्स मुल्लर यांनीं मत दिलें: "रावसाहेब वि. ना. मंडलिक यांची व आमची ओळख नव्यानें आतां होत नाहीं. ती जुनीच आहे. हिंदुधर्म शास्त्रावरील त्यांचा आधींचा ग्रंथ आमच्या फार उपयोगी पडला आहे. त्यांचें नांव इंग्लंदांत तसेंच जर्मनींत प्रसिद्ध झालेंच आहे. त्यांचा मनुस्मृतिविषयक ग्रंथ एक प्रमाणभूत होऊन राहील इत्यादि." प्रोफेसर मॉनियर वुइल्यम्स यांनीं रावसाहेबांच्या अगाध विद्वत्तेच्या उद्योगाची गाढ प्रशंसा करून लिहिलें:—"संस्कृत पंडितांत रावसाहेबांचें नांव अजरामर करण्यास हें स्मारक समर्थ होईल." प्रो. किल्हार्न यांनीं रावसाहेबांच्या धैर्ययुक्त उद्योगाची फार तारीफ केली. बर्लिन येथील प्रो. आल्बर वेबर हे आनंदाच्या भरांत म्हणाले: "ज्याच्या प्राप्तीविषयीं तुम्हीं तरुणपणीं दृढ आकांक्षा धरतां त्याची पूर्ण प्राप्ति वृद्धपणीं होते असें आमचा प्रसिद्ध कवि गीटि म्हणतो. चाळीस वर्षांपूर्वीं मी संस्कृताच्या अभ्यासास प्रारंभ केला. तेव्हां तुमचा ग्रंथ माझ्या स्वप्नाचा सुद्धां विषय झाला नव्हता. पण आतां केवढी प्रगति

तेव्हां पासून झाली आहे ! आतां संस्कृतविषयक व्युत्पत्तिशास्त्राचें केवढें रूपांतर झालें आहे ! श्रमविभागणीची अवश्यकता आहे. तुमचा ग्रंथ पुढील मंदिराचा पाया आहे. विविध माहितीची खाणच आहे. आमच्या सर्व साधारण अभ्यासविषयांत तुम्हीं प्रभूत भर घालण्याचें कार्य केलें आहे. " पंडित **महेशचन्द्र** न्यायरत्न म्हणाले:—" तुमचा ग्रंथ पाहून झालेला आनंद व्यक्त करण्यास मी असमर्थ आहें. तुमचा ग्रंथ उत्कृष्ट व प्रमाणभूत झाला आहे. तुम्हीं किति मानसिक व शारीरिक श्रम घेतले आहेत ते तेव्हांच कळून येत आहेत. मनूचें पुरातन स्वरूप दाखवून देण्याचे तुमचे प्रयत्न प्रशस्य आहेत.'

वकील, वर्तमान पत्राचे लेखक, सार्वजनिक काम करणारे कर्ते पुरुष कलकत्त्याच्या काउन्सिलांत सभासद इ. कारणांवरून रावसाहेबांची कीर्ति जी स्वदेशाच्या विस्तारानेंच व्याप्त होती ती या धर्मविषयक ग्रंथानें सर्व देशांत व युरोपांत पसरली. **रा**वसाहेबांच्या कीर्तीला तोच ग्रंथ सर्वांत अधिक चिरायु करील.

दुष्काळासारख्या राष्ट्रीय संकटकालीं **रा**वसाहेबांनीं केलेली सेवा प्रशंसनीय आहे. याशिवाय देशाची सामाजिक व राजकीय उन्नति करण्याकडे जसें **रा**वसाहेबांचें लक्ष असे तसें औद्योगिक उन्नति करण्याकडेही लक्ष असे. धंदेशिक्षणाच्या शाळा काढण्याकरतां व प्रदर्शनें भरविण्याकरतां त्यांचे प्रयत्न चालू असत. प्र. ६६ पृ. ८१२ पहा. प्र. ७७ पृष्ठें ८८१,९८३ पहा. आपल्या देशांत या शिवाय गंगाशुद्धि, गोरक्षण, आर्य वैद्यक व पाश्चात्य वैद्यक यांचें मिश्र ज्ञान देण्यास उच्च शाळा काढणें या विषयांकडेही त्यांचें लक्ष असे. प्र. ६१–६२ पहा.

प्रिय वाचकहो ! **रा**वसाहेब हे आपल्या वाचकांची ओळख नसून वर्तमानपत्रांत लेख लिहिणारे नव्हते. त्यांनीं जीं कार्यें केलीं तीं अगदीं उघडपणें केलीं. ते स्वतां विचार करणारे होते व श्रीमंत सरदार **गणपतराव विनायक** ऊर्फ **बाबासाहेब सांगलीकर**, पुणें येथील **रा**वसाहेबांच्या स्मारकसभेचे अध्यक्ष,

म्हणाले त्याप्रमाणें, “ सर्व राजकीय, सामाजिक, औद्योगिक प्रश्नांविषयीं त्यांचीं ठरींव मतें होतीं व तीं त्यांच्या गेल्या ३० वर्षांच्या प्रत्यक्ष आचरणानें सिद्ध होतीं. ” ते साक्रिय पुरुष होते. उगाच नुसत्या युक्तीच्या चार गोष्टी सांगणारे नव्हते. अंगीं संघटनाचातुर्य पुष्कळ होतें. त्यांचें कार्यक्षेत्र विस्तृत, त्यांचीं कार्यें विविध, व ज्या काळांत तीं त्यांनीं करून दाखविलीं त्याचा अवधिही मोठा त्यामुळें त्यांच्या चरित्राच्या उपसंहाराचा शेवट करतांना त्यांच्या कृतीचें यथोचित संक्षिप्त वर्णन आपल्या शब्दांत सादर करणें, प्रस्तुत अल्पमति ग्रंथकारास अशक्य आहे म्हणून तें प्रसिद्ध महाराष्ट्रीय वक्ते महादेव मोरेश्वर कुंटे यांच्या व प्रसिद्ध मराठी लेखक प्रोफेसर गोपाळराव आगरकर यांच्या ( ज्या उभयतांनीं रावसाहेबांच्या जिवन्तपणींच त्यांचें स्मारक करण्याकरतां पुणें येथें भरलेल्या सभेंत मोठीं वक्तृत्वपूर्ण भाषणें केलीं त्यांच्या ) व मुंबई विश्वविद्यालयाचे व्हाईस चॅन्सेलर सर रेमन्ड वेस्ट यांच्या शब्दांत सादर करण्यांत येत आहे.

रावसाहेबांचें कडक नैतिक आचरण; मित्रांच्या भूल पाडणाऱ्या वर्तनास दाद न देणारा त्यांचा मनोनिग्रह; खोत, इनामदार, जहागीरदार, संस्थानिक, व बहुजनसमाज, यांच्या हक्कांच्या संरक्षणार्थ केलेली सेवा; निर्भीड कर्तव्यपरता; मुंबईच्या म्युनिसिपॅलिटींत व दोन्हीं काउन्सिलांत केलेलीं भाषणें यांकडे लक्ष द्यावयास सांगून महादेव मोरेश्वर कुंटे म्हणाले:—“रावसाहेब माझ्या ओळखीचे आहेत म्हणून नव्हे, ते ब्राह्मण आहेत म्हणून नव्हे; परंतु त्यांचें वर्तन मनोदेवतेच्या आज्ञेस धरून आहे, ते व्यावहारिक सुधारक आहेत व बहुजन समाजाचा त्यांस पाठिंबा आहे म्हणून त्यांचा मान केला पाहिजे. ह्या गुणांचें वास्तव्य ज्याच्या अंगांत असेल मग तो पारसी असो अथवा मुसलमान असो त्याला मान दिला पाहिजे. ”

प्रथम रावसाहेबांच्या शीलाची वाखाणणी करून, प्रो. आगरकर ह्मणाले “ मंडलिकांसारख्या लोकांमुळें राष्ट्र मोठेपणा पावतें. त्यास सन्मान्य पद प्राप्त

होतें. त्यांचें उदाहरण मी आमच्या तरुण पिढीला अनुकरण करण्यास सर्वथा उचित म्हणून घ्यावयास सांगतों." मुंबईच्या काउन्सिलांत, सर जेम्स फर्ग्युसन यांचे व रावसाहेबांचे दोन हात कसे झाले तें सांगून पुढें आगरकर म्हणाले "मंडलिक यांच्या भावना प्रबळ असतात व त्या प्रबळ झाल्या म्हणजे प्रबळ प्रकारेंच त्यांचा उच्चार करतात. मनाची पक्की खातरी करून घेणाऱ्यांपैकीं ते एक आहेत व एकदां पक्की खातरी झाली कीं अमूक एक आचरणपद्धति न्याय्य आहे, युक्त आहे असें निश्चित झालें म्हणजे तिचा स्वीकार करावयास ते मागें घेणारे नव्हत. सर्व जगानें विरोध केला तरी ते मागें घेणारे नव्हत. या काळीं आम्हांला अशा पुरुषाची जरूर आहे." नंतर सुप्रीम काउन्सिलांत इनकमटॅक्स लादण्याच्या विरुद्ध मर्दाप्रमाणें रावसाहेबांनीं कसा झगडा केला व आयात मालावरील जकात उठविण्याच्या विरुद्ध कसा जबरदस्त विरोध केला तें सांगून पुढें म्हणाले:—"भाट्ये, पारसी, मुसलमान या तिन्हीं समाजांत सख्य प्राप्त करून घेणारे मंडलिक हे पहिलेच हिंदु होत. *

* मुंबईत पूर्वी पुढारीपण म्हणजे जाती जातींच्या 'महाजना' कडे असे. व तें पुष्कळ असे. जगन्नाथ शंकरशेट हे दैवज्ञ ब्राह्मणांचे; गोकुळदास तेजपाळ व लखमीदास खिमजी हे भाट्या जातीचे; सर मंगळदास नथुभाई, वरजीवनदास माधवदास बनिया जातीचे; भाऊ दाजी, नारायण दाजी व दाभोळकर बन्धु सारस्वत ब्राह्मणांचे; सर जमशेटजी जिजीभाई पारशी जातीचे; महंमदअल्ली रोगे व काजी मुर्गे हे मुसलमानांचे; नाना मोरोजी प्रभु जातीचे; केशवजी नाईक हे खत्री जातीचे पुढारी होते. इ. इ. रावसाहेबांच्या अगोदर सर्व हिंदूंचें पुढारीपण जगन्नाथ शंकरशेट यांकडे बरेंच होतें. त्यांच्या वयाच्या चरणार्धांत डाक्तर भाऊंकडे संयुक्त होतें. परंतु रावसाहेबांनीं सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांचें पुढारीपण मिळविलें. (पहा महादेव गोविंद रानडे यांचें पत्र. प्र ४१ पृष्ठ ४९५.) पृथक्पणें संघटित रचनेच्या कामीं जातीच्या किंवा धर्मांच्या लोकांच्या बाहेर शून्यात्मक असणाऱ्या या महाजनांस म्हणजे जातीच्या व धर्मांच्या पुढाऱ्यांस रावसाहेबांसारखा सर्वमान्य एक (एकसंख्यात्मक) मुख्य मिळतांच सर्व बहुजन समाजाची—सर्वजातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांची—किंमत वाढण्यास ते पुढें दिलेल्या श्लोकाप्रमाणें कारण झाले.

कारण रावसाहेबांचा कौटुंबिक शुचिर्भूतपणा, स्वतंत्रपणाचा बाणा, इच्छाशक्तीचें प्राबल्य, सार्वजनिक कामासंबंधें कडक नैतिक वर्तन, नियमित संवयी, उद्योगप्रियता, देशाभिमानयुक्त पुरातन मताभिमान या सर्व गुणांनीं ते अनुकरणीय झाले आहेत. ”

रावसाहेबांनीं विश्वविद्यालयांत आजन्म लोकांची कामगिरी केली तिची प्रशंसा करतांना सर रेमन्ड वेस्ट एका पदवीदानाच्या समारंभाच्या प्रसंगीं म्हणाले:—आमच्या संस्थेंत मुंबई विश्वविद्यालयांत जीं उत्तम व सर्वांत योग्य माणसें होऊन गेलीं त्यांच्या नांवाप्रमाणें रावसाहेबांचें नांव सुप्रतिष्ठित होईल. त्यांच्या अंगीं सल्पिशस, * व्हेरो, व मसीनास या प्रत्येकाचे गूण व सर्वत्रांची कीर्ति एकवटलेली आहे. प्र. ३३ पृष्ठ ३८० पहा.

यानंतर एका शब्दांत रावसाहेबांचें वर्णन करावयाचें म्हणजे ते मोठे होते. मोठे हें विशेषण रावसाहेबांस लावून त्यांचे पुरस्कर्ते, गुरु, व जन्माचे मित्र ज. जेकब यांनीं मोठेपणाची व्याख्या दिली आहे ती देऊन हा ग्रंथ पुरा करण्यांत येत आहे. “ दुसऱ्या कोणाचें आपल्यावर वजन पडूं देऊन त्याखालीं दडपून जाऊन, दुसऱ्याच्या इच्छेप्रमाणें चालून, गुलामाप्रमाणें वागण्याची पद्धत पुष्कळ हल्लीं आढळते; पण आपल्या हक्कांचें संरक्षण प्रतिपक्षी कितीही बलिष्ठ असले तरी करण्याचा निश्चय दाखविणें हेंच मोठ्या माणसाचें लक्षण होय.”

ज. जेकब यांचें पत्र १७।१२।६५

---

। मुख्यमेकं पुरस्कृत्य शून्यात्मानोऽपि साधकाः ।
॥ भवंति तं विना नैव यथा संख्यांकबिन्दवः ॥ १ ॥

* सल्पिशस हा रोम शहरांत प्रसिद्ध वक्ता, मुत्सद्दी व कायदे पंडित होऊन गेला. व्हेरो हा रोम शहरांत एक मोठा पंडित व लेखक होऊन गेला. मसीनास हा नेपोलियनचा युद्ध कलाकुशल मोठा सैन्याधिकारी होता.

या मोठेपणाच्या व्याख्येप्रमाणें प्रतिपक्षी कितिही प्रबळ असले तरी आपल्या हक्कांचें प्रतिपादन करणें व त्यांचें रक्षण करण्याचा निश्चय दाखविणें हाच रावसाहेबांच्या अंगचा प्रधान गूण होता. हाच एक गूण त्यांच्या गुणमालेंतील प्रत्येक मण्याला विद्ध करून होता. त्याचाच आश्रय धरून इतर गूण त्याला पोषक झाले होते. त्याच गुणानें इतर सर्व गूण रंजित झाले होते. त्याच गुणाचें रूप इतरांस प्राप्त झालें होतें. म्हणून ज. जेकब म्हणतात त्याप्रमाणें एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे रावसाहेब मोठे होते यांत संशय नाहीं. अशा मोठ्यापुरुषांची राष्ट्रांस गरज असते. व तसे पुरुष हें चरित्र वाचून निर्माण होवोत.



# चरित्रांत आलेल्या लोकांच्या बहुतेक नांवांची सूची.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२ | टीप १ | नागपूरकर वैद्यास | एका वैद्यास |
| २४ | १३ | आहे ) | आहे त्यांकडे ) |
| २६ | १७ | शिष्यवृत्ती | शिष्यवृत्या |
| ३६ | ७ | अनीतिलमूलक | अनीतिमूलक |
| ४६ | १ | व | व मंडळी |
| ६३ | १८ | विलसतः स्तावत् | विलसतस्तावद् |
| ७१ | ३ | भाषांतर करविण्याचें | भाषांतर करण्याचें |
| ,, | २३ | नमुने | मसुदे |
| ७२ | टीप १ | महादेवराव बर्वे | माधवराव बर्वे |
| ८० | ६ | द्वार्भावे | द्विर्भावे |
| ८७ | २ | बागुळ | बागुल |
| ९० | ७ | दिगदर्शन | दिग्दर्शन |
| १०६ | ४ | दिवस कळवा म्हणजे मेणा अथवा डोली करून यावें | मेणा अथवा डोली करून यावें |
| ११४ | १४ | बेडरबर्न | वेडरबर्न |
| १२५ | १३ | एब | एव |
| १३२ | २३ | कळूं लागल्यास | कळूं लागण्यास |
| १३३ | १२ | आठले | आठल्ये |
| १५२ | २० | सतत उद्योग व सतत आनंद होण्यास सतत निरपेक्ष अथवा विरक्त कर्म करण्यानें होतो. | सतत आनंद, सतत निरपेक्ष अथवा विरक्त कर्म करण्यानें होतो. |
| ,, | २४ | नसरवानजी कामा | खरसेटजी नसरवानजी कामा |
| १६४ | ७ | होतें | आहे. |
| १७३ | २ | अ.पली बुद्धिसर्वस्व | आपलें बुद्धिसर्वस्व |
| १७६ | २५ | न्यायाधीशीकडे | न्यायाधीशांकडे |
| १९९ | १७ | कोणाला ठाउक ? | कोणाला ठाऊक ! |
| २०३ | २१ | ताज्या प्रचलित विषयांवर अगदीं टीका | अगदीं ताज्या प्रचलित विषयांवर टीका |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २०४ | १३ | त्यांस नारायण महादेव परांजपे हे येऊन मिळाले. नारायण महादेव यांस त्यांचे बंन्धु हरिभाऊ पराजपे साहाय्य करूं लागले. | नारायण महादेव परांजपे हे येऊन संस्थेस मिळाले होते. त्यांस त्यांचे बन्धु हरिभाऊ पराजपे साहाय्य करूं लागले. |
| २१२ | १८ | नावड्याप्रमाणें | नावाड्याप्रमाणें |
| २२४ | २ | रेव्हिन्यू सर्वे | रेव्हिन्यू सर्व्हे. |
| २२५ | टीप १ | villaje | village |
| २४१ | टीप ६ | ३० वर्षे | २० वर्षे |
| २४८ | १३ | या सभेत बॉम्बे असोसिएशनचे | बाम्बे असोसिएशनचे |
| २५६ | ९ | डॉक्टर भाऊ; विनायक गंगाधर शास्त्री; | डॉक्टर भाऊ; |
| २९६ | १८ | हिंत्दुवाची | हिंदुत्वाची |
| ३१३ | ४ | शंक-चार्यांकडून | शंकराचार्यांकडून |
| ३५१ | २० | पृथुकरण | पृथक्करण |
| ३५३ | १६ | पृष्ठ पहा | पृष्ठ ३४६ पहा. |
| ३७८ | ५ | तुम्हीं केलीत | तुम्हीं केलात |
| ३७९ | १ | रामसाहेबांस | रावसाहेबांस |
| ३८२ | २० | दीवसार्धा पुरता | दिवसार्धा पुरता |
| ३८४ | ४ | प्रोफेसरवर | प्रोफेसरांवर |
| ,, | २२ | अधिकाऱ्यांनीं | अधिकाऱ्यांना |
| ३८९ | २२ | कामगारांना | कामगारांनीं |
| ३९१ | २१ | ४१ व ४२० | ४१ व ४२ |
| ३९५ | १२ | त्याच्या | त्याचा |
| ४०० | ४ | दिला | दिलें |
| ४१३ | १ | ख्रितवासी | ख्रिस्तवासी |
| ,, | १६ | लोकांचें | लोकांची |
| ४१६ | १४ | वक्र्तृत्वसमारंभ | वक्तृत्वसमारंभ |
| ४१९ | ६ | आसत | असत |
| ४२२ | १० | संबंध | सबंध |
| ४२९ | टीप १ | सुभाषिचा | सुभाषिताचा |
| ४३७ | २० | घरच्या | पहिल्या घरच्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४४३ | १५ | निघालें | निघाले |
| ४४४ | १७ | प्रहारानंतर | प्रहारानंतर |
| ४४६ | ५ | सबव | सबब |
| ४५२ | ४ | धांवति | धावति |
| ४७४ | २२ | सोडूत | सोडून |
| ४८० | ९ | १०,००० क | १०,००० रु० |
| ५१७ | १६ | असें नळ | असे नळ |
| ५३३ | २ | जोडवयाचा | जोडावयाचा |
| ५३५ | २० | ह्मणणें | म्हणणें |
| ५३६ | २ | त्यांच्या | त्याच्या |
| ६०६ | ११ | लॅग | लॅन्ग |
| ६२४ | २३ | हिंदुस्थानांच्या | हिंदुस्थानाच्या |
| ६२७ | २ | ह्मणतात | म्हणतात |
| ,, | १७ | खुद | खुद्द |
| ६४७ | १६ | मुलकीं | मुलकी |
| ६६५ | १३ | भाषांतर | भाषांतर स्वकृत |
| ६६९ शिरोभाग | | ५० वें | ५१ वें |
| ६७१ | ,, | ,, | ,, |
| ६७३ | ,, | ,, | ,, |
| ६७५ | ,, | ५१ वें | ५१ अ वें |
| ,, | १४ | प्रकरण ५१ वें | प्रकरण ५१ अ वें |
| ६७७ शिरोभाग | | ,, ,, | ,, ,, |
| ६८० | १४ | पासूत | पासून |
| ६९८ | ६ | ऊाळे | काळे |
| ७०१ | ११ | इन्स्टिटट् | इन्स्टिटयूट |
| ७०३ | १६ | नेलें | नेला. |
| ७११ | टीप ६ | वडस्वर्य | वर्डस्वर्थ |
| ७१७ | ,, २ | करावयास | करावयाच्या |
| ७२८ | १७ | माझें | माझे |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७३२ | १७ | ब्लॅक बुड | ब्लॅक वुड |
| ७५१ | १५ | वैद्यंशाळेची | वैद्यशाळेची |
| ,, | २१ | करण्यांस | करण्यास |
| ७६२ | ११ | मदनमोहन | मनमोहन |
| ७६७ | २३ | बॅरा | बॅरो |
| ७६९ | टीप २ | + अलौकिक बुद्धीचे वाङ्मयात्मक लेखक व भाषणकर्ते | + चीफ जज्ज कलकत्ता हायकोर्ट |
| ७७० | ३ | अमारअल्ली | अमीरअल्ली |
| ७९५ | ७ | बाद्ध | बौद्ध |
| ८२९ | ११ | रामवर्ग | रामवर्म |
| ८३३ शिरो-भाग | | ६७ वें | ६८ वें |
| ८३५ | ,, | ,, | ,, |
| ८३७ | ,, | ६८ वें | ६८ अ वें |
| ,, | १ | प्रकरण ६८ वें | प्रकरण ६८ अ वें |
| ८३९ शिरो-भाग | | ,, | ,, |
| ८४१ | ,, | ,, | ,, |
| ८४३ | ,, | ,, | ,, |
| ८४५ | ,, | ,, | ,, |
| ८४७ | ,, | ,, | ,, |
| ८४९ | ,, | ,, | ,, |
| ८५१ | ,, | ,, | ,, |
| ८६१ | ५ | न्यायमूर्तिंद्वयांचें | न्यायमूर्तिद्वयाचें |
| ८८८ | २० | बळकटी | बळकटी |
| ८९० | २५ | वागवीर | वाग्वीर |
| ९१९ | ३ | तीं | तों |
| ११५४ | १० | असेंच | असाच |
| १२२६ | ९ | वेडरबॅन | वेडरबर्न |

( छापतां छापतां कान्हे, मात्रा, अनुस्वार इत्यादी मध्येंच उडून गेल्यानें कांहीं प्रतीत आणखी चुका झाल्या आहेत त्या ओळखण्यासारख्या आहेत. )